# आंतरराष्ट्रीय समाजवाद

लेखक

केशव गोरे



चेतना प्रकाशन लिमिटेड, हैद्राबाद

# आंतरराष्ट्रीय समाजवाद

लेखक

केशव गोरे



चेतना प्रकाशन लिमिटेड, हैद्राबाद

किंमत पांच रुपये

# अनुक्रम

# प्रास्ताविक

**समाजवाद** हा आजचा युगधर्म आहे. जें तत्त्वज्ञान समाजाची धारणा करण्याइतकें शक्तिमान व प्रभावी असतें तेंच धर्म या संज्ञेस प्राप्त ठरतें. मानववंशाच्या विकासी व गतिमान इतिहासात समाज या शब्दाची व्याप्ति व जाणीव सतत व्यापक व सखोल बनत गेली आहे. आज समाजाच्या धारणेचा विचार हा अखिल मानवसमाजाच्या धारणेचा विचार बनला आहे. आमची समाजविषयक जाणीव जेव्हां खरीखुरी विश्वकुटुंबवादी बनेल तेव्हांच मानव-समाज एकजीव होईल. समाजवादाचें तत्त्वज्ञान ही सहोदर भावना निर्माण करूं मागत आहे; अखंड विश्वांतील मानवांत विश्वसंवेदना जागृत करूं पाहात आहे. पण ही विचारांतील विशालता, उदारता व भव्यता जेव्हां सर्व मानवांची सहजप्रवृत्ति बनेल, आपल्या आचरणांत व आपल्या समाजजीवनांत जेव्हां हे विचार प्रतिध्वनित व प्रतिबिंबित होतील, तेव्हांच ते फलद्रूप होतील.

इतिहासकालीन धर्मांचा उगमहि समाजधारणेचें उद्दिष्ट सफल करण्याच्या हेतूंतूनच झाला. पाप–पुण्य, नरक–स्वर्ग, पुनर्जन्म–मोक्ष, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान, सर्वगुणसंपन्न ईश्वर या कल्पना, आज तर्क वा बुद्धीनें सिद्ध होवोत वा न होवोत समाजाचा गाडा सुरळीत चालवा, असंतुष्ट मानवांनींहि प्राप्त कर्म पार पाडावें या हेतूनेंच रूढ केल्या गेल्या. आजहि धर्मांचें हें काल्पनिक मूल्य समाजधारणेस अत्यावश्यक आहे असें, अज्ञच नव्हेत तर, कित्येक बुद्धिवादिहि मानतात. पण स्वतः व विधाता यांचे प्रत्यक्ष संबंध स्थापूं पाहाणारी व्यक्ति व त्यानुसार तिनें निश्चित केलेली नीति समाजाला जबाबदार राहात नाहीं; समाजाच्या योगक्षेमाची टोंचणी तिला अस्वस्थ करीत नाहीं. एकाहून अधिक धर्म निरनिराळ्या मानवी समूहांत उगम पावल्यावर त्यांचें अधिष्ठित दैवत, त्यांची शिकवण, त्यांचा आचार धर्म, त्यांची अंधश्रद्धा कालांतरांत मानवी समाजजीवनांत

असहिष्णुता व धर्मवेड पसरविण्यास कारणीभूत झाली. धर्मांची जागा धर्मपीठांनीं व कर्मकांडांनीं घेतल्यावर धर्मप्रचारकांनीं व पुरोहितांनीं या मूल्यांचा वापर जनतेला गुलामगिरींत व अज्ञानांत ठेवण्यासाठीं केला. तेव्हां विज्ञान व स्वातंत्र्याची जनमनांत प्रतिष्ठापना करूं पाहाणाऱ्या विचारांना धर्मांचीं हीं काल्पनिक मूल्यें आज अडथळा होऊन बसलीं आहेत. ऐहिक सुखसाधना व समाजाचा सर्वांगीण विकास हीं ध्येयें क्षणभंगुर, आत्मशून्य व नैतिक दृष्ट्या कनिष्ठ आहेत ही भावना प्रसृत करण्यांत या धर्मविचारांचा फार मोठा वांटा आहे. कित्येक समाज अज्ञ राहाण्यास व अज्ञ समाजांत नैराश्य व उदासीन वृत्ति पसरण्यास ते मानवी इतिहासांत कारणीभूत झाले आहेत. अशा कित्येक समाजांतील वैज्ञानिक जिज्ञासा, भौतिक भरभराट, बौद्धिक व मानसिक वाढ खुरटली आहे. विश्वांतील गूढतम व्यापार व त्यांचे नियम, अनन्ताचा शोध ही कुतूहल, जिज्ञासा, संशोधन व विज्ञान यांची प्रेरणा आहे. त्याचें ठोस पण काल्पनिक उत्तर देणारा धर्मच अहंकारी आहे; संशोधन व विज्ञानाच्या मार्गे त्यांचा शोध घेत असतां जें तर्क व बुद्धीनें सिद्ध झालें नाहीं तें सिद्ध नाहीं असें सांगणारी शिकवण अहंकारी म्हणणें विपर्यस्त ठरेल. प्रेम, त्याग, शौर्य हे श्रेष्ठ मानवी गुण काल्पनिक धर्ममूल्यांच्या साधनेंतच विकास पावतात, सामाजिक ध्येयांच्या पूर्तींत ते अत्युच्च शिखर गांठूं शकत नाहींत, असेंहि मानवी इतिहास सांगत नाहीं. इत्यर्थ भावी मानवी समाज धारणेला इतिहासकालीन धर्मांची अगर काल्पनिक धर्ममूल्यांची निखालस जरूरी आहे हा दावा खरा नाहीं; नव्हे, सामाजिक ध्येयांच्या उद्दिष्टपूर्तींत तीं आज अडथळाच ठरलीं आहेत अगर ठरणार आहेत.

समाजवादी तत्त्वज्ञानाची ऐतिहासिक पार्श्वभूमि ज्या आधुनिक युरोपीय संस्कृतींतून तयार झाली त्या संस्कृतीची वाढ—धर्मसंस्थेपासून सुबुद्ध युरोपीय जनतेनें स्वतःची वाढती मुक्तता करून घेतली, गुलामी व जन्मजात कर्माविरुद्ध बंड उभारून आपल्या कर्तृत्व व गुणानुसार व्यवसाय स्वातंत्र्य अनुभवलें व संशोधन व विज्ञानाची दृष्टि स्वीकारून विश्वांतील भौतिक शक्तींचें रहस्य उकललें व त्या शक्ति भौतिक उत्कर्षासाठीं राबवल्या—म्हणूनच झाली. स्वातंत्र्य, समता व बंधुत्वासारखीं त्यांचीं ऐहिक बुद्धिगम्य ध्येयें समाजनिष्ठ होतीं;

पारलौकिक सुख वा मोक्षासारखीं व्यक्तिनिष्ठ नव्हतीं. साहजिकच हीं ध्येयें कार्यान्वित करणाऱ्या नव्या समाजसंस्थांना धर्मसंस्थेहून वरचढ महत्त्व प्राप्त झालें. त्या समाजसंस्था कर्मठ, ध्येयशून्य वा प्रतिगामी बनल्यावर क्रान्तिमार्गे त्या उधळून लावण्यांत जनतेला खन्त वाटली नाहीं. देव वा दैवी भावनांचे अडथळे त्यांना रोखूं शकले नाहींत. राजकीय स्वातंत्र्य व प्रातिनिधिक लोकशाही देणारी भांडवलशाही समाजव्यवस्था गुलामगिरीचा अंत करूं शकली; पण आर्थिक विषमता व पिळवणूक तिनें दृढ केली तेव्हां समाजवादी विचारपरंपरेचा उदय झाला. फ्रेंच राजक्रान्तींतील क्रान्तिप्रेरणा स्वातंत्र्यनिष्ठ होती तशीच समताभावीहि. पण त्या क्रान्तींतूनजन्म पावलेल्या शासनसंस्थेनें समतेच्या भावनेवर कायदानिष्ठ मालकी हक्काचा रूळ फिरवल्यावर समतेचें अधिष्ठान असलेल्या समाजवादी विचारपरंपरेनें व चळवळींनीं उचल खाल्ली. औद्योगिक क्रान्तींतून साकार बनलेलीं एका इंग्लंडचीं दोन इंग्लंडें जागृत व सुसंघटित कामगार व समाजवादी चळवळ निर्माण होण्यास कारणीभूत ठरलीं. भांडवलशाहीनें जन्म दिलेल्या लोकशाही संस्था व संघटना नंतरच्या इतिहासांत शोषित वर्गाला साहाय्यक ठरल्या. देशाच्या भौतिक प्रगतीस व सांस्कृतिक विकासास चालना देणारें राष्ट्रवादाचें तत्त्वज्ञान कांहीं राष्ट्रांत आक्रमक बनल्यावर आंतरराष्ट्रीय विचार वा आंतरराष्ट्रीय संस्था उदयास आल्या. निम-वसाहती व गुलाम राष्ट्रांतील स्वातंत्र्य चळवळींनीं साम्राज्यशाहीविरोधी चळवळींचें स्वरूप धारण केलें. समाजनिष्ठ ध्येयें व सामाजिक संस्था, जागतिक युद्धें व जागतिक संकटें माणसाच्या बुद्धीला व सहकारी भावनांना आज आव्हान ठरलीं आहेत. पारलौकिक भवितव्याचें चिंतक आज स्वतः आपल्या भवितव्याचे विधाते बनूं मागत आहेत. समाजवादी तत्त्वज्ञान व चळवळी या समाजमंथनाचेंच एक भव्य दर्शन आहेत. म्हणूनच त्यांचा ओझरता परिचय व परामर्श या पुस्तकांत घेण्यांत आला आहे.

भांडवलशाही उत्पादनपद्धति व खाजगी मालकी, नफा व स्पर्धानिष्ठ अर्थोत्पादन व आर्थिक शोषण यांना सर्व पंथांच्या समाजवाद्यांनीं प्रखर विरोध केला असला तरी समतेच्या कल्पनेची व्याप्ति, शासनसंस्थेचें स्वरूप व भवितव्य,

औद्योगिक संबंध, सर्व उत्पादन साधनांवरील राष्ट्रीय वा सामाजिक मालकी, सामुदायिक वा सहकारीशेती, सार्वत्रिक मतदान पद्धतीवर आधारलेली लोकशाही राज्यव्यवस्था वा कामगारहुकुमशाही, युद्धें व जागतिक व्यवस्था या प्रश्नांवर समाजवादी विचारांत व चळवळींत तीव्र मतभेद आढळून येतात; तर मार्क्सवादी चळवळींत शिरलेलें शब्दप्रामाण्याचें संकट व दुराग्रह, कम्युनिस्ट चळवळींतील केन्द्रीय आंतरराष्ट्रीय मार्गदर्शन, कामगार चळवळींतील फाटाफूट यांनीं समाजवादी विचार व चळवळी यांना आज धोका निर्माण झाला आहे. साध्यसाधन विचार, आर्थिक व राजकीय सत्तेच्या केन्द्रीकरणाचा प्रश्न, क्रांतिपूर्वकालांत नव समाजपेशींची निर्मिति, समाजाच्या नवउभारणीची समस्या व शाश्वत शान्ततेची व्यवस्था या प्रश्नांवर समाजवादी तत्त्वज्ञानाचा अखेरचा शब्द लिहून झालेला नाहीं व तें युक्तच आहे. अर्थात् जे मार्क्सवादी नाहींत ते खरे समाजवादीच नव्हेत असें आग्रहानें प्रतिपादणाऱ्यांवर मात्र मार्क्स, एंगल्स, लेनीन यांच्या लिखाणांतूनच या प्रश्नांचीं उत्तरें शोधण्याची पाळी येते व गतिमान आणि विकासी मानवी जीवनांत तीं उत्तरें अचुक मार्गदर्शन करण्यास असमर्थ ठरण्याचाच संभव अधिक आहे.

व्यक्तिगत स्वातंत्र्य कीं आर्थिक सुरक्षितता यांपैकीं तुम्हांस कोणतें अधिक पसंत आहे असा सवाल भांडवलशाही अमेरिका व सोव्हिएट रशिया यांनीं जगांतील जनतेपुढें टाकून त्यांचा बुद्धिभेद चालवला आहे. पण हीं दोन सामाजिक मूल्यें परस्परविरोधी वा विसंवादी नाहींत. प्रातिनिधिक लोकशाहीचें घटनात्मक साधन अगर केंद्रानुवर्ती कम्युनिस्टपक्षाची कामगारहुकुमशाही हे दोनच समाजपरिवर्तनाचे मार्ग जनतेपुढें आहेत हेंहि खरें नाहीं. हिंदी समाजवादी चळवळीनें स्वीकृत केलेल्या समाजपरिवर्तनाच्या लोकशाही साधनांत घटनात्मक बहुमताबरोबरच कामगारचळवळी, सहकारी चळवळी व प्रस्थापित सरकारचा शांततामय प्रतिकार यांचा समावेशहि करण्यांत आला आहे. व्यक्तिगत वा संघटनात्मक स्वातंत्र्याचें प्रस्थापितसरकारनें हरण केलें तर हिंसात्मक प्रतिकारहि अटळ ठरेल असें त्यांत म्हटलें आहे. पण सामाजिक चळवळींत साध्यसाधनांचा विचार होण्याचा गांधीजींनीं धरलेला आग्रह व

शांततामय प्रतिकाराचें—सत्याग्रहाचें—त्यांनीं शिकविलेलें तंत्र याकडे समाजवादी चळवळीनें दुर्लक्ष करतां कामा नये. तसेंच प्रस्थापित सत्तेनें पूर्ण हुकुमशाही राजवट स्थापल्यावर हिंसात्मक प्रतिकार करणें क्रमप्राप्त बनेल म्हणून वाट पाहात न बसतां व त्याच्या तयारींत न गुंततां ती तशी बनण्यापूर्वीच तिला शान्ततामय प्रतिकारद्वारां पदभ्रष्ट करण्याची सामुदायिक हालचाल समाजवादी चळवळीला करावी लागेल. तेव्हां हिंदी समाजवादी चळवळी पुरतेंच बोलावयाचें तर बहुसंख्यजनतेच्या पाठिंब्यावर हिंदी राज्यसत्ता संपूर्ण हुकुमशाही बनूं न देतां समाजपरिवर्तन घडवून आणणें हीच तिची साधना ठरते; त्यामुळें लोकशाही व आर्थिक समता या दोन्ही ऐतिहासिक मूल्यांचें संवर्धन होऊं शकेल. लोकशाही समाजवादाची हीच निष्ठा आहे.

हिंदी जनतेनें राजकीय स्वातंत्र्य मिळवून गेलीं आठशें नऊशें वर्षे व्यथित व सुस्त होऊन पडलेल्या हिंदी समाजव्यवथेला पुनश्च गदगदा हलवलें आहे. पण गुलामगिरीच्या शृंखला गळून पडल्या तरी आर्थिक शोषण व सामाजिक विषमता यानीं करकचून आवळलेलें समाजशरीर हातपाय मोकळे करून पुढें वाटचाल करण्यास आजहि असमर्थ आहे. आपलें स्वातंत्र्य देश द्विखंडित होऊनच साकार बनलें. धर्मवेड्या भावनांनींच हा पहिला वार केला. आपल्या राष्ट्रपित्याची हत्याहि धर्मवेडांतूनच झाली. पण त्याहूनहि भयंकर अशी जात-भावना या समाजशरीराच्या रोमरोमांतून भिनली आहे. माझें राष्ट्र वा माझा समाज याहून माझी जात हाच समाजमनांतील आज तरी प्रभावी विचार आहे. जातिव्यवस्थेला धक्का न लावण्याचें धोरण अनुसरूनच मोंगलानीं व ब्रिटिशांनीं येथें राज्य केलें व काँग्रेसची राजवटहि त्या जातिभावनेला शरण जाऊनच राज्य-कारभार करूं मागत आहे. समाजवादी वैचारिक क्रान्तीच्या अभावीं वा तीं पूर्ण होण्यापूर्वीच समाजवादी सत्ताधारी झाले तर हिंदी जातिव्यवस्था व तिचें वर्चस्व त्या सत्तेलाहि पचवल्याशिवाय रहाणार नाहीं. जगांतील इतर अनेक राष्ट्रांतहि शतकानुशतकें गुलाम व स्वतंत्र, उमराव व भूदास, अशी वर्गवारी समाजांत होती. प्रतिष्ठा वारसाहक्कानें पुढील पिढीकडे जात होती. पण एकट्या हिंदी समाजांतच या सामाजिक वर्गवारीनें अस्पृश्यतेचें हिडीस स्वरूप घेतलें. इस्लाम

व ख्रिश्चन धर्माचा स्वीकार केलेल्या हिंदु समाजांतहि स्पृश्यास्पृश्यता पुढें चालू राहिली यावरून जातीयतेचें विष आपल्या समाजशरीरांत किती पूर्ण भिनलें आहे हें ध्यानांत येतें. एकोणिसाव्या शतकापर्यंत चार प्रमुख जातींत वाटलेल्या या हिंदी समाजांत एका भाषिक प्रान्तांत २०० ते ५०० पोटजाती होत्या व ५०० ते २००० पोट-पोटजाती होत्या. म्हणजेच सुमारें २००० पोटजाती व १०००० पोट-पोटजातींत हा समाज वांटलेला होता. लग्नसंबंध, जातिकर्में, जातिपंचायती, चालीरूढी यांचें भिन्न संकेत समाजव्यवहारांत रूढ होते. दैनंदिन जीवनव्यवहारांत अशा तऱ्हेचा जातिभावनेचा अम्मल चालणाऱ्या या आज्ञाधारक व परप्रकाशी सामान्य हिंदी जनतेंत आत्यधिक सामाजिक अभिसरण, स्वयंस्फूर्त विचार व उपक्रमशीलता कशी निर्माण करावयाची हें लोकशाहीवादी व समाजवादी विचारांना हिंदी जातिव्यवस्थेनें दिलेलें आव्हान आहे.

शतकानुशतकें जातिव्यवस्था हिंदी समाजांत शाबूत राहाण्याचें कारण हिंदी माणूस दैववादी आहे हें आहे. ऐहिक जीवनांतील सुखापेक्षां पारलौकिक मोक्षाचीच त्याला तहान लागली आहे. या मोक्षासाटीं यज्ञ, जातकर्म, दान वा भजन करण्याचाच मार्ग तो चोखाळत आला आहे. आपल्या कर्मकौशल्यावर त्याची भिस्त नाहीं. आपल्या जातींतील कर्तृत्ववाज माणसें उच्च जातीचा व्यवसाय करूं लागतील तर दैवी कोप होईल या भीतीनें त्या जातीनेंच त्यांचे पाय खालीं ओढले आहेत. बहिष्कार व प्रतिकार यांच्या या दुहेरी कैचींत कर्तृत्वशक्ति वा बंडखोर वृत्ति शिल्लक राहाती तरच नवल. जातीबाहेर लग्न करणें सक्त निषिद्ध ठरवून व कित्येक शतकें तो गुन्हा टरल्यामुळें हे जातीचे तट हिंदी समाजांत अजून कायम राहिले आहेत. अस्पृश्यता, जातींत लग्न करण्याची रूढि, दैववाद, धर्मावरील अंधश्रद्धा व अखेर अज्ञान हेच हिंदी समाजाचे मूळ शत्रू आहेत. प्रथम, कृषि व हस्तव्यवसाय करणाऱ्या सुमारें ६० टक्के अनार्य-दास शूद्र वर्गास ज्ञानाचे दरवाजे बंद होते म्हणून, नंतर, श्रमाबरोबर दर्जा व समाजप्रतिष्ठा येत नाहीं या दुःखद जाणिवेनें या वर्गानें वैराग्य धारण केलें म्हणून, व आधुनिक काळांत भौतिक प्रगति खुंटल्यामुळें गरीबवर्गास शिक्षण घेणें परवडलें नाहीं म्हणून, आमच्या समाजांतील खरा श्रमिकवर्ग गेलीं शेंकडो वर्षें अज्ञच

राहिला. ज्ञान व श्रम यांची सांगड कधीं बसलीच नाहीं. तेव्हां संशोधन, विज्ञानाचे मार्ग श्रमिक जनतेस खुले करणे व सहज साध्य बनवणे, सहभोजनें व मिश्र विवाहाच्या द्वारां जाति जातींतील तट उध्वस्त करणें, नवपिढीस उत्कर्षाची समान संधि लाभूं देणें व आर्थिक विषमतेची समाज व्यवस्था नष्ट करून आपल्या श्रमाचें व कर्तृत्वाचे त्यांना पुरेपूर भागीदार होऊं देणें व राजसत्तेचा या सर्व समाजक्रांतीस पाठिंबा मिळविणें हेंच हिंदी समाजाच्या नवनिर्मितीचें प्रमुख कार्य आहे. कुत्रा व शूद्र यांच्या जोडीला नेऊन बसविलेल्या व देवता मानूनहि घरची दास बनविलेल्या हिंदी स्त्रीला सामाजिक स्वातंत्र्याची अनुभूति अजून व्हावयाची आहे. राजकीय–आर्थिक–सामाजिक स्वातंत्र्य व समतेचें समाजनिष्ठ ध्येय, त्या ध्येयाशीं सुसंवादी अशा नव्या व उच्चतर सामाजिक संस्था हिंदी समाजांत निर्माण होतील तेव्हांच फलद्रूप होईल. त्या निर्माण करण्याचें सामर्थ्य लोकशाही समाजवादी तत्त्वज्ञानांतच आहे.

हिंदी समाज हा अखिल मानव समाजाचा अविभाज्य घटक बनावयाचा असेल तर विज्ञान, प्रगल्भ उत्पादनसाधनें, संपत्ति, उच्च सामाजिकसंस्था व ध्येयें यांचा वर्षाव जसा पुढारलेल्या राष्ट्रांतून या समाजावर व्हावयास हवा आहे त्याचप्रमाणें किंबहुना त्याहून द्रुतगतीनें, हिंदी समाजांतील क्रियाशील व्यक्ती व शक्ती यांनीं अन्यायमूलक जातिव्यवस्था नष्ट करून श्रमिक व उपेक्षितवर्गाला स्वातंत्र्याचा खरा अर्थ व आनंद अनुभवण्यास जागृत व क्रान्तिप्रवण बनवावयास हवें आहे. समाजवादी विचारपरंपरा परकीय आहे असें प्रतिपादणारा राष्ट्रवादी अगर संस्कृतिसंरक्षक, श्रुति-स्मृतिपुराणोक्त हिंदुधर्माचें अगर वैदिक धर्माचें पुनरुज्जीवन करूं मागणारे धर्मसुधारक, गीताधर्माचें पुनरुज्जीवन करूं मागणारे पंडित वा नेते, तसेच सत्तेचा प्रश्न समाजसुधारणांहून अधिक महत्त्वाचा आहे असें म्हणणारे राजकारणी हे सर्वच भूतकालाचे वा निर्भेळ सत्तेचें पूजक आहेत. उच्चतर समाजवादी ध्येयाला अनुरूप अशा नव्या अनेकविध सामाजिक संस्था उभारण्याचें कार्य ते पार पाडूं शकणार नाहींत. आर्थिक व सामाजिक समतेखेरीज, विकासाच्या समानसंधीच्या अभावीं, विश्वशान्ति प्रस्थापित होईपर्यंत, खरें विश्वबंधुत्व निर्माण होणार नाहीं; ठायीं ठायीं

विखुरलेल्या मानवाची बौद्धिक व मानसिक उन्नति होणार नाहीं. मानवी शक्तींचा संपूर्ण विकास होणार नाहीं. समाजवादाचीं हीं समाजनिष्ठ ध्येयें व लोकशाही समाजवादी समाज परिवर्तनाचा मार्ग हीच हिंदी समाजाची, नव्हे अखिल मानव जातीची, साध्यसाधना बनली पाहिजे. या अर्थानेंच समाजवाद हा आजचा युगधर्म आहे.

कांहीं व्यक्तिगत भावना प्रकट केल्याखेरीज हें प्रास्ताविक पुरें होणार नाहीं. माझे जिवलग मित्र युसुफ मेहेरअल्ली यांनींच माझी वाचनाची व लेखनाची आवड वाढवली. युसुफ केवळ विचारानें समाजवादी नव्हते तर त्यांची वृत्ति व आचरणच विश्वबंधुत्ववादी होतें. मानवतेचें एक उदात्त दर्शन म्हणूनच मी त्यांच्याकडे पाहीं व त्यांच्या सान्निध्यांत माणुसकीचे धडे घेई. त्यांच्या सहवासांत जो काळ मी घालवला त्याच्या निरन्तर स्मृति मला सुखवीत असतात; कर्मप्रवृत्त करीत असतात. त्यांचें स्मरण म्हणून हें पुस्तक मी त्यांना अर्पण करीत आहें. माझा परमस्नेही व सहकारी मधु यानें या पुस्तकाच्या कामीं केलेलें साहाय्य शब्दांत व्यक्त करतां येणार नाहीं. माझे स्नेही व चेतना प्रकाशनचे संचालक श्री. बद्रीविशाल पित्ती यांनीं हें पुस्तक प्रकाशित करण्याचें आश्वासन दिलें म्हणूनच तें पुरें लिहून झालें. त्या सहकार्याबद्दल मी त्यांचा आभारी आहें. सुबक छपाईबद्दल साधना प्रेसला धन्यवाद. ज्यांच्या निरपेक्ष व निर्मल मित्रप्रेमानें मला समाजवादी विचारांची व चळवळीची साधना करणें शक्य झालें आहे त्यांचें स्मरण करून हें प्रास्ताविक संपवतां.

गोरेगांव,
२ ऑक्टोबर, १९५१

**केशव गोरे**

: १ :

# समाजवाद : ऐतिहासिक पार्श्वभूमि

ज्या आधुनिक युरोपीय संस्कृतीच्या उदयाबरोबर मध्ययुगीन युरोपचें अंधारयुग लोप पावलें त्या संस्कृतीची आद्य प्रेरणा समाजाची भौतिक भरभराट हीच होती असें म्हटलें तर तें विधान फारसें चूक ठरणार नाहीं. एका सोळाव्या शतकांत युरोपची लोकसंख्या दहा कोटींवरून पंधरा कोटींवर गेली होती. शेतीचा प्रधान व्यवसाय वाढत्या लोकसंख्येचा प्रश्न यशस्वी तऱ्हेनें सोडवूं शकला नसता. वाढता व्यापार व उद्योगधंदे समाजांत प्राधान्य मिळवूं लागले तेव्हां प्रस्थापित सरंजामशाही समाजव्यवस्था त्यांना जोखड ठरूं लागली. युरोपच्या अनेक व्यापारकेन्द्रांत निर्माण झालेल्या शहरसंस्कृतीहि सबंध समाजांत अभिप्रेत बदल घडवून आणूं शकल्या नाहींत. शहरांभोंवतालच्या अफाट प्रदेशांत पसरलेल्या अगणित शेतकरी समाजाची सरंजामशाही शोषणांतून व सावकारशाहींतून मुक्तता करण्याचें सामर्थ्य तिच्यांत नव्हतें. खुद्द शहरांत कारागिरी संघाच्या मक्तेदारीनें स्वतंत्र व्यवसाय करणाऱ्या कारागिरांच्या महत्त्वाकांक्षेस व कर्तृत्वास योग्य वाव मिळत नव्हता. वेठीचे श्रम करणारे भूदास, मक्तेदारीच्या नियमांनीं असंतुष्ट बनलेले स्वतंत्र व्यवसायी व व्यापारासाठीं दूरच्या बाजारपेठा शोधणारे व्यापारी सर्वच

प्रस्थापित समाजव्यवस्थेवर असंतुष्ट होते. हजार वर्षांहून अधिक काळ कॅथॉलिक चर्चच्या ज्या मध्यवर्ती सत्तेनें ख्रिश्चन समाजाचें नेतृत्व केलें ती चर्चची सत्ताहि जनतेस असह्य होऊं लागली होती. या काळांत युरोपच्या जवळपास तृतीयांश भूमीची मालकी चर्चकडे आली व या मोठ्या 'सरंजामदारानें' शोषक सरंजामशाही प्रथेची तळी उचलून धरल्यामुळें त्या सत्तेंतील समाजपरिवर्तनाचें शत्रुत्व आरंभलें होतें. या काळांत जुलमी सरंजामशाही विरुद्ध शेतकऱ्यांनीं अनेक बंडें केलीं. पण त्यांचें नेतृत्व करणारे विक्लीफ, हस सारखे मानवतावादी धर्मसुधारक ती समाजव्यवस्था उधळूं शकले नाहींत. त्यांचा पुरातन नैसर्गिक व्यवस्थेकडे असलेला कल, नव्या समाजाचे प्रश्न सोडवूं शकला नसता. ही सामाजिक कोंडी सर्वत्र एकाच मार्गानें फुटली नाहीं हें खरें पण या काळांत युरोपांत निर्माण झालेल्या व सर्वत्र कमीअधिक पसरलेल्या वैचारिक आन्दोल-नांतून, धर्मसुधारणेच्या चळवळींतून व व्यापार उद्योगधंद्याच्या वाढीबरोबर निर्माण झालेल्या व्यवसायस्वातंत्र्याच्या प्रयत्नांतून ती कोंडी फुटली व सरंजामी सत्तेविरुद्ध होणाऱ्या बंडांचें नेतृत्व व्यापाऱ्यांनीं व मध्यमवर्गानें करून हें सामाजिक परिवर्तन अखेरीस घडवून आणले.

व्यापाराच्या अप्रतिहत वाढीस सुव्यवस्था व शांततेची जरूरी होती. पण मध्ययुगाच्या शेवटीं सरंजामदार व सरदार वर्गाच्या अंतर्गत यादवीस ऊत आला होता. त्यांच्या स्वतंत्र सेना व त्यांचीं असंख्य जकातनाकीं अनिर्बंध व्यापारास डोईजड झालीं होतीं. तेव्हां व्यापारीवर्गानें राजेशाहीच्या नेतृत्वाखालीं समर्थ मध्यवर्ती राजसत्ता उभारण्यास हातभार लावला. नवोदित राष्ट्रभावनाहि अशा मध्यवर्ती राजसंस्था उभारण्यास पूरकच ठरणार होती. सरंजामदार वर्गाचें बल तिला असलेल्या सर्वदेशीय मध्यवर्ती कॅथॉलिक सत्तेचें होतें. मध्यवर्ती राजसत्तेच्या अनियंत्रित हुकुमासहि ही कॅथॉलिक सत्ताच आड येत होती व सहाजिकच या सत्तेविरुद्ध बंड करणारांचे हात तिनें बळकट केले. प्रॉटेस्टंट धर्मसुधारणेची चळवळ या नांवानें हें बंड इतिहासांत प्रसिद्ध पावलें. प्रॉटेस्टंट चळवळ धर्मविरोधी नव्हती. सरंजामशाहीविरोधी लढ्याचें स्वरूपहि तिनें कधीं

घेतलें नाहीं. तिचा लढा केवळ सनातन धर्मसंस्थेविरुद्ध होता. समाजावरील धर्मगुरूंची पकड तिला नष्ट करावयाची होती. सामान्य, सद्गुणी व विचारी माणसांस स्वतःच्या मुक्तीसाठीं आतां आडत्या धर्मगुरूंची जरूरी रहाणार नव्हती व आपल्या जमिनीचा कांहीं भाग चर्चला यापुढें मुक्तीचा मार्ग मोकळा करण्यासाठीं तो देणार नव्हता. प्रॉटेस्टंट धर्मसुधारणेच्या चळवळींतून त्याला धर्मस्वातंत्र्याचा अनुभव मिळाला व स्वतःच्या कर्तृत्वावरील त्याची श्रद्धा दृढमूल बनली. लूथर, कॉल्व्हीन, नॉक्स हे प्रॉटेस्टंट धर्मसुधारणेच्या चळवळीचे नेते समाजक्रान्तिकारक नव्हते. राष्ट्रांतील मध्यवर्ती राजसत्तेचे हात बळकट करण्यासाठीं त्यांनीं राजालाच जनतेच्या ऐहिक व पारलौकिक जीवनाचा मध्यबिन्दु बनवलें. जनतेच्या धार्मिक श्रद्धेची शक्ति राजसत्तेच्या पाठीशीं उभी केली.

या काळांत युरोपच्या अनेक पुढारलेल्या शहरांत सतत पसरत चाललेली पुनरुज्जीवनाची चळवळ ही धर्मसुधारणेच्या चळवळीहून अधिक मूलगामी होती. कॅथॉलिक मध्यवर्ती धर्मसत्तेच्या प्रभुत्वाच्या काळांत बौद्धिक क्षेत्रांत लॅटीनला असामान्य महत्त्व होतें. पण तें स्थान आतां इंग्लिश, फ्रेंच, जर्मन, अशा राष्ट्रभाषांनीं व ग्रीक, हेब्रू या जुन्या धर्मभाषांनीं पटकावलें. मध्ययुगांत आम्ही माद्रिद, केंट, बरगंडीचे नागरिक आहोंत असें सांगण्यांत नागरिकांना अभिमान वाटे तर आतां प्रत्येकजण आम्ही स्पॅनिश, ब्रिटिश, फ्रेन्च आहोंत असें बोलूं लागला. कोपरनिकस सारख्या खगोलज्ञांनीं पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरत आहे असा सिद्धान्त मांडला तेव्हां धर्मसत्तेनें या अश्रद्धांविरुद्ध हत्यार उपसलें होतें तर नव्या जगाचा शोध घेणाऱ्या वास्को-द-गामा, कोलंबसासारख्या प्रवाशांना नव्या जगांचे संशोधक म्हणून आतां राजदरबारीं प्रतिष्ठा मिळाली. शिक्षणाचें कार्य इतःपर चर्चच्या प्रभुत्वाखालीं राहिलें नाहीं. उलट शास्त्र, वाङ्मय, कला, संगीत या क्षेत्रांत स्वतंत्र बाण्याचीं अभिजात बुद्धिवादी माणसें पुढें आलीं. युरोपमध्यें कित्येक शतकें स्वतंत्र विद्यापीठें स्थापन झालीं होतीं. आतां या विद्यापीठांतून समाजाच्या भौतिक उत्कर्षास मदत करणारें शिक्षण नवपिढीस मिळूं लागलें तेव्हां या प्रयत्नांस राजसत्तेचेंहि पाठबळ मिळालें. नवे चित्रकार,

शिल्पकार माणसाच्या शरीरावयवांची ओळख सामान्य जनतेस करून देऊं लागले होते, तर शस्त्रविद्येनें त्यांची चिरफाड आरंभली होती. छापखान्यांच्या शोधाबरोबर नव्या संस्कृतीचें लोण जनतेपर्यंत जाऊन पोहोंचलें. बायबल हें हें अनेक पुस्तकांपैकीं एक बनलें तेव्हां बुद्धीच्या निकषावर त्यांतील विधानें तपासलीं गेलीं. शूर पूर्वजांच्या आख्यायिका लोक वाचूं लागले, राष्ट्रीय परंपरा मूळ धरूं लागल्या, धर्मप्रामाण्याची जागा बुद्धिप्रामाण्यानें पटकावली. बुद्धिजीवी वर्गाचें लक्ष शास्त्र, संशोधन, नव्या जगाचा शोध व उत्पादन साधनांतील प्रगतिकडे वळलें. धर्मसुधारणेच्या चळवळीनें मध्यवर्ती कॅथॉलिक सत्तेस जबरदस्त तडाखा दिला होता. ती दुबळी बनली होती. त्याचा फायदाहि बुद्धिस्वातंत्र्यासाठीं झगडणाऱ्या सामाजिक पुनरुज्जीवनाच्या चळवळीस मिळाला. तिची अविरोध व अप्रतिहत प्रगति त्यामुळेंच होऊं शकली. जनतेच्या मनावरील धार्मिक कल्पना, रूढि, परंपरांचा पगडा नष्ट होतांच व्यक्तीची व तिच्या जीवन प्रयत्नांची प्रतिष्ठा अमाप वाढली. युरोपीय जनतेला नव्यानेंच स्वतःच्या अमर्याद शक्तीचा साक्षात्कार झाला होता.

शास्त्र, शोधकवृत्ति व संशोधन यांमुळें जसा व्यापारी वर्गाचा फायदा झाला तसाच राजसत्तेचाहि. जसे व्यापारी धनवान बनूं लागले तसेच राजेहि. दारूगोळ्याचा व तोफांचा शोध लागला तेव्हां सरंजामदारांच्या फौजांहून राजसत्तेचें लष्कर समर्थ सुसज्ज बनलें. राजसत्ता धनवान बनली तशी मोठी खडी सेना त्यांना ठेवतां आली. जेव्हां नव्या जगाचा शोध घेणारे प्रवासी, व्यापारी, परदेशांतील चीजवस्त स्वतःच्या राष्ट्रांत परत नेऊं लागले तेव्हां आपल्या उत्पादन साधनांत प्रगति करण्यास व नव्या बाजारपेटांत नवा व चांगला माल तयार करून नेण्यास प्रोत्साहन मिळालें. उद्योगधंद्यांत झपाट्यानें प्रगति होऊं लागली तेव्हां वेठीच्या श्रमांतून जनता मुक्त होऊं लागली. समुद्रावरील व्यापार वाढला तेव्हां लुटमार व चांचेगिरी करणाऱ्यांना कडक शासन देणारें आरमार राजसत्तेनें उभारलें. खडीं सैन्यें, नाविक दलें, सरकारी खजिना, व्यापार या सर्वांतच अमर्याद वाढ झाली. कृषिव्यवस्थेंतहि आमूलाग्र बदल या काळांत झाला. परस्परांत

झगडून जहागिरदार, सरदार दुबळे बनले होते. प्रॉटेस्टंट चळवळीच्या लाटेंत कॅथॉलिक चर्चच्या मोठ्या इस्टेट्स हिसकावून घेण्यांत आल्या होत्या. स्वतंत्र शेतकरी वर्ग उदयास येत होता. शेतीच्या उत्पादनाला अर्थनिष्ठ पाया लाभला तेव्हां शेतजमिनींचें पुनर्संघटन सुरू झालें. आनुवंशिक गुलामींतून, वेठीच्या श्रमांतून अगर लादलेल्या व्यवसायांतून जनतेची अधिकाधिक मुक्तता झाली तेव्हां राष्ट्राच्या भरभराटीबरोबर लोकांना नवीं कार्यक्षेत्रें निर्माण झालीं. त्यांच्या कर्तृत्वास नवें व्यापक क्षेत्र त्यांना लाभलें. पण जनतेचे स्वतंत्र प्रयत्न, भौतिक भरभराटीची ईर्षा व अनियंत्रित राजेशाहीचें हित यांच्यांत लवकरच विग्रह निर्माण झाला.

सतराव्या शतकाच्या सुरवातीस स्वतःची जमीन कसणारा शेतकरी, स्वतंत्र व्यवसाय करूं पाहाणारा कारागीर, शांतता व सुव्यवस्था लाभल्यानें आपल्या व्यापारांत वाढ करणारा व्यापारी हे सर्वच मध्यवर्ती राजसत्तेचे पाठीराखे होते. पण पांचपन्नास वर्षांत नव्या बाजारपेठांत मोठ्या पेढ्यांनीं राजाश्रयानें आपल्या प्रचंड मक्तेदाऱ्या उभारल्या. शेतकरी, नागरिकांवरील मध्यवर्ती सत्तेचा कर वाढूं लागला. राजदरबारची मंडळी सुखासीन, उधळी व सत्तान्ध बनली. नव्या जगाचा शोध लागल्यावर नव्या बाजारपेठांचा ताबा घेण्यासाठीं युरोपीय राजसत्तांत भयावह चढाओढ सुरू झाली. एखाद्या वसाहतीस आपल्याच मालाची बाजारपेठ बनवण्यासाठीं धनिक व्यापारीपेढ्या या राजकीय सत्तासंघर्षांत स्वसत्तेस सढळ मदत करूं लागल्या. राष्ट्रांतील प्रजाजनांच्या हिताकडे दुर्लक्ष झालें. सत्ता जुलमी बनूं लागल्या. आतां अनियंत्रित राजेशाहीला आळा घालण्याखेरीज गत्यंतर नाहीं याची जाणीव विचारवंतास होऊं लागली. या काळांत राजसत्तेचें समर्थन करणाऱ्या विचारवंतांत हॉब्जचा उल्लेख प्रामुख्यानें करावयास हवा. थॉमस मूरपासूनचे कित्येक समाजद्रष्टे, प्रस्थापित राजसत्तेच्या जुलमी कारभाराला, विषमतेला, समाजाच्या दारिद्र्याला, खाजगी मालमत्तेच्या दुरुपयोगाला व राज्यकर्त्या वर्गाच्या सुखलोलुपतेला व उधळपट्टीला विटल्यागांजलेल्या अशा जनतेला पुरातन सामुदायिक जीवनाकडे व

निसर्गदत्त समतेकडे पुनश्च झेंप घेण्यास आवाहन करीत होते. ग्रामीण स्वयंपूर्ण जीवन, शहरसंस्कृति, सरंजामशाही समाज व्यवस्था, नव्या समाजाचे प्रश्न सोडवण्यास असमर्थ ठरल्या होत्या. नव्या जगांत इंग्लंडचा व्यापार जोरानें वाढत होता. खाजगी मालमत्तेवर समाजद्रष्टयांनीं जोरदार हल्ले चढवूनहि खाजगी मालकीहक्क दृढमूल झाले होते एवढेंच नव्हे तर ती नव्या वर्गाची प्रेरणा बनली होती. राष्ट्राच्या व व्यक्तीच्या भौतिक भरभराटीची ही नवी प्रेरणाशक्ति गमावण्यास हॉब्ज तयार नव्हता. त्यानें ही गोष्ट मंजूर केली कीं पुरातन नैसर्गिक समाजव्यवस्थेंत माणसांचें जीवन समाजनिष्ठच होतें. पण माणसाला थोडी उसंत मिळतांच या मूल्यांचा विसर पडून त्याच्या प्रकृति-धर्मांतील स्वार्थ मत्सराच्या भावना उसळून वर आल्या. त्याला सत्तेचें सामर्थ्य आकर्षित करूं लागलें. युद्धं व यादवींना ऊत आला. बलशाली व्यक्ति अगर समाज इतरांवर अधिराज्य गाजवूं लागला. मानववंशाचा वारसा चालविण्यास मीच लायक आहे अशी खूणगांठ त्यानें मनाशीं बांधली. न्याय, भूतदया, नम्रता, या नैसर्गिक गुणांचा अविष्कार करणारे नीतिनियम व समाजव्यवस्था एव्हांना नष्ट झाली होती. अशा परिस्थितींत व्यक्ति एकतर नैसर्गिक स्वातंत्र्याच्या भोक्त्या राहूं शकत होत्या; पण मग त्यांना भौतिक प्रगति व व्यक्तिगत उत्कर्षास मुकणें भाग होतें. किंवा समाजाची धारणा होण्यासाठीं, समाजांत शांतता व सुव्यवस्था राखण्यासाठीं, शासनाचा अधिकार कोणावर तरी सोंपवून व्यक्ति आपला वैयक्तिक उत्कर्ष साधूं शकणार होत्या. समाजानें याचें उत्तर देऊन संरक्षण व सत्तानिर्मित शांततेची निवड केली. या निवडींत त्यानें नैसर्गिक न्याय व स्वातंत्र्य गमावून सत्तेची जोखड स्वीकारली आहे. आपल्या प्रामाणिक श्रद्धेस साक्ष ठेवून ही सत्ता एका समर्थ व्यक्तीच्या वा गटाच्या त्यानें स्वाधीन केली आहे. नैसर्गिक स्वातंत्र्याचा त्याग केला आहे. आतां या मनुष्यनिर्मित सत्तेविरुद्ध बंड करण्याचा हक्क प्रजेला पोहोंचत नाहीं. शासनसत्तेनें मालमत्ता, धर्म व इतर समाजव्यवहारांचें जें मार्गदर्शन आपली जबाबदारी पुरी करण्यासाठीं चालवलें आहे त्याचा पुरस्कार प्रजेनें केला पाहिजे. हॉब्जची ही काल्पनिक करारमीमांसा अखेरीस अनियंत्रित राजेशाही व खाजगी मालकीची प्रथा

दृढ करण्यास उपयोगी ठरली. पण अनियंत्रित राजेशाहीच्या जुलमानें असंतुष्ट झालेल्या प्रजेचें समाधान फार काल या विचारानें झालें नाहीं.

सतराव्या शतकांत व्यापार व उद्योगधंद्यांत अप्रतिहत वाढ होत असलेलें इंग्लंड हीच समाजपरिवर्तनाची प्रयोगशाळा बनली होती. भौतिक भरभराट खाजगी मालमत्ता व व्यक्तिगत उत्कर्ष याच वर्धिष्णु समाजाच्या जीवनप्रेरणा होत्या. या प्रेरणांच्या आड अनियंत्रित राजेशाही आली तेव्हां तिला लगाम घालण्यास अगर तिचा शिरच्छेद करण्यास प्रजेनें मागेंपुढें पाहिलें नाहीं; पण तिला या राज्यक्रांतीसाठीं वैचारिक समर्थनाची उणीव भासत होती. राजकीय स्वातंत्र्यासाठीं ती भुकेलेली होती. प्रजेनें आपलें नैसर्गिक स्वातंत्र्य राजाच्या हवाली केलें आहे असें म्हणणारा हॉब्ज, नागरिक हक्क व प्रजेचें सुख पाहाण्याची जबाबदारी राजांवर आहे असें कां सांगत नाहीं असा कूटप्रश्न त्यांना होता. एकतर्फी शरणागतीला करार संबोधण्याइतकी प्रजा व्यवहारशून्य राहिली नव्हती. काल्पनिक करारांनीं आपलें हक्करक्षण होणार नाहीं हें तिला आतां कळून चुकलें. तेव्हां हॉब्जपेक्षां राज्यक्रांतीचें समर्थन करणारा क्रांतिकारक व्यक्तिवादी लॉक हाच इंग्लिश जनतेचा प्रातिनिधिक विचारवन्त बनला.

जॉन लॉकनें [१६३२-१७०४] हॉब्जच्या काल्पनिक करारमीमांसेवर हल्ला चढवतांना समतावादी नैसर्गिक समाजव्यवस्थेचें जें अस्तित्व हॉब्जनें मान्य केलें होतें तेंच खोडून काढलें. निसर्गांतल्या संपत्तीची किंमत मुळांत फारशी नाहीं. त्यांत समतावाद तो कसला? माणूस आपल्या श्रमानें या नैसर्गिक साधनसंपत्तीस मौल्यवान बनवतो. या श्रमानेंच व्यक्ति मालमत्तेचा हक्कदार बनते. राजसत्तेच्या साहाय्यानें हा व्यक्तिगत उत्कर्ष होत नाहीं, उलट या श्रमानें समाजाच्या धनसंपत्तींत भर घालणारी प्रजा राजसत्ता निर्माण करते व समर्थ बनवते. साहजिकच नागरिकांचे हक्क मूलभूत व निसर्गदत्त आहेत, राजसत्ता नैसर्गिक स्वातंत्र्याची वारसदार नाहीं व ती प्रजेच्या भवितव्याची धनी नाहीं. मालमत्तेच्या प्रजेचा हक्क नैसर्गिक आहे तसाच व्यक्तिगत आहे. अर्थात लॉकच्या या विचारांहून इंग्लिश जनतेनें केलेल्या चार्लस राजाच्या

शिरच्छेदानेंच राजकीय स्वातंत्र्याच्या चळवळींवर अधिक प्रभाव पडला. शासन-संस्थेची उभारणी प्रजेची संमति व पाठिंबा यावर झालेली आहे हा धडा १६८८ मधील इंग्लिश राज्यक्रांतीनें जगास शिकवला. श्रमानेंच संपत्ति निर्माण होते व म्हणून श्रम करणाऱ्यांस खाजगी मालमत्तेचा अधिकार पोहोंचतो ही लॉकची व्यक्तिवादी विचारसरणी वर्धिष्णु समाजानें दुहरावली खरी पण या विचारसरणीनेंच समाजांतील प्रचलित आर्थिक विषमतेचें समर्थन व संरक्षण केलें होतें. अर्थात् ही आर्थिक विषमता जशी अधिक जुलमी बनूं लागली तसा व्यक्तिवादी विचारसरणीचा श्रमिक वर्गानें त्याग केला. पण राज्यक्रांतीचें कार्य पुरें पाडण्यास लॉकची क्रान्तिकारी विचारसरणी जनतेच्या उपयोगी पडली ही गोष्ट निर्विवाद. लॉकनें आपल्या लिखाणांत तर्कशुद्ध विचारसरणीला मान देणारें शिक्षण व धार्मिक सहिष्णुता यांचें असेंच जोरदार समर्थन केलें आहे.

अमेरिकन राज्यक्रान्तीचा तत्त्वप्रणेता पेन यानें हॉब्जवर केलेली टीका निराळ्या प्रकारची होती. हॉब्जनें केलेलें अनियंत्रित राजेशाहीचें समर्थन, प्रजेनें स्वेच्छेनें राजास हक्क बहाल केले आहेत, या भूमिकेवरून केलें होतें. पण एका पिढीनें राजास अगर एकाद्या गटास सुपूर्द केलेले अधिकार नव्या पिढीवर बंधनकारक कां असावेत असा सवाल पेननें टाकला. जर राजा अगर तो गट जनतेच्या नैसर्गिक स्वातंत्र्यावर व हक्कांवर गदा आणील तर त्या अनियंत्रित राजाविरुद्ध अगर हुकुमशाही गटाविरुद्ध बंड करण्याचा नव्या पिढीस जन्मसिद्ध हक्क आहे. १७७६ मध्यें इंग्लिश राजेशाहीविरुद्ध अमेरिकन जनतेनें क्रान्ति करून हाच बंडाचा जन्मसिद्ध हक्क बजावला व जनतेच्या नैसर्गिक हक्कांचें संरक्षण केलें. अमेरिकन लोकसत्ताक क्रान्तींतून अमेरिकन जनतेला राजकीय स्वातंत्र्य मिळालें हें तर खरेंच पण वसाहतीचें अर्थशोषण थांबल्यामुळें नवोदित मध्यमवर्गास व्यापार व उद्योगधद्यांत प्रगति करण्यास अनिर्बंध स्वातंत्र्य लाभलें; व्यक्तिगत खाजगी मालमत्तेच्या प्रथेला नव्या राज्य-घटनेनें पूर्ण संरक्षण दिलें व तिचा कायदेशीर हक्क प्रस्थापित झाला. अमेरिकन राज्यक्रान्तीमागील स्वातंत्र्याची प्रेरणा किती जाज्वल्य होती हें त्यांची

'स्वातंत्र्याची सनद' अभ्यासली कीं सहज ध्यानीं येईल. पण जेव्हां कांहीं घटक राज्यांतील प्रतिनिधींनीं 'अमेरिकेंतील सर्व भूभागावर सर्व राष्ट्राचा सामुदायिक हक्क आहे' असें कलम सनदेंत समाविष्ट करण्याची मागणी केली तेव्हां क्रान्तीचें नेतृत्व करणाऱ्या मध्यमवर्गाच्या प्रतिनिधींनीं त्यांच्या मागणीला कसून विरोध केला. पेनच्या विचारसरणीची छाप सनदेंतील कल्पनांवर चांगलीच आढळते. सनद म्हणते,

"मानवी इतिहासांत जेव्हां जनतेच्या एका समूहाला दुसऱ्या समूहाशीं संलग्न ठेवणारे राजकीय बंध तोडण्याची आवश्यकता निर्माण होते व निसर्गदत्त कायद्यांनीं त्यांना बहाल केलेला जगांतील इतर सत्तांइतकाच स्वतंत्र व समान दर्जा प्राप्त करून घेण्यास ते पुढें येतात तेव्हां जगांतील इतर लोकांचा मान ठेऊन त्यांना या विभक्तीकरणाचा खुलासा करणें क्रमप्राप्त आहे...आमच्या मतें हीं सत्यें स्वयंसिद्ध आहेत कीं सर्व माणसें जन्मतः समान असतात व त्यांना निर्मात्यानें कांहीं चिरंजीव हक्क बहाल केले असून जीवनाची सुरक्षितता, स्वातंत्र्य व सुखासाठीं धडपड हे हक्क त्यांत समाविष्ट आहेत. या हक्कांचा लाभ करून देण्यासाठींच जनतेंतून सरकारें स्थापन केलीं जातात व हीं सरकारें प्रजेच्या संमतींतूनच न्याय्य अधिकार ग्रहण करतात. पण जेव्हां या उद्दिष्टांना कोणत्याहि स्वरूपाचें सरकार हरताळ फांसतें तेव्हां त्या सरकारला बदलण्याचा अगर नष्ट करण्याचा तसेंच आपलें संरक्षण, सुखसंवर्धन चांगल्या प्रकारें होईल अशा तत्त्वांवर अधिष्ठित व अनुरूप सत्ता दिलेलें नवें सरकार स्थापन करण्याचा अधिकार जनतेला पोहोंचतो."

१७७६ च्या अमेरिकन राज्यक्रांतीनंतर बरोबर तेरा वर्षांनीं फ्रान्समध्यें लोकसत्ताक राज्यक्रांति झाली. लॉक व पेनचें क्रांतीची वैचारिक पार्श्वभूमि निर्माण करण्याचें कार्य फ्रान्समध्यें विशेषेंकरून व्हॉल्टेअर व रूसो या दोन विचारवन्त लेखकांनीं पुरें केलें. अठराव्या शतकांतील लुई चौदा, पंधरा व सोळा यांच्या कारकीर्दींत युद्धें, राजघराण्यांची दिवाळखोरी, सत्तेचा कैफ चढलेल्या राजदरबारच्या अधिकाऱ्यांचा उन्मत्त कारभार, कमकुवत अर्थव्यवस्था

व शेतकऱ्यांचें भीषण दारिद्र्य या सर्वांमुळें समाजांत बजबजपुरी माजली होती. सर्वत्र विषमता व दडपशाहीचा अंमल सुरू होता. या दडपशाहींत पोळून निघालेला व्हॉल्टेअर जेव्हां इंग्लंडच्या भूमींत आला तेव्हां त्यास इंग्लिश क्रांतींतून जन्मास आलेल्या स्वतंत्र, विजिगीषु व सुसंस्कृत इंग्लिश समाजाचें दर्शन झालें. त्यानें लिहिलें कीं 'इंग्लिश माणूस मन मानेल त्या रस्त्यानें स्वर्गास जातो. तेथें सत्ताधारी आपल्या लहरीनुसार जनतेवर कर बसवूं शकत नाहींत. सरदार व धर्मगुरुंनाहि कर द्यावे लागतात. पुढच्या वर्षी अधिक कर बसणार असेल तर अधिक धान्य उत्पादन न केलेलेंच बरें असें तेथील शेतकऱ्यांस वाटत नाहीं.' व्हॉल्टेअरच्या या लेखनांतून इंग्लिश समाजांत काय घडत होतें यापेक्षां फ्रेंच समाजांत कशाची उणीव होती याचें उत्तम दर्शन होतें. 'व्हॉल्टेअरच्या काळांतील सर्वच फ्रेंच लेखक तत्त्वसंशोधनाहून ही नवी ऊर्मि फ्रेंच समाजांत निर्माण करण्याचा प्रयत्न करीत होते. या महान वैचारिक चळवळीचें सम्यक् दर्शन फ्रान्समध्यें १७५१ ते ७२ पर्यंत प्रसिद्ध झालेल्या एन्सायक्लोपीडियाच्या बत्तीस खंडांतून फ्रान्सच्याच नव्हे तर सर्व युरोपमधील जनतेस झालें. युरोपीय समाजाच्या धार्मिक व सामाजिक श्रद्धा तसेंच समाजव्यवस्थेंत मूळ धरून बसलेल्या सर्व अन्यायांवर, विषमतेवर, टाकाऊ रूढि व परंपरांवर निर्दय हल्ले या लेखनांतून करण्यांत आले होते. बहुतेक लेखक चर्चच्या कारभारांचेहि कट्टे विरोधक होते. सर्व लेखनांत स्वातंत्र्याचें वारें संचारलें होतें. सर्व सामाजिक रोगांवर एकच रामबाण उपाय होता. स्वातंत्र्य! विचारस्वातंत्र्य, लेखनस्वातंत्र्य, मुद्रणस्वातंत्र्य, सर्व प्रकारचें स्वातंत्र्य. हें स्वातंत्र्यच प्रगतीचें महाद्वार खोलणार होतें.

या काळांतील दुसरा नामवंत लेखक रूसो हा व्यक्तिवादी होता कीं नाहीं यावर विद्वानांत दुमत आहे. पण त्यानें पेनप्रमाणेंच प्रजेच्या जुलमी राज्यसत्तेविरुद्ध बंड करण्याच्या हक्काचा जोरदार पुरस्कार केला. निसर्गदत्त व्यक्तिस्वातंत्र्याच्या प्राप्तीसाठीं जनतेला क्रांति करण्याचा अधिकार आहे ही त्याची भूमिका क्रांतिकारी व्यक्तिवाद्याचीच होती. पण ही व्यक्तीची निष्ठा सार्वजनिक

बुद्धीच्या आड येतां कामा नये असा त्याचा आग्रह होता. तो म्हणे कीं सार्वजानिक बुद्धि ही खात्रीनेंच अधिक श्रेष्ठ आहे. तिचें माहात्म्य व्यक्तीला कळलें नाहीं तरी ती व्यक्तीच्या मनांत वास करुन असतेच. तिचा अनुभव व्यक्तीला आणून दिला म्हणजे झालें. सद्‌गुणच सर्व मानवी अरिष्टांचें परिमार्जन करील. तीच राज्यसंस्था श्रेष्ठ ठरेल कीं जिचे प्रजाजन सर्व सामान्यांच्या कल्याणाशीं आपली निष्ठा जुळती ठेवण्याचा करार करतील. श्रेष्ठ राज्यसंस्था लोभावर व दडपशाहीच्या पाशवी शक्तीवर कधींहि विसंबून राहाणार नाहीं, तर आपल्या सर्व प्रजेच्या सद्‌बुद्धीवरच तिचें अस्तित्व टिकूं शकेल. " मनुष्य स्वतंत्र म्हणूनच जन्माला आला आहे पण तो सर्वत्र जंजिरांनीं जखडला गेला आहे " ही त्याची घोषणा फ्रेंच जनतेस आव्हान न ठरती तरच नवल. 'रूसोनें फ्रेंच जनतेच्या मनांत प्रक्षोभ निर्माण केला ' हेंच खरें.

या सर्व वैचारिक आंदोलनांतून बुद्धिजीवी वर्गाचा फ्रेंच राज्यव्यवस्थेंत सुधारणा घडवून आणण्याचा विश्वास समूळ नष्ट झाला व ते क्रांतीचे प्रचारक बनले. घराण्याच्या बेपर्वाईनें व दंडुकेशाहीनें आगींत तेल ओतलें. व्यापारी व उद्योगपतींच्या वाढत्या महत्त्वाकांक्षाहि अनियंत्रित राजेशाही कुचलत होती. शहरांतील कामगार, खेड्यांतील शेतकरी दोघेहि राज्यसत्तेविरुद्ध असंतुष्ट होते. त्या काळांत शेतकरी वर्गावरील करांचा भार इतका मोटा होता कीं त्याच्या उत्पन्नापैकीं सुमारें ऐंशी टक्के भाग या ना त्या कराच्या रूपानें कर वसूल करणारे घेऊन जात. या असह्य जुलमी करभाराविरुद्ध शेतकऱ्यांनीं कमी बंडें केलीं नव्हतीं. पण धर्मगुरु व सरदारांना प्रतिस्पर्धी असें बुद्धिवाद्यांचें नेतृत्व त्यांना लाभलें नव्हतें. हें नेतृत्व नव्या मध्यमवर्गानें पुरवलें. हा मध्यमवर्ग व व्यापारीयुगांतील छोट्या व्यापाऱ्यांचा मध्यमवर्ग यांत फरक होता. व्यापार व उद्योगधंद्यावरील बंधनें व नियंत्रणें, मूठभर धनाढ्य व्यापाऱ्यांना राजसत्तेनें बहाल केलेल्या मक्तेदाऱ्या यामुळें असंतुष्ट असा छोटा व्यापारी या मध्यमवर्गात होताच पण त्याचबरोबर लेखक, डॉक्टर, शिक्षक, वकील, न्यायाधीश, स्वाभिमानी अधिकारीवर्ग यांचा बुद्धिजीवी वर्गहि या नव्या मध्यम वर्गात समाविष्ट होता.

समाजाचें वास्तव जीवन सरंजामशाही राहिलेंच नव्हतें, पण सरंजामशाही युगाचे कायदे अजून रद्द झाले नव्हते. राजदरबारच्या कर्जबाजारीपणामुळें पुंजीवादी वर्गासहि आपल्या भांडवलाची शाश्वती राहिली नव्हती. ते अर्थसत्तेचे धनी होते; पण समाजाचें पुढारीपण त्यांच्येकडे नव्हतें. सरदार, धर्मगुरूनांच राज-दरबारीं प्रतिष्ठा होती तेव्हां अर्थसत्तेला बळकटी आणणारी सामाजिक प्रतिष्ठा व राजसत्ता हातीं घेण्यास ते उत्सुक होते. आपल्या मालमत्तेचें संरक्षण करणारी राजसत्ता त्यांना हवी होती. थोडक्यांत समाजांतील सर्वच वर्ग राजघराण्याविरुद्ध व सरदार धर्मगुरूंच्या राजमान्य वर्गाविरुद्ध उठले होते. समाज नवी पातळी शोधीत होता व त्यासाठीं जुनी व्यवस्था उध्वस्त करण्यासाठी तो सज्ज झाला. 'स्वातंत्र्य, समता व बंधुत्व' यांचे जयघोष सर्वत्र वातावरणांत दुमदुमत होते. १४ जुलै १७८९ ला जुन्या राजसत्तेच्या दडपशाहीचें प्रतीक बनलेला बॅस्टीलचा तुरुंग हजारों लोकांनीं आपले प्राण पणाला लावून फोडला. फ्रेंच राज्यक्रान्तीचा रोमांचकारी इतिहास स्वातंत्र्यउर्मीच्या ज्वलंत शक्तींची परमोच्च साक्ष देतो. ती स्वातंत्र्याची भावना आज प्रत्येक समंजस व स्वाभिमानी माणसाची जणुं जीवशक्ति बनली आहे. अमेरिकन क्रान्तीनें जनतेस स्वातंत्र्याची सनद दिली तर फ्रेंच राज्य-क्रान्तींतून 'प्रत्येक मानवाच्या जन्मसिद्ध हक्कांचें निवेदन' बाहेर पडलें.

इंग्लिश, अमेरिकन व फ्रेंच राज्यक्रान्तीनें राजकीय स्वातंत्र्याची ओजस्वी प्रेरणा जगांतील मानवांना दिली. क्रान्तिकारक व्यक्तिवादाचें ऐतिहासिक कार्य पुरें झालें. फ्रेंच राज्यक्रान्तींतून उसळी घेऊन वर आलेल्या क्रान्तिकारक भावनांनीं अनियंत्रित राज्यसत्तेला कायमची मूठमाती दिली व युरोपमधील सरंजामशाहीचें थडगें खणलें. भांडवलशाही समाजव्यवस्थेनें जन्म घेतला व समाजाचें धुरीणत्व नव्या वर्गाकडे आलें. अर्थात् व्यक्तिस्वातंत्र्याचा हक्क कितीहि मौलिक असला तरी खरीखुरी समता व बंधुत्व त्यामुळें जनतेस लाभलें नाहीं. सर्वांना एकच कायदा मिळाला. न्यायदेवतेनें उच्चनीच भेद करणें सोडून दिलें. व्यक्ति नागरिक स्वातंत्र्याचा समान उपभोग घेऊं लागली. हें सर्व खरें, पण त्यामुळें जनतेस खरीखुरी समानता लाभली नाहीं. क्रान्तीचा भर ओसरल्यावर स्वातंत्र्य,

समता व बंधुत्वाची लढाई जिंकण्यासाठीं हजारोंच्या प्राणांचें बलिदान करणाऱ्या श्रमिक जनतेला हें पूर्ण कळून चुकलें कीं केवळ स्वातंत्र्याची साधना समाजांतील सर्व विषमता नष्ट करूं शकत नाहीं. कायदा व न्यायालयीन समता खरी समता नव्हे, तो समतेचा आभास आहे. जनतेनें सत्ता हिसकावून घेतली पण तिचा कब्जा अखेर समाजांतील एका विशिष्ट वर्गाच्याच हातीं गेला. जुना सत्ताधारी वर्ग जाऊन नवा त्याच्या जागीं आला पण वर्गवारी गेली नाहीं. कायद्याचा अम्मल सर्वांवर सारखा असेल पण कायद्याचे निर्माते विशिष्ट वर्गाचे व हितसंबंधांचेच प्रतिनिधि होते. धर्मगुरु, सरंजामदार वर्गाच्या हातून क्रान्तिकालांत हिसकावून घेतलेल्या जमिनी त्यांच्याकडे परत गेल्या नाहींत. तर ज्या कांहींच्या हातीं त्या आल्या त्यांचे ते कायमचे मालक बनले. कायद्यानें खाजगी मालमत्तेचे तत्त्व बळकट झालें तशीच आर्थिक विषमताहि कायद्यानें दृढ झाली. आर्थिक समता देणारा कायदा आर्थिक विषमतेचें सुख भोगणारे थोडाच करते ? त्यासाठीं समाजक्रान्तीची जरूरी होती. या राजकीय क्रान्तीच्या काळांत आर्थिक स्वातंत्र्याचे पुरस्कर्तेहि पुढें आले. पण तें स्वातंत्र्य त्यांना विषमता नष्ट करण्यासाठीं, आर्थिक समतेचें युग निर्माण करण्यासाठीं नको होतें. व्यापारी मक्तेदाऱ्या, आयात निर्यातीवरील बंधनें, वाढत्या उद्योगधंद्यावरील नियंत्रणें दूर व्हावीं व नवोदित भांडवलदारवर्गास अप्रतिहत प्रगति करतां यावी यासाठीं ते आर्थिक स्वातंत्र्याचा पुकार करीत होते. सामुदायिक प्रेरणेचे ते चहाते नव्हते तर त्यांची प्रेरणा व्यक्तिवादी होती. प्रत्येक व्यक्तीनें आपला उत्कर्ष साधावा व जुलमी बंधनें नष्ट झालीं तर प्रत्येक कर्तृत्ववान व्यक्तीस आपला उत्कर्ष साधतां येईल ही त्यांची निष्ठा होती.

या आर्थिक स्वातंत्र्यवाद्यांत फ्रेंच फिजीओक्रॅट्स व इंग्लंडमधील अर्थशास्त्रज्ञ अॅडॅम स्मिथ यांचा उल्लेख प्रामुख्यानें करावयास हवा. फ्रान्समधील राज्यक्रांति होईपर्यंत इंग्लिश राज्यक्रान्तीनंतरचीं शंभर वर्षे इंग्लंडमधील व्यापाराचा व उद्योगांचा सतत उत्कर्ष होत होता. राजसत्तेवरील पार्लमेंटचा अंकुश नव्या वर्गाचें हितरक्षण करीत होता. इंग्लिश व्यापारीवर्गानें जगांतील बहुतेक मोठ्या बाजारपेठा काबीज केल्या होत्या. मोठमोठ्या व्यापारी मक्तेदाऱ्या इंग्लंडच्या धनांत

मोठी भर आणून ओतीत होत्या. वसाहतींची अनिर्बंध लूट व वसाहतींचें विषम वांटप इंग्लंडला पूरक असल्यामुळें वर्धिष्णु समाजानें व्यापारी वर्गाच्या नियंत्रण, निर्बंध व नियमन या त्रिसूत्रीविरुद्ध बंड करून उठलेल्या आर्थिक स्वातंत्र्य-वाद्यांस पाठिंबा दिला. ज्या वर्षी ब्रिटिश साम्राज्य सरकारच्या व्यापारी शोषणाविरुद्ध अमेरिकन जनतेनें यशस्वी बंड केलें त्याच १७७६ मध्यें ॲडम स्मिथनें 'वेल्थ ऑफ दि नेशन' हा विख्यात ग्रंथ लिहून आर्थिक स्वातंत्र्य-वाद्यांच्या खुल्या व्यापाराच्या तत्त्वाचा प्रभावी प्रचार केला. मूटभर व्यापाऱ्यांच्या वसाहतींतील मोठमोठ्या मक्तेदारी कंपन्यांविरुद्ध त्याच वर्गाचे असंख्य छोटेमोठे प्रतिनिधि भांडत होते. वाढत्या उद्योगधंद्यांत व व्यापार क्षेत्रांत आपल्या कर्तृत्वाला व व्यक्तिगत उत्कर्षाला त्यांना वाव हवा होता. भांडवलाचें सामर्थ्य त्यांना उमगलें होतें. तें सतत खेळतें ठेवून व श्रमानें त्याचें मूल्य सतत वाढवून त्यांना स्वतःचा व राष्ट्राचा उत्कर्ष साधावयाचा होता. नफ्याची हांव त्यांना अधिक श्रम करण्यास उत्तेजन देत होती. व्यक्तिगत व राष्ट्रीय स्पर्धा करून जगाच्या बाजारपेठा जिंकण्यास त्यांना मुक्तद्वार व अनिर्बंध स्वातंत्र्य हवें होतें.

ज्या 'लेसेफेअर' या नांवानें ॲडम स्मिथची आर्थिक विचारसरणी संबोधिली जाते तो शब्द फ्रेंच आहे. वास्तविक ॲडम स्मिथच्या अगोदरच या कल्पनेला फ्रेंच विचारवंतांनीं जन्म दिला होता. 'लेसेफेअर' शब्दाचा अर्थ साध्या शब्दांत 'आम्हांला आमचें काय तें ठरवूं द्या' असा सांगतां येईल. अर्थात् इंग्लंडप्रमाणें फ्रान्समध्यें ही आर्थिक विचारसरणी व्यापार व उद्योगधंदे करणाऱ्या मध्यमवर्गाच्या अनिर्बंध स्वातंत्र्याच्या मागणीची दर्शक नव्हती तर फ्रेंच शेतकरी वर्गाच्या हितरक्षणासाठीं तिचा पुकार केला गेला होता. फ्रान्समधील खुला व्यापारवादी—फिजिओक्रॅटस्—शेतकरी वर्गाचे हितरक्षक, खाजगी माल-मत्तेचे समर्थक होते. त्या काळांत सर्वांत मोठी मालमत्ता जमिनींची होती. तेव्हां जमिनींचा मन मानेल तसा वापर व त्यांतून होणाऱ्या उत्पादनाची हवी तशी देवाणघेवाण करण्याचा अधिकार हाच त्यांच्या अनिर्बंध आर्थिक स्वातंत्र्याचा

अर्थ होता. त्या काळांत फ्रेंच राजसत्तेनें परदेशी व्यापाऱ्यांच्या धान्य विकण्यावर जबर कर बसवले होते एवढेंच नव्हे तर खुद्द फ्रान्समधील एका विभागांतून दुसऱ्या विभागांत धान्याची ने-आण करण्यावर जबर जकाती बसवल्या होत्या. तेव्हां शेतकरी वर्गास धान्य व इतर उत्पादन करण्यास पुरेसें प्रोत्साहन मिळावें, आपल्या उत्पादनाची जास्तींत जास्त किंमत त्यांस मिळावी व त्या उत्पादनाच्या व्यापारासाठीं सर्व बंदरें खुलीं व्हावींत या हेतूनें फिजीओक्रॅट्सनीं खुल्या व्यापाराचें अर्थतत्त्व प्रतिपादिलें. राष्ट्राची संपत्ति केवळ सोन्यानाण्यांत व संचित धनांत नसून व्यापार व उद्योगांतील उत्पन्नांत आहे; धनाचा सांठा महत्त्वाचा नसून भांडवल किती खेळतें आहे यास महत्त्व आहे हा त्यांचा आर्थिक दृष्टिकोण अर्थव्यवहाराच्या क्षेत्रांत तेव्हां क्रान्तिकारक ठरला यांत शंका नाहीं.

अर्थात् ॲडम स्मिथची विचारसरणी अधिक मूलगामी व नव्या युगाची दर्शक होती. वसाहतींतील मक्तेदारी स्वराष्ट्रप्रमाणेंच इतर स्वतंत्र राष्ट्रांतील उद्योगधंद्यांच्या वाढीस हानिकारक ठरतेंच पण त्यामुळें खुद्द वसाहतींतहि उद्योगधंद्यांची वाढ होत नाहीं, केवळ कच्च्या मालाची बाजारपेठ म्हणून तिचा वापर करण्याकडे मक्तेदारांची दृष्टि रहाते, असा आक्षेप त्यानें तत्कालीन व्यापारपद्धतीविरुद्ध घेतला. औद्योगिक क्रान्तीबरोबर निर्माण होणाऱ्या नव्या उत्पादक शक्ती या संकुचित धोरणांत जोमानें वृद्धिंगत होणार नाहींत अशी भीति त्यानें व्यक्त केली. कोणताहि उद्योग श्रमविभागणींतून भरभराटीस येतो. व्यक्तिगत श्रमिक आपल्या विशिष्ट कामांत अधिक निष्णात बनतो व त्यामुळें उद्योगांत अधिक प्रगति होते. हें एका उद्योगाचेंच तत्त्व सर्व औद्योगिक प्रगतीला लागू असतें. खुल्या बाजारपेठांतील स्पर्धेत टिकून राहाण्यासाठीं एकाद्या राष्ट्रांतील कांहीं उद्योगधंदेच या स्पर्धेत टिकूं शकतील. त्या राष्ट्रांतील विशिष्ट मुबलक कच्चा माल त्या राष्ट्राचे उद्योगधंदे अखेर निश्चित करील. त्याच धंद्यांत तेथील श्रमिक अधिक निष्णात बनतील व जगांत अनिर्बंध औद्योगिक वाढ घडून येईल. श्रमविभागणींतून वाढतें उत्पादन होतें. बाजारपेठांचें वाढतें क्षेत्र वाढती श्रमविभागणी घडवून आणते व खुला व्यापारच बाजारपेठांचें

अमर्याद क्षेत्र निर्माण करतो. व्यक्तिगत स्पर्धेप्रमाणेंच राष्ट्राराष्ट्रांमधील व्यापार खुल्या तत्त्वानें होऊं लागला कीं प्रत्येक राष्ट्र कांहीं उत्पादनांत उच्चांक गांठील, त्या उत्पादनांचा एकंदर दर्जा वाढेल व जगांतील सर्व उद्योगधंद्यांचा उत्कर्ष साधेल. अर्थात् हें ॲडम स्मिथचें खुल्या व्यापाराचें धोरण इंग्लंडमधील नवोदित भांडवलदार वर्गाला स्वीकारतां आलें यास तशींच कारणें आहेत. याच वर्षी इंग्लंडमध्यें शास्त्रज्ञ वॅटनें बाष्पशक्तीवर यंत्र चालविण्यांत स्पृहणीय यश मिळविलें होतें. पुढील पंचवीस वर्षांच्या काळांत अनेक खाणींत, कारखान्यांत व कापड गिरण्यांत नव्या यंत्रांच्या साहाय्यानें इंग्लंडमध्यें उत्पादन होऊं लागलें. दळण-वळणाच्या साधनांतहि क्रान्ति घडून आली. जगांतील दूरदूरच्या बाजारपेठांस जलद गतीनें उत्पादित माल पोहोंचवतां येऊं लागला. पुढील प्रकरणांत याचा आपण विस्तारानें विचार करणारच आहोंत. पण ॲडमस्मिथचें तत्त्व इंग्लंड-मधील नव्या औद्योगिक वर्गास कां सहज स्वीकारतां आलें हें येथें सूचित केलें आहे. राजकीय स्वातंत्र्याच्या पर्वात व्यक्तिवादी तत्त्ववेत्त्यांनीं ज्या आर्थिक स्वातंत्र्याचा पुकार केला होता तें स्वातंत्र्य, आर्थिक विषमता नष्ट करून समतावादी समाज निर्माण करण्यासाठीं त्यांना नको होतें तर नवोदित वर्गास आपला अनिर्बंध आर्थिक उत्कर्ष साधतां यावा या उद्दिष्टानेंच आर्थिक स्वातंत्र्याचें तत्त्व प्रतिपादण्यांत आलें होतें. क्रान्तीसाठीं बलिदान करणाऱ्या सर्व समाजांस हें कळून येण्यास कांहीं कालावधि लोटणार होता. पण फ्रेंच राज्यक्रांतींतील समतावाद्यांनीं त्याची जाणीव जनतेस करून देण्याची पराकाष्ठा केली.

फ्रेंच राज्यक्रान्तीनें प्रजेचें अनियंत्रित शासन करणारी राजेशाही व पिढ्यान पिढ्या जमिनींची व जमिनीवर राबणाऱ्या कुळांची मालकी सांगणारी सरंजामदारशाही नष्ट केली. फ्रेंच राज्यक्रान्तीनें सुरू केलेलें हें ऐतिहासिक कार्य एकोणिसाव्या शतकांत युरोपमधील प्रत्येक राष्ट्रांतील क्रान्तिकारी शक्तींनीं पुरें केलें. पण फ्रेंच राज्यक्रान्तीनें आणखी एक महान् ऐतिहासिक प्रेरणा या क्रान्तिकाळांत युरोपीय जनतेला दिली. तिला समतावादाची प्रेरणा म्हणून संबोधतां येईल. पराकोटीस पोहोंचलेली आर्थिक विषमता व मूठभर व्यक्तींच्या

हातीं झालेला धनसंचय लोकशाही स्वातंत्र्याच्या प्रस्थापनेस विघातक आहे याची कबुली क्रान्तींतील सर्व वर्गांच्या प्रतिनिधींनींच दिली होती. पण जवळ जवळ क्रान्तीच्या दिवसापासूनच क्रान्तीचे कांहीं पुढारी अशी विचारसरणी मांडूं लागले होते कीं खरीखुरी समता समाजजीवनांत निर्माण झाल्याखेरीज, समता वस्तुस्थिति बनल्याखेरीज, समान राजकीय हक्क कवडीमोल होत. क्रान्तिकालांतील पहिल्या कांहीं महिन्यांत जन्मास आलेल्या कित्येक कृति समित्या "सर्व जनतेस जमिनीचा ताबा घेण्याचा अधिकार आहे व संपत्तीचें समान वांटप झालें पाहिजे" अशा मागण्या पुढें मांडत होत्या. मध्यमवर्गांच्या आर्थिक स्वातंत्र्याच्या घोषणेचे ते विरोधक होते. राजकीय क्रान्ति व समाजक्रान्ति एक नाहीं असें पॅरिस-मधील कामगार बोलूं लागले होते. फक्त उत्पादक श्रमालाच मोबदला मिळाला पाहिजे व तें वेतन योग्य असलें पाहिजे अशी कामगारांची मागणी होती. १७९३ त राजाला फांसावर चढवल्यानंतर समतावादी विचारसरणीचा उघड उघड प्रचार होऊं लागला. मध्यम वर्गांच्या बहुतेक प्रतिनिधींनीं जरी या विचारसरणीचा धसका घेतला तरी कांहीं प्रतिनिधींवर त्याचा प्रभाव पडलाच. अर्थात् 'कन्व्हेन्शन्'मधील वादविवादापेक्षां १७९३–९४ त बाहेर चालू असलेल्या चळवळींवरच या विचारप्रणालीचा प्रभाव अधिक प्रमाणांत पडला. समाजवादाच्या उद्दिष्टपूर्तीसाठीं आत्यंतिक जहाल क्रान्तिकारकांची जमवाजमव करण्याचे प्रयत्न या कालांत झाले. या प्रयत्नांतूनच बॅबूफ व ब्यूनारोटी यांनीं १७९५ त गुप्त समतावादी संस्था स्थापन केल्या व जुलै १८३० च्या क्रान्तीनंतर ब्लँक्विस्टांच्या अशाच गुप्त संस्था उदयास आल्या. १७९३ च्या समतावाद्यांचीं उद्दिष्टें लोकांच्या प्राथमिक गरजांतून जन्मास आलीं होतीं. प्रत्येक व्यक्तीच्या उपजीविकेचा प्रश्न त्यांना सोडवावयाचा होता व म्हणून जमिनीचा प्रश्नच त्यांना सर्वांत महत्त्वाचा वाटला. उत्पादनाच्या वांटपाला त्यांनीं प्राधान्य दिलें. प्रत्येक क्रान्तिकारक वर्गांत समतावादाचे पुरस्कर्ते होते. कोणाचा भर औद्योगिक समतेवर होता तर कोणाचा जमिनीच्या समान वांटणीवर. कांहीं हें समतेचें तत्त्व व्यापार व पतव्यवहारांसहि लावूं मागत होते. बँकांनीं केलेल्या देवाण घेवाणींत जो नफा होतो तोहि अखेरीस सर्व जनतेनें सर्व

जनतेवर टाकलेल्या विश्वासामुळें होतो, त्यांत परस्पर सहकाराचें तत्त्वच अंतर्भूत आहे, असा त्यांचा दावा होता. फ्रान्समधील महान् क्रांतिप्रेरणा निष्प्रभ होऊन प्रतिक्रांतिकारक शक्तींनीं उचल खाल्ल्यावर बॅबूफ आदि समतावाद्यांनीं तर क्रांतीचे गुप्त कट रचून सत्तेचा कबजा घेण्याचे प्रयत्नहि केले. स्वयंस्फूर्त क्रांति-प्रयत्नाची जागा संघटनात्मक क्रांतिकारी प्रयत्नांनीं घेतली. पण त्यांत बॅबूफला यश लाभलें नाहीं. रॉक्स आदि समतावादी फार कल टिकणारी हुकुमशाही स्वातंत्र्याचा अपहार करील असें मानत होते तर बॅबूफला गुप्त गटानें, एवढेंच काय एकाद्या पोलादी पुरुषानें, आपल्या प्रखर क्रांतिनिष्ठेनें सत्ता हस्तगत केली व समतावादी समाजव्यवस्था निर्माण करून जगाला वांचवलें तरी पसंत होतें.

आजच्या जगांतील सर्व कम्युनिस्ट, अराज्यवादी, समाजवादी उद्दिष्टांना फ्रेंच राज्यक्रांतीनें व त्या क्रांतींत भाग घेतलेल्या ज्वलन्त क्रांतिकारकांच्या महान् निष्ठेनें जन्म दिला आहे हें त्या युगप्रवर्तक क्रान्तीचा व क्रान्तिकालांत प्रसृत झालेल्या कल्पना व वाङ्मयाचा सम्यक् अभ्यास करणारास कबूल करावें लागेल. बॅबूफनें समतावादी समाजव्यवस्थेचें कल्पनाचित्र मात्र भावी युगाच्या प्रवाही शक्ति आकलन करूं शकलें नाहीं. पुरातन सामुदायिक जीवनाचा आदर्शच त्यानें स्वतःपुढें ठेवला होता व ती भूतकालांतील नैसर्गिक समता जनतेला लाभावी हीच त्याची उत्कट इच्छा होती. म्हणूनच त्याची गणना स्वप्नद्रष्ट्या समाज-वाद्यांत होते. त्यानें फ्रान्समधील प्रचलित समाजव्यवस्थेवर कठोर हल्ले चढवलेच पण फ्रेंच क्रान्तींतील ज्या क्रान्तिकारकांनीं दडपशाहीचें धोरण सोडून दिलें त्यांच्याबद्दलहि त्यानें सक्त नाराजी व्यक्त केली. त्याच्याच एका वाक्यांत त्याच्या कल्पनाचित्राचें दिग्दर्शन करावयाचें झालें तर असें करतां येईलः "सर्वांचें सुख हाच समाजाचा आद्य हेतु असतो आणि हें सुख समतेंत सामावलेलें आहे."*
त्याचे अनुयायी सांगत "सर्व वस्तुमात्राचा वापर करण्यास निसर्गानें प्रत्येक व्यक्तीस समान हक्क बहाल केला आहे."*

फ्रान्समध्यें क्रांतिकालांत राजाला फांशीं दिल्यावर समतावादी चळवळींनीं

* सोशल इकॉनमिक मूव्हमेंट्स् : एच्. डब्ल्यू. लेडलर : पान ४६

डोकें वर काढलें हें आपण पाहिलें आहे. तसेंच इंग्लंडमध्येंहि राजा श्रेष्ठ कीं पार्लमेंट श्रेष्ठ या प्रश्नाचा निकाल, क्रॉमवेलसारख्या धुरंधर सेनानींनीं लढाईत यश मिळवून १६४८च्या क्रान्तींत पार्लमेंटच्या बाजूनें मिळवून दिला. तेव्हां हीच समतेची भूक शेतकरी वर्गानें व समतावाद्यांनीं व्यक्त केली होती. जेव्हां माणसाचें अधःपतन सुरू झालें, तो स्वार्थी, मत्सरी बनला, तेव्हां नैसर्गिक सामुदायिक जीवनाचा त्यानें त्याग केला ही हॉब्सची मीमांसा त्यांनीं खोडून काढली. नॉर्मन्सनीं इंग्लंडवर हल्ला करून इंग्लिश समाजाचा पाडाव केला तेव्हां त्या नैसर्गिक समाजव्यवस्थेचाच अनुभव जनता घेत होती; नॉर्मन्सनींच जनतेवर राज्यसत्ता लादली असें त्यांचें म्हणणें होतें. म्हणूनच समतावाद्यांचा नेता विन्स्टॅन्ले यानें विजयी सेनानी ऑलिव्हर क्रॉमवेलकडे अशी मागणी केली कीं त्यानीं जेत्यांना हांकलून लावून, "आमच्या जमिनी व आमचें स्वातंत्र्य आम्हांस मिळवून द्यावें...कारण जेव्हां आमच्या पूर्वजांना नॉर्मन सत्तेनें जिंकलें तेव्हां इंग्लिश जमिनीचा ते करीत असलेला विनामूल्य वापर त्यांना नंतर करतां येईना व ते सत्तेचे चाकर बनले." आपल्या न्यायनिष्ठ कायद्याच्या कल्पनाचित्रांत त्यानें लिहिलें, "जशी जमिनीची खरेदी–विक्री होतां कामा नये तशीच जमिनींतून निर्माण होणाऱ्या उत्पादनाचीहि... कोणालाहि धान्य व इतर वस्तूंची गरज पडली तर त्यानें कोठारांत जावें व विनामूल्य घेऊन यावें...जसा प्रत्येकजण सामुदायिक सांठा निर्माण करण्यासाठीं झटतो तसाच स्वतःचें जीवन सुखी करण्यासाठीं त्याचा अनिर्बंध फायदा घेण्याचा अधिकार त्यास पोहोंचतो." या काळांतील इतर स्वप्नद्रष्ट्यांप्रमाणें विन्स्टॅन्लेहि सामुदायिक मालकीचा पक्षपाती होता. आपल्या विचाराचें आचरण शेतकरी वर्गानें सर्वत्र करावें म्हणून स्वतः नांगरटी करणाऱ्या त्याच्या गटानें सरेमधील एक टेकडी खणून व त्याची मशागत करून 'उत्पादन' पुनश्च पुरातन व्यवस्थेप्रत नेऊन पोहोंचविण्याच्या 'चळवळीस' चालना देण्याचा प्रयत्न केला. आजच्या परिस्थितींत सर्व सार्वजनिक जमीन, पार्क्स, पडीत जमिनी सामुदायिक नांगरटीखालीं आणा म्हणजे इतरांना या सामुदायिक प्रयत्नांतील रहस्य कळलें कीं तेहि असेंच उत्पादन करूं लागतील अशी त्यांची श्रद्धा होती.

पण अशा समतावादी चळवळींना आतां अनुकूल काल राहिला नव्हता. नैसर्गिक संपत्तीच्या समान वांटपाहून व उपभोगाहून प्रजेनें आपल्या श्रमांनीं उत्पादनांत अवाढव्य वाढ केली पाहिजे, समाजाची संपत्ति वाढविण्याचा आदर्श डोळ्यापुढें ठेवला पाहिजे, हीच कालाची मागणी होती. नैसर्गिक धनांहून श्रमांतून निर्माण होणारें धनच समाजाची भरभराट घडवून आणणार आहे व त्यांत व्यक्तिगत पुढाकारच उपयुक्त ठरणार आहे असें व्यक्तिवादी प्रतिपादीत होते. या उत्कर्षाच्या मार्गांत येणारी सरंजामशाही व राजेशाही उखडून टाकण्याच्या प्रयत्नांत क्रान्तिकारी व्यक्तिवादी व क्रान्तिकारी समतावादी खांद्यास खांदा लावून लढले खरे पण पुरातन सामुदायिक जीवनाचे समतावाद्यांचे आदर्श वा प्रयत्न लोकमान्य झाले नाहींत. आर्थिक स्वातंत्र्याच्या व्यक्तिवाद्यांच्या तत्त्वज्ञानानें समाजाची आर्थिक विषमता स्थिर झाली एवढेंच नव्हे तर जेव्हां तिनें दिक्राळ स्वरूप धारण केलें तेव्हां अर्थातच वाढत्या उत्पादनाबरोबर वाढत्या आर्थिक समतेच्या चळवळींनीं नवस्वरूप धारण केलें.

सारांश धर्मस्वातंत्र्य, व्यवसायस्वातंत्र्य, व्यक्तिस्वातंत्र्य, सरंजामशाही व्यवस्थेचें उच्चाटन, प्रातिनिधिक राज्यसंस्था, भौतिक भरभराटीची ईर्षा व स्वातंत्र्य चळवळींतील समतेची प्रेरणा हीच समाजवादाची ऐतिहासिक पार्श्वभूमि होती.



: २ :

# औद्योगिक युगाचा प्रारंभ

सतराव्या शतकांत इंग्लंडमध्यें राज्यक्रान्ति झाली. प्रातिनिधिक राज्यसत्तेचा उदय झाला. समाजाचें नेतृत्व सरंजामदार, धर्मगुरु, सरदार यांच्या हातून गेलें. अनियंत्रित राजेशाहीवर लोकप्रतिनिधींचा अंकुश चालूं लागला व समाजाचें नेतृत्व नव्या वर्गाच्या हातीं आलें. हेंच कार्य फ्रान्समध्यें फ्रेंच राज्यक्रान्तींतून सुमारें शंभर वर्षांनीं पुरें झालें. पण या शंभर वर्षांच्या काळांत फ्रान्समधील रक्तरंजित क्रान्तीइतकीच महत्त्वाची क्रान्ति इंग्लंडमध्येंहि चालू होती. इंग्लंडमधील औद्योगिक क्रान्ति या नांवानें ती युरोपच्या इतिहासांत प्रसिद्ध आहे. व्यापार व उद्योगधंद्याच्या वाढीस ज्या शान्ततेची व सुव्यवस्थेची जरूरी नव्या वर्गास होती तो शान्ततेचा काळ इंग्लंडला या शंभर वर्षांत लाभला होता. साहजिकच युद्धांसाठीं व अनियंत्रित राजेशाहीच्या रक्षणासाठीं उभारल्या जाणाऱ्या प्रचंड खड्या सेनांचा आर्थिक बोजा नव्या वर्गाच्या शिरावर पडला नाहीं व राजघराणें स्वतःच्या ऐषआरामासाठीं व उधळपट्टीसाठीं नव्या वर्गाच्या संपत्तीवर विसंबून असल्यामुळें कोणत्याहि प्रकारच्या राजकीय वर्चस्वाची झळ त्याला बाधली नाहीं. इंग्लंडच्या या इतिहासाप्रमाणेंच इंग्लंडचें भौगोलिक वैशिष्ट्यहि नव्या क्रान्तीच्या साहाय्यास धांवून आलें. अमेरिका खंडाचा शोध

लागल्यावर व आफ्रिकेला वळसा घालून सुसंपन्न पौरस्त्य राष्ट्रांतील धान्य व इतर कच्चा माल मिळण्याची शक्यता निर्माण झाल्यावर भूमध्य समुद्र व खुष्कीचे मार्ग पूर्वीइतके महत्त्वाचे राहिले नाहींत. ब्रिटिश बेटें जुन्या जगांत एका टोंकाला पडलीं होतीं तर ब्रिटन आतां नव्या जगाचें मध्यवर्ती व मोक्याचें ठिकाण होऊन बसलें. बहुतेक नवा व्यापार समुद्रावरूनच होत होता. नाविक विद्येस नवें महत्त्व प्राप्त झालें होतें. स्वतःच्या राष्ट्रांच्या चतुःसीमांवर समुद्र असलेली प्रजा साहजिकच या विद्येंत अग्रेसर ठरली. तिचीं नैसर्गिक बंदरें व्यापारी देवाणघेवाणीचीं व पतपेढ्यांचीं मोक्याचीं केंद्रें बनलीं. बँक ऑफ इंग्लंडशिवाय ब्रिटिश आरमार अजिंक्य बनणें कठिण होतें. लोखंड, कोळसा व कापड गिरण्यांच्या ज्या पायावर इंग्लंडनें नव्या औद्योगिक युगाची उभारणी केली व भांडवलशाही जगानें तो धडा गिरवला, तो लोखंड व कोळसाहि तिच्या भौगोलिक संपत्तीचा मोठा भाग होता.

नफा हाच व्यापाराचा आत्मा आहे. व्यापारी हा धनाचा केवळ संचय करीत नाहीं. धनवाढीसाठीं पुन्हा तें धन व्यापारांत गुंतवितो. वाढता व्यापार वाढत्या फायद्याच्या रूपानें पुन्हा वाढतें धन व्यापारास पुरवितो. पण व्यापारी स्पर्धेतील धनवृद्धीस कांहीं मर्यादा पडतेच. त्या मर्यादेपलीकडे संपत्तीची वाढ होऊं शकत नाहीं. व्यापारयुगांतील धनसंचय केवळ वस्तूंच्या देवाण-घेवाणींतील कमिशननें झाला नाहीं. चांचेगिरी, लूट, फंदफितुरी, नव्या शस्त्रास्त्रांच्या जोरावर कित्येक वसाहती पादाक्रान्त करून तेथें प्रस्थापित केलेल्या साम्राज्यसत्ता, नव्या वसाहतींचें दंडुक्याच्या जोरावर केलेलें आर्थिक शोषण, गुलामांच्या व्यापारांतून व जनावरांप्रमाणें त्यांच्या श्रमशक्तीचा अपहार करून उभारलेल्या मळ्यांतून मिळविलेलें अमाप धन या व अशा सर्व अनैतिक व अमानुष वाममार्गांचा अवलंब व्यापाराच्या नांवाखालींच केला गेला. १६८० ते १७८६ या एक शतकाच्या काळांत अमेरिकेसारख्या एका इंग्लिश वसाहतींत फक्त आफ्रिकेंतून कमींत कमी २० लाख काळ्या लोकांची गुलाम म्हणून आयात झाली व त्यांच्या रक्तशोषणावर अगणित मळे उभारले गेले ही

सत्यकथा ध्यानांत घेतली तर इंग्लंड व त्याच्या मागोमाग इतर युरोपीय राष्ट्रांनीं भांडवलशाहीच्या उभारणीस आवश्यक असलेला प्राथमिक धनसंचय कसा केला याचा उलगडा होईल. अर्थात् हें सर्व शोषण युरोपीय समाजाच्या भौतिक उत्कर्षास हातभार लावीत असल्यामुळें व या प्रक्रियेंत सामान्य जनता जातीनें भागीदार नसल्यामुळें तिनें त्याची दखल घेतली नाहीं. आणि शास्तावर्ग तर बोलूनचालून आशिया आफ्रिकेंतील जनता मागसलेली व असंस्कृत आहे व तिच्या उद्धाराचें ओझें वाहाण्याची ऐतिहासिक जबाबदारी गोऱ्या लोकांवर येऊन पडली आहे या दर्पयुक्त सांस्कृतिक श्रेष्ठतेच्या अहंकारांतून वसाहतीचें राजकारण व अर्थकारण चालवीत होता. साहजिकच स्वराष्ट्रांतील राज्यकारभार-विषयक सुधारणावादी दृष्टिकोण व व्यक्तिगत हक्कांचें संरक्षण याची तमा वसाहतींच्या अम्मलबजावणींत त्यानें बाळगली नाहीं. इंग्लंडचाच काय पण सर्व युरोपीय लोकशाहींचा स्वदेशांतील उत्कर्ष होण्यास हें आशिया व आफ्रिका खंडांतील अनिर्बंध शोषण उपयोगी पडलें. मात्र नंतरच्या युरोपीय समाजवादी चळवळींचें तेज निष्प्रभ ठरण्यास हा साम्राज्य शोषणाचा इतिहास कारणीभूत झाला. समाजवादांत नैतिक बल आहे असा दावा निःशंक मनानें करतांना हा साम्राज्य सरकारांचा अनैतिक वारसा आज लोकशाही समाजवादी राष्ट्रांना जाचक झाला आहे. पण तो आजमितीचा प्रश्न आहे. त्या काळांत या अनेकविध प्रकारच्या शोषणांतून इंग्लंडांतील संपत्तीला पूर आला व भांडवल-शाही उत्पादनाच्या वाढीस आवश्यक असलेल्या प्राथमिक भांडवलाचा संचय होऊं शकला एवढें खरें.

संपत्ति व भांडवल यांत मोठा फरक आहे. संपत्तीचा उपयोग माणूस आवश्यक व उपभोगाच्या वस्तू खरेदी करण्यासाठीं करतो. पण जेव्हां संपत्तीचा मालक वस्तु किंवा श्रम विकत घेऊन व फायद्याची माया स्वतःसाठीं ठेवून पुन्हा त्यांची विक्री करतो तेव्हां ती संपत्ति भांडवल म्हणून संबोधली जाते. जेव्हां विक्री खरेदीसाठीं होते तेव्हां उपयुक्तता हाच देवाणघेवाणीचा पाया असतो; पण तीच खरेदी विक्रीसाठीं होऊं लागली कीं नफा हा देवाणघेवाणीचा

पाया बनतो. भांडवलशाहीपूर्व व भांडवलशाही अर्थव्यवहारांत हाच मूलभूत फरक आहे. व्यापारयुगांत व्यापारी वस्तू विकत घेऊन त्या नफ्यांत विकत होताच. भांडवलदारानें एका विशेष वस्तूची खरेदी केली. कामगाराची श्रमशक्ति हीच ती वस्तु होय. उत्पादनांच्या साधनांचा, इमारती, कारखाने व कच्चा माल यांचा तो मालक होताच. आतां त्यानें कामगारांची श्रमशक्ति विकत घेतली. ठराविक मजुरी देऊन आपल्या उत्पादन साधनांवर त्यांस कामास लावलें व विक्रेय वस्तू तयार करून त्या फायदा घेऊन विकण्यास सुरवात केली. जर मजुरीइतकेंच मूल्य त्यानें निर्माण केलें असतें तर भांडवलदारानें हा उपद्व्याप केलाच नसता. तेव्हां मजूर आपल्या श्रमांतून त्याला मिळणाऱ्या मजुरीहून अधिक मूल्य निर्माण करीत होता व तें नफ्याच्या स्वरूपांत भांडवलदाराच्या खिशांत जात होतें हें उघड आहे.

भांडवलाचा प्राथमिक संचय कसा झाला हें आपण वर पाहिलें. पण भांडवलशाही उत्पादनाची सुरवात होण्यासाठीं ज्या लक्षावधि मजुरांची आवश्यकता होती ते मजूर आले कोठून हा प्रश्न शिल्लक राहातोच. १७६० ते १८२१ या पन्नास वर्षांत इंग्लंडची लोकसंख्या सत्तर लाखांवरून एक कोटी वीस लाखांवर गेली. याच काळांत सोळाव्या शतकानंतर पुनश्च शेतजमिनीला कुंपणें पडूं लागलीं. बऱ्याच जमिनी श्रीमंतांचीं राखीव कुरणें बनलीं. इंग्लंडमध्येंच प्रथम आधुनिक शेती फार्म्स सुरू झाले. उघड्या शेतजमिनींची व निरनिराळ्या विभागांत विखुरलेल्या शेतीच्या तुकड्यांची स्वतंत्र मशागत होणारी मध्ययुगीन शेतीची पद्धत झपाट्यानें मागें पडली. मुळ्या लावून निघणारीं पिकें इंग्लंडमधील शेतकरी घेऊं लागला तेव्हां शेतीचें उत्पादन फार मोठ्या प्रमाणावर वाढल. लागोपाठ दोन वर्षं धान्यांचें पीक घेतां येत नाहीं म्हणून पडीत टाकलेलीं शेतें उपयोगांत आलीं. शेतीचा धंदा आर्थिक दृष्टया किफायतशीर बनविण्यांत आला. पार्लमेंटनें 'कुंपणांचे कायदे' पास करून यावेळीं शेतींतील परिवर्तनास कायद्याचा पाठिंबा दिला. स्वतःची थोडीशी तरी जमीन असलेला शेतमजूर आतां जमीन नसलेला मजूर बनला होता. जमिनीचे बंध तुटल्यामुळें

त्यानें शहराचा रस्ता पकडला. जमिनदारांनीं भांडवलदारांना मजूर पुरविण्या-साठीं हा उद्योग आरंभला होता असें मुळींच नाहीं. पण आपलीं गुरें गांवच्या सामुदायिक पडीत जमिनीवर चरवून शेती करूं मागणाऱ्या शेतकऱ्यास त्या जमिनीला कुंपणें पडल्यामुळें आतां मोफत गुरें चरवतां येणार नव्हतीं. कायद्यानें त्या कुंपणांना व जमिनदाराला संरक्षण दिलें होतें. शेतकऱ्यास शिक्षा व दंड होणार होता. कुंपण घातलेल्या शेतांचा खंडहि तिपटी चौपटीनें अधिक येऊं लागला होता. सोळाव्या शतकापासून एकोणिसाव्या शतकापर्यंत वाढत्या प्रमाणांत शेतकरी वर्ग आपल्या जमिनीवरून उठत गेला. फ्रान्समध्यें छोट्या जमिनींचा मालक बनलेला शेतकरी वर्ग क्रान्तिकालांत तरी निर्माण झाला; पण औद्योगिक भांडवलशाहीची वाढ झपाट्यानें होणाऱ्या इंग्लंडमध्यें तो वर्ग या कृषि-व्यवसायांतील परिवर्तनांत जवळजवळ नष्टच झाला. कारखान्याच्या दारांत उभ्या राहाणाऱ्या कामगारांच्या रांगेंत येऊन त्यास दाखल व्हावें लागलें.

पण जमिनीवरून उठलेल्या शेतकऱ्यांहून स्वतंत्र व्यवसायांतून उठलेले कारागीरच अधिक संख्येनें कामगार बनत होते. कारखानदारी पद्धतीनेंच कारागिरांच्या हातचें उत्पादनाचें साधन अखेर हिसकावून घेतलें. भांडवल-दाराच्या कारखान्यांतील यंत्रावर, उत्पादन साधनांवर, तो आतां मजूर म्हणून राबणार होता. यांत्रिक शक्तीवर होणाऱ्या कारखान्यांतील उत्पादनांशीं हातानें चरखा अगर माग चालवून उत्पादन करणारा स्वतंत्र कातकरी विणकरी थोडीच स्पर्धा करूं शकणार होता? व्यापारी स्पर्धेत आपला माल तितकाच स्वस्त विकणें त्याला परवडणें शक्य नव्हतें. स्वतंत्र कारागिरास, मजूर ठेवून उत्पादन करणाऱ्या छोट्या कारखानदारानें खावें व छोट्या कारखानदारास मोठ्या कारखानदारानें खावें. स्पर्धेच्या युगांत कोण कोणास संरक्षण देणार? औद्योगिक क्रान्तींतून निर्माण झालेल्या भांडवलशाही उत्पादनपद्धतींत अशा तऱ्हेनें समाजांतील वर्गवारी झपाट्यानें उग्र स्वरूप धारण करूं लागली. बड्या उत्पा-दकांची संख्या घटत गेली तर छोटे कारखानदार, उत्पादक, स्वतंत्र कारागीर मोठ्या संख्येनें मजूर वर्गांत फेंकले गेले. यापुढें मोठमोठीं यंत्रें निर्माण करणारे

अगर विकत घेऊं शकणारे भांडवलदार व शास्त्रीय पद्धतीनें आधुनिक शेती, बागायत करणारे जमीनमालक, हेच उत्पादनसाधनांचे मालक राहाणार होते. इतर त्या साधनांच्या साहाय्यानें मालकासाठीं रोजगारीनें उत्पादन करणार होते. अनुभवी शेतकरी व कुशल कारागीर यांची समाजांतील प्रतिष्ठा व धंद्यांतील विशेष स्थान यांत्रिक सुधारणेबरोबर नष्ट झालें. ही यांत्रिक प्रगति झाली कशी ?

इंग्लिश राज्यक्रान्तीनंतर लाभलेल्या शांतता व सुव्यवस्थेच्या काळांत व्यापार व उद्योगांत जसा सतत उत्कर्ष होत गेला तसाच विज्ञान व संशोधनाच्या क्षेत्रांतहि. अठराव्या शतकाच्या सुरवातीस स्थापन झालेल्या रॉयल सोसायटीनें इंग्लिश जनतेंत वैज्ञानिक कुतूहल व जिज्ञासा निर्माण करण्याच्या कार्यांत पुढाकार घेतला. सतत निरीक्षण व प्रयोग यांतून नव्या सत्याची प्रचीति होऊं शकते असा विश्वास बुद्धिजीवि वर्गास लाभला. धर्मसुधारणेच्या काळांत धर्म हाच बुद्धिवाद्यांच्या चिकित्सेचा व मीमांसेचा प्रमुख विषय होता. पण आतां उद्योग व व्यापार यांत प्रगति करून धनसंपत्तीची अधिकाधिक वाढ कशी साधतां येईल याकडेच जनतेच्या संशोधक मनोवृत्तीचें लक्ष वेधलें गेलें. या प्रयत्नांत फक्त शास्त्रज्ञांनीं व बुद्धिवाद्यांनींच सुयश मिळविलें असें मुळींच नाहीं. सूक्ष्म अवलोकन शक्तीच्या कामगारांनींहि अनेक नव्या कल्पनांना जन्म देऊन या प्रयत्नास हातभार लावला. हे प्रयत्न मुख्यत्वें सूत व विणकाम सुधारण्यास कारणीभूत झाले. आजपर्यंत पाण्याच्या शक्तीचाच उपयोग कारखाने प्राधान्येंकरून करीत होते व साहजिकच तुरळक वस्ती असूनहि डोंगरकांठीं, धन-धान्यांच्या आसपास हे कारखाने चालवावे लागत. पण पाण्याच्या शक्तीऐवजीं वाफेचा उपयोग करण्याचा शोध लागतांच हे कारखाने बरीच लोकसंख्या असलेल्या गांवांमध्यें सुरू करणें शक्य झालें. १७७३ त अमेरिकन राज्यक्रान्ति झाली, ॲडम स्मिथनें खुल्या व्यापाराच्या तत्त्वाचा पुकार केला आणि जेम्स वॅटनें पंपास स्वतंत्र कंडेन्सरची योजना करून बाष्पशक्तीच्या अभूतपूर्व उपयुक्ततेची ओळख पटवून दिली. मार्चमध्यें या शक्तीचा उपयोग ब्लूमफील्ड खाणींत प्रथम करण्यांत आला व या एका कल्पक योजनेनें पुढील कांहीं वर्षांत सर्वत्र

कोळशांच्या खाणी निघूं लागल्या, कारखान्यांतील यंत्रांनीं प्रचंड वेग पकडला, असंख्य लोकांचें थंडीपासून निवारण झालें, अधिक प्रकाश माणसांच्या सेवेला आला, अधिक यंत्रें निर्माण होऊं लागलीं व लक्षावधि जनतेच्या सुखसोयींत भर पडली. मानववंशाच्या प्रगतीचा इतिहास त्यानें स्वतःसाठीं विविध साधनांचा केलेला उपयोग व त्यांत केलेल्या सुधारणांतच सामावलेला आहे. हें माध्यम त्यास न लाभतें तर इतर प्राणिमात्रांप्रमाणें स्वशक्तीवरच त्यास विसंबून राहावें लागतें. त्यांच्याहून त्यांचें जीवन फारसें निराळें न होतें. पण एकदां या साधनांना बाष्पशक्तीची जोड मिळाल्यावर उत्पादनसाधनांत व तज्जन्य उत्पादनप्रकारांत अभूतपूर्व क्रान्ति घडून आली. कारखानदारी पद्धतीचें अपूर्व पुनर्संघटन झालें. विक्रेय वस्तूंचें उत्पादन फार मोठ्या प्रमाणावर होऊं लागलें. घरच्या व बाहेरच्या दोन्ही बाजारपेठांत मुबलक माल जाऊं लागला. व्यापारालाहि उत्पादनाबरोबर नवी गति मिळाली. शेतीच्या उत्पादनांतील क्रान्तीला तसेंच उद्योगधंद्यांतील क्रान्तीला, दळणवळणांच्या साधनांतील क्रान्तीनें अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत महत्त्वपूर्ण जोड दिली. शेतीचें उत्पादन वाढलें तरी तें उत्पादन वाहून नेण्याचे रस्ते पुराणे व त्यांची देखभाल पाहाण्याची व्यवस्था पुरातन होती. जलमार्गांचा वापर क्वचितच होत होता. विल्यम ब्रिंडले या विख्यात इंजिनिअरनें मँचेस्टर व लिव्हरपूल प्रथम जलमार्गानें एकमेकांस जोडले. मेटकॅफ, टेलफोर्ड, मॅकॅडम आदि इंजिनिअर्सच्या प्रेरणेनें या क्षेत्रांतहि इंग्लंडनें मोठी प्रगति केली व रस्ते, कालवे, पूल यांनीं देशांतील सर्व भूप्रदेश परस्परांस जोडला गेला. वाहतूक मोठ्या प्रमाणांत वाढली. १८२९ मध्यें जॉर्ज स्टिफन्सननें रेल्वे सुरू केली तेव्हां या क्षेत्रांतील प्रगतीनें अत्युच्च शिखर गांठलें. औद्योगिक क्रान्तीला अत्यावश्यक असें समाजाचें वाढतें अभिसरण सुरू होण्यास वाहतुकीच्या साधनांतील क्रान्तीनें फार मोठा हातभार लावला होता. वाढती प्रजा, तसेंच वाहतूक, शेती व औद्योगिक उत्पादनांतील अभूतपूर्व क्रान्ति परस्परपूरक होती. प्रत्येक क्षेत्रांतील वाढ व प्रगति दुसऱ्या क्षेत्रांतील प्रगतीस साहाय्य करीत होती. या सर्व शक्तींमधून नवें भांडवलशाही युग निर्माण झालें. एकदां उत्पादन व विनिमय यांच्या पद्धतींत क्रान्ति घडून आल्यावर,

सरंजामशाहीची जागा भांडवलशाहीनें घेतल्यावर, जुने कायदे, जुनीं शास्त्रें, जुनी शिक्षणपद्धति, जुनी राज्यव्यवस्था, जुना धर्म यांतहि अनुरूप बदल घडून आले. जेव्हां स्वतः व स्वतःचें कुटुंब यांचें उदरभरण करणें हाच जीवनाचा प्रधान हेतु होता तेव्हां चर्च नफाबाजांचा कडक निषेध करूं शकली. पण ज्या समाजांत फायद्यासाठींच माणसें परिश्रम करूं लागलीं त्या समाजांत धर्मोपदेशकहि अर्थसाधनेची महती न गाते तरच नवल. सरंजामशाही अर्थव्यवस्थेचें समर्थन करणाऱ्या कॅथॉलिक चर्चला एकदम आपल्या जुन्या शिकवणींत बदल करणें तितकें सोपें नव्हतें. पण ती उणीव प्रॉटेस्टंट चर्चनें भरून काढली. प्रॉटेस्टंटवाद्यांत प्यूरिटन्स, मेथॉडिस्ट, कालव्हिनिस्ट आदि अनेक पंथ होते. पण कमी अधिक प्रमाणांत या सर्वच पंथांच्या अनुयायांना भांडवलशाही अर्थसंचय व नफ्यासाठीं धडपड करतांना आपण धर्मविरोधी आचरण करीत आहों अशी रुखरुख मनास लागली नाहीं. व्यक्तिवाद्यांच्या प्रचारानें आर्थिक स्वातंत्र्याच्या युगांत प्रत्येक जण स्वतःच्या श्रमानें व कर्तृत्वानें धनसंपत्तीचा मालक बनतो अशी श्रद्धा नवोदित वर्गास मिळाली होती. उपभोगासाठीं धनाची उधळपट्टी करणाऱ्यांकडे समाज आतां तुच्छतेनें पाहूं लागला. आपल्या उत्पन्नांतील थोडा फार हिस्सा तरी बाजूला काढावा व तो पुन्हा नव्या उद्योगव्यापारांत गुंतवावा ही भावना समाजांत वृद्धिंगत झाली व व्यापाराबाहेरील नवें भांडवल उद्योगधंद्यांच्या वाढीसाठीं एकत्र होऊं लागलें. समाजजीवनांत पैशाला वाढतें प्राधान्य प्राप्त झालें.

अर्थात् बहुसंख्य जनतेच्या जीवनव्यवहारांत घडून आलेला हा क्रांतिकारक बदल स्वखुषीनें घडून आला नव्हता. स्वतःच्या मुलाबाळांइतकें स्वतःच्या जामिनीवर व गुराढोरांवर प्रेम करणारा शेतकरी त्यांचा त्याग करून स्वखुषीनें मजूर म्हणून गांवाकडे धांव घेईल ही गोष्ट कालत्रयीं शक्य नव्हती. स्वतंत्र कामधंदा करणारा स्वाभिमानी कारागीर आपल्या आयुधांची मोडतोड करून मालकाची गुलामगिरी पत्करील व पिढ्यान्‌पिढ्या कमावलेलें धंद्यांतील कौशल्य गमावून सामान्य मोलमजुरांच्या रांगेंत स्वतः होऊन जाऊन उभा राहील अशी शक्यता नव्हती. पण औद्योगिक क्रान्तीची शक्तिच इतकी निर्मूलक होती

कीं तिनें लक्षावधि शेतकरी कारागिरांना आपल्या व्यवसायांतून उठवून यंत्रांचे दास बनवलें. स्वतःचें व कुटुंबियांचें पोट जळूं लागलें तेव्हां स्वतंत्र व्यवसाय करणाऱ्या कांतकरी विणकऱ्यांनीं आपले चरखे, हातमाग जाळले. स्वतःच्या खेड्यांत मीठभाकरीला शेतकरी महाग झाला तेव्हांच धूर ओकणाऱ्या नव्या औद्योगिक शहरांतील खुराड्यांत वास्तव्य करणें त्याच्या नशिबीं आलें. हें समाजाचें अघटित विघटन, ही सक्तीची मोलमजुरी, व्यवसायस्वातंत्र्याच्या व्यक्तिनिष्ठ युगांत लक्षावधींच्या नशिबीं यावी हें महदाश्चर्यच नव्हे का?

स्वातंत्र्याच्या झेंड्याखालीं शौर्यानें लढून जनतेनें राजा, धर्मगुरु व सरंजामदारवर्गाच्या गुलामींतून स्वतःची मुक्तता करून घेतली होती खरी पण आज तीच स्वातंत्र्यवादी जनता परिस्थितीची गुलाम बनली होती. आजपर्यंतच्या मानवी इतिहासांतील शोषणाचें व पिळवणुकीचें स्वरूप प्रकट होतें. शोषितांना आपलें शोषण करणारी व्यक्ति अगर वर्ग उघड्या डोळ्यांस दिसत होता. शोषक व शोषित यांचे व्यक्तिगत संबंध होते. पण नव्या भांडवलशाही समाज-व्यवस्थेंत हे व्यक्तिगत संबंध नष्ट झाले. मानवी नात्यांची तमा अर्थजन्य व्यवस्थेनें बाळगली नाहीं. भांडवलदार व मजूर यांचीं दोन विश्वें एकाच जगांत निर्माण झालीं. भांडवलशाही उत्पादनव्यवस्थेनें उत्पादनांत प्रचंड वाढ केली. राष्ट्राची संपत्ति अनन्त पटीनें वाढली. व्यापार व देवाणघेवाण मोठ्या प्रमाणावर होऊं लागली. समाजाच्या हातांत अधिक पैसा खेळूं लागला. विज्ञान, शास्त्र, वाङ्मय, कला यांना नवा भर आला. जीर्ण समाजव्यवस्था उधळून लावण्यांत भांडवलशाहीनें आपली महान् ऐतिहासिक जबाबदारीच पार पाडली होती. पण समाजजीवनाच्या सर्व क्षेत्रांत ही अमर्याद प्रगति होऊनहि जनतेची गरिबी नष्ट झाली नाहीं; नव्हे, औद्योगिक क्रान्तीनंतरच्या पहिल्या पांचपन्नास वर्षांत जनतेची गरिबी व हालअपेष्टा उलट वाढल्या. या काळांतील इंग्लिश समाजाच्या भीषण विपन्नावस्थेचें दर्शन आपणांस सहृदय लेखक, कवि व विचारवंत यांच्या समकालीन वाङ्मयांत होईल. औद्योगिक क्रान्तीनें वाढलेल्या व्यापाराचीं, उत्पादनाचीं, संपत्तीचीं व नफ्याचीं कोष्टकें मांडलीं जातीं तर पृथ्वीवर इंद्रनगरीचें राज्य

सुरू झालेलें आहे अशी कोणाचीहि समजूत झाली असती. आणि तसें पाहिलें तर मूठभर धनिक वर्गाचें इंग्लंड कुबेरघरच बनलें नव्हतें का ? कुबेरघरांतील धनाच्या राशी फुगत होत्याच. पण श्रमिकांच्या आर्थिक परिस्थितीचीं कोष्टकें मांडणाऱ्यांना लक्षावधींच्या शरीराचीं कोळीष्टकें झाल्याचीच प्रचीति येती. नव्या वर्गाचा पंतप्रधान डिझरेली याच्या दृष्टींतूनहि ही गोष्ट पुढें लपली नाहीं. एका इंग्लंड-मध्यें दोन इंग्लंडें जन्मास आलीं आहेत. त्यांच्यांत ना परस्परसंबंध ना बंधुभाव. दोघांच्या भावना, विचार, संवयी व जीवन दोघांनाहि तितकेंच अपरिचित. दोघांचें अन्न निराळें, रीतिरिवाज निराळे, सोयरिकीचें जग निराळें. श्रीमंत आणि गरीब हींच तीं दोन इंग्लंडें होत अशा अर्थाचे भेदक उद्गार खुद्द डिझरेलीला काढावे लागले. पुढें मार्क्सनें 'भांडवल' या आपल्या विख्यात ग्रंथांत या काळांतील इंग्लंडमधील कामगारांच्या अमानुष पिळवणुकीवर व हलाखीच्या परिस्थितीवर भरभक्कम पुरावे गोळा करून झगझगीत प्रकाश टाकला. फॅक्टरी इन्स्पेक्टरनें घेतलेल्या एका साक्षींत थॉमस हीथ नांवाच्या कामगारानें इन्स्पेक्टरला दिलेलीं उत्तरें प्रचलित समाजव्यवस्थेचा जळजळीत निषेध करणारींच होतीं. साक्षींतील प्रश्नोत्तरें हीं होतीं.

**प्रश्न :** "तुला मुलेंबाळें आहेत का ?"

**उत्तर :** "नाहींत. दोन होतीं, पण देवाच्या कृपेनें दोन्हीहि मेलीं."

**प्रश्न :** "काय, आपल्या मुलांच्या मृत्यूबद्दल तुला समाधान व्यक्त करावेसें वाटतें ?"

**उत्तर :** होय, मी देवाचा त्याबद्दल आभारी आहे. त्यांना पोसण्याच्या जबाबदारींतून मी मुक्त झालों आहे आणि तीं बिचारीं भीषण जीवनसंघर्षांतून मुक्त झालीं आहेत."*

पित्याच्या तोंडून हे उद्गार कोणत्या समाजपरिस्थितींत बाहेर पडले असतील त्याची कल्पना स्वतःच केलेली बरी.

---

* 'मॅन्स वर्ल्डली गुड्स : लिओ ह्यूबरमन : पान १३३

औद्योगिक क्रान्तींतून जन्म घेतलेल्या भांडवलशाही समाजाची इंग्लंड-मधील उभारणी केवळ वसाहतींच्या लूटमारींतून, काळ्या गुलामांच्या व्यापारांतून झाली होती असें नव्हे तर खुद्द इंग्लंडमधील लक्षावधि श्रमिक जनतेचें अमानुष शोषणहि त्यास कारणीभूत बनलें होतें हाच त्याचा अर्थ आहे. पिळवणूक हाच भांडवलशाहीचा पाया आहे.

औद्योगिक युगानें भांडवलशाहीला जन्म दिला तसाच कामगार वर्गासहि. नव्या समाजांत वर्गवारी वाढली तशीच वर्गभावनाहि. नफ्याची हांव वाढली तशीच वर्गजागृतिहि. नव्या औद्योगिक शहरांत उद्योगधंद्यांचें केन्द्रीकरण झालें तसेंच कामगारांचें. दळणवळणाचीं सुलभ साधनें उद्योगधंद्याच्या व व्यापाराच्या संघटनेस उपयुक्त ठरलीं तशींच निरनिराळ्या शहरांत पसरलेल्या कामगारांच्या एकोप्यास व संघटनात्मक जुळवाजुळवीसहि. भांडवलदार वर्ग उदयास आला व संघटित झाला तसाच कामगार वर्गहि. अर्थात् खाजगी मालमत्तेचें, नफानिष्ठ अर्थव्यवस्थेचें, औद्योगिक क्रान्तीचें नेतृत्व करणाऱ्या वर्गाचे प्रतिनिधीच राजसत्तेचें चालकत्व करीत असल्यामुळें अगर त्यांचे भाईबंदच राज्यकारभार हांकीत असल्यामुळें, या दोन वर्गांतील संघर्ष विषम पातळीवर सुरू झाला. अर्थसत्ता व राजसत्ता या दोहोंचेंहि पाठबळ पहिल्या झटापटींत भांडवलदार वर्गास मिळालें. पण या दोन वर्गांतील संघर्षाचा निर्णायक निकाल आजमितीसहि लागलेला नाहीं.

एका काळचें आपलें शाश्वत व समाधानी जीवन नव्या समाजव्यवस्थेंत कशानें नष्ट झालें याचा कामगार पुनःपुन्हा विचार करूं लागले तेव्हां प्रथम त्यांचें लक्ष उत्पादनयंत्रांकडे गेलें. हीं नवीं यंत्रें निर्माण झालीं म्हणूनच त्यांचे चरखे व माग निरुपयोगी बनले होते. पावसाळ्याच्या सुरवातीस कावळ्यांच्या छत्र्या जशा एकदम उगवतात, सर्वत्र दृष्टीला पडतात, त्याचप्रमाणें धूर ओकणाऱ्या चिमण्यांनीं नव्या शहरांत डोकें वर काढलें होतें. कारखान्याच्या आवारांत यंत्रांची प्रतिष्ठापना झाली होती. कुटुंबियांच्या मदतीनें घरांत चालणारे माग नव्या शक्तीवर कारखान्यांत चालविले जात होते. कुटुंबांत चरखा, माग

येण्याऐवजीं कुटुंबे गिरणीच्या दारांत जाऊन कामास उभीं राहूं लागलीं होतीं. माणसांना गुलाम बनविणारीं हीं नवीं यंत्रेंच आपलीं शत्रू आहेत असें एकदां त्यांच्या मनानें घेतल्यावर पुढें काय करावयाचें हें निश्चित झालें. माणसांना बेकारी व उपासमार आणणाऱ्या या यंत्रांची व त्यांचें रक्षण करणाऱ्या कारखान्यांच्या तावदानांची त्यांनीं मोडतोड आरंभिली. हे यंत्रविध्वंसक 'लडाइट्स' नष्ट झालेला पूर्वीचा जीवनदर्जा परत मिळविण्यासाठीं यंत्रांची नासधूस करीत होते. पण या विध्वंसक चळवळीचा शेवट कसा होणार हें उघड होतें. यंत्रांचा विध्वंस म्हणजे भांडवलदाराच्या मालमत्तेचा विध्वंस होता. यंत्रांच्या मालकांनीं लगेच कायद्याकडे धांव घेतली. मालमत्तेच्या रक्षक कायद्यानें त्यांना वेळ न दवडतां तात्काळ न्याय दिला. १८१२ मध्यें पार्लमेंटनें कायदा पास करून यंत्रांचा विध्वंस करणारास फांशीची शिक्षा मुक्रर केली. पार्लमेंटमध्यें बिलावर चर्चा झाली तेव्हां बायरन म्हणाला "हे विध्वंसनाचे प्रकार वाढत्या प्रमाणावर होत आहेत हें खरें...पण आज ज्या माणसांना तुम्ही अज्ञ, धोकेबाज, बेफाम व दंगेखोर म्हणून संबोधीत आहांत तीं निढळाच्या, घामानें स्वतःची उपजीविका करणारीं व समाजाचें उत्पादन वाढविणारीं एके काळीं स्वतंत्र व्यवसायी माणसें होतीं...या प्रजेच्या झुंडीबाबतच्या आपल्या जबाबदाऱ्यांची आपणांस जाणीव आहे काय? आपल्या शेतांत राबणाऱ्या, आमल्या घरांत चाकरी करणाऱ्या, आपल्या लष्करांत व नाविक दलांत भरती होणाऱ्या या जनतेच्या झुंडीच्या जोरावरच आज आपण जगांस भारी झालों आहोंत व त्यांना बेभान करणारी विपन्नावस्था चालू राहिली तर ते आपणांसहि भारी ठरल्याशिवाय राहाणार नाहींत." * दडपशाहीच्या दहशतीबरोबरच कामगारांतील सुज्ञ विचारकांनाहि लवकरच हें कळून चुकलें कीं आपल्या विपन्नावस्थेस उत्पादक यंत्रें जबाबदार नसून त्या यंत्रांचे विशेष नजरेस न पडणारे मालकच जबाबदार आहेत; त्यांनींच आपलीं उत्पादनसाधनें आपल्या हातून हिसकावून घेतलीं आहेत. या सत्याची जाणीव होतांच कामगारांनीं निषेधाचे नवे मार्ग अवलंबिले.

---

* मॅन्स् वर्ल्डली गुड्स : पान १४०–४१

ओल्डॅममधील गरीब पिंजाऱ्यांनीं १८१८ त आपल्या सह्यांनिशीं मालकांना एक सामुदायिक अर्ज केला व आपल्या दुःखाचें व दारिद्र्याचें गाऱ्हाणें त्यांच्यासमोर मांडलें. अपुऱ्या मजुरीबद्दल सामुदायिक तक्रार केली व असाहि उल्लेख केला कीं आपण सर्व कारखानदार एकत्र येऊन या प्रश्नावर सांघिक निर्णय घ्याल तर आपल्या फायद्यावर गदा न येऊं देतां हा प्रश्न सुटूं शकेल. आपल्या फायद्याला कात्री लावण्याची आमची मुळींच इच्छा नाहीं. या अर्जासारखे शेकडों अर्ज थोड्याच कालावधींत अनेक ठिकाणच्या कारखानदार भांडवलदारांकडे रवाना झाले. पण आपल्या भरभराटींत धुंद असलेल्या मालकांनीं त्याची योग्य दाखल घेतली नाहीं. तेव्हां तसेच अर्ज हजारोंच्या सह्यांनीं पार्लमेंटकडे पाठविण्यांत येऊं लागले. तेथेंहि कांहीं काल ते अर्ज दप्तरींच जमा झाले. पण हळुहळु जनतेच्या मतांची कदर करणारे कांहीं सभासद पुढें आले. त्यांच्या मागण्या इतक्या रास्त होत्या, कामगारांनीं अंगिकारलेले निषेधाचे मार्ग सौम्य पण इतके परिणामकारक ठरले होते कीं कामगार हितरक्षणाचे कांहीं कायदे पार्लमेंटला पास करावेच लाग

कायदे पास झाले, पण कित्येक ठिकाणीं त्या कायद्यांची अम्मलबजावणी बरोबर होत आहे कीं नाहीं हें पाहाणारे मॅजिस्ट्रेट्स स्वतः मालक आहेत ही गोष्ट कामगारांच्या नजरेस आली. आम्ही उद्योगधंदे सुरू केले म्हणून निदान कामगाराला भाकरी तरी मिळूं लागली अशी मनोभावना असणारा वर्ग न्याय तो काय देणार? राज्यसत्तेचा दृष्टिकोण बदलल्याखेरीज न्याय मिळणार नाहीं याची जाणीव कामगारवर्गास होतांच त्यांची धडपड नवा मार्ग चालूं लागली. कामगारांना मतदानाचा अधिकार मिळाला तर पार्लमेंटचे सभासद आपल्या गाऱ्हाण्यांची व दुःखांची अधिक कदर करतील, आपल्या मतांचें दडपण पार्लमेंटवर पडूं शकेल व अखेरीस बहुसंख्य कामगारांच्या मतावर निवडून येणारें पार्लमेंट बहुसंख्यांच्या हिताचें रक्षक बनलें कीं कायदा व त्याची अम्मलबजावणी निराळ्या प्रकारें होईल असा विश्वास त्यांना वाटूं लागला. कामगारप्रतिनिधि नसलेलें पार्लमेंट कामगारहिताचे कांहीं कायदे करण्यास

प्रवृत्त होऊं शकतें तर कामगार प्रतिनिधींचें पार्लमेंट काय करूं शकणार नाहीं ? पार्लमेंट जर कॉर्नलॉज करून जमीनमालकांना व जकाती बसवून कारखानदारांना संरक्षण देऊं शकतें तर तेंच पार्लमेंट कामगारांच्या कामाचे तास व मजुरी निश्चित करून कामगारांना कां संरक्षण देऊं शकणार नाहीं असा युक्तिवाद त्यांनीं स्वतःशीं केला. कामगार चळवळीनें यानंतर नवी दिशा पकडली. खुद्द कामगारांच्या प्रतिनिधींचें पार्लमेंट बनण्यास जरी एक शतकाहून अधिक काळ जाणार होता तरी इंग्लंडमधील पार्लमेंट, कामगारवर्गांतील वाढत्या असंतोषाच्या दडपणाखालीं अधिक प्रातिनिधिक बनत गेलें. पार्लमेंटरी राज्यपद्धतीवरील कामगारवर्गाचा विश्वास कधींच कायमचा नष्ट न झाल्यामुळें इंग्लंडमध्यें शान्ततामय समाजपरिवर्तन होऊं शकलें.

१७८९ च्या पहिल्या फ्रेंच राज्यक्रान्तीनें समतावाद्यांपासून स्वप्नवाद्यांपर्यंत अनेक समाजवादी विचारांना जसा जन्म दिला त्याचप्रमाणें औद्योगिक क्रांतींतून वाढलेल्या सामाजिक प्रक्षोभांपासून इंग्लंडमध्यें अनेक समतावादी व समाजवादी विचारवन्त पुढें आले. जमिनीची सामुदायिक मालकी, जमीन कसणाऱ्याचा शेतीच्या उत्पादनावरील अधिकार, कांहींनीं प्रतिपादला तर कांहींनीं औद्योगिक क्रान्तींतून वाढलेलें इंग्लंडचें धन उत्पादकाची वाढती गरिबी ध्यानीं घेतां जातें कुठें असा रोकडा सवाल टाकला. बेंथॅम हा स्वतः सनदशीर व्यक्तिवादी होता. ‘ अधिकाधिक जनतेचें अधिकाधिक सुख ’ ज्या सामाजिक संस्था अगर जी शासनव्यवस्था साधूं शकेल तीच व्यवस्था प्रगतिशील म्हटली पाहिजे अशी त्याची शिकवण होती. तेव्हां त्याच्या अनुयायांनीं खाजगी मालमत्तेवर आधारलेल्या समाजव्यवस्थेची व तिच्या रक्षक राज्यव्यवस्थेची या सिद्धांताच्या आधारें चिकित्सा केली. तत्कालीन समाजांतील बहुसंख्य श्रमिक जनतेची विपन्नावस्था कोणासहि नाकारतां आली नसती. अशा परिस्थितींत प्रचलित समाजव्यवस्था अधिकाधिकांचें अधिकाधिक सुख साधण्यास निरुपयोगी ठरली आहे व प्रगती-ऐवजीं समाजास अधोगतीस नेत आहे असा सरळ निष्कर्ष त्यांनीं काढला व मालमत्तेच्या प्रथेवर जोरदार हल्ला चढविला. उत्पादनसाधनांची व

मालमत्तेची सामुदायिक मालकी कोणत्या ना कोणत्या स्वरूपांत पुनश्च निर्माण झाली पाहिजे हा एकच दुसरा पर्याय त्यांच्या नजरेसमोर होता. साहजिकच त्याचें जोरदार समर्थन त्यांनीं केलें. समाजांत न्यायाची प्रस्थापना कशी होईल या उद्देशानें प्रचलित राज्यव्यवस्थेचा व समाजपद्धतीचा सूक्ष्म अभ्यास करणारा विल्यम गॉडवीनहि अखेर खाजगी मालमत्तेच्या समर्थकांचा व राज्यव्यवस्थेचा प्रखर टीकाकार बनला. माणसांच्या तर्कनिष्ठ विचारशक्तीवर त्याचा पूर्ण विश्वास होता व ती जागृत केली तर या अन्यायमूलक व्यवस्थेचा ते त्याग करतील अशी आशा त्यानें बाळगिली होती. त्याच्या प्रतिपादनाचा सारांश हा होता कीं मनुष्य जन्मतःच चांगला अगर वाईट नसतो. समाजव्यवस्था जर न्यायावर आधारलेली असेल तर माणसाच्या इच्छा, विचार व जीवनहेतू मंगल राहातील व द्वेष, मत्सर आदि भावनांना त्याच्या मनांत थारा मिळणार नाहीं. पण सरकार हिंसेंतून व सक्तींतून निर्माण व स्थिर झालें असल्यामुळें दुष्ट वृत्तींना त्यांत वाव मिळतो व तें समाजांतील अन्यायाला व विषमतेला संरक्षण देतें. उलट समाज व्यक्तींच्या गरजा पुऱ्या करण्यांतून व त्यासाठीं आवश्यक अशा सहकार्यांतून विकास पावत असल्यामुळें समाजजीवन नैसर्गिक आहे. समतेच्या भावनेंतून या जनहितसंवर्धनाचे प्रयत्न होतील तर समाजाची धारणा होऊं शकेल व शासन-सत्तेची गरज राहाणार नाहीं. पण सरकारचा अंत करावयाचा तर खाजगी मालमत्ताहि शिल्लक ठेवतां कामा नये. कारण ती समाजांत विषमता व संघर्ष निर्माण करते. विषमतेंतून कांहीं माणसें उद्दाम व हुकुमशाही बनतात तर इतर गुलामी वृत्तीला बळी पडतात. या गुलामी वृत्तींतून अनैतिकता वाढते. स्पर्धेच्या युगांत साध्या उदरनिर्वाहासाठीं श्रमिक जनतेला इतका कठोर जीवन-संग्राम उभारावा लागतो कीं स्वतःच्या बुद्धीचा व मनाचा विकास करण्यास तिला बिलकूल फुरसत मिळत नाहीं. तेव्हां स्पर्धाविरोधी आर्थिक समतेच्या स्थापनेनेंच त्यास सामाजिक न्याय मिळूं शकेल. समतावाद्यांच्या कल्पनानिष्ठ आदर्श समाजाचें गॉडविनला विशेष आकर्षण नव्हतें. उलट प्रत्येक व्यक्तीचा विकास व व्यक्तित्वाची वाढ करण्यासाठीं झटणाऱ्या व्यक्तिनिष्ठ सहकारवाद्यांचा समाजच त्यास अधिक सम्मत होता. अशा समाजस्थापनेचे प्रयत्न प्रभावी

मतप्रचार व मतपरिवर्तन घडवून आणूनच अखेर यशस्वी होतील अशी त्याची श्रद्धा होती.

या सर्व समाजवादी विचारांचा प्रभाव उगवत्या कामगारवर्गाच्या चळवळीवर पडला. त्या चळवळींना वैचारिक पार्श्वभूमि लाभली. खाजगी मालमत्तेच्या प्रथेवर व आर्थिक विषमतेवर जोरदार हल्ले केले गेले पण त्यांच्याच साहाय्यानें झालेल्या औद्योगिक भरभराटीवर पाणी सोडण्यास मात्र समाजाची तयारी नव्हती. कारण ही वाढती भरभराटच युरोपीय समाजाचें विकाससूत्र बनली होती.



: ३ :

# नवसमाजाचीं कल्पनाचित्रें

फ्रेंच राज्यक्रान्तीच्या यशोदायी कालखंडांत बॅबूफ, कॅबेट आदि समतावादी स्वप्नद्रष्टे पुढें आले व त्यांनीं सामूहिक जीवनाचा आदर्श जनतेपुढें ठेऊन त्यांच्या क्रियाशील शक्तींना आवाहन केलें. स्वातंत्र्य, समता व बंधुत्वाची स्वप्नें डोळ्यासमोर नाचविणाऱ्या फ्रेंच जनतेनें आपल्या परमोच्च त्यागानें राजसत्तेला मूठमाती चारून देशांत क्रान्ति घडवून आणली. पण क्रान्तीच्या लाटेंतून बाहेर पडलेल्या समाजव्यवस्थेंत त्या तत्त्वांना मूर्तस्वरूप आलें नाहीं. त्या केवळ घोषणा ठरल्या. कन्व्हेन्शनच्या व्यासपीठावर त्यांचा इतका उहापोह झाला होता कीं जेव्हां प्रत्यक्ष कारभारांत नवी राजसत्ता त्यांची अम्मलबजावणी करण्यास असमर्थ ठरली तेव्हां जनतेचा पार्लमेंटवरील व राज्यसंस्थेवरील विश्वासच नष्ट झाला. बॅबूफ आदि समतावाद्यांनीं अशा परिस्थितींत गुप्त गटांचें जाळें फ्रान्सभर निर्माण करून, क्रान्तिभावनांना पुनश्च चेतवून, हिंसात्मक प्रतिकाराच्या मार्गानें सत्तेचा कबजा घेण्याचा प्रयत्न केला; तर सत्ताधिष्ठ वर्गानें भीषण दडपशाहीचा अवलंब करून समतावाद्यांच्या संघटित प्रयत्नांचा बीमोड केलाच पण त्याचबरोबर क्रान्तीच्या उत्स्फूर्त शक्ति दडपून त्यांनीं स्वतःची सत्ताच दुबळी बनविली व नव्या अनियंत्रित राजसत्तेचा मार्ग मोकळा केला. एकदां क्रान्तीचा मार्ग

समाजांत स्वातंत्र्य, समता व बंधुत्व निर्माण करण्यास अपेशी ठरल्यावर समाजद्रष्टे नव्या विधायक मार्गाचा शोध घेऊं लागले.

फ्रेंच स्वप्नद्रष्टा सेंट सायमन हा स्वतः क्रान्तिविरोधी नव्हता. अमेरिकन राज्यक्रान्तीच्या वेळीं तो अमेरिकेंत होता व वयाचीं वीस वर्षे पुरी होण्यापूर्वीच अमेरिकन क्रान्तींत भाग घेतलेल्या या तरुणानें फ्रान्समध्यें परतल्यावर फ्रेंच राज्य-क्रान्तींतहि पुढाकार घेतला. समाजाच्या विकासास अडथळा बनलेली जुनी समाजव्यवस्था नष्ट करणाऱ्या क्रान्तिकारी प्रयत्नांचा त्यानें हिरीरीनें पुरस्कार केला. नव्हे त्या जुन्या समाजव्यवस्थेस 'सरंजामशाही' संबोधून तिचा धिक्कार बहुधा प्रथम त्यानेंच केला असावा. पण ज्या क्रान्तिकारी व्यक्तिवादानें ही जुनी व्यवस्था उधळण्यासाठीं व्यक्तिव्यक्तींतील स्वातंत्र्यभावना जागृत केली होती त्या व्यक्तिवादाचें कार्य जुन्या समाजव्यवस्थेच्या नाशाबरोबर पूर्ण झालें होतें असें तो मानीत होता. १८१८ सालीं प्रसिद्ध झालेल्या त्याच्या संकलित निबंधांत याचे पुरावे आढळतात. तो लिहितो,

"समाजाच्या स्वातंत्र्याचा प्रश्न सोडविण्यासाठीं फ्रान्समध्यें 'माणसाच्या मूलभूत हक्कांचा' पुकार झाला असें मानलें जातें, पण वस्तुतः त्या निवेदनानें हा प्रश्न जनतेसमोर मांडण्याचेंच फक्त कार्य केलें आहे." *

कांहीं वर्षांनंतर आपल्या नव्या पुस्तकांत त्यानें या भूमिकेचें अधिक स्पष्टीकरण करतांना लिहिलें कीं,

"जोंपर्यंत जुन्या धार्मिक व सरंजामी सत्तेचें समाजांवर प्रभुत्व होतें तोंपर्यंत स्वातंत्र्यभावनांची जोपासना करणें हें प्राथमिक व महत्त्वाचें कार्य बनणें स्वाभाविक होतें; कारण सर्व प्रकारच्या स्वातंत्र्यावर त्या सत्तांकडून सतत प्रखर हल्ले होत होते. पण विज्ञान व शास्त्रीय प्रगति यांवर आधारलेली औद्योगिक पद्धति स्वीकारतांना कोणालाहि ही साशंकता बाळगण्याचें कारण नाहीं. कारण या पद्धतींत अधिकाधिक धार्मिक व सामाजिक स्वातंत्र्य अनुस्यूत आहे"...

* 'स्टडीज् इन् रेव्होल्यूशन' : इ. एच्. कार : पान ४

" उलट आज रूढ असलेली स्वातंत्र्य ची मोघम व भावनिष्ठ कल्पना राजकीय विचारप्रणालीचा गाभा बनली तर ती खात्रीनेंच सामूहिक प्रयत्नांतून होणाऱ्या व्यक्तिगत उत्कर्षास बाधक ठरेल व व्यवस्थानिष्ठ समाजपद्धतीच्या संघटनेला व संस्कृतीच्या विकासास ती प्रतिरोधी बनेल. " *

व्यक्तिस्वातंत्र्याच्या तत्त्वज्ञानांतून विकास पावलेल्या आर्थिक स्वातंत्र्याच्या विचारसरणींतून अखेर समतेऐवजीं अर्थव्यवहारांत अराजक निर्माण झालें. सायमनला जणुं त्याचीं स्वप्नें पडलीं होतीं म्हणूनच कीं काय त्यानें व्यक्तीस व व्यक्तिस्वातंत्र्याच्या कल्पनेस प्रथमपासूनच योग्य स्थानावर बसविलें. हा व्यक्तिवाद योजनाबद्ध अर्थव्यवस्थेच्या मार्गांत येतां कामा नये असा इशारा दिला. व्यक्ति समूहावर अवलंबून असते व प्रगतीसाठीं धडपडणाऱ्या क्रियाशील, वर्धिष्णु, सर्वग्राही अशा समूहाशीं असलेले व्यक्तिव्यक्तींचे संबंध अभ्यासून ते संवादी बनविणें हेंच त्याच्या दृष्टीनें महत्त्वाचें कार्य होतें.

सायमनच्या मतें औद्योगिक उत्पादन हेंच समाजाचें प्रमुख कार्य होतें. साहजिकच दैनंदिन धडपडींतून वाढती मुक्तता करून घेऊन आत्मानुभवाचा हव्यास धरणारी प्रगल्भ समाजाची मध्ययुगीन जीवनप्रेरणा त्यास विघातक वाटली. 'प्रत्येक व्यक्ति श्रम करील' असाच समाज त्यास हवा होता. समाजाला उपयुक्त ठरेल अशी व्यक्तिसाधनाच तो श्रेष्ठ मानी. उपयुक्त कामांत गुंतलेल्या एकूण माणसांचा संघ हाच त्याचा समाज होता. तो श्रम ही आवश्यक बाब न मानतां सद्‌गुण मानी. औद्योगिक क्रान्तींतून जन्मास आलेल्या उद्योगनिष्ठ समाजाला वाढत्या परिश्रमांची आवश्यकता होती. सायमननें श्रमाला जीवनांत प्रतिष्ठा निर्माण करून हें कार्य साधलें. साहजिकच ज्या राष्ट्रांत बेकारी नाहीं तें राष्ट्र त्यास श्रेष्ठ व सुखी दिसलें तर नवल नाहीं. म्हणूनच आपल्या नवसमाजाचें कल्पनाचित्र रंगवितांना त्यानें योजनाबद्ध उत्पादनाला व अर्थव्यवस्थेला त्यांत प्रमुख स्थान दिलें. सरकारच्या कारभारांत व वाढत्या

---

* स्टडीज् इन् रेव्होल्यूशन : पान ५

व्यापारांत बँकेला त्या काळांत महत्त्व आलें होतें. म्हणून व्यापार व सरकारची पत ठरविणाऱ्या, वाढविणाऱ्या वा घालविणाऱ्या बँकपतींकडेच त्यानें व्यवस्था व अंमलबजावणी यांचें कार्य सोंपविलें. कलाकार, श्रमिकांची कल्पकता व कार्य-प्रवणता जागृत करणार होते. बुद्धिवादी, समाज-शरीराचें आरोग्य राखणारीं तत्त्वें व कायदे शोधणार होते. पण या त्याच्या कल्पनाचित्रांत सक्तीची सत्ता धारण करणाऱ्या सरकारची वा स्वतंत्र अशा राज्यसत्तेची त्यास जरूरी भासली नाहीं. उत्पादन व मागणी यांचा समन्वय घालण्यासाठीं, उत्पादन कार्याला तें मार्ग-दर्शन पुरविण्यासाठीं, मध्यवर्ती व्यवस्था समितीची जरूरी त्यास भासत होती. पण ही वस्तुजाताची व्यवस्था करणारी समिती व माणसांवर अधिकार गाजविणारें सरकार यांत तो फरक करीत होता. माणसानें वस्तूंवर सत्ता गाजवून स्वतःचा विकास करून घेतला आहे, माणसानें माणसांवर सत्ता गाजवून नव्हे, अशा शब्दांत त्यानें शासनसंस्थेवर टीका केली.

सायमनचा विज्ञान व शास्त्रीय प्रगतीवर दुर्दम्य विश्वास होता. शास्त्रीय प्रगतीनें उत्पादनाला फार मोठी मदत होणार होतीच, पण ज्ञानाच्या प्रसारा-बरोबर माणसाला सत्प्रवृत्त राखण्याचें एका काळीं धर्मश्रद्धेनें केलेलें ऐतिहासिक कार्य ही ज्ञानसंपदा भरून काढील असा त्याचा विश्वास होता. ज्ञानानें माणसाची कार्यक्षमता तर वाढेलच पण तर्कनिष्ठ विचारांतून सामाजिक सहकार्यहि वाढेल व त्याचें कल्याण कशांत आहे हें दुसऱ्यानें ठरवून त्याची सक्ती माणसावर करण्याची आवश्यकता राहाणार नाहीं असें तो मानीत होता. उद्योगास विज्ञानाची जोड देऊन समाजाची अप्रतिहत प्रगति करण्याची मनीषा त्यानें बाळगली होती. सायमनचे हे विचार अभ्यासल्यानंतर भावी युगाच्या स्वप्नद्रष्ट्यांत त्यास खात्रीनें वरचें स्थान द्यावें लागेल. त्याचा समाजप्रश्नांकडे पाहावयाचा दृष्टिकोण समाजनिष्ठ होता. नव्या औद्योगिक समाजाचा तो पुरस्कर्ता होता. त्याच्या नवसमाजाच्या कल्पनाचित्रांत त्यानें योजनाबद्ध उत्पादनावर भर दिला, श्रमाला प्रतिष्ठा निर्माण केली व विज्ञान व शास्त्रीय प्रगतीची महति त्यानें गाइली. तत्त्वतः समान वांटप मंजूर करूनहि गुणांप्रमाणें पारितोषिक देऊन

गुणसंपदेची ईर्षा व्यक्तींमध्यें निर्माण करावी अशी त्याची इच्छा होती. त्याच्या समतेच्या कल्पनेला या इच्छेनें मर्यादा पडली यांत नवल नाहीं. मालमत्तेच्या अधिकाराचें रक्षण करण्यावरच समाजाची धारणा अवलंबून आहे असें जरी त्यास वाटत होतें तरी कोणत्या वस्तूंची खाजगी मालकी समाजाला विघातक ठरणार नाहीं हें वेळोवेळीं ठरविण्याचा समाजाचा अधिकार त्यानें बिनतक्रार मान्य केला होता. भावी समाज हा मालकांचा समाज न बनतां उत्पादकांचा समाज बनेल असें स्वप्न तो रंगवीत होता.

पुढें स्वतःस शास्त्रीय समाजवादाचे प्रवक्ते समजणाऱ्या मार्क्स व एंगल्सनीं कम्युनिस्ट जाहिरनाम्यांत फोरिअर व ओवेनबरोबर सेंट सायमनला स्वप्नद्रष्टा म्हणून हिणवूनहि जर्मन शास्त्रीय समाजवादाची उभारणी या तीन विचारवन्तांच्या कल्पक विचारांवर झाली आहे असा स्पष्ट उल्लेख केला व जरी या तिघांनीं सुचविलेले समाजसुधारणेचे मार्ग स्वप्नाळू होते तरी प्रचलित समाजपद्धतीवर त्यांनीं केलेली टीका मर्मभेदी व यथार्थ होती अशा शब्दांत सेंट सायमनचा गौरव करण्यांत आला. सेंट सायमनची गणना समाजवाद्यांत होऊं लागली.

सेंट सायमनच्याच काळांतील दुसरा फ्रेंच स्वप्नद्रष्टा चार्लस फोरिअर होय. तोहि सायमनप्रमाणें तर्कनिष्ठ विचार व शास्त्रीय ज्ञानाचा पुरस्कर्ता होता. यांत्रिक युगानें समाजाच्या भरभराटीला मदत होईल असें त्यासहि वाटत होतें म्हणूनच समतावाद्यांच्या नैसर्गिक समाजव्यवस्थेचा पुरस्कार त्यानें केला नाहीं. पण फोरिअरचें वैशिष्ट्य हें कीं केवळ नवसमाजाचें कल्पनाचित्र रंगवून न थांबतां त्याचें प्रात्यक्षिक जनतेसमोर ठेवण्यासाठीं एखादी आदर्श वसाहत स्थापन करावी यासाठीं त्यानें धडपड केली. माणसाच्या तर्कनिष्ठ विचारशक्तीवर, ग्रहणशक्तीवर व सत्प्रवृत्तीवर त्याचा इतका प्रचंड विश्वास होता कीं समाजजीवनाचें आपलें एकादें प्रात्यक्षिक आपण यशस्वी करूं शकलों तर समाज आपण होऊन अशा समाजव्यवस्थेचा पुरस्कार करील व स्वयंस्फूर्तीनें तशी समाजव्यवस्था निर्माण करील असें तो मानी. सायमन काय किंवा फोरिअर काय, समतावादी सोडून, इतर सर्वच स्वप्नद्रष्टे औद्योगिक उत्पादनाचे पक्षपाती होते.

मात्र उत्पादनाप्रमाणें विभजनाची पद्धति कोणती असावी, तिचें वांटप कोणत्या प्रमाणांत व्हावें या प्रश्नांवर या स्वप्नद्रष्ट्यांत एकमत झालें नाहीं. कोणी गरजां-प्रमाणें पुरवठा व्हावा असें प्रतिपादिलें तर कोणी गुणांप्रमाणें वांटप व्हावें अशी भूमिका घेतली. फोरिअरनें नफ्याची वांटणी श्रम, भांडवल व बुद्धि यांत विशिष्ट प्रमाण राखून केली जावी असें सुचविलें. औद्योगिक क्रान्तींतून निर्माण होणाऱ्या समाजरचनेबद्दल तो इतका आशावादी होता कीं दहा वर्षांत नवें युग सुरू होणार आहे, मग हिंसक क्रान्तीची जरूरी कांहींना कां भासावी, असा प्रचार त्यानें सुरू केला. नवे फॅक्टरी कायदे व आरोग्य व्यवस्थेंतील सुधारणा घडून येण्यास त्याच्या लिखाणाचा तात्कालिक फायदा झाला. त्याच्या मृत्यूनंतर अनेक धनवान व बुद्धिवादी माणसें त्याच्या पंथाचीं अनुयायी बनलीं. एकट्या फ्रान्समध्यें फोरिअरच्या कल्पनाचित्रांनुसार नववसाहती स्थापण्याचे चौतीस प्रयत्न झाले. पण ते सर्व फसले.

एंगल्सनें उल्लेख केलेले सेंट सायमन, फोरिअर व ओवेन हे तिन्ही स्वप्नद्रष्टे समाजवादी समकालीन असले तरी त्यांचे प्रयत्न व्यक्तिगत व तत्त्व-विवेचन स्वतंत्र होतें. औद्योगिक क्रान्तींतून निर्माण होत असलेल्या समाजाची पुनर्रचना कशी केली जावी व समाजव्यवहारांतील भिन्न हितसंबंधांची सांगड कशी घालावी हीच त्यांच्या तत्त्वशोधनाची समस्या होती.

फ्रान्सप्रमाणेंच इंग्लंडमध्यें नवसमाजाचीं कल्पनाचित्रें रंगवणारे अनेक विचारवन्त औद्योगिक क्रान्तींतून पुढें आले हें आपण पाहिलेंच आहे. या सर्वांमधून रॉबर्ट ओवेनची निवड येथें करण्याचें कारण असें कीं ओवेननें नवोदित भांडवलशाही समाजांतील दोन मूलभूत विग्रहांचीं उत्तरें शोधण्याचा प्रयत्न, आपलें नवसमाजाचें कल्पनाचित्र निश्चित करतांना केला आहे. समाजाच्या उत्पादनकार्यांत सहभागी असलेल्या मालक व मजूर या दोन वर्गां-मधील वाढता विग्रह व उत्पादक व गिऱ्हाईक या दोन भूमिकेंतील अनुस्यूत हितविरोध हेच ते दोन विग्रह होत. ओवेननें या दोन समस्या सप्रयोग अभ्यासून एक एकजीव समाजव्यवस्था कल्पिण्याचा धाडसी प्रयत्न केला.

ओवेनची उद्योगप्रियता व ज्ञानलालसा कौतुकास्पद होती. वयाच्या विसाव्या वर्षी धंद्यांतील एका प्रवासांत स्कॉटलंडमधील एका प्रसिद्ध गिरणी-मालकाच्या मुलीशीं त्याची ओळख झाली व विवाहानंतर तिच्या वडिलांची न्यू ल्यूनार्कमधील एक कापड-गिरणी भागीदारींत त्यानें विकत घेतली. नंतरच्या जीवनांत त्यानें अनेक महत्त्वाकांक्षी योजना व प्रयोग केले; पण न्यू ल्यूनार्क-मधील वसाहतीनेंच ओवेनच्या जीवनप्रयोगाला विशेष प्रसिद्धि दिली. ज्या यंत्रयुगांत मालक व मजूर यांच्यामधील मानवी नातें व हितसंबंध यांचा दुवा कायमचा तुटला होता व मजूर यंत्राचाच एक उपयुक्त भाग बनला होता त्या युगांत ही उणीव भरून काढण्याचा एक स्वप्नाळू प्रयोग ओवेननें स्वतः गिरणीमालक असतांना करून पाहिला. आजपर्यंतच्या मानव इतिहासांत मालकांनीं गुलामांची केलेली पिळवणूक जरी शहारे आणणारी होती तरी त्या काळांत शोषकांचा शोषितांशीं प्रत्यक्ष व्यक्तिगत संबंध येई. त्यांच्या देहयातना प्रत्यक्ष डोळ्यांना दिसल्या तर मन विरघळून एकादा मालक तरी भूतदया दाखविण्याची शक्यता होती. पण जुन्या कारखानदाराची जागा नव्या भांडवल-दारानें घेतल्यानंतर हा मानवी दुवा, हा व्यक्तिगत संबंधहि, नष्ट झाला. बाजारांतील इतर खरेदीप्रमाणेंच मजुराच्या श्रमाची खरेदी होऊं लागली होती. उद्यां बाजारांत येऊन उभे राहाण्याची ताकद मजुराला राहाते कीं नाहीं याची विवंचना मालकाला नव्हती. अशा काळांत ओवेननें न्यू ल्यूनार्कच्या वसाहतींत जातीनें लक्ष घालून तेथें नवें आदर्श सहकारी जीवन निर्माण करण्याचा प्रयत्न केला. त्यानें न्यूल्यूनार्कमध्यें प्रवेश केला तेव्हां तेथें तेराशें चौदाशें कुटुंबें व कित्येक भिकाऱ्यांचीं मुलें राहात असत. त्यांचें जीवन अधोगतीला पोहोंचलें होतें. जेमतेम एका खोलीच्या बिऱ्हाडांत हीं कुटुंबें राहात होतीं. लहान मुलेंहि कामावर जात व त्यांच्या शिक्षणाची कोणतीच सोय नव्हती. इंग्लंडमधील त्या काळांतील कोणत्याहि गिरणविभागांत हेंच दृश्य तुम्हांला दिसलें असतें. पण ओवेननें गिरणीच्या व्यवस्थेचा ताबा घेतल्यानंतर यंत्रविभागाप्रमाणें गिरणींत काम करणाऱ्या कामगारांच्या जीवना-कडेहि जातीनें लक्ष पुरविलें. नवीं घरें वसाहतींत उठलीं. आरोग्याचे नवे

नियम घालून देऊन त्यांची त्यानें कसोशीनें अम्मलबजावणी करून घेतली. कामगारांच्या जीवनोपयोगी वस्तूंचें भांडार उघडल्यावर त्यांना मूळ किंमतींत वस्तू मिळूं लागल्या. कामगारांच्या वर्तणुकीचें एक प्रगतिपुस्तक ठेऊन त्यांत दिसणाऱ्या प्रगतीनुसार तो त्यांना बढती देऊं लागला. लहान मुलांच्या शिक्षणासाठीं शाळा निघाल्या. व शिक्षणाची अभिनव सार्वजनिक योजनाच हातीं घेण्यांत आली. मंदीच्या काळांत कांहीं काल गिरणीचें काम बंद पडलें तरी कामगारांचें पूर्ण वेतन त्यांना मिळत राहिलें. थोडक्याच कालांत ओवेनचा हा सर्वांगीण सुधारणेचा प्रयोग इंग्लंडमध्यें गाजला व कित्येक ठिकाणचे लोक तो अभ्यासण्यासाठीं न्यू ल्यूनार्कची वारी करूं लागले. कांहीं वर्षे तर या प्रयोगांत गिरणीचा आर्थिक तोटाहि झाला नाहीं. कामगारांचें वाढतें सहकार्य उद्योगधंद्यांस लाभलें. पण या वाढत्या खर्चाचा बोजा सहन करून बाजाराच्या स्पर्धेत टिकून राहाण्याइतक्या दरांत गिरणींत तयार होणारा माल सदा सर्वकाळ विकणें असंभवनीय होतें. जोंपर्यंत सर्वच उद्योगधंदे व उद्योगपति हा खर्च आवश्यक मानून त्यानुसार नवा दर निश्चित करण्याचा निर्धार करणार नाहींत अगर सर्वच धंद्यांतील कामगार एकजुटीनें या सुधारणा होईपर्यंत उत्पादन थांबविण्याचा एकमुखी निर्णय घेणार नाहींत तोंपर्यंत एकट्या दुकट्या माणसाला सुधारणेच्या खर्चाचा बोजा उठवून धंदा करणें परवडणार नाहीं हें त्याला नव्हे तरी त्याच्या भागीदारांना लवकरच समजून आलें. भांडवलशाही उत्पादनच स्पर्धेवर आधारलें आहे, तेव्हां कामगारांचें अधिकाधिक शोषण करून आपला माल गिऱ्हाइकास स्वस्तांत स्वस्त विकणें हाच मालकांचा त्या काळांत प्रयत्न होता. श्रम विकण्यासाठीं गिरणीच्या दारांत रीघ लागलेल्या अर्धपोटी व बेकार कामगारांनींहि परस्परांत स्पर्धा लावली होती;नव्हे त्यांचें व मुलांबाळांचें जळणारें पोट त्यांना मजुरीच्या दरांत स्पर्धा करण्यास भाग पाडीत होतें. अनिर्बंध व अनियंत्रित भांडवलशाही उत्पादनव्यवस्था नफ्यावर आधारलेली होती; भूतदया व समाजसुधारणांवर नव्हे. वाढता भांडवलसंचय श्रमिकांच्या पिळवणुकींतून होणार होता; कामगारांच्या आदर्श वसाहती उठवून नव्हे. शासनसंस्थेनें उद्योगधंद्यांत हस्तक्षेप करून कामगारांच्या राहाणीचा दर्जा निश्चित करणें व

त्यांस कायद्याचें संरक्षण देणें अगर कामगारांनीं संघटित होऊन आपला दर्जा मिळवून घेणें हे दोनच मार्ग ओवेनला अभिप्रेत असलेल्या सुधारणा घडून येण्यास उपलब्ध होते. पण आर्थिक स्वातंत्र्याच्या युगांत शासनसंस्थेचा उद्योग-धंद्यांतील हस्तक्षेप निषिद्ध मानला गेला होता व कामगारवर्गहि अजून वर्गजागृत व संघटित झाला नव्हता. अशा परिस्थितींत ओवेनचा आदर्श कामगार-वसाहतीचा प्रयोग अखेरीस अयशस्वी झाला.

गॉडवीनप्रमाणें ओवेनहि परिस्थितिजन्य स्वभावघडणीवर विश्वास ठेवीत होता म्हणूनच त्यानें आदर्श वसाहतीच्या मार्गानें आपल्या गिरणींतील काम-गारवर्गाचा जीवनदृष्टिकोण बदलण्याची उमेद बाळगली होती. सुसंस्कृत व शिक्षित कामगार समाजांतील उत्पादनाचें प्रमुख कार्य अधिक जबाबदारीनें पार पाडतील अशी त्याची श्रद्धा होती. अर्थात् ज्या सामाजिक परिस्थितीनें कामगारांच्या जीवनाचा ऱ्हास चालविला होता त्या परिस्थितींत आमूलाग्र बदल घडवून आणला पाहिजे असा निष्कर्ष त्यानें काढला. पण कामगारांचे दोष जसे परिस्थितिजन्य तसाच त्यांचें शोषण करणारा मालकवर्गहि परिस्थितीचा गुलाम आहे अशी त्याची मनोभावना होती. म्हणूनच कामगारवर्गानें, शोषणांतून आपली मुक्तता करून घेत असतां, मालकांविरुद्ध सूडाची भावना ठेवण्याचें कारण नाहीं अशी शिकवण त्यानें कामगारवर्गास दिली. आपल्या भीषण संघर्षांत हा वैचारिक समतोलपणा राखणें कामगारवर्गास जमणारहि नव्हतें व रुचणारहि नव्हतें. तेव्हां ओवेनचा हा प्रचारहि धर्मोपदेशकी ठरला. प्रत्येक व्यक्तीनें आपल्या हिताचें जागरूक रक्षण आरंभिलें कीं समाजाचें संवर्धन आपसुक होईल ही भांडवलशाही तत्त्ववेत्त्यांची श्रद्धा त्यास कधींच संमत झाली नाहीं. खाजगी मालमत्तेच्या प्रथेमुळें भांडवलशाही समाजांत सर्व व्यक्तींना जन्मतः एकच संधि लाभत नव्हती व बहुसंख्य जनतेच्या कर्तृत्वाला व स्वहित-रक्षणाच्या प्रयत्नांना सारखा वाव मिळणें अशा परिस्थितींत दुरापास्त होतें. म्हणूनच या तत्त्ववेत्त्यांची श्रद्धा तर्कनिष्ठ व न्यायनिष्ठुर नाहीं अशी त्याची खात्री झाली व त्यानें खाजगी मालकीच्या तत्त्वावर प्रखर टीका केली. स्वार्थावर

अधिष्ठित असलेल्या स्वहित रक्षणाच्या धडपडींतूनच समाजांत वर्ग, पंथ व पक्ष निर्माण होतात व लोभ, असूया, मत्सर या दुष्ट प्रवृत्ती जन्म घेतात असें तो मानी. म्हणूनच आदर्श समाजव्यवस्थेंत स्वार्थनिष्ठ व स्पर्धायुक्त जीवन-व्यवहारांची जागा सार्वहित व परस्पर सहकारी जीवनानें घेतली पाहिजे असा आग्रह त्यानें धरला.

सायमनप्रमाणें तोहि औद्योगिक उत्पादनव्यवस्थेचा समर्थक होता. वाढत्या प्रजेच्या प्राथमिक जीवनगरजा पूर्ण करण्याचें सामर्थ्य नव्या उत्पादक-शक्तींत आहे एवढेंच नव्हे तर समाजाच्या नव्या गरजाहि त्या पुऱ्या करूं शकतील व अशा परिस्थितींत गरिबींतून जन्मास येणारे अनेक व्यक्तिगत व सामाजिक दोष नष्ट होऊं शकतील अशी त्याला उमेद होती. प्रत्येक श्रमिकास कामधंद्याची शाश्वती मिळावी म्हणून सरकारनें कामगारब्यूरो स्थापावा अशी त्यानें मागणी केली. निरुद्योगी माणसेंच अधिक व्यसनाधीन होतात याचा अनुभव त्यानें नमुनेदार वसाहतींत घेतलाच होता. स्वतः गिरणीचा मालक असतांना त्यानें आपल्याच वर्गाच्या लोकांना उद्देशून केलेलीं अनेक भाषणें उद्बोधक अशींच आहेत. कुठलाहि समंजस व तर्कशुद्ध विचार अखेरीस आपल्या वर्गाच्या प्रतिनिधींच्या जीवनदृष्टींतहि फरक घडवून आणील हा विश्वासच त्याच्या मुळाशीं होता. १८१५ ते १८ या काळांत कामगारहितरक्षक कायदे पास व्हावे म्हणून ओवेननें अहर्निश खटपट केली व प्रचार–वाङ्मय छापून जोराचा प्रचार केला. कामगारांच्या कामाचे तास कमी व्हावेत, लहान मुलांना कामावर ठेवण्यास बंदी असावी व कामगारांच्या शिक्षणासाठीं सर्वत्र शाळा उघडण्यांत याव्या या त्याच्या प्रमुख मागण्या होत्या.

ओवेनची गणना स्वप्नद्रष्ट्यांत होण्याचें मुख्य कारण हें कीं त्यानें आपल्या लेखनांतून नवसमाजाचें कल्पनाचित्र समाजापुढें ठेवलें. 'ओवेनचें पॅरललोग्रम्स' या नांवानें हें कल्पनाचित्र प्रसिद्धीस आलें. न्यू ल्यूनार्कमधील प्रत्यक्ष प्रयोगाच्या अनुभवांतूनच त्यानें हें चित्र निर्माण केलें होतें. मध्यंतरीं अमेरिकेंत ३०००० एकर जमीन विकत घेऊन त्यानें तेथेंहि एक आदर्श वसाहत स्थापण्याचा प्रयत्न

केला. तो अयशस्वी होऊन तो इंग्लंडला परतला तेव्हां कामगार चळवळ वाढीस लागली होती. सहकारी संस्थाहि उदयास येत होत्या. उत्पादक व गिऱ्हाईक यांचा मूलभूत हितविरोध कसा कमी करतां येईल या प्रश्नाकडे आतां त्यानें अधिक लक्ष पुरवलें. न्यू ल्यूनार्कच्या प्रयोगांत त्यास ही गोष्ट कळून चुकली होती कीं गिऱ्हाईक आपल्या हितावर दृष्टि ठेऊन बाजारांतील स्वस्त मालाचाच उठाव करतात. मग ती स्वस्ताई उत्पादक कामगारांच्या पिळवणुकीवर आधारलेली कां असेना ! एका धंद्यांतील उत्पादक कामगार दुसऱ्या धंद्यांतील उत्पादित वस्तु विकत घेण्यास गिऱ्हाईक म्हणून जातो तेव्हां खुद्द तो कामगारहि स्वस्त माल शोधीतच बाजारपेठेंत हिंडतो. ही स्वस्ताई दुसऱ्या धंद्यांतील कामगारांच्या शोषणांतून शक्य झाली आहे याचा विचार तो करीत नाहीं. भांडवलदार व व्यापारी तर बोलून चालून नफ्याची दृष्टि ठेवून विक्री करतात. स्पर्धेतील घट ते मजुरींत घट करून भरून काढतात. अशा अनागोंदी जीवनव्यवहारांतून उत्पादक व गिऱ्हाईक यांच्या हितविरोधांतून आजचें अरिष्ट ओढवलें आहे असा निष्कर्ष त्यानें काढला. उत्पादक व गिऱ्हाईक यांच्या संयुक्त सहकारी संस्था निर्माण झाल्या पाहिजेत असा तोडगा त्यानें सुचविला. अशा संयुक्त संस्थाच उत्पादकाच्या गरजा व गिऱ्हाईकाची खरेदी–शक्ति या दोहोंचा एकसंध विचार करून हा बाजारांतील हितसंघर्ष थांबवूं शकतील व मालकांनीं चालविलेल्या कामगार वर्गाच्या शोषणाचा अंत होईल हें स्वप्न तो मनाशीं बाळगून होता. तसेंच कामगार वर्गांतील स्पर्धा वर्गजागृतीनें कमी होईल तर कामगारांचें अप्रतिहत शोषण मालक करूं शकणार नाहीं व उत्पादक वर्गास कामगारांची जीवनराहाणी व किमान दर्जा सुधारणें भाग पडेल अशी नवी उमेद त्यानें बाळगली होती. साहजिकच कामगार संघटना व उत्पादक गिऱ्हाईकांच्या संयुक्त सहकारी संस्थांची वाढ हा त्याच्या उर्वरित जीवनप्रयोगाचा मध्यबिंदु बनला. १८३३ च्या ऑक्टोबरमध्यें ही आपली श्रद्धा कार्यान्वित करण्यासाठीं त्यानें लंडन येथें ट्रेड युनियन्स व सहकारी संस्थांचें एक संयुक्त संमेलन घडवून आणलें. या प्रयत्नास अनपेक्षित पाठिंबा मिळाल्यामुळें, ही चळवळ वाढली तर कामगार वर्गांत सहकारी भावना वृद्धिंगत होऊन उत्पादक कामगार व बहुसंख्य गिऱ्हाईक

जनता यांच्या एकसंध प्रयत्नांतून नवसमाज निर्माण होईल अशी स्वप्नें त्याला पडूं लागलीं. या संमेलनांतून कामगार वर्गांत अपूर्व उत्साह निर्माण झाला. एका वर्षाच्या काळांत ट्रेड युनियनची सभासद संख्या आठ लाखांवर जाऊन पोहोंचली. पण आपल्या संघशक्तीची जाणीव कामगारांस होतांच ते संपाची भाषा बोलूं लागले. ओवेननें ही संभाव्यता प्रथम ध्यानीं घेतली नव्हती. समाजाला उपयुक्त अशा उत्पादन कार्यांत गुंतलेल्या भांडवलदार व कामगार वर्गांमधील सहकार्यावरच राष्ट्राचें भवितव्य अवलंबून आहे, त्यांच्यामधील वर्गसंघर्ष उग्र होत जाण्यावर नाहीं, अशी त्याची मनोधारणा होती. तेवढ्यासाठीं नव्हेंबर १९३३ मध्यें त्यानें 'राष्ट्रीय पुनरुज्जीवन संस्था' काढली होती व मालक व कामगारांनीं सुधारणेचा एकसंध कार्यक्रम स्वीकारावा अशी खटपट चालविली होती. पण या खटपटींतूनच सहकारवादी, ओवेनवादी व वर्गयुद्धवादी संपवाले यांच्यांत दुफळी निर्माण झाली; कामगारांच्या वाढत्या संघशक्तीनें मालक चपापले होते म्हणून त्यांनींहि ओवेनला सहकार्य नाकारलें. उत्पादन क्षेत्रांतील मालक व मजूर वर्गांमधील विग्रह समजुतीनें व सलोख्यानें कमी करीत करीत मिटवितां येईल व दोहोंच्या सहकार्यांतून समाजाच्या उत्पादनव्यवस्थेची पुनर्रचना करतां येईल हा त्याचा विश्वास त्याच्याच जीवनांतील अनेक व्यक्तिगत व सामुदायिक प्रयत्नांनीं खोटा पाडला होता. उत्पादनाच्या एकाच कार्यांत गुंतलेल्या भांडवलदार व कामगार-वर्गांतील हा विग्रह व्यक्तींच्या गुणदोषाचा परिणाम नसून भांडवलशाही अर्थ-पद्धतीचा दोष आहे व म्हणून त्यांचा वर्गसंघर्ष अटळ आहे हें ऐतिहासिक सत्य ओवेनला पुरेपूर जाणतां आलें नाहीं. आपलें सर्व जीवन जो समन्वय शोधण्यांत त्यानें घालविलें होतें त्याचा त्याग आयुष्याच्या शेवटीं आपल्या व्यक्तिजीवनांत तो करूं शकला नाहीं. पण त्याच्या मृत्यूनें इतिहासजमा झालेल्या या महान् प्रयोगानें वर्गसंघर्षाचें तत्त्वज्ञान समाजास देणाऱ्यांचा मार्ग मोकळा झाला होता, सुकर बनविला होता.

युरोपीय समाज आजपर्यंत अनेक प्रकारच्या वर्गसंघर्षांतून गेला होता. या भूमींत लोक अनेक ऐतिहासिक युद्धें लढले होते. तेव्हां नवासमाजाचे आदर्श

प्रयोग करून पाहाण्यास युरोपची भूमि तितकीशी अनुकूल नाहीं व म्हणूनच हे प्रयोग अयशस्वी होत आहेत असा ग्रह सेंट सायमन, फोरिअर व ओवेनच्या कित्येक अनुयायांनीं करून घेतला व अमेरिकेसारख्या नव्या सधन देशांची त्यांनीं आपल्या प्रयोगासाठीं निवड केली. खुद्द अमेरिकेंतील कित्येक बुद्धिवाद्यांनीं या प्रयत्नांस पाठिंब्राहि दिला. वृत्तपत्रें व पुस्तकांच्या द्वारां या आदर्श समाजचित्रांचा अमेरिकन जनतेंत प्रचार झाला. या सर्व प्रात्यक्षिकांत फोरिअरच्या अनुयायांनीं केलेला ब्रूक फार्मचा प्रयोग विशेष उल्लेखिण्यासारखा आहे. बोस्टनजवळील दोनशें एकर जमिनीचा तुकडा रिपलेनें या प्रयोगासाठीं निवडला होता व फोरिअरचे कित्येक अनुयायीं तेथें स्वतः वास्तव्य करून राहूं लागले होते. त्यांनीं आपल्या प्रयोगास 'शेती शिक्षणाची ब्रूकफार्म संस्था' असें नांव ठेवलें होतें. आपल्या ब्रीदवाक्यांत त्यांनीं लिहिलें कीं "व्यक्तिगत स्वार्थावर आधारलेल्या स्पर्धेऐवजीं बंधुभावी सहकारी प्रयत्नांवर अधिष्ठित अशी समाजपद्धति आह्मांस निर्माण करावयाची आहे. आमच्या आवांक्यांतील सर्वोच्च प्रतीचें शारीरिक, बौद्धिक व नैतिक शिक्षण आमच्या स्वतःच्या मुला-बाळांना व ज्या मुलांचें पालकत्व आमच्या हवालीं केलें जाईल अशा मुलांना देण्याची आमची इच्छा आहे. आकर्षक, योजनानिष्ठ व अधिकाधिक उत्पादक अशी उद्योगपद्धति शोधून काढणें; व्यक्तीच्या आवश्यक गरजा सहज सुलभ मार्गानें पुऱ्या करणें व त्याला शाश्वती देणें; फाजील धनसंचयाची हांव संयमित करून आवश्यक तेवढीच खाजगी मालमत्ता संग्रहीं ठेवण्याची प्रवृत्ति वाढविणें; परस्पर सहकार्यानें सर्वांस सुस्थिति व आध्यात्मिक प्रगतीची शाश्वती देऊन वाढतें व्यक्तिस्वातंत्र्य, साधी जीवनराहाणी, सत्यनिष्ठा, सुसंस्कृतता, व व उच्च नीतिमत्ता यांच्या साहाय्यानें व्यक्तीची जीवनपातळी वाढविणें हेंच आमचें ध्येय राहील" * या ध्येयसिद्धीसाठीं त्यांनीं आपल्या वसाहतींतील कारभारांत खालील तत्त्वांचा अंगीकार केला. सर्व तऱ्हेच्या श्रमांना सारखाच मोबदला देण्यांत येऊं लागला. शिक्षण व औषधोपचार मोफत ठेवण्यांत आले.

* 'सोशल इकॉनामिक मूव्हमेंट्स' : पान १०६

ग्रंथालयें व न्हाणीघरें सर्वांना खुलीं करण्यांत आलीं. प्रत्येकाला त्याच्या आवडी-नुसार व लायकीनुसार कामधंदा पुरवण्यास संस्था वचनबद्ध बनली. हळु हळु वसाहतीचा पसारा वाढला. वसाहतीची एक अवाढव्य इमारत बांधली जात होती व नागरिकांनीं मोठ्या अपेक्षा राखल्या होत्या. पण इमारत पुरी होण्यापूर्वीच वसाहत अग्नीच्या भक्ष्यस्थानीं पडली. हा प्रयोग या आर्थिक नुकसानानें संपुष्टांत आला खरा, पण ब्रूकफार्ममधील ध्येयवादी समाजजीवनाच्या स्मृति अमर बनल्या.

अमेरिकेंत ब्रूकफार्मसारखे अनेक लहानमोठे आदर्श समाज जीवनाचे प्रयोग झाले. पण भांडवलशाही समाज व्यवस्थेंतून निर्माण झालेल्या अनेक बिनतोड समस्या सोडवण्यास हे फुटकळ व व्यक्तिगत प्रयत्न पुरे पडले नाहींत. आदर्श वसाहतींचे विकेंद्रित समाज-प्रयोग यशस्वी झाले तर सुज्ञ व बुद्धिनिष्ठ समाज त्यांचें स्वयंस्फूर्त अनुकरण करील व स्थानिक कल्पकतेला पूर्ण वाव राहूनहि अशा प्रयोगांतून एक मानवव्यापी नवी समाजव्यवस्था निर्माण होऊं शकेल या दुर्दम्य आशावादानेंच, क्रांतीच्या उदरांतून जन्म घेतलेल्या व घेत असलेल्या नव्या समाजापुढें, या समाजद्रष्ट्यांनीं आपलीं नवसमाजाचीं कल्पना-चित्रें रंगविलीं होतीं. कांहींनीं त्याचीं प्रात्यक्षिकें जनतेसमोर ठेवण्यासाठीं आदर्श वसाहती वसविल्या होत्या.

सेंट सायमन, फोरिअर व ओवेन या स्वप्नद्रष्ट्या समाजवाद्यांप्रमाणेंच समाजाच्या पुनर्रचनेच्या प्रश्नांचा सर्वांगीण विचार करणाऱ्या समाजद्रष्ट्यांत प्रूधाँचा उल्लेख येथें प्रामुख्यानें करावयास हवा. समाजवादी विचारांतील अराज्यवाद्यांच्या परंपरेचें जनकत्व त्याचेकडे जातें. ‘फिलॉसफी ऑफ प्रोग्रेस’ या आपल्या ग्रंथांत तो म्हणतो कीं कोणत्याहि कल्पना एकमेवत्वाचा दावा करूं लागल्या अगर त्या अद्वितीय मानून जनता त्यांचें अंधानुकरण करूं लागली कीं त्यांच्या खरेपणाबद्दल शंका निर्माण होते. हा एकमेवत्वाचा दावा विघटनेस जन्म देतो. समाजजीवनांत दैवी शक्तींचा अटलतावाद जितका असत्य आहे तितकाच कित्येक भौतिक कल्पनांचाहि. समाजाच्या साधनसंपदेंत व भौतिक परिस्थितींत विशिष्ट बदल घडवून आणून समाजाला मुक्तीची अनुभूति मिळवून

देण्याचा दावा करणाऱ्या ‘ इहलोकच्या देवांवर ’ त्याचा विश्वास नव्हता आणि एकादी सर्वस्पर्शी काल्पनिक पद्धति निर्मून ती मानवांच्या हवाली करणाऱ्या कुशाग्र कल्पकबुद्धीचेंहि त्यास कौतुक नव्हतें. ललाटवादाप्रमाणेंच या अटलता-वादांतून स्वतःची मुक्तता करून घेण्यांतच समाजाला प्रगतीचा पुढचा मार्ग सांपडेल अशी त्याची विचारसरणी होती. म्हणूनच विक्रेय वस्तूंप्रमाणें एकादा यशस्वी प्रयोग करून समाजव्यवस्थेचा आदर्श समाजास ‘ विकूं ’ पाहाणाऱ्या स्वप्नद्रष्ट्या विचारवंताबद्दल त्यास तिटकारा वाटत होता. मनुष्य इतःपर ठोकळेबाज बनूं इच्छित नसल्यामुळेंच सायमन, फोरिअर, ओवेनआदि विचारवंतांची राजकीय संघटना अगर समाजव्यवस्थांची कल्पना-चित्रें सर्वत्र उत्साह निर्माण करूं शकलीं नाहींत अशी टीका प्रूधाँनें केली. स्वप्नद्रष्टे समाजवादी, मानवी इतिहासाचें उत्क्रान्ति–विकास–सूत्र पकडून व म्हणूनच उत्पादनांतील क्रान्ति मंजूर करून, तदनुषंगानें समाजव्यवस्थेंत कोणते बदल व्हावयास हवेत याची चर्चा करीत होते. समाजाच्या पुनर्संघटनेचा प्रश्न हाताळीत होते. पण प्रूधाँनें समाजधारणेच्या मूलभूत प्रश्नांनाच पुनश्च हात घातला. सेंट सायमननें उत्पादनांतील क्रान्तींतून निर्माण झालेल्या उत्पादक वर्गास समाजाचें धुरीणत्व दिलें होतें. बँकांच्या चालकांवरच अम्मलबजावणीचें कार्य सोंपवलें म्हणजे निराळ्या शासनसत्तेची अगर राजकीय सरकारची समाजास जरूरी नाहीं असें प्रतिपादून शासनसंस्थेच्या स्वरूपांत सुधारणा घडवून आणण्याची मागणी केली होती. उलट प्रूधाँला समाजांतच संपूर्ण कायापालट घडून यावयास हवा होता. या कायापालटासाठीं प्रचलित समाजांत सामाजिक व राजकीय तत्त्वांस असलेल्या सापेक्ष प्राधान्यांत मोठें परिवर्तन घडून येणें जरूर होतें. समाजावर कलम केलेली एक राजकीय राजवट बदलून दुसरी तेथें प्रस्थापित होऊन भागणार नव्हतें. सर्व समाजाचें प्रकट स्वरूप बनण्याची शक्ति सामावलेली व्यवस्था आपसुक जन्माला येण्याची जरूरी प्रूधाँला भासत होती. प्रूधाँ म्हणे “ समाजांत निर्माण होणाऱ्या सर्व अरिष्टांस, माणसांच्या पिळवणुकीस व राष्ट्रांच्या ऱ्हासास शिडीच्या पायऱ्यांप्रमाणें सत्तेचें होत असलेलें केन्द्रीकरणच प्रामुख्यानें जबाबदार आहे.... समाजावरील या

राक्षसी बांडगुळांचा शक्य तितक्या लवकर आपण निःपात केला पाहिजे."* पण या सत्तेला प्रतिरोधी म्हणून तो व्यक्तीस कल्पित नव्हता. त्या अर्थानें तो व्यक्तिवादी नव्हता. स्वखुषीनें एकत्र आलेल्या व्यक्तींच्या समूहांशीं जीवात्मक एकता साधलेली व्यक्ति हीच शासनसंस्थेऐवजीं समाजाचा प्रधान घटक म्हणून त्याला अभिप्रेत होती. तो म्हणत असे कीं, धर्मसुधारणेच्या युगापासून व विशेषतः फ्रेंच राज्यक्रान्तीपासून जगांत नव्या चेतनेचा आविष्कार झाला आहे. शासनसंस्थेला विरोध करणारी ही स्वातंत्र्याची भावना सर्वत्र इतकी फैलावली आहे कीं तिचें संवर्धन केवळ व्यक्तीची जबाबदारी न ठरतां समूहांमध्येंहि हें स्वातंत्र्य टिकलें पाहिजे अशी जनतेची दृढ भावना बनली आहे. एकदां समाजांत पुनश्च संयुक्त संस्था व सामाजिक संकेत रूढ झाले कीं हें वाढतें केन्द्रीकरण संपुष्टांत येईल अशी त्याची कल्पना होती. परस्पर सहकाराच्या जाणिवेंतून स्वखुषीनें एकत्र येणाऱ्या लोकांचे समूह हेच समाजाचे प्राथमिक घटक असावेत असें तो मानीत होता. मात्र या घटकांचें नेमकें स्वरूप व समाजांतील निश्चित स्थान यासंबंधींचे प्रूधाँचे विचार ढोबळ विवेचनापलीकडे पोहोंचूं शकले नाहींत.

कामगारसंघांचें भवितव्य त्याच्या दृष्टीनें दोन प्रश्नांच्या उत्तरांवर अवलंबून होतें. उत्पादनाचें काम अंगावर घेतांना आजच्या भांडवलदाराप्रमाणें मजूरसंघ स्वतः स्वतंत्रपणें भांडवल उभारूं शकेल काय ? व उद्योगाची मालकी व नियंत्रण सामुदायिक राहूं शकेल काय ? परस्पर सहकार्याच्या तत्त्वावरच या दोन प्रश्नांचें होकारार्थी उत्तर देणें शक्य आहे असें तो मानी. एकाद्या उद्योगपतीसाठीं एकाद्या धंद्यांतील कामगार जसे खपतात तसेच ते एकमेकांबरोबर सहकार्य करून सर्वांच्या मालकीचें उत्पादन करण्यासाठीं झटतील व सर्वजण धंद्यांतील नफा वांटून घेतील, तर हें तत्त्व कार्यान्वित होऊं शकेल. हें परस्पर सहकाराचें तत्त्व एका संघांतील व्यक्तींप्रमाणें संघासंघांतील व्यवहारांत अंमलांत आणलें

* डेमॉक्रसी अॅण्ड सोशालिझम : आर्थर रोझेनबर्ग : पान ५२.

गेलें कीं नव्या समाजव्यवस्थेची रचना पुरी होईल व नवसंस्कृति जन्म घेईल. ' सर्व सहकारवादी व सर्व स्वतंत्र ' अशा शब्दांत या समाजरचनेचें वर्णन त्यानें केलें आहे. पण कुठल्याहि सत्तेनें अशा नमुन्याची रचना स्वतः पुढाकार घेऊन लोकांवर वरुन लादून चालणार नाहीं. उत्पादनाची आंच कमी करण्यासाठीं, स्वस्त उत्पादनासाठीं, गिऱ्हाईकांच्या हितसंरक्षणासाठीं व खुद्द उत्पादक कामगारांच्या जीवनांत शाश्वती निर्माण करण्यासाठीं, स्वतःच्या बोचणीतून जेव्हां व्यक्ती परस्पर सहकारास तयार होतील तेव्हांच खऱ्या अर्थानें असे घटक निर्माण होतील व अशा घटकांच्या समाजव्यवस्थेंत अंगभूत होऊनहि स्वतःची स्वातंत्र्याची भावना, व्यक्ति टिकवूं शकेल.

म्हणूनच प्रूधाँ हा सत्तेच्या केन्द्रीकरणाचें मूर्तस्वरुप बनलेल्या शासनसंस्थेचा आयुष्यभर खंदा टीकाकार राहिला. भावी समाजव्यवस्थेंत सरकार, खाजगी मालमत्ता व आर्थिक विषमता राहतां कामा नये ही त्याची विरोधत्रयी त्यानें अतिशय हिरीरीनें प्रतिपादली. ' व्हॉट इज प्रॉपर्टी ' (कुठली मालमत्ता ?) या आपल्या पुस्तकांत त्यानें खाजगी मालमत्तेच्या कल्पनेचें व त्या कल्पनेंतील अनैतिकतेचे धिंडवडे काढले आहेत. खाजगी मालमत्ता ही एक प्रकारची चोरीच आहे असें तो म्हणे. खाजगी मालमत्तेचें समर्थक दोन मुद्यांवर तिचें समर्थन करतात. वहिवाटीचा हक्क व श्रमाचें मोल हेच ते दोन मुद्दे आहेत. वहिवाट हा वारसाहक्काइतकाच अपघात आहे. वहिवाटीच्या हक्काला पूर्ण मान्यता दिली तर पुढच्या पिढीतील प्रजेवर व नव्यानेंच कुठेंहि जाऊन वसाहत करणारावर, मोठा अन्याय होईल. इतिहासकालांत केव्हांतरी कोणतीच जमीन अगर मालमत्ता जर कोणा एका व्यक्तीची नव्हती तर ती सर्वांच्याच मालकीची होती असें कां मानूं नये असा प्रश्न निर्माण करून तो लिहितो कीं लोकांनीं स्वखुषीनें जाहीरनामे काढून आपला हा सार्वजनिक हक्क सोडून दिल्याचे पुरावे कुठेंच आढळत नाहींत. साहजिक तिचा हक्क नष्ट करून तिच्यावर हक्क बजावण्यांत व्यक्तीनें चोरी करून वर पुन्हा शिरजोरी केली आहे. बरें ही श्रमाची मिळकत म्हणावी तर जोंपर्यंत व्यक्ति स्वतःच्या श्रमानें

तिचें उत्पादन करते तोंपर्यंत ती तिची म्हणतां येईल. एकाद्या जमिनीवर एकादी व्यक्ति जोंपर्यंत स्वतः राबून उत्पादन करील तोंपर्यंत ती तिची राहील, पण दुसरी व्यक्ति ती जमीन कसूं लागली कीं त्या जमिनीची मालकी त्या दुसऱ्या व्यक्तीकडे गेली पाहिजे. जमिनीच्या खाजगी मालमत्तेचे समर्थक हा कसणाऱ्याचा हक्क नामंजूर करून चोरी व शिरजोरीच करीत आहेत. श्रमास मूल्य येण्यास उत्पादनसाधनांचा वापर करावा लागतो. तीं एकट्या व्यक्तीचीं कधींकाळीं नव्हतीं तर मग तीं साधनें वापरून केलेल्या श्रमांचें मूल्य केवळ त्या व्यक्तीचें कसें मानतां येईल? श्रमसिद्धान्त मानावयाचा असेल तर उत्पादन साधनांवरील खाजगी मालकीहक्काचा अंत झालाच पाहिजे. तो हक्क नामंजूर केला तरच जमीन व इतर उत्पादनसाधनें श्रमिकाला पुनश्च उपलब्ध होऊं शकतील. खाजगी मालकीहक्क नष्ट केला पाहिजे असा आग्रह धरतांना प्रूधाँ स्वतःच्या श्रमानें कमावलेल्या मालमत्तेच्या वापराचा हक्क नाकारीत नव्हता. पण स्वतः वापर करीत नसलेली उत्पादनसाधनें दुसऱ्या श्रमजीवीस देऊन त्याबद्दलचा मोबदला घेण्यास मात्र त्याचा सक्त विरोध होता. थोडक्यांत उपभोगाच्या वस्तूंवरील खाजगी मालकी त्यास समाजविघातक वाटत नसली तरी उत्पादनवस्तूवरील वैयक्तिक मालकीचा तो कट्टा विरोधक होता. नुकसान भरपाई देऊन मालकी हक्काबद्दल हा अन्याय दूर करण्याचा पर्याय त्यास पसंत नव्हता. धनसंपत्ति निर्माण करणाऱ्या उत्पादन साधनांचें समान वांटप झालें पाहिजे व तें असंभवनीय असलें तर त्यांवर समाजाची मालकी प्रस्थापित झाली पाहिजे हाच मार्ग त्यास पसंत होता. जर प्रत्यक्ष उत्पादनांत कमीअधिक प्रमाण राहिलें व त्यांतून विषमता निर्माण झाली तर ती कशी व कोणी नष्ट करावयाची याचें मात्र निःसंदिग्ध उत्तर त्यानें दिलेलें नाहीं.

वस्तूंचें मूल्यमापन हें त्यासाठीं खर्च झालेल्या श्रमाच्या तासांनीं करावयास हवें असा विचार मांडून, त्यानें समाजवादी विचारपरंपरेंत मोठी मौलिक भर घातली. उत्पादनसाधनें पुन्हा श्रमिकांस मिळवून देण्याचा एक

मार्ग म्हणून त्यानें राष्ट्रीय बँकेची कल्पना मांडली. या बँकेनें श्रमिकांना विनामूल्य उत्पादनसाधनें वापरण्यासाठीं दिलीं कीं श्रमाचें योग्य मोल श्रमिकांस मिळूं लागेल अशी त्याची कल्पना होती. या बँकेच्या कारभाराचा एक आदर्श त्यानें आपल्या लेखनांत विस्तारानें चर्चिला आहे.

त्याच्या समाजवादी विचारसरणीचें अधिष्ठान सामान्यतः नैतिक होतें असेंच मानावें लागेल. माणसानें माणसांवर नियंत्रण ठेवणें म्हणजेच दडपशाही. समाजांत व्यवस्था व अव्यवस्था यांचें स्वतंत्र अस्तित्व नष्टच झालें पाहिजे; त्या एकरूप बनल्या पाहिजेत. सर्वंकष सत्तेकडे झेंप घेणाऱ्या मानवी इतिहासाच्या कालखंडांत हें त्याचें समाजाच्या स्वरूपासंबंधीचें लिखाण कल्पनावादी न ठरतें तरच नवल. प्रूधाँलाहि असा समाज नजिकच्या काळांत निर्माण होईल अशी उमेद नव्हती. इतर स्वप्नद्रष्ट्यांत व प्रूधाँत हाच फरक होता. म्हणूनच आपल्या अढळ श्रद्धेनुसार समाजांतील प्रस्थापित सत्तांवर हल्ला चढविण्याचें निष्काम कर्म त्यानें आयुष्यभर केलें.

राष्ट्रीय बँकेमार्फत उत्पादनाचीं साधनें श्रमिकांस पुरवावीं हा कार्यक्रम प्रूधाँनें समाजापुढें ठेवला. त्याच काळांत, दुसरा फ्रेंच समाजवादी विचारवंत लुई ब्लांक १८४८ च्या फ्रेंच क्रान्तींतील हंगामी सरकारांत सामील होऊन, तशाच तऱ्हेचा कार्यक्रम प्रतिपादीत होता. राष्ट्रांत सगळीकडे समाजाच्या मालकीचे कारखाने निर्माण करून, उत्पादन साधनें पुरवून, सर्व श्रमिकांस उत्पादक म्हणून अनुकूल संधि मिळवून द्यावी अशीच त्याचीहि योजना होती. पण खुद्द शासनसंस्थेनें हा कार्यक्रम पार पाडावयाचा असल्यामुळें ती योजना प्रूधाँला सम्मत झाली नाहीं. शासनसत्तेच्या पुढाकारांतून सर्वत्र पसरलें जाणारें सहकारी संघटनाचें जाळें एकसांची व सहकारी प्रयत्न निर्जीव बनविण्यास कारणीभूत बनेल व तो सहकार जाणिवेंतून व स्वप्रयत्नांतून न झाल्यामुळें अखेर क्षणभंगुर ठरेल असें त्याचें म्हणणें होतें. ब्लाँकचे ‘सार्वजनिक कारखाने’ शासनसंस्था स्थापन करणार होती, त्यांना भांडवल पुरवणार होती व त्यांचें मार्गदर्शन व नियंत्रण करणार होती. त्याच्या समाजपुनर्संघटनेच्या

कल्पनेंत ' एका कारखान्यांतील सर्व कामगार ' ' एका धंद्यांतील सर्व कारखाने, व ' समाजांतील सर्व कारखाने ' एकजीव व सुसंघटित समाज निर्माण करणार होते. सर्वांच्या गरजा पुऱ्या करण्यासाठीं सर्वांच्या श्रमांतून निर्माण झालेलें उत्पादन तो एकत्र गोळा करणार होता. सहकारवादी समाजसंघ शक्य तितक्या लवकर व अधिकाधिक व्यापक समाजजीवनांत निर्माण करण्यासाठींच, शासनसंस्थेची सत्ता व शक्ति कामीं लावण्याची उमेद त्यानें बाळगली होती. समाजांतील शासनसत्तेच्या अदृष्ट गर्भशक्ती कोणत्या आहेत हें त्यास नेमकें उमगलें नाहीं. म्हणूनच शासनसंस्था समाजांत किती अपूर्व कामगिरी पार पाडूं शकेल याचें एक भव्य चित्र निर्माण करण्यापलीकडे तो कांहीं साध्य करूं शकला नाहीं. आपल्या लिखाणांतून तत्कालीन भांडवलशाही नीतितत्त्वांवर त्यानें जोरदार हल्ले चढविले. चालू समाजपद्धति म्हणजे " सर्वांचें सर्वांविरुद्ध युद्ध " होय, असें तो म्हणे. स्पर्धानिष्ठ अर्थव्यवस्थेचें हें फळ आहे अशी त्याची खात्री झाली होती. परस्परावलंबी व परस्पर साहाय्यक शरीरावयवांच्या देहसंघटनेप्रमाणेंच मानवी कुटुंबाचा कारभार चालावयास हवा असें त्याचें मत होतें. समाजांतील सर्व व्यक्तींत एकच नैपुण्य असेल हें संभवनीय नाहीं. पण आपलें विशेष नैपुण्य स्वतःची हांव पुरवण्यासाठीं व इतरांवर कुरघोडी करण्यासाठीं कोणी वापरूं नये, समाजऋण म्हणून त्याचा वापर करावा अशी त्याची शिकवण होती. व्यक्तीच्या विशेष नैपुण्याबद्दल त्यास मोबदला कसा मिळावा यासंबंधीं अनेक स्वप्नद्रष्ट्यांनीं अनेक पर्याय सुचविले. पण या पर्यायांस श्रेष्ठ नैतिक अधिष्ठान नाहीं अशी त्याची मनोभावना होती. " प्रत्येकानें आपल्या कर्तृत्वानुसार समाजास द्यावें व गरजांनुसार समाजाकडून घ्यावें " हेंच तत्त्व त्यास सर्वश्रेष्ठ वाटत होतें. दैन्यावस्थेंतून मनाची क्षुद्रता व गुन्हेगार वृत्ति प्रबळ होत जाते. म्हणून भौतिक सुख व भरभराटीची वाढती धडपड निषिद्ध न ठरतां उलट उच्च आत्मिक प्रगतीची ती प्रेरक शक्ति बनली पाहिजे असा प्रचार करून उत्पादनांत सतत प्रगति करीत राहाण्याची जनतेंतील इच्छा त्यानें जागृत राखली. भांडवलशाही अर्थव्यवस्थेंतील बेकारीचें संकट निवारण करण्याच्या प्रयत्नांत सार्वजनिक कामें हातीं घेण्याची त्याची योजना उपयुक्त ठरली.

शासनसंस्थेचा उपयोग समाजाच्या कल्याणासाठीं विशिष्ट परिस्थितींत करून घेतां येईल हा त्याचा आशावाद, समाजवादी चळवळींच्या इतिहासांत मोलाचा ठरला व भांडवलशाही समाजांतील शोषित श्रमिक वर्ग शासन संस्थेचा कबजा घेण्याच्या दृष्टीनें विचार करूं लागला.

स्वप्नद्रष्ट्या समाजवाद्यांच्या तत्त्वशोधनाचा व कार्याचा जो ओझरता परामर्ष या प्रकरणांत आपण घेतला आहे त्यावरून या सर्व समाजद्रष्ट्यांनीं समाजवादी विचारपरंपरा समृद्ध करण्यांत बजावलेली अभूतपूर्व कामगिरी व त्यांच्या मर्यादा आपल्या ध्यानीं येतील. या सर्व स्वप्नद्रष्ट्यांचें समाजाच्या मूलभूत समस्यांबाबत एकमत तर नव्हतेंच, उलट त्यांच्यांत गंभीर मतभेद होते. पण एका मुद्यावर त्या सर्वांमध्यें मतैक्य दिसतें. भांडवलशाही समाजव्यवस्था व अर्थपद्धति त्याज्य असून तिचा अंत केला पाहिजे हाच तो मतैक्याचा धागा होय.

भांडवलशाही पद्धति पिळवणूक व अन्याय यावर आधारलेली आहे.संपत्तीची व श्रमशक्तीची अमर्याद उधळपट्टी या व्यवस्थेंत होते. उत्पादन क्षेत्रांतील अनिर्बंध स्पर्धेंतून अरिष्टें उद्भवतात. उत्पादन योजनाबद्ध व सामाजिक उपयुक्ततेच्या दृष्टीनें होत नाहीं, तर नफ्यावर दृष्टि ठेऊन केलें जातें. उत्पादन साधनांवरील खाजगी मालकींतून भयावह आर्थिक विषमता जन्मास येते व स्पर्धेंतून द्वेष, मत्सर व हिंसक वृत्तींचा मानवी मनांत उद्भव होतो. ही समाजपद्धति अन्याय्य व शोषक आहे तशीच अनैतिक आहे. कारण अशा समाजांत मानवतेच्या उदात्त, बंधुभावी व मंगल भावना नष्ट होऊन मानव मानवाचा शत्रु बनतो. सामर्थ्यवान दुबळ्यांचे मारेकरी बनतात. मूठभर धनिक उत्पादनसाधनांवरील विषम मालकी, तिला कायद्याचें अधिष्ठान देऊन समाजांत स्थिर करतात व उत्पादन वाढीसाठीं कोणतेहि शारीरिक अगर बौद्धिक श्रम न करतां त्या मालकी हक्काच्या जोरावर संपत्तीचा मोठा वांटा स्वतःच्या खिशांत टाकून त्या धनाची मन मानेल तशी उधळपट्टी करतात. आपल्या आर्थिक सत्तेच्या जोरावर राजसत्तेवर प्रभुत्व गाजवून श्रमिक जनतेला गुलाम बनवितात. आपल्या अन्याय्य, जुलमी, शोषक व अनागोंदी कारभारावर पांघरूण घालतात व विरोधी विचार व संघटना झोडपून

काढतात. मानवी श्रमशक्तीचा अपहार करणारी ही समाजपद्धति अमानुष आहे व तिचा अंत केल्याखेरीज निरोगी संपन्न व सुखी स्वतंत्र समाज निर्माण होणार नाहीं.

उत्पादनाचीं साधनें समाजाच्या मालकीचीं करूनच या सुखी समाज-जीवनाची साधना यशस्वी होऊं शकेल. खाजगी मालकीच्या कल्पनेंतूनच समतेच्या नैसर्गिक व उदात्त कल्पनेला हरताळ फांसला गेला आहे. तेव्हां खाजगी मालकीची प्रथा नष्ट झाली पाहिजे. व्यक्तिगत अगर राष्ट्रीय स्पर्धेऐवजीं परस्परसहकार्य व सहकारी सहजीवनांतच व्यक्तीचें व समाजाचें सुख सामावलेलें आहे हा विश्वास जनतेमध्यें निर्माण होईल व कोणत्या ना कोणत्या स्वरूपांत उत्पादनसाधनें समाजाच्या हातीं येतील तरच समाजाचे प्रश्न समाधानकारकपणें सुटूं शकतील. अशा समाजांत प्रत्येक व्यक्तीस आपल्या शारीरिक, बौद्धिक व मानसिक विकासास संपूर्ण व समान संधि प्राप्त होईल. प्रत्येकानें आपल्या उपजीविकेसाठीं श्रम केले पाहिजेत व समाजांत श्रमांस सर्वश्रेष्ठ प्रतिष्ठा मिळाली पाहिजे. रिकामटेकडा ऐतखाऊ वर्ग उपयुक्त कार्य तर करीत नाहींच; उलट आपल्या फुरसतीचा काल समाजद्रोही कारवाया व उपद्व्याप करण्यांत व व्यसनाधीन बनण्यांत तो उपयोगांत आणतो. कोणत्याहि उत्पादनव्यवस्थेंत या फुरसतीचा विघातक उपयोग होणार नाहीं याची खबरदारी घेतली पाहिजे. प्रत्येक व्यक्तीचें शील, स्वभाव व मनाचा सुसंस्कृतपणा परिस्थितिजन्य आहे. निदान प्रतिकूल परिस्थितींत या गुणांचें योग्य संवर्धन होत नाहीं; यासाठींच समाजाची भौतिक स्थिति व वातावरण सुधारलें पाहिजे. समाजांतील गरिबी, अज्ञान व जीविताची अशाश्वती नष्ट केली पाहिजे.

स्वप्नद्रष्ट्या समाजवादांतील सर्वसामान्य मतैक्याचा धागा येथें संपतो. भांडवलशाही समाजपद्धतीचा अंत कोण कसा करणार? या सामाजिक परिवर्तनानंतर समाजाची पुनर्संघटना कशी करावी? त्या नवोदित समाजाचे प्रमुख घटक कोण? या प्रश्नांवर त्यांच्यांत तीव्र मतभेद दिसून येतात. समाजाची मालकी कोणत्या मर्यादेपर्यंत व कोणत्या स्वरूपांत राहावी हा प्रश्न या विचार

मंथनांतून सुटला नाहीं. समतेच्या आविष्कारासंबंधींहि एकवाक्यता होऊं शकली नाहीं. बॅबूफ, कॅबेट आदि समतावादी संपूर्ण समतेचे समर्थक होते; तर सेंट सायमन व फोरिअर गुणविशिष्ट मोबदल्याची तरफदारी करीत. कांहीं शासन-संस्थेचे समर्थक होते, कांहीं त्यांत सुधारणा घडवून आणूं इच्छित होते तर कांहीं तिचे कट्टे विरोधक होते. उत्पादनाचा व विभजनाचा प्रश्न सुटला तर शासनसंस्था अनवश्यक बनून ती कालावधींत लोप पावेल असाहि कांहींचा विश्वास होता.

या सामाजिक परिवर्तनाचीं साधनें हिंसात्मक असतां कामा नयेत असें बहुतेकांचें मत होतें. पण हें मत ते हिंसेचे तत्वनिष्ठ विरोधक होते म्हणून त्यांनीं बनविलें होतें असें मानावयास पुरावा नाहीं. तसें पाहिलें तर हे सर्व विचारवंत हिंसात्मक क्रान्तीच्या पर्वांतूनच जन्मास आले होते. पण नवोदित समाजाच्या शास्त्रसंपन्न, तर्कनिष्ठ बौद्धिक सामर्थ्यावर व समजूतदारपणावर त्यांचा विश्वास होता. ज्या न्याय्य व सत्य विचारांची प्रचीति आपणांस झाली आहे त्या विचारांचा प्रचार व प्रत्यक्ष आचरण आपल्याच समाजांतील भोंवतालच्या व्यक्तींना पुनर्विचार करण्यास उद्युक्त करील व त्यांनीं तें सत्य-संशोधन आरंभलें कीं आपल्याप्रमाणेंच त्यांनाहि या सत्याची अनुभूति होईल व आपल्या जागृत विवेक बुद्धीनें न्याय्य कोणतें व त्याज्य कोणतें हें ते ठरवूं शकतील अशी त्यांना दुर्दम्य आशा होती. आपल्या विपन्नावस्थेची जाणीव बहुसंख्य जनतेस झाली कीं चालू परिस्थिति बदलण्यास ते कां प्रवृत्त होणार नाहींत असाच प्रश्न ते विचारीत. समाजांतील या वाढत्या जाणिवेबरोबर, पहांटे-बरोबर जसा अंधार पळून जातो, तद्वत् त्यांची विपन्नावस्था नष्ट होईल व संघर्ष अटळ बनलाच तरी या जागृत समाजाचें शत्रुत्व पत्करण्यास विरोधक धजणार नाहींत अशी त्यांची अटकळ होती.

आपले नवविचार कुठल्याहि एका मर्यादित वर्गाचें तत्त्वज्ञान बनूं नये अशी त्यांची इच्छा होती. ते म्हणत 'चुकलेल्या कोकरांत वर्गवारी ती काय करावयाची!' नव्हे सत्तासंपन्न व धनिकवर्गाचें मतिपरिवर्तन करण्याचा

प्रयत्न प्रथम व्हावयास हवा. कारण त्यांचें हृदयपरिवर्तन झालें तर सार्वत्रिक बदल झपाट्यानें घडून येण्यास त्यांचें सामर्थ्य उपयुक्त ठरेल. श्रीमंतांच्या हृदय-परिवर्तनाचा प्रयत्न करावा का या प्रश्नास कॅबेट 'निःसंशय' असें उत्तर देतो. पण तें हृदयपरिवर्तन होऊं शकेल का या प्रश्नास तो प्रतिप्रश्न टाकी कीं "अशी शंका कां घ्यावी? श्रीमंत वर्गांत सुसंस्कृत, न्यायनिष्ठुर व उदार मनाचीं माणसें नाहींत का?"

म्हणूनच आपल्या ध्येयाचा उच्चार व आचार करीत रहा असा संदेश स्वप्नद्रष्ट्या समाजवाद्यांनीं आपल्या अनुयायांस व जनतेस दिला. आपल्या नवसमाजाच्या कल्पनाचित्रांनुसार एकादी छोटी मानववसाहत जरी आपलें तत्त्वनिष्ठ समाजजीवन संघटित करील तरी त्यांतून अत्यंत परिणामकारक प्रचार-कार्य होईल या श्रद्धेनेंच या कित्येक समाजवाद्यांनीं हीं सामूहिक जीवनाचीं प्रात्यक्षिकें जनतेसमोर ठेवण्याचा प्रयत्न केला. तर इतरांनीं आपल्या प्रतिभासंपन्न व प्रभावी लेखणींतून असें जीवन संघटित करूं इच्छिणारी अनुयायी मंडळी निर्माण केली. आपल्या आयुष्याच्या शेवटीं कांहीं द्रष्ट्यांमधील सर्ववर्गी समानत्वाची भावना कमी होऊन सामाजिक परिवर्तनाची प्रमुख शक्ति म्हणून कामगार संघटनेकडे त्यांचें लक्ष अधिकाधिक वेधलें गेलें होतें. सत्ताधाऱ्यांच्या प्रयत्नांतून नवसमाज निर्माण होणार नाहीं, तर शोषित जनतेंतील संघटित व जागृत अशा कामगार वर्गाच्या क्रान्तिकारी प्रयत्नांतूनच नवसमाज जन्म घेईल हा धडा, स्वप्नद्रष्ट्या समाजवाद्यांच्या विफल प्रयत्नांतून, समाजवाद्यांच्या पुढील पिढीनें घेतला. आज हा मतपरिवर्तनावरील विश्वास कोणत्याहि पंथाच्या समाजवादी चळवळींत बुद्धिभेद निर्माण करूं शकत नाहीं याचें श्रेय आपणांस या स्वप्नद्रष्ट्या समाजवाद्यांसच द्यावें लागेल.

माणूस विचारशील आहे तद्वतच भावनाशील आहे. अंतर्मनावर विभिन्न संवेदना, अविवेकी भावना प्रभुत्व गाजवूं शकतात. त्याची संवेदनक्षमता सारखी नाहीं. माणसाच्या मनाला पडणाऱ्या निर्गाठी सहज सोडविण्याचा दावा करणें धाडसाचें आहे ही कल्पना ते करूं शकले नाहींत.

भांडवलशाही समाजाच्या वास्तव व व्यवहारी जीवनव्यवहारांशीं त्यांचा निगडित संबंध असता तर आपल्या कपोलकल्पनांत ते रमले नसते. त्यांची वैचारिक पातळी व सामान्य जनांच्या जीवनविचाराची पातळी एक नव्हती. बहुधा कोणताहि सत्ताधारी, कोणताहि मालक, कोणताहि समाजांतील प्रतिष्ठित वर्ग आपल्या विशेषत्वाचा त्याग स्वखुशीनें करीत नाहीं व करणार नाहीं हा ऐतिहासिक अनुभव त्यांनीं अन्यथा दृष्टिआड केला नसता. सत्ताधिष्ठांची विचारसरणी व श्रद्धा कालौघांत हेकट व कर्मठ बनत जाते, प्रत्येक बदल आपल्या अस्तित्वावर घाव घालण्यासाठीं सुचविला गेला आहे अशी त्यांची भावना होते व म्हणूनच ते स्थितिप्रिय व प्रतिगामी बनत जातात, हा अनुभव आपले पर्याय सुचवितांना त्यांनीं जमेस धरला असता. या वास्तव परिस्थितींतून सामाजिक बदलांचें नेतृत्व करणाऱ्या शक्ती शोधून त्या बदलांचे मार्ग त्यांनीं निश्चित केले असते.

स्वप्नद्रष्टे समाजवादी तीक्ष्ण टीकाकार होते, विलक्षण कल्पक होते व दुर्दम्य आशावादी होते. प्रस्थापित भांडवलशाही समाजव्यवस्थेचा अंत केला पाहिजे ही क्रान्तिकारी शिकवण त्यांनीं श्रमिक जनतेस दिली. आपल्या असामान्य बौद्धिक सामर्थ्यानें हृदय परिवर्तनाचे वैचारिक प्रयत्न त्यांनीं करून पाहिले व पुढील पिढीस संघटनात्मक प्रयत्नांचा मार्ग मोकळा करून दिला. त्यांनीं रंगविलेली नवसमाजरचनेचीं भव्य कल्पनाचित्रें जनतेंतील कर्तृत्वशक्तीला आव्हान ठरलीं व त्यांचा मानवी प्रगतीवरील दुर्दम्य विश्वास पुढील समाजद्रष्ट्यांना व समाजवादी चळवळींना स्फूर्तिदायी ठरला.

• • •

: ४ :

# अठराशें अठ्ठेचाळीस

**बॅबूफच्या** मृत्यूबरोबर व समतावाद्यांच्या गुप्त चळवळी दडपल्या गेल्यानंतर, फ्रान्समधील क्रान्तिकारी लोकशाही भावनेला कांहीं काळ ओहोटी लागली. कांहीं वर्षांच्या अस्थिर रिपब्लिकन कारकीर्दीनंतर नेपोलियनच्या अनियंत्रित सत्तेखालीं फ्रान्समध्यें भांडवलशाहीनिष्ठ राज्यव्यवस्था स्थिर होत होती. नेपोलियन वर्धिष्णु फ्रेंच भांडवलशाहीचें प्रतीक बनला होता. तिला वाढतें आर्थिक क्षेत्र तो पुरविणार होता. क्रान्तिकालांत स्थापन झालेल्या नव्या फ्रेंच लष्कराला नेपोलियनसारखा शूर खंदा सेनानी लाभला होता. सरदार जमिनदारवर्गाच्या ज्या जमिनी शेतकऱ्यांनीं छिनून घेतल्या होत्या त्यांचें नेपोलियन संरक्षण करणार असल्यामुळें व आपल्या वर्गातील शूर तरुणांना अजिंक्य लष्कराचे भागीदार बनण्यास नेपोलियनची युरोपवरील चढाई मदत करणार असल्यामुळें शेतकरी वर्गहि मोठ्या प्रमाणावर नेपोलियनचा चहाता बनला होता. एकोणिसाव्या शतकांतील या पहिल्या पंधरा वर्षांच्या काळांत इंग्लंड, अमेरिका व फ्रान्स या पश्चिमेंतील तिन्ही मोठ्या राष्ट्रांत भांडवलशाही वर्गाची झपाट्यानें प्रगति झाली. उलट सरंजामशाहीनिष्ठ ऑस्ट्रिया, जर्मनी, स्पेन, इटली या राष्ट्रांत ही ऐतिहासिक क्रान्ति व प्रगति खुंटली होती. तेथें प्रबल

अनियंत्रित राजेशाह्या व सरंजामदारवर्ग समाजावर प्रभुत्व गाजवीत होते. पण नेपोलियनच्या युरोपवरील स्वाऱ्यांनीं या अनियंत्रित राजेशाही व सरंजामशाहीचा पाया गदगदां हलविला. राष्ट्रीय ऐक्याची भावना या राष्ट्रांतील जनतेंत निर्माण झाली. सरंजामशाहीच्या नाशांतून निर्माण झालेल्या फ्रान्सच्या प्रभावी शक्तींचें दर्शन त्यांना घडलें तेव्हां एकच निष्कर्ष त्यांनीं काढला; आपल्या राष्ट्रांतील जुन्या सरंजामशाही व्यवस्थेचे ते कट्टे वैरी बनले. परिणामीं, नवोदित भांडवलदार वर्गाला आपल्या नेतृत्वाखालीं या सामाजिक शक्ती संघटित करतां आल्या. तुर्कस्थानच्या प्रभुत्वाखालील ग्रीक व सर्ब्ज जनता, ऑस्ट्रियन साम्राज्यांतील इटालियन व हंगेरियन जनता, डच वर्चस्वाखालील बेल्जियम जनता, रशियन साम्राज्याखालीं दडपली गेलेली पोलीश जनता नव्या राष्ट्रभावनेनें प्रेरित झाली. आपल्यावर अम्मल गाजविणाऱ्या साम्राज्यसत्ता उखडून देऊं इच्छिणाऱ्या स्वातंत्र्यवादी चळवळी या जनतेंत निर्माण झाल्या.

नेपोलियनच्या पराभवानंतर फ्रान्सच्या जुन्या बोर्बो राजघराण्यांतील अठरावा लुई गादीवर आला होता. त्याच्या साहाय्यानें १७८९ च्या क्रान्तींत पराभूत झालेला वर्ग पुनर्संघटित होऊं मागत होता. पण पूर्वीची शक्ति सरदार सरंजामदारांत आतां राहिली नव्हती. त्यांच्या जमिनी व मालमत्ता पुन्हा त्यांच्या स्वाधीन करण्याची कुवत लुईला नव्हती. नेपोलियननें निर्माण केलेली नवी लष्करी परंपरा जुन्या राजपरंपरेचा पुन्हा स्वीकार करण्यास नाखुष होती. नेपोलियनचा रणभूमीवर पराभव झाला होता म्हणूनच केवळ ते लुईला आपली स्वामिनिष्ठा देत होते. लुईनंतर गादीवर बसलेल्या दहाव्या चार्ल्सला सरंजामशाही शक्तींनीं पुन्हा घेरलें व जुन्या अनियंत्रित राजसत्तेचीं स्वप्नें पडणाऱ्या चार्ल्सनें त्यांचा बदसल्ला ऐकून पार्लमेंटच्या मर्यादित सत्तेवरहि आक्रमण चालू केलें. २५ जुलै १८३० ला नवे वटहुकूम काढून त्यानें मुद्रण व प्रचारस्वातंत्र्यावर घाला घातला. लोकसभा बरखास्त केली व मताधिकारांत प्रतिगामी बदल घडवून आणण्याचें योजलें. महान् फ्रेंच राज्यक्रान्तींत जनतेच्या मनांत रुजलेल्या क्रान्तिकारी लोकशाही भावनांनीं या चार्ल्स राजाच्या नव्या लोकशाहीविरोधी

चढाईला पुनश्च क्रान्ति करून उत्तर दिलें व एकट्या पॅरीसमधील विद्यार्थी व कामगार यांनीं तीन दिवसांत जुलमी राजघराणें पदभ्रष्ट केलें. जुलै क्रान्तींतून स्थिर असें लोकसत्ताक फ्रान्समध्यें प्रस्थापित झालें नाहीं हें खरें पण पहिल्या फ्रेंच राज्यक्रान्तीप्रमाणेंच या क्रान्तींतून स्फूर्ति घेऊन युरोपभर लोकशाही शक्तींनीं उठाव केला. १८३० च्या जुलै क्रान्तीनें लोकशाहीच्या नव्या चढाईची नांदी गाइली. ब्रुसेल्स येथें बंड झालें. बेलजियम जनतेनें डच परसत्ता झुगारून दिली. पोलीश जनतेनें झारविरुद्ध बंड पुकारलें. प्रबळ रशियन लष्करी सत्तेनें हें बंड मोडलें खरें पण पोलीश जनतेची राष्ट्रभावना ते नष्ट करूं शकले नाहींत. पश्चिम युरोपमधील स्वतंत्र राष्ट्रांच्या राजधान्यांत परागंदा पोलीश क्रान्तिकारक नव्या प्रयत्नासाठीं जुळवाजुळव करूं लागले.

१८३४ च्या व्हिएन्ना बैठकींत रशिया, प्रशिया व ऑस्ट्रिया मधील राजेशाह्यांनीं एकजुटीनें युरोपच्या भूमीवरील प्रागतिक व क्रान्तिकारक चळवळ निर्दयपणें झोडपून युरोपभर शान्तता प्रस्थापित करण्याचा निर्णय घेतला होता. उलट या भीषण दडपशाहींत तावूनसुलाखून निघालेल्या, परागंदा बनलेल्या, क्रान्तिकारी शक्ती ब्रुसेल्स, लंडन, पॅरिसमध्यें आसरा घेउन नव्या चढाईसाठीं सज्ज होत होत्या. दडपशाहीची सत्ता राजत्रिकूटाच्या हातीं होती तर जनतेचा व इतिहासाचा कौल क्रान्तिकारकांच्या बाजूनें होता. १८४० नंतर लोकसत्ताक व राष्ट्रीय चळवळींना पुन्हां भरती येऊं लागली. स्वित्झर्लंडमध्यें लोकशाही शक्तींना वाढतें यश मिळालें. १८४७ च्या निवडणुकींत बेल्जियममध्यें प्रागतिक मोठ्या संख्येनें निवडून आले. १८४६ मध्यें नवव्या पोपला इटलींत कांहीं सुधारणा जाहीर करणें भाग पडलें. जर्मनींत, विशेषतः प्रशियांत, लोकशाही शक्तींच्या लोकसभेच्या मागणीला जोराचा पाठिंबा मिळाला. स्वित्झर्लंड, प्रशिया व इटली या देशांत लोकशाही गटाला जरी निर्णायक यश मिळालें नाहीं तरी भांडवलदार वर्गाचे नेतृत्वाखालीं लोकशाहीच्या लढ्यानें पुढची मजल गांठली. अखेरची सत्ता कोणाची? राज्यकारभार कोणाचे हातीं? हे प्रश्न धसास लागत होते. राजा व त्याचे हस्तक धर्मगुरु, सरदार व राज्यकर्ता वर्ग यांच्या हातीं राज्यसत्ता राहाणार कीं भांडवल-

दार वर्गाचे हातीं सत्ता येणार याचा निर्णय ठरणार होता. प्रशिया व इतर जर्मन स्टेटसमधील प्रश्न अंतर्गत कारभार कोणाचे हातीं हा होता तर इटलींतील भांडवलदार वर्गास ऑस्ट्रियन वर्चस्व झुगारून द्यावयाचें होतें व अंतर्गत राज्यकारभारांतहि लोकशाही सुधारणा घडवून आणावयाच्या होत्या. सारांश १८४८ च्या प्रारंभीं युरोपमधील प्रत्येक देशांत जीं जनान्दोलनें कमी अधिक प्रमाणांत सुरू होतीं त्यांचें स्वरूप तिहेरी होतें. पोलंड, इटली, हंगेरी आदि गुलाम राष्ट्रांतील जनता परकीय साम्राज्याविरुद्ध लढत होती. प्रशिया, ऑस्ट्रिया आदि स्वतंत्र राष्ट्रांतील जनता भांडवलशाही नेतृत्वाखालीं सत्ताधिष्ठित सरंजामशाहीविरुद्ध लढणार होती. इंग्लंड, फ्रान्स, बेल्जियम, स्वित्झर्लंड, हॉलंड या राष्ट्रांतील क्रान्तिकारी लोकशाही निष्ठेनें भारावलेली जनता सत्ताधिष्ठ भांडवलशाही वर्गाविरुद्ध झगडून जनतानिष्ठ लोकशाही निर्माण करूं पाहात होती.

इंग्लंडमध्यें लोकशाहीचें स्वरूप जनतानिष्ठ बनविण्याचें प्रयत्न प्रामुख्यानें चार्टिस्ट चळवळीनें केले. १६८८ च्या राज्यक्रान्तीनें इंग्लंडमधील सरंजामदार सरदार वर्गाच्या हातून भांडवलदार वर्गानें राजसत्ता हिसकावून घेतली होती. अठराव्या शतकांतील औद्योगिक क्रान्तीनंतर इंग्लंडमधील समाज-जीवनांत महान् परिवर्तन घडून आलें खरें पण राजसत्ता प्राधान्यें करून श्रीमंत भांडवलदारवर्ग व स्वतः उद्योगपति बनलेला सरदार वर्ग यांचेच हातीं राहिली. क्रान्तिकारी समजवादी चळवळी यश संपादन करुं शकल्या नव्हत्या. १८३२ च्या मताधिकार व्यापक करणाऱ्या कायद्यानेंहि सामान्य कामगाराऐवजीं औद्योगिक क्रान्तीची धुरा वाहणाऱ्या कारखानदार वर्गास राज्यकर्त्या वर्गांत सामील करुन घेतलें होतें. या दीडशें वर्षांच्या काळांत पार्लमेंटमधील प्रतिनिधींनीं विशेषेंकरून भांडवलदार वर्गाच्या हिताचेंच रक्षण केलें होतें. म्हणूनच १८३९ नंतर वाढलेल्या चार्टिस्ट चळवळीनें सार्वत्रिक मताधिकाराच्या मागणीभोंवतीं श्रमिक जनतेला संघटित केलें. लोकशाही राज्यसत्ता जनताभिमुखी बनविण्याचा तो एक शांततामय प्रयोग होता खरा पग त्यामागील प्रेरणा राजकीय सत्ता जनतेच्या हातीं घेण्याचीच होती. म्हणूनच भांडवलशाही सत्ताधिष्ठ वर्गानें या चळवळीस

कसून विरोध केला. या मताधिकाराच्या जोरावर कामगार पक्ष निवडून आलाच तर देशाची राजकीय व सामाजिक पुनर्रचना कोणत्या तत्त्वानें व कोणत्या कार्यक्रमावर होईल याचें स्पष्ट दर्शन खुद्द चार्टिस्ट चळवळीच्या नेत्यांनाहि झालें नव्हतें. केवळ भावनात्मक अधिष्ठान असलेली राजकीय चळवळ यशस्वी होत नाहीं, तिला इतर वर्गांचें संघटित पाठबळ मिळत नाहीं, हें चार्टिस्ट चळवळीनें दाखवून दिलें. पण आज या चळवळीचें निराळें मूल्यमापन करतां येणें शक्य असलें तरी त्या काळांत तिनें श्रमिक जनतेच्या वाढत्या आकांक्षा व्यक्त केल्या व औद्योगिक क्रान्तीनंतर भरडून निघालेल्या कामगार वर्गास आपल्या दैनंदिन आर्थिक झगड्याबरोबरच मताधिकारासारखी राजकीय चळवळ हातीं घेऊन राजसत्ता हातीं घेण्यास उद्युक्त केलें.

चार्टिस्टांच्या प्रमुख मागण्या पार्लमेंटचें प्रतिनिधित्व अधिक लोक-मतानुवर्ती बनावें या उद्देशानेंच केलेल्या होत्या. (१) सार्वत्रिक मताधिकार (पुरुषांना) (२) पार्लमेंटच्या प्रतिनिधींना वेतन (गरीब कामगारासहि आपला व्यवसाय सोडून हेंच काम करणें त्यामुळें शक्य होणार होतें) (३) प्रतिनिधींची लायकी ठरवितांना मालमत्तेची अट रद्द करण्यांत यावी (४) गुप्त मतदान-पद्धति असावी (मालकाचें वजन मत नोंदणाऱ्या कामगारावर पडूं नये यासाठीं तरतूद (५) दरवर्षी पार्लमेंट भरावें (६) समान मतदार विभाग पाडले जावे या मागण्या तोच उद्देश स्पष्ट करतात. चार्टिस्ट चळवळ थोड्याच वर्षांत लोप पावली खरी पण या मागण्या राज्यसत्तेला अल्प कालावधींत पुऱ्या कराव्या लागल्या. चार्टिस्ट चळवळीच्या लोकप्रियतेचें मर्म अर्थातच या मागण्यांहून तिच्या प्रवक्त्यांनीं या चळवळीस जें अधिक व्यापक स्वरूप दिलें त्यांत आढळतें. चार्टिस्ट चळवळीचा नेता हार्नें यानें चार्टिस्ट चळवळीचें उद्दिष्ट एका वाक्यांत सांगितलें. "जनतेस जमीन, प्रत्येक माणसास घर, प्रत्येकास मताधिकार व प्रत्येकाच्या हातीं बंदूक हेंच आमचें ध्येय आहे." हा कार्यक्रम त्यावेळीं जनतेंत जरी लोकप्रिय ठरणार होता तरी सर्वश्रेष्ठ औद्योगिक राष्ट्रांतील कामगारवर्गाच्या पक्षाचा तो जाहीरनामा खात्रीनेंच ठरला नसता.

कामगारांना संघटनेमार्फत आपल्या वैयक्तिक गाऱ्हाण्यांची दाद लावून घेण्याचा अधिकार राहूं नये, आपल्या ट्रेड युनियन्स स्थापन करतां येऊं नयेत, यासाठीं राज्यकर्त्या भांडवलदारवर्गानें मागील शंभर वर्षांत अनेक यशस्वी व अयशस्वी प्रयत्न केले होते. नुकत्याच ट्रेड युनियन व सहकारी चळवळी इंग्लंडमध्यें वाढीस लागल्या होत्या. चार्टिस्ट जनान्दोलन कांहीं वर्षांत थंडावलें खरें पण कामगारांची संघटनात्मक चळवळीवरील श्रद्धा व वर्गनिष्ठा वाढण्यास चार्टिस्ट चळवळीनें हातभार लावला. १८४८ च्या जूनमध्यें फ्रान्स-मधील कामगारांनीं सशस्त्र क्रान्ति केली तशी ब्रिटनमधील कामगारांनीं केली नाहीं पण इंग्लंडमधील राज्यसंस्था अधिक लोकमतानुवर्ती बनण्यास चार्टिस्ट चळवळीची मदत झाली.

अठराशें अठ्ठेचाळीसच्या प्रारंभीं युरोपमधील प्रत्येक देशांतील लोकशाही शक्ती अशा तऱ्हेनें आपआपल्यापरी राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठीं, भांडवलशाही राज्यक्रान्तीचें कार्य पुरें करण्यासाठीं अगर भांडवलशाही लोकशाही जनसत्ताक बनविण्यासाठीं झगडत होत्या. पण या राष्ट्रविशिष्ट आन्दोलनांना एक आंतर-राष्ट्रीय तात्त्विक बैठक देणें जरूर होतें. इतिहासाचें विकाससूत्र अभ्यासून चालू युगांतील जनतेच्या आकांक्षांना व सामाजिक लढ्यांना क्रान्तिकारी श्रद्धा पुरविणाऱ्या सर्वस्पर्शी तत्त्वज्ञानाची गरज भासत होती. युरोपभर पसरत चाललेल्या व जनमनाची पकड घेणाऱ्या उदार लोकशाही शक्ती ठेंचून टाकण्यासाठीं १८१५ नंतर रशिया, प्रशिया व ऑस्ट्रिया या देशांच्या सरंजामी राजसत्तांनीं एकजूट केली. इंग्लंडमधील कर्मठ राज्यकर्ता वर्ग व १८३० च्या क्रान्तीनंतर फ्रान्समध्यें स्थापित झालेली राजेशाही या गटांस अनुकूल होती. या आंतरराष्ट्रीय स्वरूपाच्या प्रतिक्रान्तिकारक गटाचें बौद्धिक नेतृत्व करणारा मुत्सद्दी मेटरनिच हा सर्व देशांतील सत्ताधारी वर्गांना क्रान्तिकारी शक्तींविरुद्ध एकजूट करण्यास सतत उद्युक्त करीत होता. जहाल जनशक्तींना ठेंचून टाकण्यासाठीं व त्यांची आंतरराष्ट्रीय आघाडी निर्माण न होऊं देण्यासाठीं भांडवलदार वर्गहि राजेशाह्यांशीं संगनमत करील तर त्यास हवें होतें. एकदां लोकांच्या हातीं

मतदानाचा हक्क गेला कीं सरंजामदारांच्या पाठोपाठ खुद्द भांडवलदार वर्गाच्या हितांवर गदा येईल हें भांडवलदार वर्गास कां उमगत नाहीं असा प्रश्न तो त्यांना टाकी. या जहाल चळवळीच्या लाटेंत अखेर मालमत्ता व संस्कृतीचा नाश झाल्याशिवाय राहणार नाहीं असा इशारा त्यानें धनिकवर्गास दिला. पॅरिस हेंच या धोक्याचें उगमस्थान आहे अशी त्याची खात्री होती व म्हणून फ्रान्समधील उदारवादी म्हणून संबोधला जाणारा राजा लुई फिलिप हाहि प्रस्थापित समाजव्यवस्थेचा व शान्ततेचा पुरस्कर्ता आहे हें जसें स्पष्ट होऊं लागलें तसें लोकशाही शक्तींशीं सामना करण्यास त्याला अधिक बळ आलें. या प्रतिगामी एकजुटीनें या बळावरच पोलीश बंड मोडलें; ऑस्ट्रियन सैन्यांनीं इटलींतील स्वातंत्र्यवादी चळवळ झोडपून काढली व ऑस्ट्रिया व प्रशियांतील दोन समर्थ राजसत्तांनीं जर्मनींतील उदार लोकशाही शक्तींना दडपून टाकलें.

या प्रतिगामी आंतरराष्ट्रीय एकजुटीस लोकशाहीवाद्यांची आंतरराष्ट्रीय आघाडी उघडूनच शह देणें शक्य होतें. अन्यथा युरोपमधील कोणतीच क्रान्ति यशस्वी झाली नसती. १८१५ पासून फ्रान्स व इटलींतील लोकशाहीवादी परस्परांस साहाय्य करूं लागलेच होते. पुढें मॅझिनीनें सर्व क्रान्तिकारकांचें एक आंतरराष्ट्रीय संघटन निर्माण करण्याचा प्रयत्न केला. १८३० च्या पोलीश बंडानंतर स्वित्झर्लंड, ब्रुसेल्स, पॅरीस, लंडन येथें आश्रयास आलेल्या पोलीश क्रान्तिकारकांना मदत देण्याच्या उद्देशानें सर्वत्र आंतरराष्ट्रीय मेळावे भरूं लागले. कुठल्याहि देशांतील क्रान्तिकारी प्रयत्न यशस्वी होण्यासाठीं एकाच वेळीं सर्वत्र उठाव होण्याची गरज सर्वांनाच पटली होती. तेव्हां नव्या उद्दिष्टानुसार नवे राजकीय व संघटनात्मक डावपेंच स्वीकारणें क्रमप्राप्त झालें.

या लोकशाहीवाद्यांच्या आंतरराष्ट्रीय आघाडींत प्रत्येक देशांतील परागंदा समाजवादीहि प्रकर्षानें झळकत होते. समाजवाद्यांच्या प्रयत्नांचें अधिष्ठानहि लोकशाहीचें होतें. हा आंतरराष्ट्रीय लोकशाही चळवळीचा पाया दुर्लक्षून कोणत्याहि समाजवाद्यांस आंतरराष्ट्रीय समाजवादी चळवळीची ऐतिहासिक सुसंगति लावतां येणार नाहीं. प्रतिगामी गटांच्या दडपशाहीस बळी पडलेल्या

अशा परागंदा समाजवादी क्रान्तिकारकांत कार्ल मार्क्सचा उल्लेख येथें प्रामुख्यानें केला पाहिजे. जर्मनींतील सत्ताधाऱ्यांच्या विरोधानें तो प्रथम पॅरीसला आला. पण प्रशियन सत्तेनें फ्रान्समधील राज्यकर्त्यांवर राजकीय दडपण आणून त्यास पॅरीसमध्येंहि राहूं दिलें नाहीं तेव्हां त्यास ब्रूसेल्सचा रस्ता पकडावा लागला. या परागंदा अवस्थेंतच सर्व देशांतील क्रान्तिकारकांशीं व गुप्त संघटनांशीं त्याचा घनिष्ट संबंध आला. त्या चळवळींत त्यानें प्रत्यक्ष भाग घेतला व अखेर या चळवळींना स्फोटक द्रव्य पुरविण्याचें कार्य त्यानें कम्युनिस्ट जाहीरनामा लिहून पुरें केलें.

१८१८ सालीं जर्मनीच्या ऱ्हाइन्लंडमधील ट्रीव्ह्ज या गांवीं कार्ल मार्क्सचा जन्म झाला. त्याच्याच वर्गीय भाषेंत बोलावयाचें म्हणजे एका वरिष्ठ वर्गांतील ज्यू कुटुंबांत तो जन्मास आला होता व आपल्याहून अधिक श्रीमंत घराण्यांतील मुलीशीं त्यानें विवाह केला. वयाच्या एकोणिसाव्या वर्षी तत्त्वज्ञानाचा अभ्यास करीत असतांना हेगेल या सुप्रसिद्ध तत्त्ववेत्त्याच्या विचाराचा पगडा त्याच्या मनावर बसला. पुढें कायद्याचा अभ्यास करीत असतांना समाजाची धारणा साधणाऱ्या कायद्याच्या मूलभूत तत्त्वांची चिकित्सा त्यानें आरंभिली. या अभ्यासांत कायदा अखेर धनिकांचा पक्षपाती कसा बनतो याचें विदारक दर्शन त्यास झालें. तत्त्वज्ञानाचा प्राध्यापक बनण्यास त्यास विरोध झाला तेव्हां आपल्या विचारांचा स्वतंत्र प्रचार करण्याच्या जिद्दीनें त्यानें वृत्तपत्रव्यवसायांत पदार्पण केलें व अर्थशास्त्रास वाहिलेल्या ऱ्हाईनमधील एका वृत्तपत्रांत काम करीत असतां त्यानें अर्थशास्त्राच्या सखोल अभ्यासास सुरवात केली. समाजवादी विचारांचा अभ्यास करण्यास याच काळांत त्यास चालना मिळाली. १८४३ सालीं लिहिलेल्या एका पत्रांत मार्क्सनें लिहिलें होतें कीं इतरांप्रमाणेंच एकादें आदर्श समाजव्यवस्थेचें कल्पनाचित्र रेखाटणें हें माझें कार्य आहे असें मला वाटत नाहीं. उलट आजच्या राजकीय व सामाजिक परिस्थितीवर प्रखर टीका करून चालू युगांतील सामाजिक लढे व जनतेच्या आकांक्षा तत्त्वरूपानें मांडणें हेंच माझें प्रथम कर्तव्य आहे. याच सालांत

हेगेलच्या एका पुस्तकाला लिहिलेल्या प्रस्तावनेंत प्रचलित समाजव्यवस्थेंत व औद्योगिक पद्धतींत कोणताहि क्रान्तिकारी बदल एकटा कामगारवर्गच घडवून आणूं शकेल असा आपला विश्वास त्यानें व्यक्त केला आहे. पॅरीसमधील संपादकीय जीवनांत फ्रेड्रिक एंगल्सचा एक विद्वत्तापूर्ण लेख त्याच्या वाचनांत आला. त्यांतून सुरू झालेल्या पत्रव्यवहारांतून व परिचयांतून एंगल्स व मार्क्स लवकरच निकट स्नेही बनले एवढेंच नव्हे तर यापुढील काळांत या दोन समाजवाद्यांनीं संयुक्त वा स्वतंत्ररीत्या केलेल्या सर्व लिखाणांत त्यांच्या वैचारिक एकतेची व परस्परपूरक विचारांची परमोच्च साक्ष मिळते. कम्युनिस्ट जाहीरनामा हें त्याचें उत्कृष्ट प्रतीक आहे.

मार्क्स स्वतः जर्मन होता व जीवनांतील बहुतेक सर्व महत्त्वाचा काळ त्यानें परागंदा अवस्थेंत घालविला या दोन घटनांचा मूलगामी परिणाम त्याच्या जीवनावर व विचारसरणीवर झालेला आढळतो. शिक्षणाच्या काळांत जर्मन विचारपद्धतीची त्याच्या मनावर बसलेली पकड नंतर कधींच ढिली पडली नाहीं. जरी आपल्या तत्त्वज्ञानाची मांडणी करतांना मार्क्सनें हेगेलवर कठोर टीका केली तरी हेगेलच्या विरोधविकासवादी विचारपद्धतीचा त्यानें कधींच त्याग केला नाहीं. वैचित्र्य व विरोध यांतून नवविकास होतो हें तो हेगेलपासून शिकला. भविष्यकालीन समाजव्यवस्था कशी असावी हें लिहीत न बसतां त्यानें सर्व पुरातन समाजव्यवस्थांचा सर्वांगीण अभ्यास आरंभिला. या व्यवस्था जन्मास कशा आल्या, त्यांची वाढ कशी झाली व त्या कां ऱ्हास पावल्या व आजच्या समाजव्यवस्थेंत त्यांचें रूपान्तर कसें झालें हें अभ्यासणें त्याच्या दृष्टीनें अधिक महत्त्वाचें होतें. प्रचलित भांडवलशाही अर्थव्यवस्थेच्या जन्मदात्या शक्ती कोणत्या हें तो शोधून काढणार होता. भांडवलशाही अर्थ-व्यवस्थेचा संपूर्ण अभ्यास त्यानें यासाठींच आरंभिला होता. या अर्थव्यवस्थेच्या चिकित्सेंतून समाजवादी समाजरचना निर्माण होणें क्रमप्राप्त आहे असा विश्वास त्याला मिळाला; पण त्याचीं स्वप्नें त्याला पडलीं नाहींत. चालू समाजव्यवस्थेच्या उदरांतून जन्म घेणारी कामगार वर्गाची शक्तिच समाजवादाचें भवितव्य

ठरविणार आहे व समाजाची पुनर्रचना घडवून आणणार आहे अशी त्याची खात्री पटली होती. विरोधविकासवादी तत्त्वास परिपुष्ट करणारे अनेक आधार इतिहासाच्या सखोल अभ्यासांतून त्यानें जमा केले होते. आपल्या वर्गलढ्याच्या सिद्धान्तास तात्त्विक बैठक पुरविली होती. हेगेलचें तत्त्वज्ञान, फ्रान्सची भौतिक तत्त्वदृष्टि व क्रान्तिपरंपरा व इंग्लंडमधील अर्थशास्त्रविषयक तत्त्वमीमांसा यांचा प्रभाव मार्क्सच्या विचारसरणीवर पडलेला दिसतो.

परागंदा झालेला मार्क्स पॅरीसला आला तेव्हां त्याच्यापूर्वीच पॅरीसला येऊन पोहोंचलेल्या जर्मन क्रान्तिकारकांनीं आपलें संघटनेचें जाळें बरेंच विणलें असल्याचें त्यास आढळून आलें. जुलै १८३० च्या फ्रेंच क्रान्तींतून स्फूर्ति घेऊन फ्रँकफर्ट येथील कामगारांनीं अकालीं बंड केलें होतें. क्रान्तीचे नेते जॉन बेकर, कार्ल शॅपर व थिओडॉर शूस्टर यांनीं गुप्त पत्रकें वांटलीं होतीं, तुरुंग फोडला होता व शस्त्रांसाठीं फ्रँकफर्टच्या लष्करी तळावर हल्लाहि केला होता. बंडाचा बीमोड झाल्यावर तुरुंगांतून पळालेल्या या क्रान्तिकारकांनीं पॅरीसला जाऊन तेथें १८३३ मध्यें 'फरारी व हद्दपारांची' संस्था काढली. शूस्टरवर प्रसिद्ध क्रान्तिकारक ब्लँक्वीचा प्रभाव पडल्यानें या संस्थेंत पुढें दुफळी माजली व १८३६ मध्यें शूस्टरनें 'लीग ऑफ दि जस्ट' ही निराळी संस्था काढली. १८३९ मध्यें ब्लँक्वीच्या नेतृत्वाखालीं बंड करणाऱ्या फ्रेंच क्रान्तिकारकांस हे जर्मन क्रान्तिकारक जाऊन मिळाले. शॅपर आदि मंडळींनीं या उठावानंतर लंडनचा आश्रय घेतला व नांवानें सोवळी अशी 'कामगार शिक्षण संस्था' त्यानीं १८४० मध्यें स्थापन केली. हळूहळू या संस्थेच्या शाखा ब्रुसेल्स, पॅरीस व जिनेव्हा येथें पसरल्या व मोठ्या संख्येनें या केन्द्रांतून जर्मन क्रान्तिकारक आपले गट संघटित करूं लागले. फ्रान्समध्यें नजिकच्या भविष्यकालांत क्रान्ति घडून येईल व त्या लाटेवर स्वार होऊन आपण जर्मनींत हें क्रान्तीचें लोण नेऊन पसरवूं अशी उमेद त्यांनीं बाळगली होती.

पॅरीस येथील 'लीग ऑफ दि जस्ट'मध्यें विल्यम वेटलिंग हा प्रमुख जर्मन क्रान्तिकारक काम करीत होता. १८३८ सालीं क्रान्तिकारी समाजवादी

चळवळीचें समर्थन करणारी एक पुस्तिका त्यानें लिहिली. ब्लँक्वीच्या बंडानंतर तो स्वित्झर्लंडमध्यें पळाला व तेथें त्यानें क्रान्तिकारी कामगारांचे छोटे गट स्थापन केले. क्रान्तींतूनच समाजवादाची स्थापना होईल एवढेंच सांगून न थांबतां अशीं बंडें बुद्ध्या चेतावणी देऊन घडवून आणलीं पाहिजेत; समाजांतील निराश्रित व भुकेलेले बेकार व गुन्हेगारच अशा बंडांत हिरीरीनें भाग घेतात, कारण प्रस्थापित समाजव्यवस्थेविरुद्ध बंड करण्यांत त्यांचेजवळ गमावण्या-सारखें कांहीं नसतेंच, असें तो म्हणे. रशियन क्रान्तिकारक बाकूनीनवर वेटलिंगच्या या विचारांचा बराच असर पडलेला दिसून येतो. बाकूनीनप्रमाणेंच मार्क्स व एंगल्सहि लंडन येथें वेटलिंगचें वास्तव्य असतांना त्याच्या सहवासांत आले होते. पण त्यांची मैत्री फार काळ टिकूं शकली नाहीं. क्रान्तीच्या डावपेंचाबद्दल त्यांच्यांत तीव्र मतभेद झाले. धाडसी व कर्तृत्ववान् नेतृत्व मिळालें तर क्रान्ति केव्हांहि घडवून आणतां येईल असें वेटलिंगचें मत होतें तर परिश्रमपूर्ण प्रभावी प्रचार केल्याखेरीज क्रान्ति होणार नाहीं व केवळ गुन्हेगार आणि बेकार कामगार क्रान्ति करूं शकणार नाहींत या मताचा मार्क्स होता. प्रचारांत व संघटनेंत निष्णात तसेंच चारित्र्यवान पुढारीपण क्रान्तीस आवश्यक आहे ही भूमिका वेटलिंगला विरोध करतांना मार्क्सनें वारंवार मांडली.

हे मतभेद तीव्र झाले तेव्हां १८४६ मध्यें वेटलिंग अमेरिकेला निघून गेला. कामगार संस्थांचें नेतृत्व यापुढें मार्क्स–एंगल्सकडे आलें होतें. जर्मन क्रान्तिकारकांचें प्रतिनिधित्व मार्क्सच करणार होता. या संस्थेच्या निरनिराळ्या देशांतील गटांची एक प्रातिनिधिक बैठक १८४७ मध्यें लंडन येथें भरली व व त्यांनीं ‘कम्युनिस्ट लीग’ची स्थापना केली. फ्रान्समधील ‘लीग ऑफ दि जस्ट’ या नव्या लीगमध्यें सामील झाली कीं नाहीं हा मुद्दा विवाद्य असला तरी तिच्या सभासदांशीं व इतर राजधान्यांतील गटांशीं या काळांत मार्क्सनें केलेल्या पत्रव्यवहारानें व तात्त्विक चर्चेंतून कम्युनिस्ट लीगचा वैचारिक पाया निर्माण झाला हें निःसंशय. कांहीं महिन्यांच्या कालावधीनंतर कम्युनिस्ट लीगची दुसरी परिषद भरली व नव्या संस्थेचें ध्येय, धोरण व कार्यक्रम स्पष्ट

करणारें एक निवेदन प्रसिद्ध करण्याचा निर्णय घेण्यांत आला. मार्क्सच्या बौद्धिक नेतृत्वाची छाप लीगमधील क्रान्तिकारकांवर पडली होती. त्यासाठीं त्यानें निकराचे प्रयत्न केले होते. साहजिकच हें पत्रक लिहिण्याचें कार्य मार्क्सवर सोंपविण्यांत आलें. हाच तो इतिहासप्रसिद्ध कम्युनिस्ट जाहिरनामा होय. १८४८ च्या फेब्रुवारीच्या शेवटच्या आठवड्यांत कम्युनिस्ट जाहीरनामा प्रसिद्ध झाला. ४ मार्चला ब्रुसेल्सहून मार्क्सला हद्दपार करण्यांत आलें. तेथून तो पॅरीसला आला व तेथें शॅपर, बॉवर, मोल या जर्मन क्रान्तिकारक पुढाऱ्यांशीं व हार्नें व जोन्स या चार्टिस्ट पुढाऱ्यांशीं त्यानें खलबतें केलीं. कम्युनिस्ट लीगची मध्यवर्ती कचेरी पॅरीसला आणण्यांत आली व जाहीरनाम्याच्या शेंकडों प्रती पॅरीसमध्यें वांटण्यांत आल्या. एप्रीलमध्यें त्या जर्मनींत वांटल्या गेल्या व फ्रेंच, जर्मन, डॅनीश व रशियन भाषेंत जाहीरनाम्याचीं भाषांतरें झालीं.

समाजवादी विचाराचा अभ्यास करणाऱ्या प्रत्येक व्यक्तीनें या जाहीर-नाम्याचें पूर्ण अध्ययन केलें पाहिजे. जगांतील बहुतेक सर्व प्रमुख भाषेंत आज त्याचें भाषांतर झालें आहे. इतिहासाचें तत्त्वदर्शन त्यांत आहे व त्या मितीच्या सर्व समाजवादी विचारवंतांचा व चळवळींचा समाचार त्यांत घेण्यांत आला आहे. कामगारवर्गास त्याच्या ऐतिहासिक जबाबदारीची जाणीव करून देऊन क्रान्तिकाल समीप येऊन ठेपला असल्याची ग्वाही त्यांत देण्यांत आली आहे. त्या जाहीरनाम्यांतील कित्येक अंदाज व अपेक्षा नंतर इतिहासानें खोट्या ठरविल्या असल्या तरी १८४८ मध्यें क्रान्तीच्या उंबरठ्यावर असलेल्या युरोपमधील जन-तेला या जाहीरनाम्यानें ज्वलंत चेतावणी दिली हें नाकबूल करतां येणार नाहीं. जाहीरनाम्यानें दिलेलें आव्हान केवळ भावनात्मक नसून वैचारिक आहे. कारण जाहीरनामा वाचून क्रान्ति आवश्यक आहे एवढीच जाणीव वाचकांस होत नाहीं तर ती अटळ आहे याचा प्रत्यय येतो. क्रान्तीसाठीं त्यांत विनवणी नाहीं; क्रान्तिकार्याचें मार्गदर्शन व तिच्या यशाबद्दलची अढळ श्रद्धा त्यांत आढळते. जाहीरनाम्याचा सारांश काढणें म्हणजे त्या लेखनाचा उपमर्द करणें होईल. तरीपण त्यांतील मध्यवर्ती कल्पनेचा गोषवारा येथें देणें क्रमप्राप्त आहे.

खुद्द जाहीरनामा अगदीं मोजक्या व झोंबक्या शब्दांत लिहिला आहे.

"आज युरोपमधील राजसत्तांच्या मानगुटीला कम्युनिझमचें भूत बसलें आहे" या वाक्यानें जाहीरनाम्याची सुरवात झाली आहे. "मानवी वंशाचा सर्व लिखित इतिहास हा वर्गयुद्धाचा इतिहास आहे." गुलामी व सरंजामशाहीच्या युगांत हे संघर्ष कधीं व्यक्त तर कधीं झांकलेले असत व पिळणारे व पिळले जाणारे यांच्यामधील या संघर्षांत कधीं समाजरचनेंत बदल घडून येई तर कधीं दोन्ही वर्गांचा निःपात होई. नव्या जगाच्या शोधानें व उत्पादन साधनांतील क्रान्तिकारक बदलांमुळें भांडवलदार वर्गाचें प्रभुत्व समाजावर प्रस्थापित झालें. या वर्गानें सरंजामयुगांतील गुंतागुंतीचे उत्पादनसंबंध नष्ट करून नाण्याच्या छनछनाटांत सर्व मानवी नातीं नव्या स्वरूपांत निर्माण केलीं. समाजांत भांडवलदार व कामगार हे दोनच वाढते व प्रतिस्पर्धी वर्ग शिल्लक राहिले. भांडवलदार वर्गानें ऐतिहासिक क्रान्तिकार्य केलें आहे. पूर्वव्यवस्थेंतील अनेकविध स्वातंत्र्यांचा अपहार करून जगाच्या बाजारपेठेवर प्रभुत्व सांगणारें एकमेव स्वातंत्र्य-व्यापार स्वातंत्र्य—समाजास दिलें आहे. पिळवणुकीवर हा वर्ग जिवंत राहातो व बाजारपेठांच्या अविरत शोधांत समाजजीवनांतील प्रत्येक अंगोपांगांत त्यानें महत्त्वपूर्ण बदल घडवून आणले आहेत. आजपर्यंत प्रतिष्ठित गणल्या गेलेल्या प्रत्येक जीवनव्यवसायांतील 'मोठेपण' या वर्गानें नष्ट केलें असून आज डॉक्टर, वकील, धर्मगुरु, कवि, शास्त्रज्ञ सर्व मोलमजूर बनले आहेत. प्रत्येक देशांतील उत्पादनास व वांटपास भांडवलदारांनीं सर्वदेशीय स्वरूप दिलें. कुठल्याहि राष्ट्रास अलिप्त राहूं दिलें नाहीं व प्रत्येक राष्ट्राचें अर्थजीवन परस्परावलंबी बनविलें. प्रत्येक देशांतील शोध, विज्ञान व वाङ्मय सर्वांच्या मालकीचें झालें. राज्यसत्ता अधिक केन्द्रानुवर्ती बनल्या, शहरें खेड्यांवर प्रभुत्व गाजवूं लागलीं व उत्पादनाचीं प्रगल्भ साधनें ज्यांच्या हातीं होतीं त्यांच्यावर मागसलेल्या जनतेला अवलंबून राहणें भाग पडलें.

पुढें जाहीरनाम्यांत कामगार हा मजुरीचा गुलाम बनून भांडवलशाहीच्या प्रगतीबरोबर भांडवलदार वर्गाकडून कसा शोषला जातो याचें विदारक वर्णन

केलेलें आहे. या पिळवणुकींत स्त्रिया व मुलेंहि भरडलीं जातात. लहान लहान उद्योगधंदे करणाऱ्यांना मोठे गिळतात. उद्योग व अर्थसत्ता अधिक केन्द्रित होते व शेती उद्योगधंद्यांच्या प्रत्येक क्षेत्रांतील स्वतंत्र व्यवसायी व कारागीर चढाओढींत देशोधडीस लागून वा पराभूत होऊन शोषक कामगार वर्गाच्या संख्येंत भर घालतात. ही पिळवणूक अखेर इतकें अमानुष स्वरूप धारण करते कीं केवळ आत्मरक्षणाच्या भावनेनें कामगार मालकाविरुद्ध एक-जूट करूं लागतात. प्रथम एका कारखान्यांतील, नंतर एकाच धंद्याच्या अनेक कारखान्यांतील, नंतर एका वस्तींतील व शहरांतील सर्व कारखान्यांतील, नंतर अनेक शहरांतील एका धंद्यांतील व शेवटीं सर्व धंद्यांतील सर्व शहरांतील सर्व कामगार एकजुटीस सिद्ध होतात. युनियन्स काढतात. आपल्या वर्गाचें प्रति-निधित्व करणारा राजकीय पक्ष निर्माण करतात. कारण प्रत्येक वर्गलढा अखेर राजकीय लढाच असतो. वर्गलढ्याच्या चढउतारांत स्वयंप्रेरित अशी बहुसंख्य जनतेची व बहुसंख्यांकांच्या हिताची चळवळ उग्र स्वरूप धारण करते. त्यांचें यश दृष्टिपथांत आलें कीं सत्ताधारी वर्गांतील एक ध्येयवादी गट कामगारवर्गाच्या बाजूनें लढ्यांत सामील होतो. भांडवलदारवर्गाविरुद्ध उभारलेल्या आघाडींत आतां जरी अनेक वर्गांचे लोक सामील होतात तरी खरा क्रान्तिकारक वर्ग एकटा कामगारवर्गच असतो. इतर वर्ग फक्त आपल्या हितांचें भावी कालांत रक्षण व्हावें या स्वार्थी दृष्टीनें लढ्यांत आलेले असतात व ते वेळीं दगा फटकाहि देतात. कामगार वर्गाजवळ म्हणण्यासारखी कोणतीच मालमत्ता नसते. संरक्षण करण्यासारखें त्याच्याजवळ असतेंच काय? प्रथम कामगार चळवळ राष्ट्रापुरती मर्यादित असते. आपल्या देशांतील भांडवलदार वर्गाचा तिला प्रथम समाचार घ्यावयाचा असतो. पण नंतर ती चळवळ आंतरराष्ट्रीय बनते. भांडवलशाही अर्थव्यवस्था आपले मारेकरी कामगारवर्गाच्या व त्याच्या वर्गजागृतीच्या रूपांत स्वतःच निर्माण करते. तेव्हां तिचें अधःपतन व कामगारवर्गाचें यश दोन्ही तितकींच अटळ आहेत.

यशस्वी कामगार क्रान्तीचें भविष्य वर्तवून, पुढें जाहीरनाम्यांत

कामगारवर्गांच्या चळवळींतील कम्युनिस्टांच्या विशेष कामगिरीचें विवेचन केलेलें आहे. अन्य कामगारवर्गीय पक्षांना विरोधी अशी स्वतंत्र पार्टी कम्युनिस्टांनीं काढूं नये; कारण कामगारवर्गाहून निराळें असें त्यांचें हित असूंच शकत नाहीं. कामगार चळवळीस वळण देण्याच्या इच्छेनें कोणतीहि स्वतंत्र एकांगी विचारप्रणाली त्यांनीं पुढें मांडूं नये. इतर कामगार पक्षांहून कम्युनिस्टांचें वैशिष्टय हें आहे कीं ते कामगारांना आंतरराष्ट्रीय एकजुटीचें महत्त्व शिकवितात, प्रत्येक देशांतील कामगारांच्या लढ्यांत आघाडीवर राहातात व इतिहासाच्या विकाससूत्रांची विशेष तत्त्वदृष्टि असल्यामुळें कामगारांच्या सत्ता संपादनाच्या लढ्यांत ते त्यांना मदत करतात.

कम्युनिस्टांना त्यांच्या कर्तव्याची जाणीव करून दिल्यावर त्यांच्यावर घेण्यांत येणाऱ्या अनेक आक्षेपांचें खंडन जाहीरनाम्यांत करण्यांत आलें आहे. समाजनिर्मित उत्पादनाचा प्रत्येक व्यक्तीनें उपभोग घेण्यास कम्युनिस्टांचा विरोध नाहीं; पण उत्पादनसाधनांचा स्वतः ताबा घेऊन त्यावर इतरांच्या श्रमाची पिळवणूक करण्यास मात्र कम्युनिस्टांचा कसून विरोध राहील. भांडवल-शाही समाजव्यवस्थेंतील कुटुंबव्यवस्थेंत स्त्रीकडेहि उत्पादनसाधन म्हणून पाहिलें जातें. ही विकृत दृष्टि नष्ट झाली कीं खाजगी व सार्वजनिक वेश्याव्यवसाय थांबून स्त्रिया व मुलांचें चालू शोषण बंद पडेल. कामगारांचें देशप्रेम कमी करण्याचा कम्युनिस्ट प्रयत्न करतात असा आरोप केला जातो. पण भांडवल-दारांच्या शोषणांतून मुक्त होण्यापूर्वी कामगारांना देशप्रेम तें काय असणार ? व जेव्हां राजसत्ता मिळविण्यांत कामगारांना यश मिळेल तेव्हां राष्ट्राराष्ट्रांतील संघर्ष नष्टच होतील. प्रस्थापित मालमत्तेच्या संबंधांशीं कम्युनिस्ट क्रान्तीचें पक्कें हाडवैर आहे. मग त्या संबंधांचें रक्षण करणाऱ्या पारंपरिक कल्पनांचा अगर तत्त्वांचा त्यांनीं पूर्ण धिक्कार केला तर त्यांत आश्चर्य कां वाटावें ?

जाहीरनाम्यांत हें कबूल करण्यांत आलें आहे कीं प्रत्येक देशांतील कामगारवर्गांचें विमोचन एकाच पद्धतीनें होईल असें नाहीं. त्यांच्या प्रगतींतील कमी अधिक अंतर लक्षांत घेतां हें स्वाभाविकच आहे. तरी पण पुढारलेल्या

देशांना सर्वधासारण उपयुक्त ठरेल असा लोकशाहीच्या विजयाचा कार्यक्रम देतां येण्यासारखा आहे. जाहीरनाम्यांत कलमवार असा ताबडतोब अंमलांत आणावयाचा दहा कलमी कार्यक्रम सुचविण्यांत आला आहे. या कार्यक्रमान्वयें सर्व उत्पादन पद्धतींत क्रान्तिकारक बदल घडून येतील व नव्या परिस्थितींत वर्गविग्रह नष्ट झाले कीं वर्गनिष्ठ शासनसंस्था लोप पावेल. नागरिकांच्या स्वतंत्र सहकारी जीवनास प्रारंभ होईल व प्रत्येकाचा स्वच्छंद विकास सर्वांच्या स्वच्छंद प्रगतीची शर्त होऊन बसेल असा विश्वास व्यक्त करण्यांत आला आहे.

जाहीरनाम्याच्या तिसऱ्या विभागांत निरनिराळ्या प्रकारच्या तथाकथित समाजवाद्यांवर टीकेची झोड उठविण्यांत आली आहे. भांडवलशाही समाजव्यवस्थेच्या प्रत्येक आधारभूत तत्त्वावर स्वप्नद्रष्ट्या समाजवाद्यांनीं प्रखर टीका करून कामगारवर्गास जागृत करण्याचें भरीव कार्य केलें असलें तरी कामगारवर्ग प्रभावी राजकीय चळवळ करूं शकेल व कांहीं विशिष्ट ऐतिहासिक कार्य पुरें करण्याची भूमिका कामगारवर्गास पार पाडावयाची आहे हें स्वप्नवाद्यांच्या कधींच ध्यानीं आलें नाहीं. स्वतःचा प्रखर ध्येयवादच इतिहासांतील खरी कार्यप्रवण शक्ति आहे व आपल्या कल्पना समाजानें स्वयंस्फूर्तीनें व्यवहारांत आणण्याचा प्रयत्न करावा अशी त्यांची इच्छा होती. आपल्या प्रात्यक्षिकांतून व समाजप्रयोगांतून तसेंच त्याचा प्रचार करून भावी समाजव्यवस्था आपसुक निर्माण होईल असा फाजील विश्वास त्यांना होता. कुठल्याहि एका विशिष्ट वर्गाला आवाहन करण्याऐवजीं ते सर्व समाजाला व शक्य तर सत्ताधिष्ठित वर्गाला अधिक आर्जवीत. एकदां आपल्या आदर्श समाजपद्धतीच्या धारणेचें तत्त्व लोकांना समजलें कीं लोक ही सर्वश्रेष्ठ कल्पना कां व कशी बाजूला सारूं शकतील असाच उलट प्रश्न ते करीत. म्हणूनच कुठल्याहि राजकीय चळवळीची व विशेषतः क्रान्तिकारक चळवळीची आवश्यकता त्यांना भासली नाहीं; नव्हे अशा चळवळींचे ते विरोधक होते.

स्वतःस कामगारप्रेमी म्हणविणाऱ्या 'प्रतिक्रान्तिवादी' जर्मन समाजवाद्यांविरुद्ध जाहीरनाम्यांत अशी टीका करण्यांत आली आहे कीं ते राजेशाही

व कामगारवर्ग यांत भांडवलदारांशीं दोन हात करण्यासाठीं समझोता करूं मागत होते. चार्टिस्ट व खिश्चन समाजवादी नव्या कारखानदारी व्यवस्थेला भिऊन कामगारवर्गास पूर्वीच्या समाजव्यवस्थेकडे खेंचून नेत व त्यामुळें त्यांची क्रान्तीची धास्ती अखेर टोरी पक्षास सत्ताधिष्ठ ठेवण्यास कारणीभूत झाली असा आक्षेप या समाजवाद्यांविरुद्ध जाहीरनाम्यांत घेण्यांत आला आहे. 'मध्यमवर्गीय' समाजवादी, भांडवलशाही उत्पादन व्यवस्थेचे उत्कृष्ट टीकाकार असले तरी, खाजगी मालमत्तेचे ते विरोधक बनत नाहींत; जुन्या समाजव्यवस्थेची तळी उचलून धरण्याचेंच कार्य त्यांचे हातून होतें व म्हणून ते प्रतिगामी व स्वप्नवादी आहेत असें म्हटलें आहे.

'खऱ्या' जर्मन समाजवाद्यांविरुद्धहि जाहीरनाम्यांत टीका करण्यांत आली आहे. फ्रान्स व जर्मनीच्या ऐतिहासिक परिस्थितींतील फरक यांचे ध्यानीं आलेला नाहीं. फ्रान्समधील समाजवादी भांडवलदारवर्गाच्या प्रस्थापित सत्ते-विरुद्ध झगडत आहेत; भांडवलशाही क्रान्तीचें कार्य फ्रान्समध्यें पुरें झालें आहे. मात्र जर्मनींतील भांडवलदारवर्ग अजून अनियंत्रित राजसत्तेविरुद्ध लढत आहे. अशा परिस्थितींत कामगार-संघटनांनीं समाजवादाच्या प्रस्थापनेसाठीं भांडवलदारवर्गाविरुद्ध झगडा केल्यास भांडवलशाही क्रान्तीचें कार्य अपुरें राहील. पण 'खऱ्या' जर्मन समाजवाद्यांनीं भांडवलशाहीविरोधी आघाडी उघडून अखेरीस प्रस्थापित जर्मन सरकारेंच अधिक प्रबळ बनविलीं. जर्मन क्रान्तिकारकांनीं केलेला क्रान्तीचा प्रचार व जनजागृति अखेर सरंजामशाही गटास व राजेशाहीस उपयोगी पडली. कामगारवर्गास कांहीं हक्क मिळाले पण भांडवल व श्रम यांच्या नात्यांत कोणताच फरक घडून आला नाहीं.

भांडवलदारवर्गाच्या व कामगारवर्गाच्या हितांत मूलभूत विग्रह नसून तीं संवादी व परस्परपूरक आहेत असा आभास निर्माण करणाऱ्या समाजवाद्यांवर जाहीरनाम्यांत प्रखर टीका करण्यांत आली असून सच्छील व उदार माणसें भूतदया वृत्तींतून कधींच नवसमाज निर्माण करूं शकणार नाहींत असा स्पष्ट इशारा जाहीरनाम्यानें कामगारांस दिला आहे.

जाहीरनाम्याच्या पुढच्या विभागांत नजीकच्या भविष्य काळांतील क्रांतीवर नजर ठेवून कम्युनिस्टांनीं कोणता पवित्रा स्वीकारावा या संबंधींची चर्चा आहे. कामगारांच्या तात्कालिक मागण्या त्यांना मिळवून देण्यासाठीं व जाहीरनाम्यांतील ताबडतोबीचा कार्यक्रम पुरा करण्यासाठीं कम्युनिस्टांनीं इतर लोकशाही शक्तींबरोबर सहकार्य करावें पण या चळवळींत भाग घेत असतां त्या चळवळीच्या अंतिम स्वरूपाबाबत व तिच्चें प्रतिनिधित्व स्वतःकडे घेण्याबाबत कम्युनिस्टांनीं गाफील राहूं नये. फ्रान्समध्यें त्यांनीं लोकशाही समाजवाद्यांबरोबर कार्य करावें पण त्या चळवळींतील मारकवृत्ति व विचार बदलण्याचा त्यांनीं प्रयत्न करावा. जर्मनींत कम्युनिस्टांनीं राजेशाहीविरुद्ध व प्रस्थापित सरकारविरुद्ध भांडवलदारवर्गास मदत करावी, पण तें सहकार्य देत असतांनाच भांडवलशाही क्रान्तीच्या पूर्तीबरोबर समाजवादी क्रान्तीचें पर्व सुरू होणार आहे असा प्रचार करावा. इंग्लिश व फ्रेंच राज्यक्रान्तीचे वेळीं कामगारवर्गाची प्रगति फारशी झालेली नव्हती, पण आज जर्मन कामगार-वर्गाची तशी परिस्थिति नसल्यामुळें जर्मन भांडवलशाही क्रान्तींतून समाजवादी क्रान्ति उद्‌भवण्याचा संभव आहे या घटनेकडे व म्हणून जर्मन क्रान्तीकडे कम्युनिस्टांनीं अधिकाधिक लक्ष पुरवावें असें मार्गदर्शन जाहीरनाम्यांत करण्यांत आलें आहे. सारांश, प्रत्येक देशांतील कम्युनिस्टांनीं जुनाट राजकीय व सामाजिक परिस्थितीविरुद्ध पुकारलेल्या प्रत्येक क्रान्तिकारी लढ्यांत भाग घ्यावा व सहकार्य द्यावें. मालकी हक्काचा प्रश्न मूलभूत असल्यामुळें प्रत्येक चळवळींत तो धसास लावावा व सर्व देशांतील लोकशाही पक्षांत परस्पर विश्वास व एकजूट घडवून आणण्याचा कम्युनिस्टांनीं प्रयत्न करावा.

“आपले विचार व आपलें उद्दिष्ट लपवून ठेवण्याची कम्युनिस्टांना घृणा आहे. जीर्ण समाजव्यवथेचें सत्तीनें उच्चाटन करूनच आपलें उद्दिष्ट ते साधूं शकतील. कम्युनिस्ट क्रान्तीच्या आगमनाच्या चाहुलीनें सत्ताधारी वर्गाची बोबडी वळूं दे. कामगारांजवळ शृंखलांखेरीज गमावण्यासारखें कांहीं नाहीं, पण जिंकण्यास मात्र सर्व जग मोकळें आहे.” “तेव्हां जगांतील कामगारांनो एक व्हा!”

१८४८ च्या सुरवातीला युरोप क्रान्तीच्या उंबरठ्यावर होता. मग त्या क्रान्तीचें स्वरुप राष्ट्रीय क्रान्तीचें असो, भांडवलशाही लोकशाही क्रान्तीचें असो कीं समाजवादी कामगारक्रान्तीचें असो. या प्रत्येक क्रान्तींत कामगार वर्गानें व विशेषतः कम्युनिस्टांनीं कोणती तात्त्विक भूमिका घ्यावी व कोणत्या बाजूनें लढावें याचें मार्गदर्शन जाहीरनाम्यांत करण्यांत आलें होतें. मानवी इतिहासांतील सर्व संघर्षांचा आढावा घेऊन कामगारवर्गास अंतिम यशाचें विराट दर्शन घडविण्यांत आलें होतें. लढ्यासाठीं तयार हो असें आवाहन करण्यांत आलें होतें.

इंग्लंडमध्यें चार्टिस्ट चळवळ विस्कळित झाली होती खरी पण भांडवलशाही व कामगारवर्ग यांतील संघर्षाची ऐतिहासिक पार्श्वभूमि कामगार-वर्गांतील वाढत्या वर्गजागृतींतून तयार होण्यास ती उपयुक्त ठरली. १८४७ व १८४८ च्या सुरवातीस फ्रान्समध्यें मतदानाच्या हक्कांत व मतदानपद्धतींत सुधारणा घडवून आणण्यासाठीं फ्रान्समधील भांडवलदारवर्ग व कामगारवर्ग एका व्यासपीठावर जमा झाले होते. लुई फिलीप व त्याचा पंतप्रधान ग्विझॉट मर्यादित मतदारसंघाच्या बहुमतावर कित्येक वर्षे फ्रान्सवर एकप्रकारें अनियंत्रित राजसत्ताच चालवीत होते. फ्रान्समधील कारखानदारांना व उद्योगपतींना शांततेच्या तत्त्वांस चिकटून राहाण्याचें फिलीपचें धोरण पसंत नव्हतें. सुसंघटित फ्रेंच लष्कराच्या जोरावर पूर्व युरोपवर चढाई करणारी परराष्ट्रनीति त्यांच्या हिताची होती. यासाठींच व्यापक मतदार संघांतून निवडून येणारें वर्धिष्णु भांडवल-शाहीचें नवें फ्रेंच सरकार त्यांना हवें होतें. जाहीरनाम्यांत म्हटल्याप्रमाणें, ‘जोंपर्यंत भांडवलदारवर्ग भांडवलशाही क्रान्ति संघटित व पूर्ण करण्यासाठीं लढणार होता’ तोंपर्यंत कामगारवर्ग भांडवलदारवर्गाच्या खांद्यास खांदा लावून लढला. लुई फिलीप व त्याचा सल्लागार ग्विझॉट यांना क्रान्तिजन्य स्फोटक परिस्थितीचें आकलन झालें नाहीं व त्यांनीं सामाजिक असंतोषाला तोंड फोडणारे सर्व प्रयत्न सत्तेच्या जोरावर झोडपून काढले. २३ फेब्रुवारीला परराष्ट्र-कचेरीसमोर झालेल्या अशाच एका जनतेच्या निदर्शनावर गोळीबार करण्यांत

आला तेव्हां गोळीस गोळीनें उत्तर मिळालें व २४ फेब्रुवारीच्या पहांटेस पॅरीसमधील सर्व मोठ्या रस्त्यांवर जनतेनें अडथळे उभे केले. पॅरीसमधील कामगारांनीं व विद्यार्थ्यांनीं पुनश्च राजेशाहीला सिंहासनावरून खालीं ओढलें व रिपब्लिकची घोषणा केली.

२४ फेब्रुवारी ते २४ जून हा तिसऱ्या फ्रेंच राज्यक्रान्तीचा काळ प्रत्येक समाजवाद्यानें बारकाईनें अभ्यासला पाहिजे. लोकशाहीच्या एका व्यापक झेंड्याखालीं लढणाऱ्या शक्तींतील अंतर्गत संघर्षाचें विदारक चित्र आपणांस त्यांत आढळेल. सत्तासंघर्षाचा एक मौलिक धडा शिकतां येईल. त्या अभ्यासांतून निघणाऱ्या एका निष्कर्षाचा येथें मुद्दाम उल्लेख करण्यांत येत आहे याचें कारण एकोणिसाव्या व विसाव्या शतकांतील अनेक क्रान्त्यांच्या भवितव्याचा उलगडा होण्यास तो ऐतिहासिक अनुभव उपयुक्त ठरणार आहे. कम्युनिस्ट जाहीरनाम्यांत कल्पिलेल्या क्रान्तिक्रमास व तदनुषंगी मार्गदर्शनास प्रत्यक्ष इतिहासानें मर्यादा घातल्या. जाहीरनाम्याच्या मार्गदर्शनानुसार भांडवलदार व कामगार फेब्रुवारींत एकजुटीनें लढले तेव्हां लोकशाही क्रान्तीनें पुढचें पाऊल टाकलें खरें पण त्या क्रान्तीला समाजवादी क्रान्तीचें स्वरुप देण्याचा पहिला प्रयत्न होतांच सर्वत्र भांडवलदारवर्गानें कच खाल्ली. भांडवलशाही क्रान्तींत मार्क्सला अभिप्रेत असलेले सर्व सामाजिक बदल घडवून आणण्याचा उत्साह भांडवलदार वर्गानें दाखविला नाहीं. उलट २४ जूनला नॅशनल असेंब्लीनें आपले सर्व अधिकार जनरल कॅव्हिगनॅकच्या हातीं सुपूर्त केले. भांडवलशाही क्रान्ति पुरी करण्याची त्यांची इच्छा नव्हती. पॅरीसचे कामगार पुनश्च शौर्यानें लढले. पण फेब्रुवारी ते जूनपर्यंत, सैन्यापासून तों शेतकरीवर्गापर्यंत आणि लोकशाहीवादी मध्यम वर्गापासून तों संरक्षक दलांतील पोटभरू बेकार कामगारांपर्यंत, समाजांतील सर्व शक्ती कामगारांपासून फुटून अलग झाल्या होत्या. हजारों कामगारांच्या तीन दिवसांच्या बलिदानानंतर ही क्रान्ति संपुष्टांत आली. हजारों वर्गजागृत कामगारांची सक्तीनें उचलबांगडी करून, शेंकडोंची कत्तल करून, जनरल कॅव्हिगनॅकनें भांडवलशाहीचें रक्षण केलें होतें. जून क्रान्तीचें वर्णन करतांना

मार्क्स म्हणतो, "जून क्रान्तीनें सर्व समाज दोन प्रतिस्पर्धी गटांत विभागला गेला. पॅरीसचे पूर्व व पश्चिम भाग अलग झाले. फेब्रुवारी क्रान्तींतील एकजूट आतां शाबूत राहिली नाहीं. आजपर्यंत कधींहि न घडलेली घटना आतां घडून आली आहे. फेब्रुवारीचे क्रान्तिकारक एकमेकांशीं लढत आहेत. पूर्वींचा निरुत्साह नष्ट होऊन शस्त्र उचलूं शकणारा प्रत्येक माणूस अडथळ्यांच्या या अगर त्या बाजूनें लढत आहे." *

क्रान्तीचें रूपान्तर समाजवादी क्रान्तींत होण्याची चाहूल लागतांच भांडवलशाहीनें स्वतःच्या दुर्बलतेमुळें अगर भीतीनें कच खाल्ली तर त्या वर्गाचें ऐतिहासिक कार्य पुरें कसें व्हावयाचें व कोणी करायचें? तें अपुरें कार्य कामगार वर्गानें पुरें करावयाचें तर त्याचें स्वरूप काय राहील? काय क्रान्तींत हस्तगत केलेलीं अधिकारपदें यशस्वी क्रान्तीनंतरच त्यांनीं स्वतः भांडवलदार वर्गाच्या प्रतिनिधींच्या हातीं सुपूर्द करावयाचीं व स्वतः बाहेर राहून पुन्हा समाजवादी क्रान्तीची संघटना आरंभावयाची! कदाचित् सैद्धान्तिक रचनेंत अशी शक्यता कल्पितांहि येईल. पण प्रत्यक्ष व्यवहारांत तो मूर्खपणाच ठरेल. समाजवादी चळवळींच्या पुढील इतिहासांत हा जाहीरनाम्यांतील पूर्वरचित क्रान्तिक्रम समाजवादी नेत्यांस मोठें आव्हानच ठरणार होता.

जर्मन क्रान्तीसंबंधीं चर्चा करतांना मार्क्सनें लिहिलें होतें कीं जर्मनींतील भांडवलशाही क्रान्ति फार उशिरां म्हणजेच युरोपीय संस्कृतीच्या पूर्ण विकासाच्या काळांत होणार असल्यामुळें भांडवालशाही क्रान्तींत भांडवलदार वर्गाबरोबर सहकार्य करणारा कामगारवर्ग एका क्रान्तींतूनच दुसऱ्या क्रान्तींत पदार्पण करील. भांडवलशाही क्रान्ति व कामगार क्रान्ति यांत फारसा कालावधि जाणार नाहीं. जर्मनींत फार काळ स्थिर भांडवलशाही सत्ता टिकली नाहीं एवढ्या मर्यादित अर्थानें मार्क्सचा हा अंदाज बरोबर ठरला; पण त्यास कामगार वर्गाची अपेक्षित संघटित शक्ति कारणीभूत नव्हती. भांडवलदार वर्गाचा दुबळेपणा

* स्टडीज् इन् रेव्होल्यूशन : पान २१

व कामगारक्रान्तीच्या भीतीनें त्यानें उरलेल्या सरंजामवर्गांशीं केलेली हात-मिळवणी त्यास कारणीभूत होती. मार्क्सनें १८५० सालीं कम्युनिस्ट लीगपुढें केलेल्या भाषणांत भांडवलशाहीनें आपलें ऐतिहासिक कार्य अर्धवट सोडलें तर काय या प्रश्नाला उत्तर देण्याचा प्रयत्न केला. लोकशाहीप्रेमी मध्यमवर्ग, क्रान्ति शक्य तितक्या लवकर संपविण्याच्या मागें असतो....अशा वेळीं सर्व लहान मोठ्या मालकवर्गाचें अधिकारपदावरून उच्चाटन होऊन शासनसंस्था कामगार वर्गाच्या हातीं पडेपर्यंत ती क्रान्ति अखंड चालू ठेवणें हेंच आपलें कार्य आहे व कामगारांचें हित त्यांतच आहे. " सरंजामशाही समाजव्यवस्था नष्ट करण्याचें भांडवलशाहीचें ऐतिहासिक कार्य कामगार वर्गानें पुरें करावयाचें होतें. शांतता-मय लोकशाही मार्गानें कामगार सत्ताधारी होता तर एकवेळ तरी राजकीय लोकशाही स्थापन करून तो स्वतः विरोधी गटांत राहूं शकता. पण हिंसात्मक क्रान्तीनंतर भांडवलशाहीचें राजकीय कार्य व आर्थिक भरभराट होण्यास संधि देण्यासाठीं सत्तात्याग करण्याची भूमिका प्रत्यक्षांत आणणें अशक्य होतें. मग एक तर जाहीरनाम्यांतील क्रान्तिक्रम सदोष होता अगर जाहीरनाम्याच्या शेवटच्या विभागांत, जर्मन कामगारांना भांडवलशाही क्रान्तीचें समाजवादी क्रान्तींत रूपांतर करण्याचें केलेलें मार्गदर्शन चुकीचें होतें.

राष्ट्रवादासंबंधीं जाहीरनाम्यांत केलेली चर्चाहि मार्क्सनें केवळ पश्चिम युरोपचा अनुभव जमेस धरून केली होती असें म्हणणें भाग आहे. इंग्लंड व फ्रान्समध्यें भांडवलशाहीनें राष्ट्रवादाच्या झेंड्याखालीं जनतेस संघटित करून सरंजामशाही समाजव्यवस्था उखडून टाकली होती व राष्ट्रवादाच्या पायावर मध्यवर्ती शासनसंस्था उभारल्या होत्या. पण मध्य व पूर्व युरोपांत जशी भांडवलशाहीची अप्रतिहत प्रगति झाली नाहीं त्याचप्रमाणें राष्ट्रवादाचीहि. प्रशियांत व रशियांत परकीय सत्तेच्या आक्रमणाला तोंड देण्यासाठीं समर्थ केन्द्रीय शासनसंस्था निर्माण झाल्या होत्या, राष्ट्रवादी भावनेंतून नव्हेत. साहजिकच फ्रेंच राज्यक्रान्त्यांच्या लाटेंतून युरोपभर पसरलेला राष्ट्रवाद मध्य व पूर्व युरोपांत शासनसंस्थेचा आविष्कार बनला नाहीं. प्रचलित शासनसंस्थेच्या

संघटनेहून त्याचें अस्तित्व स्वतंत्र होतें. त्यामुळेंच राष्ट्राभिमानी जर्मन व ऑस्ट्रियन भांडवलशाहीनें अविभाज्य हॅब्सबर्ग साम्राज्याचें समर्थन केलें तर हंगेरियन आदि इतर राष्ट्रीय घटकांनीं ती केन्द्रीय शासनसंस्था दुभंगविण्याचा, निदान तिचें स्वरूप संघराज्याचें करण्याचा, प्रयत्न केला. सारांश सर्व युरोपला लागू पडणारा राष्ट्रवादाचा एक सलग सिद्धान्त प्रतिपादणें व त्यानुसार समाजवादी चळवळीचें मार्गदर्शन करणें मार्क्सला कठिण गेलें. 'खुला व्यापार' व राष्ट्रवादांतून आंतरराष्ट्रीय वादच निर्माण होईल ही एक अटकळच होती. जाहीरनाम्यांत मार्क्सनें जर्मन कामगारवर्गाच्या संघटित शक्तीबद्दल व ऐतिहासिक भूमिकेबद्दल फाजील उत्साह दाखविला होता. भांडवलशाही अर्थ-व्यवस्थेंत समाज भांडवलदार व कामगार या दोन वर्गांतच वाढत्या प्रमाणांत वांटला जाईल व त्यांच्यांतील अन्तर सतत वाढेल ही मार्क्सची समाजमीमांसाहि इतिहासानें खोटी ठरविली. स्वतःची मालमत्ता अगर सत्ता नसलेल्या कामगार-वर्गास राष्ट्र तें कोणतें व गमावण्यासारखें शृंखलांखेरीज आहे तरी काय ह्यासंबंधीं मार्क्समध्यें व युरोपीय कामगारांत निदान पुढील काळांत एकमत झालें नाहीं हें निःसंशय. देशाभिमानाच्या भावनात्मक सामर्थ्याचें मार्क्सला व एकोणिसाव्या शतकांतील मार्क्सवाद्यांना कधींच पूर्ण आकलन झालें नाहीं.

१८४८ च्या फ्रान्समधील फेब्रुवारी क्रान्तीनें युरोपमधील क्रान्तिप्रयत्नांस पुनश्च चालना मिळाली. १३ मार्चला व्हिएन्नांतील विद्यार्थ्यांनीं 'मॅटरनीचला खालीं ओढा' अशा घोषणा करून निदर्शनें केलीं तेव्हां राजीनामा देऊन पळून जाणें त्यास भाग पडलें. हंगेरियन्सनीं जबाबदार राज्यपद्धतीची मागणी केली. ऑस्ट्रियाच्या फौजा लोंबार्डी सोडून मागें फिरल्या व इटलींत सर्वत्र लहान रिपब्लिक्स जन्मास आलीं. प्रशियन राजसत्तेला घटनासमिती बोलावून नवी राज्यघटना निर्माण करण्याचा हुकूम सोडावा लागला. जर्मनींत बॅडेन, बव्हेरिया, सॅक्सिनी आदि प्रांतांत बंडाचे प्रयत्न झाले. सर्वत्र लोकशाही शक्ती चढाईवर होत्या. पण फ्रान्समधील जून क्रान्ति अपेशी ठरून १८५२ मध्यें लोकसत्ताक सरकारचें रूपांतर पुनः दुसऱ्या सम्राट सरकारमध्यें झालें.

फ्रान्समधील लोकसत्ताक शक्तींची ही माघार युरोपला तितकीच बाधली. ऑस्ट्रिया, हंगेरी, बोहेमिया, इटली या सर्व ठिकाणीं लोकसत्ताक शक्तींवर संक्रान्त आली. बर्लिनमधील घटनासमिती तिनें सुचविलेली घटना फार पुरोगामी आहे म्हणून बरखास्त करण्यांत आली. क्रान्तिकारक शक्तींना जर्मनींत वावरणें अशक्य झालें व बहुतेक क्रान्तिकारक अमेरिका व इतर देशांत पळून गेले. कम्युनिस्ट लीगमार्फत चाललेल्या कामगारवर्गाच्या क्रान्तिकारक चळवळी सर्वत्र थंडावल्या. पुढील कांहीं वर्षांत युरोपीय राजसत्तांत अंतर्गत लाथाळी बरीच वाढणार होती. पण लोकशाही व कामगार चळवळींना वर डोकें काढण्यास कुठेंच संधि मिळाली नाहीं. कम्युनिस्ट लीगच्या मध्यवर्ती मंडळाचे बरेच सभासद पकडले गेले व लीग बरखास्त करण्यांत आली.

खुद्द मार्क्स व एंगल्स १८४८ च्या क्रान्तिकालांत ऱ्हाईनलंडमध्यें राहून ‘ न्यू ऱ्हाइनिश झुटॅंग ’ या आपल्या पत्रांतून जर्मन क्रान्तिकारक शक्तींना मदत व मार्गदर्शन देत होते. मे १८४९ मध्यें आपल्या पत्राच्या शेवटच्या अंकांत जर्मन कामगारांना उद्देशून मार्क्सनें लिहिलें कीं “ पॅरीसमध्यें लाल लोकसत्ताक राज्य निर्माण होत आहे व पूर्व युरोपमध्यें राष्ट्रीय क्रान्तिकारक, रशियन सेनेला तोंड देण्यास संघटित होत आहेत. तेव्हां जर्मन कामगारांनीं या भावी क्रान्तीसाठीं सिद्ध रहावें. ” यानंतर मार्क्स पॅरीसमार्गें लंडनला येऊन पोहोंचला व तेथेंच आयुष्याचीं उरलेलीं चौतीस वर्षें त्यानें घालविलीं. लंडनमध्यें पोहोंचल्यावर अठराशें अठ्ठेचाळीसमधील क्रान्तीच्या अनुभवांवर त्यानें ‘ एटीन्थ ब्रूमायर ऑफ लुई बोनापार्ट ’ व ‘ रेव्होल्यूशन ॲण्ड काउन्टर रेव्होल्यूशन ’ हीं दोन पुस्तकें लिहिलीं. १८५० नंतरचा मार्क्सचा बहुतेक काळ ‘ पहिल्या आंतरराष्ट्रसभेचें ’ मार्गदर्शन करण्यांत व ‘ भांडवल ’ या जगद्विख्यात ग्रंथाचे तीन खंड लिहिण्यांत खर्ची पडला.

• • •

: ५ :

# कार्ल मार्क्सची विचारप्रणाली

विरोध-विकासात्मक ऐतिहासिक भौतिकवाद, वर्धितमूल्य सिद्धान्त, व वर्गयुद्धाचा सिद्धान्त हे मार्क्सच्या विचारप्रणालीचे प्रमुख आधारस्तंभ आहेत. हेगेलचें तत्त्वज्ञान, फ्रेंच भौतिकवाद, फ्रान्समधील क्रान्तिपरंपरा, आणि इंग्लंडमधील सनातन अर्थशास्त्र व कामगार वर्गाची स्थिति यांचा सखोल परिणाम मार्क्सच्या विचारांवर झाल्याचें अभ्यासकास आढळून येईल. हेगेलचा विरोध-विकासवाद विकसित व संपन्न अशा जर्मन तत्त्वज्ञानाचें भूषण होता असें खुद्द मार्क्स मानी. भौतिक सृष्टीकडे पाहाण्याची हेगेलची विरोध-विकासात्मक दृष्टि मार्क्सनें स्वीकारली. मात्र हेगेल हा कल्पनावादी व मार्क्स भौतिकवादी असल्यामुळें विश्वव्यापारांत आद्यस्थान जडाला कीं चेतनेला, त्या दोहोंचा अन्योन्यसंबंध काय, यासंबंधीं त्यांच्यांत मूलभूत मतभेद होता. या अर्थानेंच हेगेलची विरोध-विकासात्मक तत्त्वपद्धति अवलंबूनहि जडाला आद्यस्थान देण्यांत मी हेगेलला सुलटा केला आहे असें मार्क्स म्हणे. त्याच्या विचारसरणींतील मध्यवर्ती कल्पना येथें सूत्ररूपानें मांडण्याचा प्रयत्न केला आहे.

सर्व कल्पनावाद्यांनीं आपल्या तत्त्वज्ञानमीमांसेंत आत्मतत्त्व हेंच शाश्वत सत्य मानलें आहे. अंतिम मीमांसेंत जग निर्माण केलें गेलें आहे असें मानलें आहे.

चराचर जड ही माया आहे, तें अशाश्वत व म्हणून असत्य आहे अशी भूमिका घेतली आहे. उलट मार्क्स भौतिक सृष्टी सत्य आहे असें मानतो व विश्वाच्या उत्पत्तीच्या दृष्टीनें जडाला आदिस्थान देतो. या भौतिक सृष्टीच्या अनुभवांतूनच आत्मिक कल्पनासृष्टि जन्म पावते. भौतिक सृष्टींतील अनुभवांचें कल्पनासृष्टि प्रतिबिंब आहे असें तो मानतो.

अर्थात् ही भौतिक सृष्टि गतिशून्य असती तर कल्पनेच्या सामर्थ्याचा प्रत्यय तिच्या विकासांत कधींच आला नसता. कर्तृत्व व गुण यांना कांहीं स्वतंत्र कार्य उरलें नसतें; भौतिक सृष्टींतील बदल पूर्वयोजित व नियमबद्ध राहाते. पण तशी वस्तुस्थिति नाहीं. भौतिक सृष्टि गतिशून्य व स्थिर नाहीं. ती गतिमान् आहे; तिच्यांत निरन्तर बदल होत आहेत. सृष्टींतील जीवमात्रांतहि बदल होत आले आहेत. मार्क्सच्या समकालीन अशा एका प्राणिशास्त्रज्ञानें या जीवमात्रांतील बदलांचा, उत्क्रान्तीचा सखोल अभ्यास करून कांहीं मूलभूत सिद्धान्त मांडले. डार्विनचें नांव सर्वांस परिचित आहे. निसर्गाशीं व भौतिक परिस्थितीशीं झगडत असतांना लक्षावधि जीववंश पूर्ण नाश पावले. जे या जीवनसंघर्षांत टिकून राहिले त्यांनाच निसर्गानें जगूं दिलें. त्यांची निवड केली. या झगड्यांत निसर्गाशीं व इतर जीवमात्रांशीं झगडण्यांत जो समर्थ ठरतो तोच टिकतो. या झगड्यांत पराभूत होणारे प्राणिवंश नष्ट होत असतांना, प्रतिकूल अवस्थेंतून अनुकूल द्रव्यें मिळविण्यासाठीं आवश्यक अशीं इंद्रियें ज्या प्राणिवंशांत निर्माण होतात, त्या प्राण्यांची त्या इंद्रियांच्या साहाय्यानें प्रगति होते. ही प्रगति इतिहासकालांत नंतर वेग पकडते. या उत्क्रान्तीच्या प्रक्रियेंतच मनुष्यप्राण्यास मेंदू लाभला व मन, बुद्धि, अहंकार हे मानसिक अथवा आत्मिक गुण त्याच्या ठायीं निर्माण झाले. सर्व प्राणिमात्रांत तो प्रगल्भ व विकसित प्राणि बनला. विज्ञानसंपन्न जगांतील कांहीं शास्त्रज्ञांनीं उत्खनन कार्य हातीं घेतलें तेव्हां त्यांच्या हातीं आलेल्या मानव प्राण्यांच्या अवशेषांवरून मनुष्यप्राण्याच्या शरीरयोजनेंत इतिहासकालांत घडून आलेले बदल त्यांना संगतवार मांडतां आले. निसर्गाशीं व भौतिक परिस्थितीशीं मानवानें दिलेल्या हजारों वर्षांच्या संघर्षांत त्याच्यामध्यें

घडून आलेले बदल सिद्ध झाले. भौतिक सृष्टींत निरन्तर बदल घडून येत आहे हा केवळ विचार न राहातां डार्विनच्या उत्क्रान्तिवादाच्या सिद्धान्तानें त्याची सत्यता पटवून दिली. मार्क्सनें पुढचें पाऊल टाकून हा जीवसृष्टींतील उत्क्रान्तीचा सिद्धान्त समाजजीवनाला लागू केला व मानवी इतिहासाचा सखोल अभ्यास करून मानवसमाजाच्या विकासाचा सिद्धान्त मांडला.

म्हणूनच सृष्टींत बदल घडून येत आहेत एवढ्यावर न थांबतां हे बदल नित्य विकासी आहेत, म्हणजेच या बदलांत पूर्वी नव्हतें असें कांहीं तरी नवीन अस्तित्वांत येत आहे हा विचार त्यानें पुढें मांडला. या बदलाची गति रहाट गाड्यासारखी व म्हणूनच कधीं तरी पुनश्च पूर्वस्थितीवर येणारी अशी नाहीं. ती सतत विकासी, साध्यांतून संमिश्रांत व एका अवस्थेंतून वरचढ अवस्थेंत परिणत होणारी आहे. या विकासाला एक निश्चित क्रम आहे. त्याचें स्वरुप वेगळें भासलें तरी त्याचें सूत्र एकच आहे. त्याचें नांव विरोधविकास. भौतिक सृष्टींतील कोणतीहि स्थिति घेतली तरी तिच्या पोटीं त्या स्थितीच्या विरोधी परिस्थिति निर्माण होते. या दोहोंत संघर्ष सुरू असतो व तो तीव्रतेला पोहोंचल्या-नंतर एका नवीन उच्च पातळीवर या दोहोंचा समन्वय साधून एक नवस्थिति निर्माण होते. याच स्थिति, विरोधी परिस्थिति व नवस्थितीला, योग–प्रतियोग–संयोग असा त्रिपुटीक्रम कांहींनीं संबोधिला आहे.

भौतिक सृष्टींतील हा विरोधविकासी क्रम भौतिक सृष्टींतील मानवी समाजाच्या व्यवहारांनाहि लागू पडतो. तो समजून घेतला कीं मानवी समाजांतील गूढतम घटनांचा उकल होतो. मानवाच्या व्यवहारांतील मूलभूत मध्यवर्ती गोष्ट म्हणजे त्याची जीवनासाठीं चाललेली धडपड निसर्गाशीं चाललेला झगडा ही आहे. या झगड्यासाठीं मनुष्य जे व्यवहार करतो, त्यासाठीं जीं साधनें वापरतो त्यालाच आपण आर्थिक व्यवहार, उत्पादनाची व अर्थोर्जनाची पद्धत व आर्थिक संबंध असें संबोधतों. ही उत्पादनपद्धति व त्यावर अधिष्ठित झालेले आर्थिक संबंध हाच मानवी समाजाचा पाया आहे. एक विशिष्ट उत्पादनपद्धति व त्या पद्धतीशीं सुसंगत असे आर्थिक संबंध ही

समाजाची एक स्थिति झाली. कालान्तरानें या उत्पादनपद्धतींत व उत्पादन-तंत्रांत बदल घडून येतात. त्यांच्यांत विकास होतो. या विकासाच्या प्रक्रियेंत समाजाच्या प्रस्थापित व्यवस्थेच्या उदरांतून विरोधी शक्ती निर्माण होतात. म्हणजेच विकसित उत्पादनशक्ती व पूर्वीच्या उत्पादनप्रकारांशीं अनुरूप असलेले आर्थिक संबंध यांच्यांत संघर्ष सुरू होतो. हा संघर्ष वाढतां वाढतां तीव्र बनून क्रान्ति घडून येते. संख्यात्मक बदलांतून गुणात्मक बदल दृश्यमान होतो. विकसित उत्पादन प्रकारांशीं व तंत्राशीं अनुरूप अशा नव्या आर्थिक संबंधांची प्रस्थापना होऊन वरच्या पातळीवर (गुणात्मक फरकांमुळें) समन्वय घडून येतो. नवीन समाजव्यवस्था अस्तित्वांत येते.

अर्थोत्पादनाचा प्रकार व आर्थिक संबंध हा समाजाचा पाया असल्यामुळें त्यांच्या समर्थनासाठीं व संरक्षणासाठींच समाजव्यवहारांत नीतिशास्त्र, कायदेकानू, राज्यपद्धति यांची उभारणी झाली आहे. रूढ नीतिकल्पना, कायदेकानू, राज्यपद्धति, धर्म, वाङ्मय इत्यादींचें कार्य प्रस्थापित आर्थिक संबंधांना उचलून धरण्याचें असतें. पण जुन्या आर्थिक संबंधांच्या चौकटींत सामावूं न शकण्या-इतकें उत्पादनसामर्थ्य वाढलें कीं त्या वाढींत प्रगल्भ पावलेल्या शक्ती या वैचारिक क्षेत्रांतहि नवविचाराची मोहीम सुरू करतात. या वैचारिक संघर्षांतूनच समाजक्रान्तीचे नवे धडे जनता शिकते. समाजक्रान्ति घडून आली कीं तिला अनुरूप अशी नवी राज्यपद्धति व कायदेकानू साकार बनतात.

मानवी इतिहासांत या सिद्धान्ताला सर्वत्र पुष्टि मिळते. रोमन राजवटींतील उत्पादन प्रकारांशीं अनुरूप अशी वर्गव्यवस्था (आर्थिक) त्यावेळीं होती. त्या प्रकारांत बदल झाला व मोठें सामाजिक परिवर्तन घडून आलें. त्यानंतर नवीन सरंजामशाही उत्पादनपद्धतीशीं अनुरूप असे नवे वर्गसंबंध समाजांत प्रस्थापित झाले. या अर्थव्यवस्थेच्या पोटांत उत्पादनशक्ती विकास पावल्या व नवा संघर्ष सुरू झाला, त्यांतून भांडवलशाही उत्पादनपद्धती व नवे वर्गसंबंध निर्माण झाले. भांडवलशाहीच्या विकासांत उत्पादन साधनें व तंत्र यांत अभूतपूर्व वाढ झाली असून त्याचा भांडवलदारी अर्थसंबंधांशीं झगडा सुरू झाला आहे. भांडवल-

शाहींतील वर्गसंबंध व पूर्वीच्या समाजांतील वर्गसंबंध यांत एक विशेष फरक घडून आला आहे. गुलामगिरीवर अधिष्ठित झालेल्या समाजरचनेंत गुलाम ही स्वतंत्र व्यक्ति नव्हती. आपली 'श्रमशक्ति' विकण्याचें 'स्वातंत्र्य' तिला नव्हतें. ती आयुष्यभर व दिवसाचे चोवीस तास मालकाची गुलाम असे. या आर्थिक संबंधांतील पिळवणूक उघड व स्पष्ट होती. पुढें सरंजामशाहींत मालकांच्या जमिनीवर भूदासांना पिढ्यान्‌पिढ्या सक्तीनें व मोफत काम करावें लागे. ही पिळवणूकहि राजरोस होती. भांडवलशाहींतील पिळवणूक मात्र छुपी असते. शोषक कामगार मजुरी करण्यास अगर घरीं स्वस्थ बसण्यास 'स्वतंत्र' असतो. तो श्रमशक्ति विकतो व मालक मजुरी देऊन संपत्तीच्या वाढीसाठीं तिचा वापर करतो. हा सरळ अर्थव्यवहार दिसतो. यांत पिळवणूक आली कोठून असें वाटणें स्वाभाविक आहे. पण भांडवलशाही उत्पादनपद्धतींतील प्रगल्भ उत्पादन साधनें व तंत्र कामगारांची उत्पादनशक्ति वाढवितात व तितक्या प्रमाणांत त्याची मजुरी वाढत नाहीं. श्रमिक कामगार हें जें 'वाढीव मूल्य' निर्मितात तें व्याज, खंड, नफा व डिव्हिडंड यांच्या रूपानें त्या उत्पादनासाठीं श्रम न करणाऱ्या ऐतखाऊंना मिळतें. ही छुपी, प्रच्छन्न पिळवणूक स्पष्ट करण्यासाठींच मार्क्सनें श्रममूल्य व वर्धितमूल्य सिद्धान्त मांडला.

वाढतें उत्पादन सामर्थ्य व जुनाट वर्गसंबंध यांतील संघर्ष वर्गयुद्धाचें स्वरूप धारण करतो. हा वर्गयुद्धाचा लढा सत्तेचा लढा आहे. कारण भांडवलदार वर्ग प्रस्थापित सरकारच्या साहाय्यानें हा लढा चिरडून टाकण्याचे निकराचे प्रयत्न करतो. प्रचारसाधनें, कायदेमंडळें, पोलीस, तुरुंग या सर्वांचा उपयोग कामगार-वर्गाचा लढा चिरडून टाकण्यासाठीं केला जातो. प्रस्थापित राज्यसंस्था ही वर्गव्यवस्था टिकविणारी संस्था असल्यामुळें वर्गयुद्धाची परिणती राजकीय लढ्यांत होते. या राजकीय लढ्यांतूनच प्रस्थापित राज्यसंस्था नष्ट होऊन कामगारांची हुकुमशाही निर्माण होईल. प्रतिक्रान्तिकारी शक्तींचा उच्छेद होईल व उत्पादनाचीं साधनें शासनसंस्थेच्या मालकीचीं बनतील. कामगारांची हुकुमशाही ही संक्रमणकालीन अवस्था आहे. अखेरीस वर्गविहीन समाज स्थापन होऊन

शासनसंस्था विलयास जाईल. भांडवलशाही अर्थपद्धतीचें स्वरूप विश्वव्यापी आहे. म्हणून कामगारक्रान्ति प्रथम राष्ट्रापुरती मर्यादित राहिली तरी तिचा शेवट जागतिक क्रान्तींतच होणार. या जागतिक क्रान्तीनेंच राष्ट्राराष्ट्रांतील अंतर्गत विरोध व युद्धें यांचा अखेर शेवट होणार आहे.

मार्क्सच्या विचारप्रणालीचें मध्यवर्ती सूत्र थोडक्यांत वर दिलें आहे. मार्क्स हा भौतिकवादी होता व फ्रेंच भौतिक तत्त्ववेत्त्यांच्या विचाराचा सखोल परिणाम त्याच्या तत्त्वचिंतनांत आढळतो. हें खरें असलें तरी फ्रेंच तत्त्ववेत्त्यांचा जडवाद, विरोध–विकासवादी दृष्टिकोणाच्या व मानवी विकासाच्या ऐतिहासिक बैठकीच्या अभावीं त्यास अपुरा वाटे. जडास विशिष्ट गुणधर्म असतात व म्हणून भौतिक सृष्टीचा व्यापार जडधर्मानुसार चालतो हें त्यांचें म्हणणें मार्क्सला मान्य होतें. पण जर हा नियम मानवाचे बाबतींत जसाच्या तसा लागू केला तर सूर्यचंद्राच्या गती-प्रमाणेंच मनुष्यप्राण्याची गतीहि सृष्टिधर्मास अनुसरून होईल व माणसास स्वतःकडे प्रेक्षकाची भूमिका घेऊन सर्व स्वस्थ पाहात बसावेसें वाटेल व परिणामीं दैववाद्यांचीच भूमिका पदरीं येईल ही भीति मार्क्सला होती. सारांश, जडसृष्टी-प्रमाणें माणसासहि विरोधविकासक्रम लागू आहे हें पाहण्यापुरता तो भौतिकवादी होता. पण माणसानें स्वतंत्र प्रज्ञेनें व उत्क्रान्तींतील विशेष वेगानें या सृष्टि-नियमांवर नियंत्रण केलें आहे व तें तो करूं शकतो, तेथें माणसाच्या कर्तृत्वाला वाव आहे असें तो मानी. सृष्टिधर्म समजावून घेण्यांतच माणसानें निसर्ग शक्तींबरोबरील झगड्यांत आजचें यश मिळविलें आहे. सृष्टिधर्म असा नसताच तर त्यास कालवे खणणें, टोलेजंग इमारती बांधणें अशक्य झालें असतें. या सृष्टिधर्माशीं झगडतांना मानवी समाजघटनाहि विशिष्ट क्रमानें घडत व बदलत जाते. या समाजघटनेंत एक ऐतिहासिक क्रम निर्माण होतो. तो क्रम विरोधविकासात्मक आहे. म्हणूनच मार्क्सच्या तत्त्वज्ञानास "विरोधविकासात्मक ऐतिहासिक भौतिकवाद" असें समग्र नांव दिलें गेलें आहे. या दृष्टि-कोणाच्या अभावींच फ्रेंच भौतिक तत्त्ववेत्ते केवळ 'उत्पत्ति' कार राहिले असा आक्षेप मार्क्सनें त्यांच्यावर घेतला, तर मार्क्सनें हा इतिहासक्रम मांडून

कामगारांना समाजक्रान्ति अटळ आहे असा विश्वास दिला. हा क्रम अडविण्याचा भांडवलदार कसोशीनें प्रयत्न करीत आहेत व त्यांतून आर्थिक अरिष्टें व युद्धें मानवजातीस भोगावीं लागत आहेत, तेव्हां कामगारांनीं या ऐतिहासिक क्रमास कर्तृत्वाची जोड देऊन या अरिष्टांतून व युद्धांपासून मानवजातीची शक्य तितक्या लवकर मुक्तता करावी अशी ओजस्वी शिकवण या तत्त्वज्ञानाच्या बैठकीवरून मार्क्सनें कामगारवर्गास दिली.

हेगेलचें विरोधविकासाचें सूत्र व फ्रेंच तत्त्ववेत्त्यांची भौतिक दृष्टि यांप्रमाणेंच सनातन इंग्लिश अर्थशास्त्राचे व इंग्लिश कामगारवर्गाच्या स्थितीचे दृढ संस्कार मार्क्सच्या विचारप्रणालीवर झाले होते. औद्योगिक क्रान्तींतून निर्माण झालेल्या कामगारवर्गाची दारुण स्थिति त्यानें अभ्यासिली होती. इंग्लिश समाजाचें भांडवलदार व कामगारवर्गांतील वाढतें वर्गीकरण नजरेसमोर ठेवूनच त्यानें कम्युनिस्ट जाहीरनाम्यांतील तत्संबंधींचे विचार मांडले होते. शासनसंस्थेचें एकमेव कार्य भांडवलदारवर्गाच्या हिताची अम्मलबजावणी करण्याचें आहे असा निष्कर्ष काढला होता. समाजांतील अन्य वर्गाच्या समाजक्रान्तींतील भूमिकेची चिकित्सा केली होती. पण त्यांतूनच कामगारवर्गाकडे आलेल्या ऐतिहासिक भूमिकेंत अतिशयोक्ति झाली होती. इंग्लिश अर्थशास्त्रज्ञांनीं मांडलेल्या मूल्यसिद्धान्ताच्या अनुषंगानेंच मार्क्सनें आपला महत्त्वपूर्ण वर्धितमूल्य सिद्धान्त मांडला. विल्यम-पेटीपासून रिकार्डोपर्यंतच्या अर्थशास्त्रज्ञांनीं "विक्रेय वस्तूचें मूल्य त्या वस्तूच्या उत्पादनासाठीं खर्च केलेल्या सापेक्ष श्रमावर अवलंबून असतें" या प्रमेयाभोंवतीं मूल्यसिद्धान्ताची मांडणी केली होती. या सिद्धान्ताची व्याप्ति करतांना मार्क्स म्हणतो कीं सर्व विक्रेय वस्तूंत एकच साधारण गुण असतो. तो म्हणजे माणसाचे श्रम. सामाजिक श्रमाचा प्रत्येक विक्रेय वस्तूंत कमी—अधिक भाग खर्चीं पडलेला असतो. विक्रेय वस्तूच्या मूल्यांत तो प्रतिबिंबित होतो. विक्रेय वस्तूचें कमी—अधिक मूल्य या खर्चीं पडलेल्या आवश्यक सामाजिक श्रमांनींच ठरतें. भांडवलशाही उत्पादनव्यवस्थेंतील भारी किंमतीचीं उत्पादसाधनें एकट्या-दुकट्या कामगाराला विकत घेतां येत नाहींत. जमीन, नवीं आयुधें,

कारखाने, यंत्रसामुग्री आदि उत्पादनसाधनांवर त्याची मालकी राहात नाहीं. अशा परिस्थितींत स्वतःचें व कुटुंबाचें उदरभरण करण्यासाठीं त्याच्या स्वतःच्या मालकीची एकमेव विक्रेय वस्तू त्यास विकावी लागते. स्वतःची श्रम करण्याची शक्ति, श्रमशक्ति, हीच ती वस्तू होय. इतर विक्रेय वस्तूंचें मूल्य जसें त्यांच्या पुनरुत्पादनांत खर्च होणाऱ्या मूल्यानें ठरतें तसेंच श्रमशक्तीचेंहि. कामगार जगला तर तो पुन्हा श्रम करणार. तेव्हां त्यास जिवंत ठेवण्यासाठीं खर्च होणाऱ्या मूल्यावरून त्याच्या श्रमशक्तीचें मूल्य ठरवलें जातें किंवा दुसऱ्या शब्दांत त्याच्या जीवनगरजा भागविण्याइतकें मूल्य स्वतःच्या श्रमशक्तींच्या विक्रींतून तो मिळवतो. अर्थात् इतर कुठल्याहि उत्पादनयंत्राप्रमाणेंच त्याची उत्पादनशक्तीहि हळुहळु घटूं लागते व तो खंगू लागतो. नवीं यंत्रें विकत आणण्यासाठीं होणारा खर्च, त्यांचें मूल्य निश्चित करतांना जसा विक्रेय-वस्तूंवर आकारला जातो तसाच श्रमशक्तीचें मूल्य ठरवितांना कामगाराच्या मुलाबाळांचा खर्च जमेस धरला जातो. कारण हीं मुलेंच पुढें विक्रेय वस्तू निर्माण करण्यासाठीं आपली श्रमशक्ति घेऊन बाजारांत येत असतात. तेव्हां मजुराची मजुरी ठरवितांना त्याच्या उदरभरणाचा, त्याच्या कुटुंबाच्या पोषणाचा व त्याच्या राहाणीच्या दर्जाचा विचार केला जातो. त्याच्या श्रमशक्तीचें मूल्य या आवश्यक गरजा लक्षांत घेऊनच निश्चित होतें.

एकदां कामगार मजूर म्हणून कामावर आला कीं त्या दिवसांत त्यानें केलेल्या सर्व श्रमावर उत्पादकाची मालकी राहाते. जर या दिवसाकांठींच्या श्रमांतून कामगारानें आपल्या मजुरीइतकेंच मूल्य निर्माण केलें असतें तर अर्थातच त्याला मजुरीला ठेवण्यांत भांडवलदाराला कांहीं नफा झाला नसता. हा उपद्व्याप त्यानें केलाच नसता. पण तसें होत नाहीं हें उघड आहे. कामगार दिवसाकाठीं कांहीं तास तरी आपल्या श्रमाच्या मोबदल्याहून अधिक मूल्य निर्माण करतो. या वाढाव्यालाच मार्क्स ' वर्धितमूल्य ' म्हणतो. म्हणजे या कांहीं तासांत तो आपले श्रम विकत नाहीं. त्यांचा मोबदला त्यास मिळत नाहीं. त्याच्या श्रमाच अपहरण होतें. श्रमाऐवजीं श्रम करण्याची शक्ति तो गमावून बसतो. स्वतःस

पुढच्या दिवशीं कामावर ठेवलें जावें म्हणून ही जबर किंमत त्यास द्यावी लागते. या श्रमशक्तीच्या 'उधळपट्टींतून' व अपहरणांतूनच कामगारांचें सुप्त शोषण होत राहातें. ही उत्पादनपद्धति त्याचें शोषण करते. हें शोषण, हें वर्धितमूल्य किती होतें हें निश्चित सांगतां येणार नाहीं. त्याची श्रम करण्याची स्थिति कायम ठेवण्यासाठीं लागणारा खर्च जेवढ्या तासांच्या श्रमानें भरून निघतो त्या व्यतिरिक्त उरलेल्या सर्व तासांतील श्रम या वर्धितमूल्याचें प्रमाण ठरवितात. मजुरी व त्यानें निर्माण केलेल्या वस्तूचें मूल्य यांत जेवढा वाढावा असेल तेवढें 'वर्धितमूल्य नफा, व्याज, भाडें आदि स्वरूपांत मालकशाहीच्या तिजोरींत भर टाकतें. जागेचा मालक भाडें घेतो. भांडवल पुरविणारा व्याज घेतो, कारखानदार धंद्यांतील नफा घेतो. जर एकच भांडवलदार जागेचा मालक असेल, धंद्यास स्वतःच सर्व भांडवल पुरवीत असेल व स्वतःच कारखाना चालवीत असेल तर सर्वच वर्धितमूल्य तो स्वतःच्या खिशांत टाकूं शकेल.

नफ्याचा दर कधींच निश्चित केला जात नाहीं. कमींत कमी मजुरी देणें व मूर्च्छा न येतां कामगार जितके अधिकाधिक तास काम देईल तेवढें करून घेणें यांतूनच पिळवणुकीची मर्यादा निश्चित होते. या नफयाच्या दरांत किती तरी पर्याय संभवतात. भांडवलदार व कामगार दोघेहि आपापल्या हितसंबंधांचें अधिकाधिक रक्षण करीत असतात. मालक अधिकाधिक तास काम व कमींत कमी मजुरी या न्यायाचा अवलंब करतो तर कामगार कमींत कमी तास काम व अधिकाधिक मजुरी यासाठीं झटत असतो. मालक-मजूर संबंधांतील ही रस्सीखेंचच नफ्याचा दर अखेरीस निश्चित करते. तसेंच बाजारांतील इतर विक्रेय वस्तूंप्रमाणेंच श्रमशक्तीची किंमतहि 'मागणी व पुरवठा' या तत्त्वानुसार कमीअधिक होते. मात्र कामगार व भांडवलदारांमधील ही चढाओढ बाजारांतील इतर निर्जीव विक्रेय वस्तूप्रमाणें फक्त बाजारापुरती मर्यादित राहात नाहीं.

शोषित कामगार हळु हळु जागृत व संघटित होऊं लागतात. स्वतःच्या मजुरींत घट न होऊं देण्यासाठीं, तसेंच बेकार व मजुरीवर असलेल्या श्रमिकांतील स्पर्धा थांबविण्यासाठीं त्यास संघशक्तीचा उपयोग करणें भाग पडतें. या

हितरक्षणाच्या व हितसंवर्धनाच्या पायावरच ऐक्याची इमारत उभी होते. या एकजुटीच्या प्रयत्नांत कामगारवर्गामधील बंधुभाव वृद्धिंगत होतो व पुढें व्यक्तिगत स्वार्थापेक्षांहि हा बंधुभाव व ही एकजूट कायम टिकविण्यास तो अधिक महत्त्व देऊं लागतो. या बंधुभावांतूनच पुढें कामगार वर्गामधील व्यक्तिगत स्पर्धा बंद पडते. प्रभावी ट्रेड युनियन संघटना वाढणाऱ्या उद्योग-धंद्यांत मालकाला गिरणीच्या दारांत कामगारांची मन मानेल तशी भरती करतां येत नाहीं. एवढेंच काय संपकाळांतहि संप फोडण्याच्या उद्देशानें मालकांनीं नवे मजूर कामावर ठेवले तरी अशा मजुरांची 'संपफोडे' म्हणून संभावना होते. त्यांच्यावर जोरदार दडपण आणलें जातें. कामगार व भांडवलदार वर्गामधील वाढते वर्गलढे अखेर राजकीय लढ्याचें स्वरूप घेतात. भांडवलदार आपल्या हितरक्षणासाठीं आपल्याच हितसंबंधींच्या हातीं असलेल्या राजसत्तेचा उपयोग कायदा व सुव्यवस्था टिकविण्याच्या नांवाखालीं करुन घेतो.

ज्या भांडवलशाही क्रान्तींत समतेच्या व बंधुत्वाच्या झेंड्याखालीं असंख्य कामगार आपल्या महान् त्यागानें सरंजामशाही समाजव्यवस्थेचीं पाळेंमुळें खणून टाकलीं त्याच क्रान्तींतून निर्माण झालेल्या घटनासमितीनें खाजगी मालमत्तेला व आर्थिक विषमतेला कायद्याचें अधिष्ठान दिल्याचीं उदाहरणें इतिहासांत कमी नाहींत. पुढें याच खाजगी मालकीहक्कांचें व मालमत्तेचें रक्षण करण्यासाठीं शासनसंस्थेची दमनशक्ति असंतुष्ट कामगारवर्गाविरुद्ध वापरली जाते. आपल्या वर्गलढ्याचें अंतिम यश समाजक्रान्तिद्वारां शासनसंस्थेचा ताबा घेण्यावरच अवलंबून आहे ही शिकवण वर्गीय लढे देणारा कामगार अनुभवान्तीं शिकतो. जनतेला असें परोपरीनें सांगण्याचा प्रयत्न होतो कीं शासनसंस्था कुठल्याच वर्गाची पक्षपाती नाहीं. ती कायद्यांत उच्च–नीच, गरीब–श्रीमंत, असा भेदाभेद करीत नाहीं. पण भांडवलशाही अर्थव्यवस्था खाजगी मालमत्तेच्या पायावर उभारली असल्यामुळें, त्या हक्काला आव्हान देणाऱ्या कामगारवर्गाच्या प्रत्येक प्रयत्नाकडे सरकार शत्रुत्वानें पाहातें व हा विरोध दडपण्यासाठीं हिंसक शस्त्रास्त्रांचा उपयोग करतें. मार्क्सच्याच शब्दांत सांगायचें म्हणजे "आधुनिक

शासनसंस्थेचें कार्यकारी मंडळ सर्व भांडवलदार वर्गांचा एकत्रित कारभार पाहाणारें व्यवस्थापक मंडळ बनतें." ॲडॅम स्मिथ, अब्राहम लिंकन आदि विचारवन्तांनीं शासनसंस्थेच्या या स्वरूपावर केलेल्या टीकेचा आधार मार्क्स आपला शासनसंस्थाविषयक दृष्टिकोण मांडतांना घेतो. शासनसंस्थेचें स्वरूप वर्गनिष्ठ आहे हें एकदां मान्य केल्यानंतर व भांडवलशाही समाजास विरोध-विकासीक्रम लागू केल्यावर कामगारक्रान्तींतून वर्गविहीन समाजच निर्माण होतो हें सिद्ध होतें; अशा समाजांत शासनसंस्थेची जरूरी राहाणार नाहीं हा निष्कर्ष ओघानेंच निघतो. अनवश्यक शासनसंस्था लोप पावणें अनिवार्य ठरतें. म्हणून मार्क्सचें वर्गविहीन कम्युनिस्ट समाजाचें चित्र कामगारवर्गास अत्युच्च त्यागास आवाहन करणारें एक स्वप्नवादी आदर्श मानसचित्रच होतें अशी टीका करणाऱ्यांनीं मार्क्सच्या शासनसंस्थाविषयक विचारांची दखल घेतली पाहिजे.

विरोधविकासवादी ऐतिहासिक भौतिकवादाचा सिद्धान्त मांडून, कामगार-वर्गाकडे नव्या समाजवादी समाजरचनेचें नेतृत्व व ऐतिहासिक जबाबदारी कशी येते हें जसें इतिहासाचा सर्वांगीण अभ्यास करून मार्क्सनें कामगारवर्गास दाखवून दिलें, त्याचप्रमाणें प्रचलित भांडवलशाहीचा ऱ्हास कसा अटळ आहे हें भांडवलशाही अर्थव्यवस्थेचा संपूर्ण अभ्यास करून, त्यानें 'भांडवल' या ग्रंथांत प्रतिपादन केलें. 'भांडवल' या पुस्तकाच्या पहिल्या विभागास लिहिलेल्या प्रस्तावनेंत तो लिहितो, "हल्लींच्या समाजपद्धतीच्या (म्हणजेच भांडवलशाही समाजपद्धतीच्या) प्रवाहाचा आर्थिक सिद्धान्त शोधून काढणें हेंच या पुस्तकाचें अंतिम ध्येय आहे." भांडवलशाही अर्थव्यवस्था कामगारवर्गाच्या रूपानें आपल्या विनाशक शक्ती कशा निर्माण करते, त्याचप्रमाणें या व्यवस्थेंतील आर्थिक अरिष्टांतूनच क्रान्तीस पोषक वातावरण कसें निर्माण होतें हें त्यानें दाखवून दिलें. आर्थिक विषमता, उत्पादनसाधनांतील वेगवान् प्रगति, वाढती बेकारी, अनागोंदी उत्पादन, उत्पादनांतील मक्तेदाऱ्या, नफ्याची हांव, कृत्रिम टंचाई, एका विशिष्ट मर्यादेनंतर उत्पादनशक्तींच्या वाढीस घालण्यांत येणारा अटकाव, दर कांहीं वर्षांनीं येणारी आर्थिक मंदीची लाट, व अखेर भांडवलशाही उत्पादन

व्यवस्थेंत निर्माण होणारें निरन्तर अरिष्ट अभ्यासतां भांडवलशाही अर्थव्यवस्था अखेर कां विघातक ठरते याची चर्चा मार्क्सनें या ग्रंथांत केली आहे. भांडवलशाही उत्पादनव्यवस्थेंतून निर्माण होणाऱ्या वाढत्या उत्पादनशक्ती व भांडवलशाही समाजव्यवस्थेंतील प्रस्थापित उत्पादनसंबंध यांचा विग्रह अखेर अटळ आहे हें दाखवून दिलें आहे. भांडवलशाही समाजव्यवस्थेंत उत्पादन अधिकाधिक सांधिक व सामाजिक बनतें तर वांटप मात्र खाजगी मालकांच्या इच्छेनुसार व विषम होत राहातें हा या व्यवस्थेवरील मोठा आक्षेप आहे. उत्पादनसाधनांवर समाजाची मालकी प्रस्थापित करूनच ही विसंगति दूर होईल अशी शिकवण मार्क्सनें दिली व ही शिकवण फलद्रूप करण्यासाठींच 'वर्गयुद्ध व कामगार हुकुमशाहीचा सिद्धान्त' त्यानें मांडला.

"आजपर्यंतच्या तत्त्ववेत्त्यांनीं जग कसें आहे व कसें असावें याचा खल केला; पण खरा प्रश्न जग बदलण्याचा आहे." मार्क्सच्या या एका वाक्यावरून आपल्या जीवनांत त्यानें कोणत्या मुद्यावर अधिक भर दिला हें उघड होईल. आपल्या युगांत हा महान् बदल घडवून आणण्याची शक्ति कामगारवर्गात आहे हें त्यानें ओळखलें व कामगारांच्या वर्गलढ्यास एका व्यापक, ओजस्वी व बुद्धिनिष्ठ अशा क्रान्तिकारी तत्त्वज्ञानाची बैठक पुरविली.



: ६ :

# पहिली आंतरराष्ट्रसभा

**लंडनमधील** सेंट मार्टीन हॉलमध्यें २८ सप्टेंबर, १८६४ रोजीं भरलेल्या सभेतून पहिली आंतरराष्ट्रसभा अस्तित्वांत आली. समाजवादी चळवळीच्या इतिहासांत 'फर्स्ट इंटरनॅशनल' या नांवानें ती ओळखली जाते. तिचें मूळ नांव 'इंटरनॅशनल वर्किंगमेंन्स ॲसोसिएशन' ( आंतरराष्ट्रीय कामगारबंधूची सभा ) असें होतें.

इंग्लंडमधील चार्टिस्ट चळवळ अठराशें पन्नासनंतर अस्तास गेली तरी ब्रिटिश कामगारांतील परराष्ट्रांतील पुरोगामी चळवळींबद्दलचें आकर्षण कमी झालें नव्हतें. चार्टिस्ट चळवळीनंतर सुमारें पंधरा वर्षें कामगारवर्गाच्या सर्व हालचाली थंडावल्या होत्या. पण अमेरिकेंतील उत्तर व दक्षिण संस्थानांत गृहयुद्ध पेटलें तेव्हां त्यांची सहानुभूति उत्तर संस्थानांकडे होती. १८६३ सालचें पोलिश क्रान्तिकारकांचें बंड झारनें पुनरपि दडपून टाकलें तरी त्यांच्या शुभेच्छा पोलिश क्रान्तिकारकांच्या पाठीशीं होत्या. गॅरीबाल्डी आदि इटालियन स्वातंत्र्यवाद्यांचें ब्रिटिश कामगारांनीं उत्साहानें स्वागत केलें. आंतरराष्ट्रीय लाटेनें कामगारवर्ग पुनश्च कार्यप्रवण व उत्साही बनला व मतदान हक्कांतील सुधारणांसाठीं झगडूं लागला. थोड्याच वर्षांत या सुधारणा चळवळीला यश येऊन

दुसरें सुधारणा बिल पास झालें व ब्रिटिश राज्यसंस्था अधिक लोकशाही स्वरूपाची बनली. जॉर्ज ओडगेर, क्रेमर आदि नेते या दोन्ही आघाड्यांवर नेतृत्व करीत होते. त्यांच्याच प्रेरणेनें १८६३ मध्यें फ्रेंच, इटॅलियन व पोलिश कामगार नेत्यांत वैचारिक देवाण–घेवाण होऊन सप्टेंबर १८६४ च्या चौथ्या आठवड्यांत आंतरराष्ट्रसभा काढण्याचा निर्णय लंडन येथें एकत्र झालेल्या प्रतिनिधींनीं घेतला. मार्टीन हॉलमधील जाहीर सभेंत ज्या प्रतिनिधींनीं भाषण केलें त्यांत मार्क्सचा उल्लेख प्रामुख्यानें केला पाहिजे. याच सभेंत आंतरराष्ट्रसभेचें ध्येयधोरण स्पष्ट करणारें निवेदन तयार करण्यासाठीं एक तात्पुरती समिति नेमण्यांत आली. सभासदांत लंडन ट्रेड युनियन्सचे नेते, जुने चार्टिस्ट, ओवेनवादी, मॅझिनीचे चाहाते व इतर कांहीं प्रतिनिधी होते. पण त्यांनीं तयार केलेले मसुदे पास न झाल्यामुळें ही कामगिरी अखेर मार्क्सवर सोंपविण्यांत आली. 'प्रारंभिक निवेदनाच्या' स्वरूपांत त्यानें हा मसुदा तयार केला व तो सर्वानुमतें पास झाला.

कामगारवर्गाच्या राजकीय कामगिरीसंबंधीं मार्क्स व चार्टिस्ट नेत्यांत बरेंच मतैक्य होतें व ब्रिटिश कामगारपरंपरेबद्दल मार्क्सला नितांत आदर होता. त्या मनोभूमिकेंतूनच हें निवेदन त्यानें लिहिलें असल्यामुळें त्याचा सहज स्वीकार झाला. ब्रिटिश कामगारवर्ग व्यापक आंतरराष्ट्रीय दृष्टींतून सर्व प्रश्नांकडे पाहात नाहीं व त्यांच्या प्रयत्नाला सर्वव्यापी तात्त्विक अधिष्ठान नाहीं हीच त्याची प्रमुख तक्रार होती, पण आतां ती उणीव आपल्या नेतृत्वानें तो भरून काढणार होता.

१८५२ मध्यें कम्युनिस्ट लीग बरखास्त झाली तरी आपल्या आंतरराष्ट्रीय एकजुटीच्या कल्पनेचा प्रसार मार्क्स व एंगल्स करीतच होते. १८४८ नंतर क्रान्तिकारी प्रयत्नांची सर्वत्र पीछेहाट झाली होती तरी कम्युनिस्ट जाहीरनाम्याचा वाचकवर्ग कमी झाला नव्हता. पण तो जाहीरनामा आंतरराष्ट्रसभेला उपयोगीं पडला नाहीं. त्यासाठीं मार्क्सला नव्या परिस्थितीला व परंपरेला साजेसें नवें निवेदन लिहावें लागलें व तेव्हांच तें सर्वसंमत होऊं शकलें ही घटना ध्यानांत ठेवण्याजोगी आहे.

निवेदनांतील प्रास्ताविक भागांत १८४८ ते १८६४ मधील युरोपच्या आर्थिक परिस्थितीचा आढावा घेण्यांत आला आहे. या काळांत सर्व युरोपांत व विशेषतः इंग्लंडमध्यें, उद्योगधंद्यांत व व्यापारांत अभूतपूर्व अशी प्रगति होऊनहि श्रमिक जनतेचें दारिद्य मुळींच कमी झालें नाहीं. ग्लॅडस्टननें इंग्लंडच्या आयात–निर्यात वाढीचे नेत्रदीपक आंकडे मांडूनहि जर त्या भाषणाची कामगारांच्या राहाणी व आरोग्यासंबंधींच्या रिपोर्टांतील आंकड्यांशीं तुलना होती तर या भाषणांतून जनतेच्या दारिद्याचेंच विदारक दर्शन घडतें. यंत्र-सुधारणा, शास्त्रीय ज्ञानाची उत्पादनास जोड, वाढतीं दळणवळणाचीं साधनें, नववसाहती, नव्या बाजार पेठा, खुला व्यापार या एक वा सर्व गोष्टींचा अवलंब करूनहि कामगार वर्गाचें दारिद्य नष्ट झालेलें नाहीं अगर होऊं शकणार नाहीं हें कोणाहि प्रामाणिक युरोपीय विचारवंतास मान्य करावें लागलें असतें. जर हें सत्य दृष्टीआड करून उत्पादनांत यापुढें प्रगति केली गेली तर समाजांतील विग्रह अधिक तीव्रतर बनतील व परिस्थिति अधिक चिघळेल हें उघड होतें. उत्पादनाची वाढ अमानुष शोषणानेंच होऊं शकेल या कल्पनेविरुद्ध चार्टिस्ट निश्चयानें लढले व माणुसकीच्या दृष्टीनें व सामाजिक दूरदृष्टीनें उत्पादन नियंत्रित केलें पाहिजे असा आग्रह त्यांनीं धरला. म्हणूनच दहा तासांच्या कामाचा कायदा ही केवळ एक सुधारणा नसून त्यांनीं प्रतिपादिलेल्या राजकीय अर्थशास्त्राचा तो विजय आहे. ओवेनच्या प्रेरणेनें सुरू झालेल्या सहकारी उत्पादन प्रयत्नांनींहि ही गोष्ट सिद्ध केली कीं उत्पादन कार्यास भांडवलदाराची गरज आहेच असें नाहीं. पण तेवढ्यानें वाढत्या मक्तेदाऱ्यांना शह बसत नाहीं व श्रमिकांच्या दारिद्याचा प्रश्न सुटत नाहीं. त्यासाठीं कामगारवर्गानें राजसत्तेवर ताबा मिळविला पाहिजे व शासन-संस्थेचा उपयोग आपल्या हितसंवर्धनासाठीं केला पाहिजे. त्यांच्याजवळ यशाला अनुकूल अशी एकच शक्ति आज आहे. ती म्हणजे त्यांचें संख्याबल. पण जेव्हां सर्व ठिकाणचें हें संख्याबल एकजूट करील व त्याला बौद्धिक मार्गदर्शन लाभेल तेव्हांच त्याला यश मिळेल. या जाणिवेंतूनच ही सभा निर्माण होत आहे. पण कामगारांचें देशप्रेम, नव्हे त्यासंबंधींचे प्रचलित पूर्वग्रह, त्यांच्या

सरकारांनीं आपमतलबासाठीं वापरून घेतले, त्यांच्या भावना अधिक दूषित बनविल्या, तर कामगारवर्गाच्या दास्यविमोचन प्रयत्नांत अनेक राष्ट्रांतील कामगार सहकार्य करूं शकणार नाहींत. अशा प्रसंगीं मुत्सद्यांच्या कारवाया बंद पाडाव्या लागतील. त्यांच्या असत्य प्रचारावर झगझगीत प्रकाश टाकावा लागेल. दोन व्यक्तींमधील संबंध ज्या नैतिक व न्यायाच्या निकषावर पारखले जातात त्याच निकषानें राष्ट्राराष्ट्रांतील संबंधांची पारख व्हावी हें महान् तत्त्व त्यांच्या गळीं उतरवावें लागेल. अशा सत्यनिष्ठ परराष्ट्रीय धोरणासाठीं प्रत्येक देशांतील कामगारांनीं झगडणें हें दास्यविमोचन–चळवळीचें महत्त्वाचें अंग बनलें पाहिजे. निवेदनाचा शेवट, सर्व देशांतील कामगार बंधूंनो एक व्हा, या वाक्यानें करण्यांत आला आहे.

पूर्वीच्या पंधरा वर्षांच्या काळांत कामगार चळवळीला युरोप व इंग्लडमध्यें किती ओहोटी लागली होती याची कल्पना सभेंतील भाषणांवरून येऊं शकते. "इंग्लंड व युरोपमधील कामगारवर्गानें आपल्या हितरक्षणासाठीं न दाखविलेली एकजूट निदान त्यांच्या सार्वत्रिक पीछेहाटींत दिसून आली" हे नेत्यांचे उद्गार निषेधाइतकेच कामगारवर्गाला नवी चेतावणी देणारे होते. मार्क्सनें आपल्या भाषणांत कामगारांना स्वतंत्र मजूर पक्ष स्थापण्यास, पार्लमेंटमध्यें सामाजिक सुधारणांसाठीं व फॅक्टरी कायद्यांसाठीं भांडण्यास, मुत्सद्यांच्या कारवाया हाणून पाडण्यास व हें सर्व करीत असतां तीव्र वर्गयुद्ध उभारून, राजसत्तेवर ताबा मिळवून, उत्पादनाचीं सर्व साधनें राष्ट्राच्या मालकीचीं होईपर्यंत ते निर्धारानें चालू ठेवण्यास आवाहन केलें.

पहिल्या आंतरराष्ट्रसभेची इमारत ट्रेड युनियन चळवळीच्या पायावर उभारलेली होती. मार्क्सनें कामगारांना लंडन येथील सभेंत स्वतंत्र राजकीय पक्ष स्थापण्यास आवाहन केलें असलें तरी अजून युरोपभर समाजवादी पक्ष स्थापन होण्यास कांहीं काळ लोटावयाचा होता. तेव्हां आंतरराष्ट्रसभेंतील मुख्य मतभेद ट्रेड युनियन चळवळीच्या धोरणांतूनच निर्माण झाले. पहिल्या वर्षी ओडगेर व क्रेमर यांचेबरोबर हेन्री ब्रॉडहर्स्ट, रॉबर्ट हार्टवेल, जॉर्ज हॉवेल आदि

अनेक ट्रेड युनियन पुढारी आंतरराष्ट्रसभेंत सामील झाले. पण दुसरें सुधारणा बिल पास झाल्यावर ते आंतरराष्ट्रसभेंतून बाहेर पडले. आंतरराष्ट्रसभेस जोडून घेतलेल्या अनेक फ्रेंच, स्विस, जर्मन, बेलजियन, इटॅलियन, रशियन संघटनांच्या नेत्यांचा कामगार चळवळीसंबंधींचा दृष्टिकोण त्यांना पसंत नव्हता. पार्लमेंटरी राजकारणाचें कामगार चळवळींतील स्थान काय आहे या मुद्यावरून आंतर-राष्ट्रसभेंत पहिली वैचारिक दुही निर्माण झाली. समाजवादाच्या उद्दिष्टांबद्दल भिन्नभिन्न देशांतील प्रतिनिधींत फारशी मतभिन्नता नव्हती. मार्क्स व त्याचे समर्थक पार्लमेंटरी राजकारणाची आघाडी कामगारांनीं लढविली पाहिजे अशा मताचे होते तर बहुतेक फ्रेंच, इटॅलियन, स्पॅनिश व रशियन कामगार नेत्यांनीं कामगारांच्या सर्व शक्ती आर्थिक व वर्गीय लढ्यावरच केन्द्रित झाल्या पाहिजेत असा आग्रह धरला होता. ओवेनवादी, प्रूधाँवादी व अराज्यवादी नेत्यांच्या या गटांत बाकूनीन व त्याच्या अनुयायांचा एक पोट-गट होता. प्रस्थापित राजसत्ता सशस्त्र बंड करून उखडून टाकण्यासाठीं कामगारांच्या छोट्या गुप्त संघटनांचें जाळें सर्वत्र पसरण्यांत यावें अशी त्याची विचारसरणी होती.

खुद्द मार्क्स पार्लमेंटरी राजकारणाच्या आघाडीचा पक्षपाती असला तरी त्याच्या विचारप्रणालींत राजकारणाहून अर्थकारणास अधिक प्राधान्य दिलें गेलें असल्यामुळें त्याच्या वर्गयुद्धाच्या डांवपेंचांचा एकेरी पुरस्कार करणाऱ्या गटांस मार्क्सकडून अनाहूत पाठबळ मिळत होतें. सर्व सामाजिक अन्यायांचें आद्य कारण उत्पादनसाधनांवरील मक्तेदारी हें आहे हा मार्क्सच्या विचारसरणीचा मध्यबिंदु होता. तेव्हां त्या मक्तेदारीस आव्हान देणारी कामगारआघाडी व तिचे वर्गलढे हेच कामगार चळवळींच्या डांवपेंचांत अग्रभागीं असले पाहिजेत अशी भूमिका मार्क्सविरोधी गटानें घेतली होती. इंग्लंड व प्रशियांतील कामगार-प्रतिनिधींना सार्वजनिक मतदानाच्या हक्कासाठीं होणाऱ्या चळवळींत विशेष रस असला तरी फ्रान्स, इटली, स्पेनमधील कामगार प्रतिनिधींचा, स्वदेशांतील पार्लमेंटरी राजकारणावरील विश्वास पार उडाला होता. अनियंत्रित झारशाहींतहि अशा राजकारणास अनुकूलता नव्हती. कामगारांचे क्रान्तिकारी गुप्त गट स्थापन

करून झारविरुद्ध सशस्त्र बंड करणें हा एकच मार्ग रशियन क्रान्तिकारकांपुढें होता व म्हणूनच बाकूनीनच्या पोट–गटानें त्या मार्गाचा आंतरराष्ट्रसभेंत हिरीरीनें पुरस्कार केला.

आंतरराष्ट्रसभेच्या कामकाजासाठीं जे तात्पुरते नियम ठरविण्यांत आले होते त्यानुसार कोणत्याहि व्यक्तीस वा संघटनेस सभेचें सभासद होतां येणार होतें. सभेच्या कामकाजांत निरनिराळ्या देशांतील कामगार संघटनांचे अधिक घनिष्ट संबंध निर्माण करण्यास प्राधान्य देण्यांत आलें होतें. कामगारांच्या विमोचनाचा प्रश्न स्थानिक व राष्ट्रीय नसून तो एक सामाजिक प्रश्न आहे, इतिहासाचा अनुभव जमेस धरतां सर्वत्र इतस्ततः पसरलेल्या विस्कळित कामगार-संघटना व चळवळी एकजीव व केंद्रित होणें अपरिहार्य व आवश्यक आहे, प्रत्येक राजकीय चळवळ कामगारांचें आर्थिक स्वातंत्र्याचें ध्येय डोळ्यांपुढें ठेवूनच झाली पाहिजे व सर्व राष्ट्रांतील कामगार चळवळींत आंतरराष्ट्रीय बंधुभाव निर्माण केला गेला पाहिजे असे विचार उद्दिष्ट विभागांत व्यक्त करण्यांत आले होते.

कामगारवर्गाच्या सामुदायिक आकांक्षा सर्व युरोपीय जनतेस जाहीर करण्यासाठीं, कामकाजाचे तात्पुरते नियम घटनाबद्ध करण्यासाठीं व मध्यवर्ती समिती स्थापन करण्यासाठीं एक वर्षाच्या काळांत आंतरराष्ट्रसभेंत सामील होणाऱ्या संघटनांच्या प्रतिनिधींची बैठक १८६५ मध्यें बेल्जियममध्यें भरविण्याचा निर्णय पहिलें अधिवेशन समाप्त होण्यापूर्वी घेण्यांत आला. या बैठकींत (१) प्रत्येक देशांतील कामगारांच्या हालचालींची इतर सर्व राष्ट्रांतील कामगारांना माहिती करून देणें, (२) मध्यवर्ती मार्गदर्शनाखालीं युरोपमधील निरनिराळ्या देशांतील सामाजिक परिस्थितीचा सर्वांगीण व एकत्रित अभ्यास करून अहवाल तयार करणें, (३) सर्वांच्या जिव्हाळ्याचा एकादा प्रश्न कुटल्याहि राष्ट्रांत निर्माण झाला तर त्यास सर्वत्र पाठिंबा मिळविणें व (४) एकादी आंतरराष्ट्रीय समस्या निर्माण झाली तर सर्व संबंधित संघटनांमार्फत एकाच वेळीं एकसूत्री हालचाल करणें या चतुःसूत्री कार्यक्रमाचा स्वीकार

करण्यांत आला. मध्यवर्ती समितीनें या सर्व प्रश्नांत पुढाकार घेऊन सभासद संघटनांस मार्गदर्शन करावें असेंहि ठरविण्यांत आलें.

आंतरराष्ट्रसभेच्या स्थापनेनंतर ४ नोव्हेंबर १८६४ रोजीं एंगल्सला लिहिलेल्या पत्रांत मार्क्सनें म्हटलें होतें, "आजच्या कामगार चळवळीच्या दृष्टिकोणाशीं न जुळणारा व त्यांना अमान्य होईल अशा भाषेंत मांडलेला आपला दृष्टिकोण त्यांच्या गळीं उतरविणें मला फार कठिण गेलें आहे." आंतरराष्ट्रसभेच्या कारकीर्दींत प्रचलित कामगार चळवळींवर आपला दृष्टिकोण लादण्याचा जागरूक प्रयत्न मार्क्सनें अनेकवार केला पण त्यांत त्याला यश लाभलें नाहीं.

आंतरराष्ट्रसभेचीं १८६५ मध्यें लंडन, १८६६ : जिनेव्हा, १८६७ : लोझां, १८६८ : ब्रुसेल्स, १८६९ : बर्न व १८७२ : हेग अशीं एकूण सहा अधिकृत वार्षिक अधिवेशनें झालीं.

जिनेव्हा परिषदेसाठीं मार्क्सनें तयार केलेल्या ठरावावरून तो क्रान्तिकारी ट्रेड युनियनवादाचा निःसीम पुरस्कर्ता होता ही गोष्ट स्पष्ट होते. या ठरावांत तो म्हणतो कीं आज भांडवल ही एक केन्द्रित समाजसत्ता बनली आहे तर कामगार केवळ व्यक्तिगत श्रमशक्तीचे मालक आहेत. कामगारांची अगणित संख्या ही एकच सामाजिक शक्ति कामगार आज आपलीशी करूं शकेल. पण ती शक्तिहि आज विस्कळित व दुबळी आहे. स्वतःच्या नोकरीसाठीं कामगार परस्परांत स्पर्धा करीत आहेत. ट्रेड युनियन्सचा जन्म ही परिस्थिति नाहींशी करण्यासाठींच झाला आहे. ट्रेड युनियन्सचें ताबडतोबीचें कार्य कामाचे तास निश्चित व मर्यादित करणें व मजुरीचे लढे देणें हेंच आहे. त्यासाठीं सर्व देशांतील कामगारांची एकजूट उपयुक्तच ठरेल. भांडवल व कामगार यांमधील हे दैनंदिन लढे लढण्याचें कार्य ट्रेड युनियन्सना करावयाचें आहेच, पण मजुरीची प्रथा व भांडवलशाही प्रभुत्व यांविरुद्ध झगडणें हें या संघटित संस्थांचें त्याहूनहि महत्त्वाचें कार्य आहे....आपल्या ऐतिहासिक भूमिकेची त्यांना अजून पुरेशी जाणीव झालेली नाहीं....सर्वसाधारण सामाजिक व राजकीय चळवळींपासून ट्रेड युनियन्स अलिप्त राहिल्या आहेत....श्रमिक वर्गाच्या संपूर्ण दास्यविमोचनाचें ट्रेड युनियन्स

केन्द्र बनल्या पाहिजेत...या अशा प्रत्येक सामाजिक व राजकीय चळवळींत त्यांनीं भाग घेतला पाहिजे....अशा प्रयत्नांतूनच, ट्रेड युनियन्स केवळ आपल्या संकुचित स्वार्थी हेतूसाठीं झटत नसून, असंघटित व सर्वत्र विखुरलेल्या लक्षावधि दलित जनतेच्या मुक्ततेसाठीं झगडत आहेत अशी श्रद्धा त्यांना लाभेल.

मार्क्सनें जिनेव्हा अधिवेशनांत हा ठराव मांडून समाजक्रान्तींत ट्रेड युनियन्सना शौर्याची व क्रान्तिनिष्ठ भूमिका दिली होती. पार्लमेंटरी राजकारणास या परिवर्तनांत दुय्यम स्थान होतें. आर्थिक क्रान्तीचें तें केवळ साधन होतें. मार्क्सचा हा कल आंतरराष्ट्रसभेंतील अराज्यवादी व पार्लमेंटरी आघाडीविरोधी प्रतिनिधींनीं पूरेपूर उपयोगांत आणला व आंतरराष्ट्रसभेच्या कार्यक्रमांतून पार्लमेंटरी राजकारणाची पद्धतशीरपणें हकालपट्टी केली. फ्रान्समधील कामगार-वर्गास क्रान्तिकारक परंपरा होती. तीन्ही फ्रेंच क्रान्त्यांत तो स्वार्थत्यागपूर्वक लढला होता व त्या क्रान्त्यांतून निर्माण झालेल्या राजसत्तांनीं त्याचा पुरा भ्रमनिरास केला होता. प्रूधाँच्या शासनसंस्थाविरोधी विचारसरणीचाहि बराच प्रभाव फ्रेंच, इटॅलियन, स्पॅनीश चळवळीवर होता. त्यामुळें पहिली आंतर-राष्ट्रसभा केव्हांच मार्क्सवादी बनूं शकली नाहीं.

आंतरराष्ट्रसभेच्या पहिल्या चार वर्षांच्या काळांत ब्रिटिश ट्रेड युनियनवादी व जर्मन लासालियन्स व मार्क्सवादी यांच्या साहाय्यानें मार्क्सनें आपल्या नेतृत्वाची छाप सभेच्या कामकाजावर टाकली हें खरें पण त्यानंतर अराज्यवादी व सशस्त्र बंडाचा पुरस्कर्ता बाकूनीन व मार्क्स यांचे तीव्र मतभेद झाले. सभेच्या कामकाजांत व्यक्तिगत हेवेदावे व वितुष्टें पराकोटीला गेलीं. संघटनेंत लाथाळी सुरू झाली. १८६७ सालीं मार्क्स आंतरराष्ट्रसभेबद्दल फार आशावादी होता. एंगल्सला या वर्षी लिहिलेल्या पत्रांत मार्क्स म्हणतो, "आतां संघटना गति पकडीत आहे. कदाचित् पुढील क्रान्ति अपेक्षेपेक्षां लवकर सुरू होईल. अशावेळीं आपल्या हातांत ही शक्तिमान संघटना असणार आहे."* पण

* सोशल इकॉनमिक मूव्हमेंट्स : पान १५५

वस्तुस्थितींत ही संघटना अशा आणीबाणीच्या वेळीं शक्तिमानहि बनली नव्हती व मार्क्सच्या हातीं तर ती बिलकूलच राहिली नाहीं.

युरोपमधील राजकीय परिस्थिति या काळांत पुनश्च चिघळूं लागली. युद्धाचे वारे वाहूं लागले होते. आंतरराष्ट्रसभेच्या एका प्रमुख श्रद्धेची व कामगिरीची सत्त्वपरीक्षा लवकर होणार होती. १८७० च्या जुलैंत स्पॅनीश गादीवर कोणास बसवावें या मुद्यावर बिस्मार्क व फ्रेंच राजा लुई बोनापार्टचे सल्लागार यांच्यांत मतभेद झाले व त्याचा परिणाम १४ जुलैला फ्रान्स व जर्मनींत पुनश्च युद्ध सुरू होण्यांत झाला. "जनतेची इच्छा लक्षांत घेऊन आम्हांस नाईलाजानें जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारावें लागत आहे" असा खुलासा बोनापार्टनें केला व फ्रान्समध्यें धुमसत असलेल्या अंतर्गत असंतोषाला परराष्ट्रावर आक्रमण करून वाट काढून देण्यांत आली. २ सप्टेंबरला बोनापार्ट जर्मन सैन्याच्या हातीं सांपडला तेव्हां ४ सप्टेंबरला पॅरीस येथें पुनश्च लोकसत्ताकाची घोषणा झाली व फ्रेंच जनता एक तसूभरहि जमीन शत्रूला कायमची गिळूं देणार नाहीं असा निर्धार नव्या सरकारनें घोषित केला. दोन लाखांची सेना उभारली गेली पण जर्मन लष्करी सामर्थ्यापुढें लोकसत्ताक सरकारचा अखेर टिकाव लागला नाहीं.

फ्रेंच—जर्मन युद्धाच्या काळांत मार्क्सनें आंतरराष्ट्रसभेच्या मध्यवर्ती समितीच्या वतीनें फतवे काढले. युद्धाच्या स्वरूपाविषयीं तात्त्विक चर्चा केली. जर्मन कामगारांना उद्देशून काढलेल्या फतव्यांत त्यानें बजावलें कीं हें युद्ध अखेरपर्यंत संरक्षक युद्धच राहिलें पाहिजे; तें ज्या क्षणीं आक्रमक ठरेल त्या क्षणीं जर्मन कामगारांनीं या युद्धास पाठिंबा देणें बंद करावें. युद्ध फ्रेंच राजेशाहीविरुद्ध आहे व तें फ्रेंच जनतेविरुद्ध चालू ठेवण्यास तुम्ही सक्त विरोध केला पाहिजे. फ्रेंच कामगारांना उद्देशून काढलेल्या पत्रकांत, बोनापार्टच्या पाडावांतून निर्माण झालेल्या हंगामी लोकसत्ताक सरकारला फ्रेंच कामगारांनीं पाठिंबा द्यावा असा आदेश मार्क्सनें दिला. युद्ध सुरू होतांच १२ सप्टेंबर १८७० ला एंगल्सनें मार्क्सला लिहिलेल्या पत्रांत म्हटलें होतें कीं "पॅरीसमध्यें आज कांहीं करतां येण्यासारखें असेल तर हें युद्ध संपून शांतता प्रस्थापित

होईपर्यंत फ्रेंच कामगार आपल्या जबाबदारीवर कांहीं उचल करणार नाहींत असे सर्व प्रयत्न झाले पाहिजेत...पॅरीसला वेढा पडून या युद्धाची परिणति, अडथळे उभारून पॅरीसचें रक्षण करणाऱ्या फ्रेंच कामगारांशीं जर्मन लष्करानें, युद्ध खेळण्यांत होणार असेल तर ती गोष्ट हिडीस ठरेल. आपली पन्नास वर्षांनीं पीछेहाट होईल."* पण क्रांतिकालांत आंतरराष्ट्रसभेची 'शक्तिमान संघटना' उपयोगांत आणण्याची मार्क्सची मनीषा विफल ठरली होती. पॅरीस कामगार मार्क्स व एंगल्सचें मार्गदर्शन स्वीकारणार नव्हते.

लोकसत्ताक सरकारचा राष्ट्रीय संरक्षक सेनेच्या हातांतील तोफा काढून घेण्याचा आदेश पॅरीसच्या जनतेनें उठाव करून उधळून लावला. सरकारी सेनेनें जनतेवर बंदुका चालविण्यास नाखुषी दर्शवली व सरकार पॅरीस सोडून जातांच १८ मार्च १८७१ ला पॅरीस कम्यूनची घोषणा झाली. पॅरीस कम्यून-मध्यें निवडून आलेल्या प्रतिनिधींत जॅकोबिन्स, ब्लँक्वीस्ट व आंतरराष्ट्रसभेचे अल्पसंख्य प्रतिनिधि होते. कम्यूनचें स्वरूप पार्लमेंट व सरकार असें दुहेरी होतें. कम्यूनचे क्रान्ति पसरविण्याचे प्रयत्न विफल ठरले. पॅरीस कम्यून आपल्याच देशांत वास्तव्य करणाऱ्या प्रतिगामी सरकारचा पाडाव करूं शकलें नाहीं, कारण त्यांना जर्मन लष्करी सत्तेचें पाठबळ होतें. अखेर कम्यूनचा पाडाव झाला. एकट्या पॅरीस शहरांत वीस हजार लोक ठार मारले गेले. हजारों कामगार तुरुंगांत डांबले गेले. जणुं पॅरीसची क्रान्तिकारी कामगार पिढी गारद झाली. मार्क्सच्या मतें विजयी कामगार वर्गानें क्रान्तीनंतर लगेच समर्थ व लढवय्यें केन्द्रीय सरकार स्थापन करावयास हवें होतें. अशी 'कामगार हुकुमशाही' लोकशाही विरोधी न ठरतां उलट तिचें प्रतिकारक्षम दर्शन ठरलें असतें. कम्यूनचें अपयश, मार्क्स–एंगल्स पुरतें तरी एका क्रान्तिखंडाचा शेवट ठरणार होतें. इतर युरोपीय राष्ट्रांतहि बराच काळ कामगार लोकशाही स्थापन होण्याची शक्यता नव्हती. तरीहि '१८७१ चें फ्रेंच गृहयुद्ध' हें पुस्तक लिहून मार्क्सनें धैर्यानें कम्यूनचें समर्थन केलें. आंतरराष्ट्रसभा व कम्यून यांचा संबंध जनतेच्या मनांत जोडला.

---

* डेमॉक्रसी अॅण्ड सोशलिझम: पान १९४

आंतरराष्ट्रसभेंत पुढाकार घेतांना भिन्न दृष्टिकोण असणाऱ्या फ्रेंच व इंग्लिश कामगारवर्गास एका क्रान्तिकारी लोकशाही व्यासपीठावर एकत्रित आणण्याची उमेद मार्क्सनें व एंगल्सनें बाळगली होती. पण पॅरीस कम्यूननंतर फ्रेंच कामगार हतबल झाले व आंतरराष्ट्रसभेशीं संबंध ठेवणें इंग्लिश कामगार-वर्गास रुचलें नाहीं. त्यांना मतदानाचा हक्क मिळाला होता व ट्रेड युनियन्सचें कायदेशीर अस्तित्व धोक्यांत घालण्यास ते तयार नव्हते. बाकूनीनवादी अराज्यवाद्यांचा आंतरराष्ट्रसभेंतील विरोध पराकोटीस पोहोंचला होता व १८७१ नंतर बदललेल्या राजकीय परिस्थितींत आंतरराष्ट्रसभा नव्या क्रान्तीची चालक-शक्ति बनण्याची शक्यता मार्क्सला वाटत नव्हती. अर्थात् आंतरराष्ट्रसभेचें ऐतिहासिक कार्य संपुष्टांत आलें असलें तरी या संघटनेचें नांव व प्रतिष्ठा अराज्यवाद्यांनीं वापरूं नये याची खबरदारी तो घेणार होता. म्हणूनच १८७२ च्या अधिवेशनांत त्यानें आंतरराष्ट्रसभेच्या मध्यवर्ती समितीचें केन्द्र लंडनहून न्यूयॉर्कला हलवावें ही सूचना पास करून घेतली.

युरोपांतील क्रान्तिजन्य लोकशाही चळवळीचें ऐतिहासिक कार्य स्वतःच्या हिंमतीवर व स्वतंत्रपणें पुरें करण्याचा कामगारवर्गाचा प्रयत्न पॅरीस कम्यून-बरोबर संपुष्टांत आला होता. हेग अधिवेशनांत मार्क्सनें कामगार लढ्याच्या स्वरूपाविषयीं व तंत्राविषयीं कांहीं नवे महत्त्वपूर्ण विचार मांडले. क्रान्तीचें तंत्र प्रत्येक देशांत एकाच प्रकारचें असणार नाहीं व इंग्लंड अमेरिकेसारख्या देशांत शांततामय मार्गांनीं क्रान्ति यशस्वी होऊं शकेल असें त्यानें जाहीर केलें. मार्क्स म्हणतो, “ निरनिराळ्या देशांतील सामाजिक संस्था, चालीरीति, व रूढि यांचा विचार लढ्याचें तंत्र ठरवितांना केला पाहिजे याची आम्हांला जाणीव आहे. इंग्लंड, अमेरिका व संभाव्यतः हॉलंड हे देश असे आहेत कीं जेथें कामगार, शान्ततामय मार्गांनीं आपलें ध्येय गांठूं शकतील हें आम्ही नाकबूल करूं शकत नाहीं. मात्र सर्व देशांत ही वस्तुस्थिति नाहीं. ” *

---

* सोशल इकॉनमिक मूव्हमेंट्स : पान १५६

याच हेग अधिवेशनांत बाकूनीनचें अनुयायित्व स्वीकारलेल्या अराज्य-वाद्यांची आंतरराष्ट्रसभेतून हकालपट्टी करण्यांत आली. अर्थात् त्यांच्या हकाल-पट्टीबरोबर आंतरराष्ट्रसभेचें संघटन एकदमच खिळखिळें झालें. पण मार्क्सला त्याची पर्वा करण्याचें कारण आतां शिल्लक राहिलें नव्हतें. १८७३ मध्यें जिनेव्हाचें अधिवेशन कसेंबसें झालें. पण तिची संघटनात्मक हालचाल नंतर पूर्ण थंडावली व १८७६ मध्यें फिलाडेल्फियांत पहिली आंतरराष्ट्रसभा रीतसर बरखास्त करण्यांत आली.

हेग परिषदेंतून बाहेर फेंकल्या गेलेल्या अराज्यवादी गटानें १८७४ मध्यें ब्रूसेल्सला, १८७६ मध्यें बर्नला व १८७७ मध्यें व्हर्व्हेसला अधिवेशनें भरविलीं. पण त्यानंतर हा आंतरराष्ट्रीय फुटीर गटहि नामशेष झाला. पॅरीस कम्यूनबरोबर समाजवादी चळवळीच्या इतिहासांतील पहिल्या आंतरराष्ट्रीय संघटनेचा अशा तऱ्हेनें अस्त झाला होता.



: ७ :

# जर्मन सोशल डेमॉक्रसी

**पहिली** आंतरराष्ट्रसभा बरखास्त झाली तेव्हां जे मूठभर राजकीय समाजवादी पक्ष अस्तित्वांत आले होते त्यांत जर्मनीमधील लासालच्या कामगार पक्ष व जर्मन सोशल डेमोक्रॅटिक वर्कर्स पार्टी (जर्मन समाजवादी लोकशाही कामगार पक्ष) यांचा समावेश प्रामुख्यानें होतो. कांहीं वर्षांनीं यांच्याच संयुक्त पक्षानें दुसरी आंतरराष्ट्रसभा स्थापन करण्यांत पुढाकार घेतला. तसेंच मार्क्सवादाची परंपरा, पहिल्या आंतरराष्ट्रसभेनंतर या पक्षानेंच प्रामुख्यानें पुढें चालविली. समाजवादी चळवळींत मार्क्सवादास विशेष स्थान मिळवून दिलें. तेव्हां समाजवादी विचारांचा व चळवळींच्या विकासाचा आढावा घेतांना जर्मन सोशल डेमॉक्रसीचा अभ्यास प्रथम करणें उपयुक्त ठरेल.

जर्मन राष्ट्राचा अभ्युदय अभ्यासतांना हेगेलचें तत्त्वज्ञान, फ्रेड्रीच लीस्ट आदि अर्थशास्त्रज्ञांचा आर्थिक दृष्टिकोण व बिस्मार्कचे जर्मनींत मध्यवर्ती केन्द्रित राज्यसत्ता उभारण्याचे प्रयत्न विशेष उल्लेखनीय आहेत. हेगेलनें जर्मन जनतेला आध्यात्मिक राष्ट्रवादाची तात्त्विक बैठक पुरविली. इंग्लंड, अमेरिका, फ्रान्स यामधील भांडवलशाही राज्यक्रात्यांना क्रान्तिकारी व्यक्तिवादाचें तात्त्विक अधिष्ठान होतें; तर व्यक्तिवादी तत्त्वज्ञानास आव्हान देऊनच हेगेलनें जर्मन

राष्ट्रवादाचें तात्त्विक अधिष्ठान निर्माण केलें. प्रत्येक व्यक्तीप्रमाणें राष्ट्रास प्राण आहे, बुद्धि आहे, आत्मा आहे, एवढेंच नव्हे तर व्यक्तीचा विकास राष्ट्रीय विकासावरच अवलंबून आहे अशी शिकवण त्यानें जर्मन जनतेस दिली. व्यक्ति-स्वातंत्र्याच्या त्याच्या कल्पना निराळ्या होत्या. धार्मिक कल्पना, सामाजिक बंधनें व राजकीय कायदे पाळण्यांत व्यक्तिस्वातंत्र्य नष्ट होत नाहीं. उलट राष्ट्रीय जीवनांतूनच व्यक्तिस्वातंत्र्याचा उगम होतो. राज्यसत्तेविरुद्ध बंड पुकारण्यास मुभा देणारा क्रान्तिकारी व्यक्तिवाद राष्ट्रास विघातक आहे; कारण राज्यसत्ताच दुर्जनांचें नियंत्रण व जनतेचें पालनपोषण करते तेव्हां तिच्याविरुद्ध बंड करणें कधींहि समर्थनीय ठरणार नाहीं. जर्मनीच्या एकीकरणास व पुढें जर्मन राष्ट्रीय परंपरेंतील दोषास ही हेगेलनें जनतेस दिलेली शिकवणच कारणीभूत झाली. व्यक्तीचा बंडाचा अधिकार धिक्कारून या विचारसरणीनें परंपरागत सामाजिक व आर्थिक अन्याय दृढमूल होण्याचा धोका निर्माण केला. राज्यकर्त्यांस सार्वजनिक मन व बुद्धि विचारांत घेण्याचा व व्यक्त करण्याचा हक्क बहाल केल्यानें सत्ताधिष्ठ वर्ग समर्थ व अरेरावी बनला. सामाजिक अंतर्विरोध व असंतोष प्रकट करण्याचे मार्ग निषिद्ध ठरल्यामुळें समाजाची संतत व विकासी प्रक्रिया चालू राहणार नव्हती. एका काळांत समाजधारणेस पोषक असलेलीं बंधनें पुढें बदलत्या परिस्थितींत विघातक ठरतात. अशा वेळीं सामाजिक बंधनांचें समर्थन विकासाच्या आड येतें. सत्ताधारी वर्गांतील हुकुमशाही व अनियंत्रित प्रवृत्ति बळावण्याचा संभव असतो. पण ही सर्व टीका हेगेलच्या काळांतील जर्मनीच्या परिस्थितीचा विचार करतां केवळ शाब्दिक ठरली असती. इंग्लंड, अमेरिका व विशेषतः फ्रान्सची औद्योगिक भरभराट व साम्राज्यवाद जर्मन जनतेच्या व्यक्तिगत उत्कर्षास प्रतिकूल होती. फ्रान्सच्या आक्रमक राष्ट्रवादास जर्मन जनतेला तोंड द्यावयाचें होतें. मार्क्सला अभिप्रेत असलेला समाजक्रान्तिक्रम पुरा करण्याचें सामर्थ्य व उत्साह जर्मन भांडवलदार वर्गाजवळ नव्हता. ती फुरसतहि त्यास लाभली नाहीं. साहजिकच हेगेलच्या आध्यात्मिक राष्ट्रवादांतून जर्मन जनतेनें राष्ट्रवादाचे धडे घेतले व आपल्या राष्ट्राच्या अभ्युदयाकडे तिनें सर्व लक्ष केन्द्रित केलें.

हेगेलच्या आध्यात्मिक राष्ट्रवादाइतकाच जर्मन जनतेच्या दृष्टीनें फ्रेडीच लीस्टचा अर्थसिद्धान्त मोलाचा होता. अमेरिकेंतील कांहीं वर्षांच्या वास्तव्यांत लीस्टनें अमेरिकेंतील औद्योगिक विकासाचा अभ्यास केला होता. साम्राज्यवादी ब्रिटनबरोबर आर्थिक क्षेत्रांत स्पर्धा करून नव्यानेंच आपला उत्कर्ष करूं मागणाऱ्या अमेरिकेकडून त्यास बरेच धडे शिकतां आले. लीस्टच्या काळांत सर्वत्र आंतरराष्ट्रीय खुल्या व्यापाराच्या सिद्धान्ताचा उदोउदो होत होता. पण उद्योगधंद्यांत प्रगति न झालेलीं राष्ट्रें आंतरराष्ट्रीय खुल्या व्यापारी स्पर्धेत टिकूं शकणार नाहींत व अशा राष्ट्रांची औद्योगिक प्रगति खुरटेल अशी भूमिका लीस्टनें घेतली. तो लिहितो, "मी आंतरराष्ट्रीय खुल्या व्यापाराच्या बाजूचा आहें, पण त्यापूर्वी पुढारलेल्या राष्ट्रांइतकीच उद्योगधंद्यांत मागसलेल्या राष्ट्रांची प्रगति व्हावयास हवी. कुठल्याहि विशिष्ट वेळीं कोणत्या राष्ट्राजवळ किती धन आहे हें पाहून राष्ट्राचें वैभव निश्चित करतां येणार नाहीं; मूल्य निर्माण करण्याचें उत्पादन सामर्थ्य त्या राष्ट्राजवळ किती आहे हें पाहिलें पाहिजे. धन निर्माण करण्याची शक्ति ही धनाहून अधिक मोलाची आहे. कारण धनांत सतत वाढ न होईल तर शिल्लक कमी होऊन व्यक्ति भिकारी बनेल. एकट्या-दुकट्या भांडवलदाराहून हा धोका राष्ट्रास अधिक आहे.... पुढारलेल्या राष्ट्रांनीं आपली आर्थिक व औद्योगिक भरभराट खुल्या व्यापाराचें तत्त्व सांगण्यापूर्वी करून घेतली आहे व एकदां हें वैभवाचें शिखर गांठल्यावर, ती शिडी दूर फेंकून देऊन, इतरांना हें शिखर गांठण्याचें साधनच खुल्या व्यापाराचे समर्थक नष्ट करूं पाहात आहेत...."* सारांश, नव्या राष्ट्रांनीं स्वराष्ट्रांतील उद्योगधंद्यांसाठीं घरची बाजारपेठ प्रथम सुरक्षित केली पाहिजे. आयातीवर कर बसवून, उद्योगधंद्यांस टॅरीफनें संरक्षण देऊनच ही भरभराट होऊं शकेल. जर्मनींतील उद्योगधंदे संरक्षण घेऊनच वाढणार होते. लीस्टनें सुचविलेल्या धोरणाच्या अम्मलबजावणीसाठीं समर्थ अशा केन्द्रित शासनसंस्थेची जरूरी होती. राष्ट्राचें आर्थिक व औद्योगिक धोरण ठरविण्यांत तिनेंच पुढाकार

---

* मॅन्स वर्ल्डली गुड्स : पान १५९

घ्यावयाचा होता. भांडवलशाही अर्थव्यवस्थेंत होणारे वर्गसंबंध अभ्यासून राष्ट्राच्या आर्थिक हितासाठीं त्यांचें नियमन व नियंत्रण ती करणार होती. त्यासाठीं कामगार हितसंवर्धक कायदे पास करण्यांत, सामाजिक सुधारणा घडवून आणण्यांत, शासनसंस्थाच पुढाकार घेणार होती. आपल्या उद्योगधंद्यांना संरक्षण व प्रोत्साहन मिळावें म्हणून भांडवलदारवर्गहि तिच्यावरच विसंबून राहाणार होता.

पण या काळांत राजकीय दृष्ट्या जर्मनी हें एक संघटित राष्ट्र बनलें नव्हतें. जर्मन लोकांचें वास्तव्य असणाऱ्या भूप्रदेशांत अनेक लहानमोठीं राज्यें होतीं. त्यांच्या संघराज्याचे खरे अधिकार या अनेक लहान राज्यांच्या बेचाळीस प्रतिनिधींचें जें कार्यकारी मंडळ होतें त्याच्याच हातांत होते. प्रशियाचा पंत-प्रधान या मंडळाचा प्रमुख असे. बिस्मार्क जेव्हां प्रशियाचा पंतप्रधान झाला तेव्हां त्यानें राज्यसत्तेच्या केन्द्रीकरणास जोरानें चालना देऊन मध्यवर्ती जर्मन शासनसंस्था निर्माण करण्याचें ऐतिहासिक कार्य हातीं घेतलें. चतुःसीमेवरील प्रबल ऑस्ट्रियन राजसत्तेचें वर्चस्व जर्मन एकीकरणाच्या आड येत होतें. पोलंडचा नवोदित राष्ट्रवाद प्रशियास धोका निर्माण करणारा होता. उलट पोलंड व इटलींतील लोकसत्ताक राष्ट्रवादी चळवळींना फ्रान्सचें नैतिक पाठबळ होतें. तेव्हां फ्रान्सलाहि पायबंद घालणें जरूर होतें. सर्व प्रतिकूल शक्तींवर मात करण्याचें कार्य त्यानें स्वतःच्या मुत्सद्देगिरीच्या व प्रशियन लष्करी सत्तेच्या बलावर हातीं घेतलें. क्लॉझेव्हिट्झ सारखे प्रशियन सेनानी जनतेला हीच शिकवण देत होते कीं 'शासनसंस्था सर्वश्रेष्ठ आहे. ... युद्ध हा राष्ट्रीय धोरणाचा व राजनीतीचाच एक आविष्कार आहे.' बिस्मार्कचे हात या परंपरेंत बळकट होणार होते.

इटलीसारख्या नवोदित राष्ट्रांत प्रातिनिधिक लोकसत्तेच्या अभ्युदयाबरोबर राष्ट्रवादाची वाढ झाली तर जर्मनींत प्रातिनिधिक लोकसत्तेच्या पराभवांतून राष्ट्रवाद जोमानें पुढें आला. मुत्सद्देगिरींत अपयश आलें तर बिस्मार्क आपलें एकीकरणाचें कार्य युद्धानें पुरें करणार होता. प्रशियन सैन्यांची वाढ करतां यावी म्हणून तिजोरीकडे जेव्हां अधिक तरतुदीची मागणी करण्यांत आली तेव्हां

तें बिल प्रशियन लोकसभेनें फेंटाळून लावलें. या संधीचा फायदा घेऊन जर्मन जनतेच्या राष्ट्रभावना बिस्मार्कनें उद्दीपित केल्या. आपल्या योजनेनुसार प्रथम रशियाशीं संधि करून त्यानें पोलीश राष्ट्रवाद ठेंचून काढण्याचें आश्वासन रशियाकडून मिळविलें. नंतर ऑस्ट्रियाशीं संगनमत करून डेन्मार्कचा पराभव केला. ऑस्ट्रियाच्या दडपणाखालीं जर्मन राज्यघटनेंत सुधारणा घडून येणें त्यास अपमानास्पद वाटत होतें. ऑस्ट्रियावर स्वारी करण्यापूर्वी त्यास हें नैतिक नेतृत्व स्वतःकडे घेणें भाग होतें. जर्मन संघराज्यांत सुधारणा जाहीर करून त्यानें हें साधलें. सार्वत्रिक मतदानाचा हक्क जाहीर करण्यांत आला. नवें पार्लमेंट जनता निवडणार होती. ऑस्ट्रियाविरुद्ध लढाई पुकारण्यास जनता संमति देईल ही त्याची अटकळ खरी ठरली. १८६६ मध्यें ऑस्ट्रियावर स्वारी करून त्यानें तींत जय मिळविला. जुलमी तह जनतेवर न लादतां उत्तरेकडील राज्यांचें प्रशियाच्या नेतृत्वाखालीं एकत्रीकरण करण्यास त्यानें ऑस्ट्रियन सत्तेकडून सवलत मिळविली. तसेंच बृहन्‌जर्मनीची चळवळ हातीं घेण्याचा आततायी मार्ग त्यानें स्वीकारला नाहीं. आपल्या औद्योगिक भरभराटीसाठीं हीं सर्व लहान राज्यें नजीकच्या भविष्य काळांत एकत्र आल्याशिवाय राहाणार नाहींत; या एकत्रीकरणास चालना देण्याचें व चतुःसीमेवरील राष्ट्रें दुर्बल बनवून परसत्तेचा धोका कमी करण्याचेंच आपलें कार्य आहे असें तो मानीत होता. १८७० मध्यें फ्रान्स बरोबरच्या युद्धांत ही एकत्रीकरणाची व प्रखर राष्ट्रवादाची जर्मन–जनतेंतील भावना प्रभावी ठरली. बोनापार्टच्या पाडावांतून अल्सेस–लॉरेन्स हे समृद्ध भाग जर्मनीस जोडले गेले. १८७८ च्या बर्लीन काँग्रेसमध्यें मध्य व पूर्व यूरोपचा राजकीय प्रश्न जर्मनीच्या कलानेंच सुटला. बिस्मार्कनें या जर्मन ऐक्यांतून युरोपच्या राजकारणांत जर्मनीस श्रेष्ठपद मिळवून दिलें होतें. जर्मनीच्या एकी-करणाबरोबर बिस्मार्कनें हळु हळु नव्या साम्राज्यशाही युगाला अनुरूप असे बदल राज्यसत्तेच्या दृष्टिकोणांत व कारभारांत घडवून आणले. उद्योगधंद्यांस संरक्षण मिळालें. आफ्रिकेंत जर्मन वसाहती निर्माण होऊं लागल्या.

फ्रँकफर्ट बंडासारखे कांहीं फुटकळ प्रयत्न वगळल्यास १८४८ पूर्वी

जर्मन लोकशाहीची चळवळ प्रायः परागंदा जर्मन क्रांतिकारकांनीं जर्मनी-बाहेरून संघटित केली होती. १८४८ च्या फ्रेंच क्रांतीनंतर खुद्द जर्मनींत लोक-शाही चळवळींची लाट पसरली हें खरें पण प्रतिक्रांतीबरोबर तीहि लवकरच ओसरली. जर्मन ऐक्याची भावना ही अंतर्गत कारभारांतील लोकशाहीनिष्ठ सुधारणांहून अधिक प्रभावी ठरल्यामुळें व बिस्मार्कसारखा नेता जर्मनीस लाभल्यामुळें पश्चिम युरोपसारखा लोकशाही चळवळींचें नेतृत्व करणारा भांडवलदार वर्ग जर्मनींत पुढें आला नाहीं. उलट उद्योगधंद्यांस शासनसंस्थेनें दिलेलें संरक्षण व तिची साम्राज्यविस्ताराची दृष्टि जर्मन भांडवलदार वर्गास अनुकूल असल्यामुळें त्यानें शासनसंस्था, प्रशियन लष्करी परंपरा व मोटमोठे अमीर जमीनदार व बँकर्स यांच्याशीं सोयरीक केली. पश्चिम युरोपीय राष्ट्रांत साम्राज्यशाही सरकारी धोरणास विरोध करणारे व खुला व्यापारवादी असे उदार लोकशाही पक्ष राजकीय क्षेत्रांत टिकून राहिले होते. प्रतिगामी भांडवलदार पक्ष व क्रांतिकारी समाजवादी चळवळ यांची निवड करण्यास उत्सुक नसलेल्या जनतेस उदार लोकशाही पक्षाला पाठिंबा देण्याचा पर्याय शिल्लक होता. पण जर्मनींत असा उदार पक्ष फार काळ टिकूं शकला नाहीं. वर्धिष्णु जर्मन समाजवादी लोकशाही पक्षालाच हा पाठिंबा मिळत गेला. लोकशाहीची चळवळ समाजवादी पक्षाच्या झेंड्याखालींच पुढें चालू राहिली.

१८५० नंतर प्रतिक्रान्तिकारक राजसत्तांनीं सर्व लोकशाही चळवळी दडपण्याची जी नीति अवलंबिली होती त्यानुसार वाढत्या कामगार चळवळीवर प्रथम शस्त्र उचलण्यांत आलें. १८४८ च्या लोकशाहीच्या आन्दोलनांतून जनतेस जरी मर्यादित मताधिकार मिळाला होता तरी घटनात्मक राजकारणांत कामगारवर्गास स्थान आहे ही भावना त्यांच्या मनांत जागृत झाली होती व सर्वत्र कामगार सभा उदयास येत होत्या. १८५४ सालीं प्रशियन डायटनें (लोकसभा) कामगारसभा विरोधी कायदा पास केला व संयुक्त राज्यांतील प्रत्येक घटकराज्यास असाच कायदा पास करण्यास आवाहन करण्यांत आलें. सर्व राजकीय कामगारसभा दोन महिन्यांत बरखास्त करण्याचा हुकूम या

कायद्यानें दिला होता. मुद्रण-प्रकाशनावरहि कडक निर्बंध घालण्यांत आले. तेव्हां कांहीं काल सर्व पुरोगामी शक्तींनीं आपलें लक्ष सहकारी चळवळीवर केन्द्रित केलें. शासनसंस्थेच्या सहकार्यावर विसंबून न राहतां स्वयंपूर्णतेच्या तत्त्वावर सहकारी चळवळी उभारण्याची शिकवण जनतेस देण्यांत येऊं लागली. कामगारवर्गास या चळवळीचा फारसा फायदा झाला नाहीं तरी छोटे उद्योगधंदे करणारा वर्ग व स्वतंत्र कारागीर हे सहकारी चळवळींतून संघटित झाले. अर्थात् या उत्पादकांच्या सहकारी चळवळींहून सहकारी ग्राहक सोसायट्यांची वाढ झपाट्यानें होत होती.

१८६० नंतर राजकीय आघाडीवर नव्या शक्तींची पुनश्च जमवाजमव होऊं लागली. कामगार सभा पुनर्संघटित होऊं लागल्या होत्या व नवोदित समाजवादी चळवळीला फर्डिनांड लासालसारखा नेता लाभला. समाजवादी विचारपरंपरेंत व कामगार चळवळींत त्यास मानाचें स्थान लाभलें. थॉमस मूरपासून गॉडविन व सेंट सायमनपर्यंत आणि मार्क्सपासून प्रूधाँ, बाकूनीनपर्यंत समाजवादी विचारपरंपरेंत शासनसंस्थाविरोधी दृष्टिकोणच प्रमाणभूत बनला होता. मार्क्स व पुढील काळांत लेनीन शासनसंस्थेची तात्पुरती अपरिहार्यता मंजूर करीत असले तरी आदर्श कम्युनिस्ट समाजव्यवस्थेंत ती अंतर्धान पावेल असेंच त्यांचें मत होतें; तर सर्वच अराज्यवादी तिचे सर्वकालीन विरोधक होते. उलटपक्षीं लासालचा शासनसंस्थेकडे पाहाण्याचा दृष्टिकोण या विचारपरंपरेशीं विरोधी व जर्मन राष्ट्रवादाशीं संवादी होता. शासनसंस्थेमार्फतच व्यक्तीच्या व्यक्तिमत्त्वाची व व्यक्तिस्वातंत्र्याची पद्धतशीर वाढ होते या हेगेलवादी विचारसरणीची छाप त्याच्या विचारांत आढळते. बर्लीनमधील विद्यार्थीदशेंतच, फ्रेंच राज्यक्रान्तींतून फ्रेंच जनतेला लाभलेलें स्वातंत्र्य 'दार्शनिक' व केवळ 'व्यक्तिनिष्ठ' आहे अशी टीका तो करीत होता व नव्या क्रान्तींत कामगार वर्गानें स्पर्धानिष्ठ भांडवलशाही व्यवस्था नष्ट केली पाहिजे असे विचार त्यानें व्यक्त केले होते. कामगार चळवळींत प्रत्यक्ष कार्य करूं लागल्यावर, कामगार वर्गावरील अन्याय दूर करण्याची गर्भित शक्ति शासनसंस्थेमध्यें आहे ही त्याची निष्ठा अधिक

दृढ झाली. कामगारवर्गास उद्देशून केलेल्या एका भाषणांत तो म्हणतो : " आमच्यासारख्या मूठभर सुखी वर्गासाठीं नव्हे तर तुमच्यासारख्या गरजवंतां-साठींच शासनसंस्था आवश्यक आहे. नव्हे ती तुमच्याच मालकीची आहे, कारण तुमचाच भरणा ( राष्ट्रांत ) सर्वांत अधिक आहे. "* सार्वत्रिक व समान मतदानाच्या हक्कांतून निवडून आलेल्या बहुसंख्य जनतेच्या प्रतिनिधींमार्फत चालणारी खरीखुरी शासनसंस्था " मानव समाजास स्वातंत्र्याप्रत नेऊन पोहोंच-विण्यास मदत करील; नव्हे तेंच तिचें खरें कार्य आहे. "‡ तेव्हां संपूर्ण लोकशाही हक्कांसाठीं झगडून कायदेशीर मार्गानें श्रमिक जनतेस सत्ताधारी बनविण्याचा कार्यक्रम कामगार वर्गानें हातीं घेतला पाहिजे.

जर्मनींत सर्वत्र वाढत असलेल्या सहकारी चळवळींनीं शासनसंस्थेची मदत घ्यावी कीं नाहीं या मुद्यावरहि त्याचा या क्षेत्रांतील समाजवादी विचा-रांच्या कांहीं प्रमुख कार्यकर्त्यांशीं मतभेद होता. बर्लीन व लिपझिग येथें कारागीर संघापुढें भाषण करतांना त्यानें आपले हे मतभेद बोलून दाखविले. कामगारांनीं केवळ गिऱ्हाइकांच्या सहकारी संस्था स्थापून भागणार नाहीं, सहकारी उत्पादन संस्थांची वाढ केली पाहिजे व कामगारांच्या श्रमाचा अधिकाधिक मोबदला त्यांच्या पदरांत पडण्यासाठीं शासनसंस्थेनें त्यांना भांडवल पुरविलें पाहिजे अशी भूमिका त्यानें मांडली. मार्च १८६३ मधील लिपझिग सभेंत या मुद्यावर फाटाफूट झाली. बहुसंख्य कामगारांनीं लासालचा दृष्टिकोण मंजूर केला तर शूल्झचे ( Schulze ) अनुयायी उत्पादक सहकारी संस्थांनीं शासनसंस्थेची मदत घेण्याविरुद्ध होते. लिपझिग सभेंत लासालचें नेतृत्व प्रस्थापित झाल्यावर लासालनें २३ मे १८६३ रोजी अखिल जर्मन कामगार सभा स्थापन केली. " जनमत संघटित करून समाजांतील वर्गविग्रह नष्ट करण्यासाठीं, कामगारहिताचें रक्षण करण्यासाठीं व सार्वत्रिक मतदानाच्या

* स्टडीज इन् रेव्होल्यूशन : पान ८० ‡ सोशल इकॉनमिक मूव्हमेंट्स : पान २२७

समान हक्कांतून कामगारांच्या लोकशाही हक्कांची प्रस्थापना करण्यासाठीं शांततेच्या व कायदेशीर मार्गानें लढत राहाणें हाच आमचा हेतु आहे"* असें कामगारसभेनें आपल्या निवेदनांतील पहिल्या विभागांत जाहीर केलें. कुठल्याहि जर्मन कामगाराला नाममात्र वर्गणी देऊन सभेचा सभासद होतां येणार होतें व या सभासद नोंदणीसाठीं जर्मनींत सर्वत्र एजंट्सहि नेमण्यांत आले होते. या सभेच्या स्थापनेनंतर पुढील दोन वर्षांत लासालनें एक समर्थ राजकीय पक्ष स्थापन करण्याचा अविरत प्रयत्न केला. दोन वर्षांत सभेनें वीस प्रकाशनें केलीं. प्रथम वृत्तपत्रांनीं नव्या चळवळीकडे दुर्लक्ष केलें असलें तरी लवकरच तिच्या वाढत्या शक्तीकडे त्यांना लक्ष पुरवावें लागलें व कित्येक वृत्तपत्रांनीं या चळवळीस पाठिंबा दिला. लासालच्या चरित्राच लेखक डॉसन म्हणतो : "लासालनें कामगार चळवळींत पदार्पण केलें तेव्हां कामगारांची कोणतीच मोठी संघटना नव्हती. पण लासालनें त्यांच्या संघटनात्मक प्रयत्नांना चालना देऊन मोजक्या दोन वर्षांच्या कार्यांत पहिला खराखुरा कामगार पक्ष स्थापन करण्यांत यश मिळविलें." § १८६८ मध्यें जर्मन उत्तर संघराज्यांत जनतेला सार्वत्रिक मतदानाचा हक्क मिळाला. अर्थात् त्याचें श्रेय लासालच्या चळवळीला किती व बिस्मार्कला किती हा मुद्दा विवाद्य आहे.

दक्षिण जर्मनींतहि या काळांत कामगार चळवळी सुरू झाल्या होत्या. लासालशीं मतभेद झालेला शूल्झ व डेलीश (Delitzch) हे या चळवळींचें नेतृत्व करीत होते. या चळवळींतूनच जर्मन सोशल डेमॉक्रसीचे दोन विख्यात नेते विल्यम लिब्नेश्ट व ऑगस्ट बेबेल पुढें आले. १८६७ मध्यें 'लीग ऑफ वर्किंग मेन्स ॲसोसिएशनचा' लिब्नेश्ट अध्यक्ष बनला व १८६९ मध्यें लीग बरखास्त होऊन इसनॅश (Eisenach) येथें जर्मन सोशल डेमोक्रॅटिक वर्कर्स पार्टीची अधिकृत स्थापना झाली. पहिल्या आंतरराष्ट्रसभेस तिनें पुढील

---

* सोशल इकॉनमिक मूव्हमेंट्स : पान २२९ § सोशल इकॉनमिक मूव्हमेंट्स : पान २२८

अधिवेशनांत आपले प्रतिनिधी धाडले. उत्तर संघराज्यांतहि पक्षानें आपलें स्वतंत्र कार्य सुरू केलें होतें.

उत्तर संघराज्यांतील १८६८ नंतरच्या पहिल्या निवडणुकींत लासाल पक्षास व सोशल डेमोक्रॅटिक पक्षास डायटमध्यें एकूण आठ जागा मिळाल्या. लासाल पक्षाचा नेता श्विट्झर डायटमधील आपलें पक्षबल हळु हळु वाढवून तिच्या मार्फत कामगारसत्ता प्रस्थापित करण्याच्या दृष्टिकोणांतून डायटकडे पाहात होता तर लिब्नेश्ट पक्ष डायटला प्रतिगामी संस्था समजून जनतेंतील प्रचाराचें एक व्यासपीठ म्हणून डायटचा उपयोग करूं मागत होता. डायटमध्यें येणाऱ्या सुधारणावादी बिलास पाठिंबा दिल्यास तिचें स्वरूप पुरोगामी असल्याची भावना जनतेंत निर्माण होईल अशी भीति पक्षास होती. लासाल पक्ष राष्ट्रीय भूमिकेंतून सर्व प्रश्नांकडे पाही तर सोशल डेमोक्रॅटिक पक्ष आंतरराष्ट्रसभेला जोडलेला व म्हणून आंतरराष्ट्रीय दृष्टिकोणांतून सर्व प्रश्न विचारांत घेण्याच्या बाजूचा होता. १८७० च्या फ्रान्स व जर्मनीमधील युद्धांत हे मतभेद जनतेसमोर आले. डायटमध्यें युद्धखर्च संमतीसाठीं आला तेव्हां सोशल डेमोक्रॅटिक पक्षाच्या प्रतिनिधींनीं त्यास जोरदार विरोध केला; तर लासाल पक्षाच्या सभासदांनीं बोनापार्टचा पाडाव होईपर्यंत युद्धखर्चाची तरतूद मंजूर केली. बोनापार्टच्या पाडावानंतर मात्र दोन्ही पक्षांनीं युद्ध पुढें चालू ठेवण्यास विरोध करून तात्काल तह घडवून आणण्याची मागणी केली. पॅरीस कम्यूनच्या काळांत डायटमध्यें केलेल्या एका भाषणांत बेबेल म्हणाला, " सर्व स्वातंत्र्येच्छु जनता व युरोपमधील कामगारवर्गाचे डोळे आज पॅरीसकडे लागले आहेत. पॅरीसचा आजचा लढा ही एक साधी चकमक ठरली तरी त्यांच्या घोषणा एक दिवस निःसंशय सर्व युरोपीय कामगारवर्गाच्या लढ्याच्या घोषणा बनतील. " *

पॅरिस कम्यूननंतर कांहीं काळ जर्मनींतील कामगार वर्गाच्या चळवळीहि थंडावल्या. पण मध्यंतरींच्या आर्थिक मंदीनंतर १८७४ मध्यें डायटच्या

* सोशल इकॉनमिक मूव्हमेंट्स : पान २३१

निवडणुकींत समाजवादी प्रतिनिधींना ३,४०,०० मतें पडली. मतांच्या आंकड्यांत तीन वर्षांत २,३८,००० ची वाढ झाली होती. दोन्ही पक्षांत एकजूट घडवून आणण्यास या प्रगतीनें चालना मिळाली.

गोथा येथें १८७५ मध्यें दोन्ही पक्षांची संयुक्त परिषद भरविण्यांत आली व या परिषदेंतून पंचवीस हजार पक्ष सभासदांची सोशल डेमोक्रॅटिक पार्टी स्थापन झाली. परिषदेनें पास केलेल्या ध्येयधोरणांत व कार्यक्रमांत दोन्ही पक्षांच्या विचारसरणीचा व कार्यक्रमाचा समन्वय साधण्यांत आला होता. शासनसंस्थेच्या मदतीनें उत्पादनसंघटना उभारण्याच्या गोथा कार्यक्रमांतील भागास, मार्क्सनें 'गोथा कार्यक्रमाची मीमांसा' ही पुस्तिका लिहून जोराचा आक्षेप घेतल्यामुळें गोथा परिषद समाजवादी इतिहासांत विशेष गाजली आहे. या एकजुटीचा अनुकूल परिणाम १८७७ च्या निवडणुकींत पाहावयास सांपडतो. यावेळीं पार्टीचे बारा प्रतिनिधी निवडून आले व पार्टीस पांच लाखांवर मतें मिळालीं. समाजवाद्यांचा विरोधी पक्ष मूळ धरीत आहे या भावनेनें राजसत्ता अस्वस्थ बनूं लागली होती व ही वाढती चळवळ दडपण्याची संधि ती पाहातच होती. लवकरच तशी संधि चालून आली. १८७१ च्या पॅरीस कम्यूननंतर युरोपांत मोठ्या प्रमाणावर क्रान्ति होण्याची शक्यता राहिली नव्हती. त्याचा परिणाम एका बाजूनें कामगारांचे कायदेशीर राजकीय पक्ष निर्माण होण्यांत जसा दिसून आला त्याचप्रमाणें दुसऱ्या बाजूस अराजक चळवळींनीं जनपाठिंब्याच्या अभावीं व्यक्तिगत दहशतवादाचा मार्ग पकडला होता. प्रमुख राजकीय व्यक्तींवर प्राणघातक हल्ले करण्याचें तंत्र स्वीकारलें गेलें होतें. १८७८ मध्यें सम्राट पहिल्या विल्यमवर दोन अराजकवाद्यांनीं प्राणघातक हल्ला केला तेव्हां बिस्मार्कनें त्या प्रसंगाचा फायदा घेऊन समाजवादी चळवळ वेळींच ठेंचून टाकण्याचा निर्धार बोलून दाखविला व डायटपुढें 'समाजवादी विरोधी' बिल आणलें. राजाची जरी बिलास संमति होती तरी लोकप्रतिनिधींनीं असें मोघम बिल पास करण्यास विरोध दर्शविला. बिस्मार्कनें डायट बरखास्त केलें व नव्या निवडणुकींत घसघशीत बहुमत मिळवून अखेर हा कायदा

पास करून घेतला. समाजवादी पक्ष बेकायदा ठरला. समाजवादी सभा व वाङ्मयावर बंदी पडली. कायदेशीर व संघटनात्मक मार्गानें समाजव्यवस्थेंत बदल घडवून आणण्याच्या लासालवादी विचारसरणीस व प्रयत्नास जर्मन समाजवादी चळवळींत उतरंड लागली. पार्टीचे सभासद क्रान्तिनिष्ठ तंत्राकडे व विचाराकडे झुकूं लागले. बेबेल, लिब्रनेश्ट यांच्याकडे पार्टीचें अविरोध नेतृत्व आलें. जर्मन सत्ताधाऱ्यांचें आव्हान पार्टीनें शौर्यानें स्वीकारलें. स्वित्झर्लंडमध्यें पार्टीचें मुखपत्र प्रसिद्ध होऊं लागलें व सरहद्दीवरुन त्याच्या हजारों प्रती जर्मनींत आणून त्यांचें मोठ्या प्रमाणावर गुप्त वांटप होऊं लागलें. जर्मन समाजवादी चळवळ दडपशाहीनें नष्ट होण्याऐवजीं अधिक लढाऊ बनली व तिनें अधिक जहाल धोरणाचा पुरस्कार केला.

बिस्मार्कला समाजवादी चळवळ नेस्तनाबूद करावयाची होती पण शासनसंस्थेसंबंधीं कामगारवर्गांत असलेला आदर त्यास कमी होऊं द्यावयाचा नव्हता. म्हणूनच १८८२ मध्यें त्यानें नव्या डायटपुढें दोन सुधारणा बिलें मांडलीं. एका बिलानें अपघातांत व आजारीपणांत कामगारांना इन्शुअरन्सचा फायदा मिळणार होता. दुसऱ्या बिलानें सत्तर वर्षांवरील कामगारांस व कामावर असतांना अपघात झालेल्या कामगारांना त्यापूर्वीहि, ठराविक पेन्शन मिळणार होतें. बिस्मार्कनें मांडलेली ही स्टेट इन्शुअरन्स योजना कामगारक्षेत्रांत पहिलीच ठरल्यामुळें त्यास ऐतिहासिक महत्त्व आहे. इंग्लंडमधील कामगारवर्ग कित्येक वर्षांच्या अविरत झगड्यानंतर ज्या सवलती अनुभवणार होता त्या सवलती या बिलांच्या द्वारां जर्मन शासनसंस्थेनें, आपला सर्व जनतेच्या पितृत्वाचा दावा सिद्ध करण्यासाठीं, स्वतः होऊन जर्मन कामगारांना बहाल केल्या होत्या. समाजवादी चळवळ दडपशाहीनें नष्ट होणार नाहीं याची खात्री पटल्यावर १८९० मध्यें हे समाजवादीविरोधी जुलमी कायदे रद्द करण्यांत आले. नव्या निवडणुका झाल्या तेव्हां सोशल डेमोक्रॅटिक पार्टीचें मतदान चौदा लाखांवर झालें. संघटना-स्वातंत्र्य मिळाल्यावर जर्मनींत नव्या जोमानें पक्षसंघटना वाढूं लागली. लिब्रनेश्ट, बेबेल, सिंगर यांचें दडपशाहीच्या युगांतील लढवय्यें नेतृत्व आतां पार्टीचें संचालन

करणार होतें. गोथा परिषदेप्रमाणें चळवळींत ऐक्य कसें टिकेल याची काळजी करण्याची गरज आतां राहिली नव्हती. सुधारणा–बिलें पास करून शासन संस्थेबद्दल कामगार वर्गाच्या मनांत निर्माण झालेली अढी सहजासहजीं जाणार नव्हती. म्हणूनच १८९१ मध्यें इरफर्ट येथें भरलेल्या पार्टीच्या अधिवेशनांत संपूर्ण मार्क्सवादी कार्यक्रम पक्षानें स्वीकारला. शासनसंस्थेची कोणतीहि मदत कामगारवर्ग यापुढें मागणार नव्हता अगर 'भांडवलशाही' शासनसंस्थेशीं कोणतेंच सहकार्य करणार नव्हता. पार्टीच्या ध्येयसिद्धान्तांत प्रथमतःच कम्युनिस्ट जाहीरनाम्यांतील मूलभूत कल्पनांचा समावेश करण्यांत आला. जाहीरनाम्यांत सुचविलेला ताबडतोबीचा कार्यक्रम पक्षानें हातीं घेतला. खड्या सैन्याऐवजीं जनता–लष्कर उभारण्याची मागणी प्रबल प्रशियन लष्करी परंपरेला शह देण्यासाठीं कार्यक्रमांत मुद्दाम समाविष्ट करण्यांत आली. अर्थात् जर्मन समाजवादी चळवळींतून लासालवाद्यांचें उच्चाटन करण्यांत लिबनेस्ट, बेबेल आदि मार्क्सवादी नेत्यांना जरी तात्पुरतें यश लाभलें तरी दहा वर्षांच्या काळांत क्रान्तिनिष्ठ मार्क्सवादी विचार व पुढारलेल्या युरोपीय राष्ट्रांतील प्रचलित राजकीय परिस्थिति, यांच्यांतील विग्रह नव्या स्वरूपांत जर्मन समाजवादी चळवळीपुढें आल्याशिवाय राहिला नाहीं.

खुद्द आंतरराष्ट्रसभेच्या कालांतहि मार्क्सनें पार्लमेंटच्या निवडणुका लढविण्याच्या कामगारपक्षाच्या कार्यक्रमास पाठिंबा दिला होता. कम्यूननंतरच्या हेग परिषदेंत कांहीं राष्ट्रांत शांततामय सत्ताक्रान्ति घडून घेण्याची शक्यताहि त्यानें बोलून दाखविली होती. तेव्हां आंतरराष्ट्रसभा बरखास्त झाली तरी कामगार वर्गाच्या सनदशीर चळवळी हातीं घेणारे पक्ष व मार्क्स यांचे संबंध दुरावले नाहींत. कम्यूननंतर नजीकच्या भविष्यकालांत युरोपमध्यें क्रान्तिकारक परिस्थिति निर्माण होण्याची कोणतीच शक्यता राहिली नव्हती व रस्त्यांत अडथळे उभारून प्रस्थापित सरकारशीं सशस्त्र लढत देण्याचें पॅरीसकामगारांचें तंत्रहि शासनसंस्थेच्या वाढत्या शस्त्रबलानें निरुपयोगी बनलें होतें. यापुढें खुद्द शासन-संस्थेचें लष्कर अगर त्याचा मोठा विभाग जनक्रान्तींत क्रान्तिकारकांच्या बाजूनें

सामील झाल्याखेरीज सशस्त्र क्रांति कधींहि यशस्वी होणार नव्हती. साहजिकच कामगारपक्षांचें सर्व लक्ष या काळांत दैनंदिन व सनदशीर चळवळीवरच केंद्रित झालें. बिस्मार्कनें समाजवादी विरोधी कायदे पास केल्यामुळेंच जर्मन समाजवादी चळवळीनें गुप्त प्रचाराचा व संघटनेचा मार्ग अवलंबिला होता. ते कायदे रद्द होतांच पुनश्च उघड व सनदशीर मार्गानेंच तिनें आपली बलाढ्य संघटना उभारली.

पुढारलेल्या युरोपीय राष्ट्रांतील राजकीय परिस्थितींतहि या कालखंडांत मोठा बदल घडून आला. समाजवादी चळवळ कार्यप्रवण करण्याच्या उद्देशानें मार्क्सनें केलेल्या सर्व लिखाणास अपेक्षित क्रान्तीची पार्श्वभूमि आहे. ती अपेक्षा दुरावल्यावर मार्क्सवादी समाजवाद्यांचें लक्ष तात्रडतोबीच्या कार्यक्रमावर, सामाजिक सुधारणांसाठीं प्रयत्न करण्यावर, केन्द्रित व्हावें हें स्वाभाविकच होतें. युरोपमध्यें रशिया सोडून इतर कोणत्याच मोठ्या राष्ट्रांत एकोणिसाव्या शतकाच्या शेवटीं क्रान्तीची अपेक्षा करणें वस्तुस्थितीस सोडून ठरलें असतें. आपल्या आयुष्याच्या अखेरीस मार्क्स व एंगल्स यांचें लक्ष प्राधान्येंकरून रशियन प्रश्नाकडे वळलें, तेंहि क्रान्तिकारी परिस्थितीची त्यांच्या पिंडास आवश्यकता होती याचेंच द्योतक आहे. हा काळ युरोपीय राष्ट्रांच्या दृष्टीनें साम्राज्यशाहीचा काळ होता. या साम्राज्यशोषणांत, नकळत कां होईना, कामगारवर्गहि भागीदार झाला होता. त्याला वाढती आर्थिक सुस्थिति लाभली होती. आपल्या आर्थिक लढ्यांत सुलभ यश संपादणें त्यास शक्य बनलें होतें. प्रत्येक देशांत सरंजामशाही प्रथा मागें पडून भांडवलशाही समाजव्यवस्थेस मार्ग मोकळा होत होता. व कामगारवर्गास मतदानाचे व लोकशाहीचे वाढते हक्क मिळत होते. साहजिकच लोकशाही मार्गानें सत्ता ताब्यांत घेण्याचा मार्ग क्रान्तीपेक्षां स्वतःस अधिक हितकारक आहे अशी भावना त्यानें करून घेतली होती. १८८३ मध्यें मृत्यू पावण्यापूर्वी मार्क्सनें कामगारपक्षांच्या या विचारव्यवहारांवर व त्यांच्यांत आढळणाऱ्या क्रान्तिनिष्ठेच्या अभावावर अनेकदां बोंचक टीका केली होती. पण तो दोष विचारांचा वा नेत्यांचा नव्हता. दोष द्यावयाचाच तर तो युरोपीय

राष्ट्रांतील नव्या साम्राज्यवादी भरभराटीस द्यावा लागेल. म्हणूनच मार्क्सची नाखुषी पत्करूनहि या काळांत कामगारपक्षांनीं मार्क्सवादांतील अराज्यवादी प्रेरणांचें उच्चाटन करणें, कामगारवर्गाचें राजकारणांतील माहात्म्य प्रस्थापित करण्यासाठीं निवडणुकांत भाग घेणें व भांडवलदार वर्गाविरुद्ध कामगारांचे नित्याचे आर्थिक लढे लढविणें हा कार्यक्रम अंगीकारला होता.

एकोणिसाव्या शतकाच्या शेवटीं, नव्या कार्यक्रमाशीं सुसंगत व नव्या परिस्थितीला अनुरूप असा सैद्धान्तिक फेरबदल घडवून आणण्याची मागणी मार्क्सवादी जर्मन सोशल डेमोक्रॅटिक पार्टीतील कांहीं मार्क्सवादी विचारवन्त करूं लागले. बिस्मार्कनें पास केलेल्या समाजवादीविरोधी कायद्यांच्या काळांत व दडपशाहीच्या वातावरणांत लिबनेस्ट, बेबेल आदि मार्क्सवाद्यांना, या कार्यक्रमाचा पुरस्कार करणाऱ्यांविरुद्ध, हजारों पक्ष सभासदांस आपल्या बाजूला ओढून घेणें शक्य झालें होतें. पण पुढील सात आठ वर्षांत सनदशीर मार्गानें पार्टीचें संघटन व जनतेंत पार्टीला पाठिंबा वाढल्यानंतर पुनः तात्त्विक मतभेदांनीं वर डोकें काढलें. दडपशाहीच्या काळांत स्वित्झर्लंडमधून निघणाऱ्या पार्टीच्या मुखपत्राचें संपादकत्व करणारा पक्षनेता एडवर्ड बर्न्स्टाईन तेथून हद्दपार झाल्यावर कांहीं काळ इंग्लंडमध्यें वास्तव्य करीत होता. या वास्तव्यांत एंगल्सच्या सहवासांत त्यानें अनेक दिवस घालविले होते. ब्रिटिश कामगार चळवळीचें जवळून अवलोकन केलें होतें व कांहीं बुद्धिमान् फेबियनवाद्यांचीं मैत्री संपादन केली होती. जर्मन मार्क्सनें लंडनमधील वास्तव्यांत ब्रिटिश कामगार-चळवळीचें जवळून निरीक्षण करूनच आपले सिद्धान्त जगापुढें मांडले होते. आज जर्मन बर्न्स्टाईन त्याच लंडनमध्यें वास्तव्य करीत असतांना ब्रिटिश कामगार चळवळीचें जवळून अवलोकन करून या मार्क्सच्या सिद्धान्तांच्या फेरविचाराचा पुकार करीत होता. या काळांत त्यानें लिहिलेल्या अनेक लेखांवरून जर्मन सोशल डेमोक्रॅटिक पार्टीत वैचारिक रणें माजलीं. १८९८ मध्यें स्टटगार्ड येथें भरलेल्या पक्षाच्या अधिवेशनास उद्देशून त्यानें एक निवेदन लिहिलें व या निवेदनांत आपल्या विचारांची सुसूत्र मांडणी केली. तसेंच कांहीं

महिन्यांच्या कालावधींत, आपल्या सिद्धान्ताचें स्पष्टीकरणार्थ जर्मन भाषेंत एक मोठा ग्रंथ त्यानें लिहिला. " उत्क्रान्तिशील समाजवाद " या नांवानें तो इंग्लिश भाषेंत प्रसिद्ध करण्यांत आला आहे. हा ग्रंथ प्रसिद्ध झाल्यापासून एकोणिसशें चौदाच्या लढाईपर्यंत युरोपीय समाजवादी चळवळींत कट्टर मार्क्सवादी व फेरविचारवादी मार्क्सवादी समाजवादी यांच्यांत अनेक बौद्धिक चकमकी झाल्या. वृत्तपत्रांतून व नियतकालिकांतून या वैचारिक द्वंद्वांस बरीच प्रसिद्धि मिळाली.

मार्क्सवादावरील फेरविचारवाद्यांच्या टीकेचा सारांश हा होता : नजीकच्या भविष्यकाळांत भांडवलशाही समाजव्यवस्था मोडकळीस येईल हा मार्क्सचा अंदाज परिस्थितीनें खोटा पाडला आहे. तेव्हां पक्षाचें धोरण व कार्यक्रम ठरवितांना वांछित क्रान्तीची पार्श्वभूमि गृहीत धरणें घातक ठरेल. जाहीरनाम्यांत मार्क्स व एंगल्सनें बांधलेली क्रान्तिकालाची अटकळ खोटी ठरली होती. तेव्हां उत्क्रान्तीच्या विशिष्ट अवस्थेंत क्रान्ति घडून येणें अटळ आहे ही भूमिका, इतिहासाचें मार्क्सप्रणीत विकाससूत्र मान्य करूनहि, मानलीच पाहिजे असें नाहीं. जाहीरनाम्यांत, भांडवलदार व कामगार अशा दोनच वाढत्या वर्गांत भांडवलशाही समाजव्यवस्थेंतील समाज दुभंगला जाईल असें आग्रहानें प्रतिपादलें आहे. पण आजच्या समाजाचा अभ्यास करतां त्यास सत्याचा आधार मिळत नाहीं. सामाजिक धनामध्यें झालेल्या अमर्याद वाढींत बड्या भांडवलदारांची संख्या कमी होण्याऐवजीं वाढली आहे. बड्या भांडवलदारां-बरोबर मध्यम व छोटे भांडवलदारहि संख्येनें वाढले आहेत. मध्यमवर्गाचें स्वरूप पालटलें असलें तरी समाजाच्या वर्गवारींतील त्याचें स्वतंत्र स्थान नष्ट झालेलें नाहीं. भांडवलशाही समाजव्यवस्था मोडकळीस येणें तर राहोच, पण गेल्या पन्नास वर्षांत ती अधिक स्थिर बनली आहे. उत्पादक उद्योगधंद्यांचें केन्द्रीकरण होत असलें तरी शेतीच्या उत्पादनांत हें केन्द्रीकरण मंदगतीनें होत आहे. सर्वत्र कामगार चळवळीच्या वाढीबरोबर व तिच्या वाढत्या दडपणानें, भांडवलवाल्यांच्या शोषक वृत्तीला आळा घालणाऱ्या सामाजिक

प्रतिक्रिया सुरू झाल्या आहेत. फॅक्टरी कायदे, स्थानिक संस्थांतील वाढता लोकशाही कारभार, ट्रेड युनियन व सहकारी चळवळींना मिळालेले कायदेशीर हक्क व कामाच्या तासांवर बसलेलें सार्वजनिक नियंत्रण या सामाजिक प्रतिक्रियेचींच दृश्य फलें आहेत. पुढारलेल्या राष्ट्रांतील शासनसंस्था अधिकाधिक लोकशाही-प्रधान बनत असून रक्तपाती राजकीय क्रान्तीचे दिवस मागें पडत आहेत. उलथापालथींतून होणाऱ्या समाजपरिवर्तनांहून समाजव्यवस्थेंतील संथ व सतत बदल हा शाश्वत यशाचा अधिक सुरक्षित मार्ग आहे.

बर्न्स्टाईन मार्क्सवादाच्या फेरविचाराची मागणी करून परिस्थितीशीं व प्रत्यक्ष कार्यक्रमाशीं जुळती अशी सिद्धान्ताची मांडणी करण्याचा प्रयत्न करीत होता; उलट इरफर्ट येथें संपूर्ण मार्क्सवादी कार्यक्रमाचा व जाहीरनाम्यांतील प्रमेयाचा स्वीकार करण्यास पक्षास उद्युक्त करणारे बेबेल, लिब्नेश्ट आदि जुने नेते व कट्टर मार्क्सवादाचा नवा प्रवक्ता कार्ल काउटस्की, सैद्धान्तिक दृष्ट्या क्रान्तीचें तत्त्वज्ञान शिरसावंद्य मानीत होते तर प्रत्यक्ष पार्टीच्या कामकाजांत मात्र प्रथम लासालवादी व नंतर बर्न्स्टाईनवाद्यांचाच कार्यक्रम अंगीकारीत होते. नव्हे त्यांच्याजवळ पार्टीसाठीं दुसरा कार्यक्रम असण्याची शक्यताच नव्हती; तो बहुसंख्य कामगार वर्गानें मानला नसता. बर्न्स्टाईन म्हणे कीं, राजकीय सत्तेसाठीं अंतिम लढा करण्यास प्रथम राजकीय हक्क मिळविण्याची जरूरी आहे. तेव्हां सोशल डेमोक्रॅटिक पार्टीनें हे राजकीय व संघटनेचे हक्क कामगारवर्गास मिळवून देण्यासाठीं व त्यांची वाढ करण्यासाठीं आपली सर्व शक्ति पणास लावावयास हवी. क्रान्तीची वाट पाहात बसणारी अगर ती गृहीत धरून आपले डावपेंच ठरविणारी पार्टी या कार्यक्रमाचें महत्त्व कधींच समजूं शकणार नाहीं; या कार्यक्रमासाठीं तीव्रतेनें झगडणार नाहीं. समाजवादाच्या अंतिम ध्येयापेक्षां समाजवादी व कामगार चळवळीवर माझी अधिक श्रद्धा आहे व म्हणूनच कामगारांच्या लोकशाहीच्या लढ्यांतून श्रम व उत्पादन करणाऱ्यांचें हितसंवर्धन व रक्षण होऊं शकेल अशी मला खात्री आहे. मार्क्सची ऐतिहासिक भौतिक-वादी दृष्टि मान्य करूनहि खुद्द मार्क्स व एंगल्सनीं आपल्या आयुष्याच्या शेवटीं,

मानवी इतिहास समजून घेतांना आर्थिक घटनांबरोबरच इतर घटनाहि अभ्यासिल्या पाहिजेत, असा दिलेला इशारा महत्त्वाचा आहे. मानवी इतिहासांत आर्थिक हेतूंप्रमाणेंच इतर प्रेरणा मानवास कार्यान्वित करूं शकल्या आहेत, कायदा व नीतीच्या कल्पनांतील स्वतंत्र विकास, तसेंच प्रत्येक कालखंडांतील ऐतिहासिक व धार्मिक परंपरा, यांचा परिणाम समाजजीवनावर झाला आहे हें केवळ आर्थिक दृष्टीवर भर देणारे संकुचित मार्क्सवादी विसरतात. मानवी विकासाच्या प्रतिक्रियेंतच ध्येयवादी कल्पनांची ही जोपासना व वाढ झाली आहे हें ते ध्यानीं घेत नाहींत.

मार्क्सच्या 'भांडवलमीमांसे'नंतर चालू काळांत कित्येक अकल्पित फरक घडून आले आहेत. भांडवलाच्या एकत्रीकरणांत केवळ मूठभर भांडवलवाल्यांचेंच फावलें नसून ट्रस्ट्स, जॉईंट स्टॉक कंपन्या आदि मार्गांनीं नफ्याचा कांहीं हिस्सा फार मोठ्या वर्गात डिव्हिडंडच्या रूपानें वांटला जात आहे. वर्धितमूल्याचें शोषण कमींत कमी धनवान करूं लागले कीं समाजवादास वाढती अनुकूल भूमि तयार होईल ही एक अंधश्रद्धा आहे. मोठ्या उद्योगधंद्यांबरोबर व त्यांच्या स्पर्धेत मध्यम व लहान उद्योगधंदे आपलें अस्तित्व टिकवून आहेत. शेतीच्या जमिनीचा तुकडा मोठा होण्याऐवजीं त्या जमिनीचे अधिक तुकडे पडले आहेत. आर्थिक अरिष्टांतून आजची उत्पादनव्यवस्था कोलमडून पडेल असें मानण्यास आज आधार नाहीं. अर्थात् त्याचा अर्थ सत्तासंक्रमणाची शक्यता वा आवश्यकता नाहीं असा होत नाहीं. मात्र समाजवादाच्या प्रस्थापने-साठीं कामगार हुकुमशाहीपेक्षां लोकशाहीच्या लढ्याचाच मार्ग अधिक हितकारक आहे. लोकशाही लढ्याच्या संघटनांत अर्थातच ट्रेड युनियन्सना विशेष स्थान आहे. उदार लोकशाहीवाद्यांवर समाजवाद्यांनीं जरा संयमानें हल्ला करावा कारण पश्चिम युरोपांतील उदार लोकशाहीवाद्यांचा ऐतिहासिक वारसा आज जर्मनींत समाजवाद्यांकडे आला आहे. नागरिक स्वातंत्र्याची समाजवाद्यांनीं आजमितीस जोरदार तरफदारी केली आहे; नव्हे एकाद्या आर्थिक लढ्याहून, या नागरिक स्वातंत्र्याचें रक्षण करणें अधिक निकडीचें आहे. प्रत्येक व्यक्तीला स्वतःच्या

व्यवसायांत व त्याच्या निवडींत कुठल्याहि प्रकारें आर्थिक परिस्थितीची सक्ती होऊं नये हीच समाजवाद्यांच्या स्वातंत्र्याची कल्पना आहे. मार्क्सच्या लिखाणांत कित्येकदां विरोधाभास आढळतो. त्याचें लेखन शास्त्रीय सत्य शोधण्यासाठीं आहे. तसेंच हें संशोधन करीत असतां प्रमाणभूत मानलेल्या कांहीं गृहीत सिद्धान्तांच्या पुष्ट्यर्थ पुरावे शोधण्याची दृष्टिहि त्यांत आहे. मार्क्सवादांत स्वप्नद्रष्ट्यांच्या विचाराचा वारसा आढळतो. सनदशीर मार्गानें कोणते बदल घडवून आणतां येतील व हिंसात्मक क्रान्तींतून कोणते बदल घडून येणार अगर घडवून आणले पाहिजेत याचें स्पष्ट दिग्दर्शन कुठेंच नाहीं. इरफर्ट कार्यक्रमांत हाच दोष आहे. त्याची तात्त्विक बैठक व त्यांत ग्रथित केलेला सामाजिक सुधारणांचा कार्यक्रम यांचा सांधा बसत नाहीं. त्यांत संवादित्व नाहीं. स्वतः जर्मन समाजवादी चळवळींत राहूनच ही विसंगति दूर करण्याचा निर्धाराचा प्रयत्न बर्न्स्टाईननें केला. काउटस्की व इतर कर्मठ मार्क्सवाद्यांनीं बर्न्स्टाइनच्या टीकेचें जरी जोरदार बौद्धिक खंडन केलें तरी १९१४ पर्यंतच्या जर्मन सोशल डेमॉक्रसीनें शान्ततामय मार्गाचा अवलंब करून व समाजसुधारणेचा राजकीय कार्यक्रम स्वीकारूनच आपली प्रगति केली.

'फ्रान्समधील वर्गयुद्ध' या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत, १८९५ मध्यें खुद्द एंगल्सनें व्यक्त केलेले विचार पाहिले तर बर्न्स्टाईनच्या टीकेचें योग्य मूल्यमापन करणें सुकर होईल. एंगल्स लिहितो : "मार्क्सनें व मी क्रान्तिकालासंबंधीं बांधलेली अटकळ इतिहासानें खोटी ठरविली...एवढेंच नव्हे तर कामगारवर्गास ज्या नव्या परिस्थितींत पुनः आपले डावपेंच निश्चित करून लढावयाचें आहे त्या परिस्थितींतहि बदल झाला. १८४८ चें लढ्याचें तंत्र आतां निरुपयोगी व टाकाऊ बनलें आहे...भांडवलशाही उत्पादनव्यवस्था नष्ट होण्याच्या पक्व परिस्थितीस त्या काळांतील युरोपची औद्योगिक प्रगति पोहोंचलीच नव्हती. १८४८ नंतर पुनश्च वेग पकडलेल्या उत्पादनक्रान्तींत युरोपमधील प्रत्येक देश सांपडला. फ्रान्स, ऑस्ट्रिया, हंगेरी, पोलंड व अगदीं अलीकडच्या काळांत रशिया या देशांत मोठमोठ्या उद्योगधंद्यांची वाढ झाली आहे. जर्मनी हें एक प्रथम दर्जाचें उद्योगप्रधान

राष्ट्र बनलें आहे. भांडवलशाही अर्थव्यवस्थेनें ही औद्योगिक भरभराट करून उत्पादनाच्या अमर्याद प्रगतीची आपली शक्ति सूचित केली आहे. " *

या काळांत कामगार आपल्या मतदानाचा हक्क जागरूकपणें वापरून आर्थिक स्वातंत्र्यासाठीं झगडण्यास शिकले. सार्वत्रिक मतदानाच्या हक्कानें आपली व विरोधकांची शक्ति अजमावणें त्यांस शक्य झालें व आपल्या यशाबद्दलचा त्यांचा विश्वास वाढला. निवडणुकीच्या काळांत कामगारवर्गास जनतेशीं संपर्क वाढविण्याची संधि मिळाली. आपल्या प्रतिनिधींमार्फत लोकसभेंतील विरोधकांपुढें व लोकसभेबाहेरील जनतेपुढें आपला कार्यक्रम ठेवण्याचें व्यासपीट मिळालें. याचा परिणाम एंगल्सच्या शब्दांत असा असा झाला: "कामगार पक्षाच्या बेकायदेशीर कार्यापेक्षां त्यांच्या कायदेशीर चळवळीची भीति भांडवलदारवर्गास व राजसत्तेस अधिक वाटूं लागली. क्रान्तींतील उठावापेक्षां निवडणुकींतील कामगारांचें यशच त्यांना अधिक धोक्याचें वाटूं लागलें." एंगल्सनें पुढें लिहिलें आहे : "जागृत नसलेल्या आम जनतेचें, अल्पसंख्य क्रान्तिकारक गटानें नेतृत्व करून क्रान्ति घडवून आणण्याचा काल आतां मागें पडला आहे...आम्ही 'क्रान्तिकारक' व 'उत्पाती' राज्यसत्तेंत बदल घडवून आणण्याचा प्रयत्न बेकायदेशीर मार्गापेक्षां सनदशीर मार्गानेंच अधिक चांगल्याप्रकारें करूं शकतों असें वाटूं लागलें आहे. आम्ही शान्ततेवर व सुव्यवस्थेवर भर देतों असा दावा करणारे पक्ष स्वतःच निर्माण केलेल्या कायद्यांनीं अखेर स्वतःचा नाश ओढवून घेतील." †

एंगल्सच्या या लिखाणावरून बदललेल्या राजकीय परिस्थितींत कामगार-लढ्याचे नवे डावपेंच निश्चित करण्याचे विचार मृत्यूपूर्वी फक्त सहा महिने एंगल्सच्या मनांत किती खेळत होते याची कल्पना येईल. बर्न्स्टाईननें मार्क्सवाद्यांवर केलेल्या उघड हल्ल्यांतून विसाव्या शतकांतील पहिल्या दशकांत

* सोशल इकॉनमिक मूव्हमेंट्स : पान १४६ † सोशल इकॉनमिक मूव्हमेंट्स : पान १४७

युरोपमधील मार्क्सवाद्यांत व फेरविचारवाद्यांत चांगलीच वैचारिक रणधुमाळी माजली. ती जर्मनीपुरती मर्यादित राहिली नाहीं. फेरविचारवाद्यांत सर्व प्रश्नांवर एकमत झालें नाहीं तरी मार्क्सवादाच्या एकाददुसऱ्या प्रमेयावर त्यांपैकीं प्रत्येकानें प्रखर हल्ला चढविला. ट्यूगॅन, बॅरॅनोस्कि, फ्रेंच समाजवादी नेता जीन ज्वांरे, सोंबार्ट, टी. जी. मॅसॅरॅक, पॉल बार्थ व फ्रान्ज ओपेनहेमर हे या गटांत प्रमुख होते; तर मार्क्सवादाचें समर्थन करण्यासाठीं कार्ल काउटस्कीबरोबर इंग्लंडमधील हेन्री हिंडसमन अमेरिकेंतील बोडीन व रूबीनो तसेंच इतर कांहीं नामवन्त समाजशास्त्रज्ञ व अर्थशास्त्रज्ञ पुढें सरसावले.

अर्थात् जर्मन सोशल डेमोक्रॅटिक पार्टीतील तात्त्विक रणधुमाळीस आंतरराष्ट्रीय महत्त्व येण्याचें प्रमुख कारण, युरोपीय समाजवादी चळवळींत इतर कुठल्याहि देशांतील चळवळींहून जर्मन समाजवादी चळवळ कितीतरी पटीनें अधिक शक्तिशाली होती हेंच आहे. दुसऱ्या आंतरराष्ट्रसभेचें नेतृत्वहि याच समर्थ पक्षाकडे आल्यामुळेंच पक्षांतील मतभेदांनीं आंतरराष्ट्रीय स्वरूप धारण केलें हेंहि तितकेंच खरें. १८८० नंतर जर्मन साम्राजसत्ता, ही वेगानें वाढणारी समाजवादी चळवळ दडपून टाकण्याचा खेळ कधीं खेळली नाहीं. प्रत्येक नव्या निवडणुकींत पक्षाला मिळालेलें मतदान लाखांनीं वाढत होतें. संघटित कामगारसंघटना उदयास आल्या होत्या. त्यांची शक्ति प्रतिदिनीं वाढत होती. १९१२ च्या राईश्टॅगच्या ( जर्मन पार्लमेंट ) निवडणुकींत पक्षानें ३९७ पैकीं ११० जागा जिंकल्या. अर्थात् एवढा शक्तिमान पक्षहि १९१४ च्या पहिल्या महायुद्धापूर्वी जर्मनीचें भवितव्य बदलूं शकला नाहीं याचें प्रमुख कारण मार्क्सवादी विचारसरणींतून निघणारे धोरणासंबंधींचे निष्कर्ष व पक्षाचें बल वाढविणारा पक्षाचा कार्यक्रम यांमधील विसंगति हेंच आहे. पक्षाचें जहाल मार्क्सवादी नेतृत्व आपल्या वर्गीय दृष्टिकोणापलीकडे जाऊन सबंध राष्ट्राच्या राजकीय भवितव्याचा विचार करण्याच्या मनोभूमिकेंत नव्हतें. समाजांतील इतर वर्गांकडे तें उपेक्षेनें पाही. प्रचलित राज्यव्यवस्थेंत पक्षाच्या बलाला शोभेसें सत्तेचें राजकारण खेळण्यास तें तयार नव्हतें. आपली वर्गीय अलिप्तता

अशा राजकारणांत त्यांना सोडावी लागली असती. फेरविचारवाद्यांच्या दृष्टिकोणाचा पक्षांत अधिकृत स्वीकार होता तर हा दोष जाण्याची शक्यता होती. कामगार चळवळीचाहि व्यावहारिक फायदा अधिक झाला असता. पण फेरविचारवाद्यांच्या दृष्टिकोणांत एक मोठा दोष हा होता कीं साम्राज्यशाही युगाचें पर्यवसान भीषण युद्धांत, क्रान्त्यांत व प्रतिक्रान्त्यांत झाल्याशिवाय राहाणार नाहीं व अशा परिस्थितींत संथ शान्ततामय बदल राजकीय जीवनांत अशक्य बनेल हें त्यांना उमगलें नाहीं. म्हणूनच त्यांचें नेतृत्व दैनंदिन कार्यक्रमांत अधिक फलद्रूप होण्याची शक्यता असूनहि, या दूरदृष्टीच्या अभावीं त्यांना समाजवादी चळवळीस चिघळल्या राजकीय परिस्थितींत तारतां आलें नाहीं. जर्मन सोशल डेमॉक्रसीवरील या अरिष्टाचे परिणाम महायुद्ध सुरू झालें तेव्हां युरोपांतील समाजवादी चळवळींनाहि कमीअधिक प्रमाणांत बाधले.



: ८ :

# ब्रिटनमधील फेबियन समाजवाद

जर्मन सोशल डेमॉक्रसीची वाढ प्राधान्येंकरून मार्क्सवादी विचार-परंपरेंतून झाली. तिचें नेतृत्व मार्क्सवादी समाजवाद्यांनीं केलें. त्या नेतृत्वास विरोध करणारा बर्न्स्टाईनवादी समाजवाद्यांचा गटहि फक्त मार्क्स-वादाच्या फेरविचाराचीच मागणी करीत होता. आपल्या आयुष्याच्या अंतकालांत खुद्द मार्क्स व एंगल्सनीं नव्या परिस्थितीशीं जुळते डावपेंच शोधण्यासाठीं जे विचार व्यक्त केले होते त्या विचारांचा आधार घेऊनच फेरविचाराची मागणी होत होती. पण जर्मनीव्यतिरिक्त इतर युरोपीय देशांत स्थल–काल–इतिहासपरत्वें स्वतंत्र समाजवादी विचारपरंपरा उदयास आल्या. समाजवादी विचारपरंपरा समृद्ध करण्यांत त्यांनीं मोठा हातभार लावला आहे. आपल्या देशांतील कामगारवर्गाच्या राजकीय व आर्थिक चळवळींना तात्त्विक अधिष्ठान पुरविलें आहे. या समाजवादी विचारपरंपरांच्या अभ्यासांत इंग्लंडमधील फेबियन समाजवादी विचारसरणीचा परामर्श प्रथम घेतला पाहिजे.

यंत्रविध्वंस करूं मागणाऱ्या 'लडाईट्स' चळवळीची विफलता पटून ब्रिटनमधील कामगारवर्गानें यंत्राची मालकी समाजाच्या हातीं घेण्याच्या उद्देशानें एकोणिसाव्या शतकाच्या सुरवातीपासून शान्ततामय संघटनात्मक

चळवळ हातीं घेतली होती. फॅक्टरी कायदे पास झाले तरी त्यांची अम्मल-बजावणी करणारी यंत्रणा व ते कायदे करणारी भांडवलशाहीनिष्ठ राजसत्ता बदलल्याखेरीज कामगारवर्गाचें हितरक्षण होणार नाहीं याची खात्री त्यांना पटली होती. भांडवलशाही अर्थपद्धतींतील शोषण एकट्या दुकट्या भांडवल-दाराच्या हृदयपरिवर्तनानें अगर कामगारवर्गाविषयींच्या सहानुभूतीनें नष्ट होणार नाहीं हें न्यू ल्यूनार्कच्या आदर्श वसाहतीच्या प्रयोगांतून, स्वप्नद्रष्टा समाजवादी रॉबर्ट ओवेन शिकला होता व म्हणूनच आपल्या उतारवयांत कामगारांना संघटित होण्यासाठीं त्यानें आवाहन केलें होतें. त्याच्याच प्रेरणेंतून एकोणिसाव्या शतकाच्या मध्यास इंग्लंडमध्यें सहकारी व ट्रेड युनियन्सच्या चळवळी उदयास आल्या होत्या. १८४० नंतर चार्टिस्ट चळवळीनें कामगार-वर्गास आपल्या आर्थिक मागण्यांबरोबरच राजकीय हक्कांसाठीं लढण्याची शिकवण दिली. कामगार चळवळीस व्यापक लोकशाही लढ्याचें स्वरूप दिलें. या लढ्यांतून कामगार चळवळ अधिक बलवान बनली. कामगार चळवळीच्या वाढत्या बलाची साक्ष पार्लमेंटनें वेळोवेळीं पास केलेल्या ट्रेड युनियन्स कायद्यांत, सुधारणा बिलांत, सहज मिळूं शकते. १८४८ सालीं इंग्लंडमध्यें कामगारांचा प्रत्येक संप बेकायदेशीर होता, तर १८७५ च्या कायद्यानें संपच काय पण शान्ततामय निरोधनहि कायदेशीर मानलें गेलें. १८३२ मधील सुधारणा-बिलानें कामगारवर्गास कोणताच म्हणण्यासारखा फायदा झाला नव्हता; तर १८६७ च्या दुसऱ्या सुधारणा–बिलानें त्यास मतदानाचा हक्क मिळाला. इंग्लंड-मधील समाजवादी चळवळीचा पाया या बलशाली संघटित कामगार चळवळींनींच घातला.

कामगार चळवळीबरोबरच इंग्लंडमधील बुद्धिजीवी वर्गांतील कांहीं अर्थ-शास्त्रज्ञ, लेखक व धर्मसुधारक कामगारवर्गाचें हितरक्षण करण्यासाठीं पुढें सरसावले. ‘प्रिन्सिपल्स ऑफ पोलिटिकल इकॉनमी’ या आपल्या पुस्तकांत जॉन स्टुअर्ट मिल म्हणतो, ‘समाजाच्या हिताआड येणारे विशिष्ट मालकी हक्क नियंत्रित करण्याचा अगर त्यांत बदल घडवून आणण्याचा समाजाला पूर्ण अधिकार

आहे. ' जॉन स्टुअर्ट मिल, लेस्ली, सिम, केन्स या अर्थशास्त्रज्ञांनीं अर्थशास्त्रास नवा राजकीय पाया देण्याचा प्रयत्न केला. रस्किन, कार्लाईल आदि विख्यात लेखकांनीं भांडवलशाही समाजव्यवस्थेवर प्रखर टीका केली. डिकन्सनें सामाजिक अन्यायावर व हेन्री जॉर्जनें प्रचलित जमीनव्यवस्थेवर हल्ले चढविले. किंग्स्ले व मॉरिस या ख्रिश्चन समाजवाद्यांनीं ख्रिश्चन धर्मभावना व शोषक भांडवलशाही समाजपद्धति परस्परविरोधी आहे असा जोरदार प्रचार करून श्रद्धावान जनतेस समाजवादाकडे आकर्षित केलें. इंग्लंडमधील समाजवादी विचारपरंपरा समृद्ध करण्यांत या सर्वांचें कार्य बहुमोल ठरलें आहे. ' १८४८ च्या इंग्लंडमधील कामगार वर्गाची स्थिति ' या पुस्तकाच्या प्रत्येक नव्या आवृत्तीस नवी प्रस्तावना लिहून खुद्द एंगल्सनेंहि इंग्लंडमधील कामगारवर्गाच्या स्थितींत व प्रगतींत घडून आलेल्या बदलाचा अद्यावत् आढावा घेतला. १८७१ च्या फ्रेंच–जर्मन युद्धानंतर इंग्लंडशीं स्पर्धा करणारीं जर्मनी व अमेरिका हीं उद्योगप्रधान राष्ट्रें पुढें आलीं. इंग्लंडच्या व्यापारी मक्तेदारीवर त्यांनीं घाला घातला. या औद्योगिक व व्यापारी चढाओढींत ' खुल्या व्यापाराचे ' वैभवशाली दिवस इंग्लंडला पुनश्च लाभले नाहींत. पण या मध्यंतरींच्या काळांत भांडवलदार वर्गाबरोबर इंग्लंडमधील कामगार-वर्गाची स्थितिहि सुधारली आहे अशी कबुली १८८५ सालीं आपल्या पुस्तकास लिहिलेल्या नव्या प्रस्तावनेंत एंगल्सनें दिली. १८७१, १८७५ व १८७६ मध्यें पास झालेल्या ट्रेड युनियन ॲक्ट्स्मुळें कामगारवर्गाला संरक्षण मिळालें होतें, स्त्रिया व मुलें चढाओढींतून दूर झालीं होती व मजुरांमजुरांमधील स्पर्धा बंद पडून कामधंद्याची शाश्वती लाभली होती. कामगारवर्गाच्या एका गटानें तर मक्तेदारीचाहि फायदा अनुभवला होता. उत्पादक म्हणून ट्रेड युनियन्समधून व गिऱ्हाईक या नात्यानें वाढत्या सहकारी चळवळींतून ते आपलें हितरक्षण करूं लागले होते. या आर्थिक सुस्थिति व संघटनावाढीबरोबर १८७६ च्या सुधारणा कायद्यानें लाभलेल्या मतदानाच्या हक्कांतून कामगारवर्ग राजकीय क्षेत्रांतहि प्रगतिपथास लागला.

इंग्लंडमधील या सामाजिक, आर्थिक व राजकीय परिस्थितीच्या

पार्श्वभूमीवर व विशेषतः ब्रिटिश कामगार वर्गाची स्थिति डोळ्यापुढें ठेवून, आपण फेबियन विचारपरंपरेचा अभ्यास करावयास हवा. मार्क्स व एंगल्सच्या काळांतील क्रांतिजन्य ऐतिहासिक परीस्थिति केव्हांच मागें पडली होती. नव्या परिस्थितीशीं जुळतें असे नवे मार्ग शोधणें क्रमप्राप्त बनलें होतें. निदान इंग्लंडपुरतें बोलावयाचें तर मार्क्सहि इंग्लंडमध्यें शान्ततामय मार्गानें समाजक्रान्ति घडून येऊं शकेल असें मानूं लागला होता. फेबियन्सनीं हाच विश्वास सिद्धान्तरूप केला. शान्ततामय मार्गानें, घटनात्मक चळवळींतून, एक एक प्रगतीचा टप्पा गांठत समाजाच्या विकासी प्रक्रियेंत भांडवलशाही अर्थव्यवस्थेचें परिवर्तन समाजवादी समाजव्यवस्थेंत होऊं शकेल. इंग्लिश जनतेस उपलब्ध अशा आर्थिक व राजकीय संघटनांमार्फत उद्योगधंद्यांचें सामाजीकरण करणें शक्य आहे. समाजवाद्यांना क्रान्तिकारक परिस्थितीची वाट पाहात बसण्याची जरूरी नाहीं. ज्या क्षणीं सामाजिक सुधारणांची जबाबदारी शासनसंस्थेनें मान्य केली व भांडवलदारांनीं कामगारांचा सांघिक देवाणघेवाणीचा हक्क कबूल करून शासनसंस्था व ट्रेड युनियन्सना आपल्या अनिर्बंध स्वातंत्र्यांत ढवळाढवळ करूं दिली त्या क्षणापासून समाजवाद्यांच्या कर्तृत्वास वाव निर्माण झाला आहे. त्यांच्या प्रतिपादनाचा थोडक्यांत हा आशय होता. मार्क्सचा इंग्लंडमधील शान्ततामय परिवर्तनाचा विश्वास त्यांना पूरक ठरला होता; तर मार्क्सची शासनसंस्था-विषयक मीमांसा त्यांनीं या प्रतिपादनांनीं त्याज्य ठरविली होती.

१८८३ च्या हिवाळ्यांत स्वप्नद्रष्ट्या समाजवाद्यांचा अमेरिकन अनुयायी थॉमस डेव्हीडसन इंग्लंडला भेट देण्यासाठीं आला होता. त्यानिमित्त भरलेल्या बैठकीस आलेल्या कांहीं कुशाग्र बुद्धीच्या तरुणांनीं एकत्रित कार्य करण्याचा निर्णय घेतला. ९ नोव्हेंबरच्या बैठकींत या गटानें नैतिक व सामाजिक क्षेत्रांतील सुधारणांच्या शक्याशक्यतेवर बराच खल करून एक उद्दिष्ट ठराव पास केला. त्यांत ते म्हणतात, " बहुसंख्यांकांच्या हालअपेष्टांची किंमत मोजून स्पर्धानिष्ठ पद्धतीनें मूठभर लोकांचें सुख व आराम अबाधित केले आहेत व म्हणून समाजाची अशा तऱ्हेनें पुनर्रचना केली गेली पाहिजे कीं त्यांत सर्वांचें हितरक्षण

होऊन सर्वांना सुखप्राप्ति होईल." ४ जानेवारी १८८४ ला या गटानें फेबियन सोसायटीची अधिकृत स्थापना केली. गटास फेबियन हें नांव कां घेतलें याचा अधिकृत खुलासा करतांना ते म्हणतात, "हनिबालविरुद्ध लढत असतां फेबियस धीरगंभीरपणानें योग्य क्षणाची वाट पाहात राहिला. त्याबद्दल अनेकांनीं त्याच्यावर प्रखर टीका केली. आपणहि अशीच वाट पाहिली पाहिजे. पण योग्य क्षण येतांच, फेबियसप्रमाणें, आपणहि शत्रूला जोराची धडक देऊं; अन्यथा आपलें वाट पाहाणें निरुपयोगी व निरर्थक ठरेल." वर्गीय भाषेंत फेबियन चळवळ मध्यमवर्गाची म्हणजेच त्या वर्गांतील बुद्धिवाद्यांची होती. सुरवातीच्या काळांत तरी ती समाजवादी नव्हती. समाजाच्या नैतिक व आत्मिक पुनरुज्जीवनाचें ध्येय डोळ्यासमोर ठेवूनच तिनें आपलें कार्य आरंभिलें. तिच्या यशाचें श्रेय चळवळींत सुरवातीस सामील झालेल्या कांहीं असामान्य बुद्धिमन्तांना द्यावें लागेल. विशेषतः बर्नार्ड शॉ, सिडने ऑलिव्हर, सिडने वेब्र, ग्रॅहॅम वॅलास, विल्यम क्लार्क, ॲनी बेझंट व नंतर चळवळींत सामील झालेले एच्. जी. वेल्स व बेट्रीस वेब्र यांचा उल्लेख प्रामुख्यानें करावयास हवा.

फेबियनवाद्यांचा समाज–प्रश्नांकडे पाहावयाचा दृष्टिकोण वस्तुस्थितिनिष्ठ व व्यवहारवादी असल्याचें आपणांस आढळून येईल. मार्क्सप्रमाणें एकादें सर्वस्पर्शी संपूर्ण तत्त्वज्ञान निर्माण करण्याचा प्रयत्न त्यांनीं न करतां आपल्या पुढील प्रत्येक समस्येचा बारकाईनें अभ्यास करून त्या समस्येचें चालू काल-परिस्थितीनुरूप उत्तर शोधलें. पुस्तकरूपानें त्यांची जाहीर चर्चा केली. समाज-हिताच्या सर्व लहानमोठ्या प्रश्नांवर फेबियन सोसायटीमार्फत आजपर्यंत शेंकडों पुस्तिका प्रसिद्ध करण्यांत आल्या असून त्या पुस्तिकांनीं जागतिक कीर्ति संपादन केली आहे. लहानमोठ्या हजारों सभांत सोसायटीच्या सभासदांनीं सर्व प्रचलित समाज-प्रश्नांवर व्याख्यानें दिलीं आहेत. पार्लमेंटांतील कित्येक बिलें तयार करण्यांत, मांडण्यांत वा त्यासाठीं इतरांना उपयुक्त माहिती पुरविण्यांत पुढाकार घेतला आहे. मजूर पक्षाच्या संघटनावाढीस व समाजवादी विचाराच्या प्रसारास बहुमोल मदत केली आहे. 'फेबियन निबंधांत' सोसायटीच्या सात प्रमुख

सभासदांचे लेख छापण्यांत आले आहेत. आजपर्यंत त्याच्या अनेक आवृत्त्या निघाल्या आहेत. या निबंधांतून फेबियन समाजवाद्यांची तात्त्विक भूमिका विशद करण्यांत आली आहे. चार निबंधांत समाजवादाच्या ऐतिहासिक, आर्थिक, औद्योगिक व नैतिक दृष्टिकोणाची चर्चा असून दोन निबंधांत भावी समाजवादी समाजव्यवस्थेचें दिग्दर्शन करण्यांत आलें आहे. सातव्या निबंधांत या समाजव्यवस्थेप्रत पोहोंचणाऱ्या संक्रमण कालासंबंधीं चर्चा केली आहे. शॉ, वेब, क्लार्क, ऑलिव्हर, वॅलास, ब्लॅंड व ॲनी बेझंट यांनीं हे निबंध लिहिले आहेत. फेबियन सोसायटीस आजपर्यंत कधींहि अध्यक्षाची गरज पडली नाहीं व सोसायटीच्या अधिकृत भाष्यकाराचा मक्ता कोणी सांगितला नाहीं ही घटना तिच्या कामकाजाचें वैशिष्ट्य दर्शविते. १८८७ मध्यें फेबियन सोसायटीनें आपली तात्त्विक श्रद्धा व कार्यक्रम एक निवेदन देऊन जाहीर केला. त्याची सुरवात ' फेबियन सोसायटी समाजवाद्यांची आहे ' या वाक्यानेंच झाली आहे. फेबियन समाजवादी विचारपरंपरेची ओळख फेबियन निबंधांत मांडण्यांत आलेल्या विचारांचा सारांश अभ्यासिला तरी होऊं शकेल.

इतिहासावरील आपल्या निबंधांत वेब लिहितो, " कोमटे, डार्विन, स्पेन्सर यांचे विचार जगापुढें येण्यापूर्वी सर्व आदर्शवाद्यांनीं आपली आदर्श समाजव्यवस्था चिरंजीव बनेल असा निर्वाळा दिला होता. पण आजच्या सामाजिक आदर्शांत समाजव्यवस्थेंतील सतत विकास गृहीत धरण्यांत येतो. समाजविकासाच्या प्रक्रियेंत कुठेंहि एकदम खीळ न पडतां जुन्या समाज-व्यवस्थेंतून नवी समाजव्यवस्था अप्रतिहत कशी विकसित होत राहील हीच आजच्या तत्त्ववेत्त्यांची समस्या आहे... लोकशाहीचा पाठ आजच्या समाज-सेवकांनीं घेतला आहे. इंग्लंडपुरते तरी समाजांत घडून येणारे मूलभूत बदल हे लोकशाही, उत्पातविरहित, उच्च नैतिक पातळी साधणारे व घटनात्मक आणि शांततामय मार्गानें घडून आलेले असतील या त्यांच्या मतास आज सर्व समाजवादी मान्यता देतात... लोकशाहीची परिणति राज्यसंस्थेवरच नव्हे तर अर्थजन्य उत्पादनाच्या सर्व उत्पादनसाधनांवर सर्व जनतेचें प्रभुत्व प्रस्थापित

होण्यांत अखेर व्हावयास हवी व स्पर्धेतून निर्माण होणाऱ्या अराजकाची जागा सांघिक सहकार्यानें भरून निघावयास हवी हें स्पष्ट आहे... लोकशाहीची आर्थिक बाजू खुद्द समाजवाद हीच असूं शकेल... औद्योगिक क्रान्तीनें कामगारास स्वदेशांत घरदार नसलेला पाहुणा बनवलें होतें तर आज लोकशाहीच्या वाढत्या विजयाबरोबर तो देशाचा शास्ता बनत आहे..."

"... व्यक्तिवादी तत्त्वज्ञानांतील अतिरेकानें भांडवलशाही अर्थव्यवस्थेंत अराजक माजूं दिलें. पण व्यवहारी लोकांनीं या वृत्तीस हळु हळु पायबंद घातला. आरोग्यासाठीं, शिक्षणासाठीं व कामगारांच्या न्याय्य हितरक्षणासाठीं शासनसंस्थेला भांडवलदारवर्गाच्या अनिर्बंध स्वातंत्र्याला लगाम घालणें भाग पडलें. पोस्ट व तारखातें यांवर आज शासनसंस्थेची मालकी प्रस्थापित झाली आहे. लष्कर, नाविकदल, पोलीस व न्यायदान या खात्यांचा कारभार पाहाणारी शासनसंस्था आज इतर क्षेत्रांतहि आपलें नियंत्रण वाढवीत आहे. व्यक्तिगत शोषणाचें उद्योगधंद्यांचें क्षेत्र आकुंचित होऊं लागलें आहे.... उद्योगधंद्यांच्या नियंत्रणांत आज अनेक महत्त्वाचे बदल घडून आले आहेत. उद्योगधंद्याची व्यवस्था व मार्गदर्शन स्वतः भांडवलदार आज क्वचितच करतो. उद्योगधंद्यास भांडवल तो पुरवितो पण आज इंग्लंडमधील एकतृतीयांश उद्योगधंद्यांचें भांडवल जॉइन्ट स्टॉक कंपन्यांनीं पुरविलें आहे. कांहीं उद्योगधंदे शासनसंस्था स्वतः चालविते तर कांहीं उद्योगधंद्यांचें वाढतें नियंत्रण ती आज करीत आहे. समाजवादाबद्दल आपुलकी नसणाऱ्या शासकवर्गाच्या प्रतिनिधींनींच ही उद्योगधंद्यांवरील सार्वजनिक मालकी आज कांहीं प्रमाणांत स्थापित केली आहे. जसजसा कामगारवर्ग राजसत्तेचा भागीदार बनेल तसतसा तो आपल्या वर्गाच्या आर्थिक व सामाजिक हितरक्षणासाठीं सत्तेचा उपयोग केल्याशिवाय राहाणार नाहीं."* सारांश राजकीय लोकशाहीच्या वाढत्या यशाबरोबर इंग्लंडमध्यें समाजवाद येईल असा विश्वास वेबनें आपल्या निबंधांत व्यक्त केला आहे.

---

* सोशल इकॉनमिक मूव्हमेंट्स : पान १९२

'समाजवादाचा औद्योगिक पाया' या आपल्या निबंधांत क्लार्क लिहितो, "...फॅक्टरी कायद्यांनीं भांडवलदारांच्या 'अनिर्बंध स्वातंत्र्याच्या' कल्पनेस नख लावलें. उत्पादनाचें कार्य मॅनेजर वा व्यवस्थापक मंडळावर सोंपवून आज भांडवलदार, कुठलेंहि उत्पादक कार्य न करतां, केवळ व्याज व डिव्हिडंडचा धनी बनला आहे. आपल्या वडिलोपार्जित ठेकेदारीवर हा ऐतखाऊंचा वर्ग समाजांत पोसला जात आहे...जॉइन्ट स्टॉक कंपन्यांच्या वाढीबरोबर छोटी पुंजी असलेले लोक एकत्र येऊन त्यांनीं उधोगधंद्यांसाठीं फार मोठें भांडवल उभें केलें. कामगार व कारखानदार यांच्यांतील व्यक्तिगत संबंध दुरावले. लठ्ठ पगार घेणारे मॅनेजर जादा डिव्हिडंड वांटून स्वतःचें आसन बळकट करावें या बुद्धीनें कामगारांच्या मजुरींत कपात करूं लागले, संपांची संख्या वाढूं लागली व भांडवलशाहीनिष्ठ शासनसंस्थेला त्यांनीं या संघर्षांत आपल्या बाजूनें ओढून घेतलें...हळु हळु या जॉइन्ट स्टॉक कंपन्यांचे मोठमोठे एकजीव गट अगर ट्रस्ट्स वाढले. उत्पादनांतील व्यक्तिगत प्रेरणा मागें पडली व उत्पादनव्यवस्था लोकशाहीशीं विसंगत बनूं लागली. भांडवलशाही व लोकशाही हीं एकाच गाड्याचीं दोन चाकें बनण्याऐवजीं आज परस्परविरोधी मार्ग आक्रमीत आहेत असे आढळून येईल. अर्थात् व्यक्तिगत उत्पादनांतील उधळपट्टी व नुकसान या ट्रस्ट्सनीं थांबविलें, वस्तूंच्या किंमती स्थिर झाल्या, फायद्याचे टक्के वाढले व जलद यांत्रिक सुधारणा शक्य बनली. उद्योगधंद्यांचीं उद्दिष्टें त्यांनीं साधलीं आहेत. तेव्हां उत्पादनांतील वाढतें सामाजीकरण व श्रम-विभागणीचें सहकारी उत्पादन थांबवून परत अनियंत्रित व्यक्तिगत भांडवलशाही उत्पादनाचा मार्ग चोखाळावयाचा कीं चालू व्यवस्थेंतील आर्थिक व सामाजिक असंतोष नष्ट करण्यासाठीं उत्पादनाच्या सांघिक प्रयत्नांना सामाजिक मालकीची जोड देण्याचा समाजवाद्यांनीं सुचविलेला पर्याय स्वीकारावयाचा, या प्रश्नाचें उत्तर आज व्यक्तिवाद्यांना द्यावयाचें आहे..."

"...इतिहासाचा कौल समाजवाद्यांच्या बाजूनें आहे. उद्योगधंद्याच्या कुठल्याच प्रक्रियेंत आज भांडवलदारांची आवश्यकता उरलेली नाहीं. गुलामांचे

मालक अगर सरंजामदार हे समाजाला निरुपयोगी ठरल्यावर त्यांची जशी उचलबांगडी झाली तशीच आज भांडवलदारांची व्हावयास हवी. व्यवस्थापकांस आपल्या उद्योगधंद्यांची व्यवस्था पाहाण्यासाठीं समाज, आवश्यक तो पगार देईल. पण श्रमिकांनीं निर्माण केलेल्या संपत्तीवर डिव्हिडंड व व्याजाच्या रूपानें हात मारण्यास कोणासहि संधि मिळणार नाहीं. इतर लोकांप्रमाणें आपल्या उदरनिर्वाहासाठीं कांहींतरी उपयुक्त काम या लोकांनीं करावें... भांडवलाच्या वाढत्या एकत्रीकरणाबाबत शासनसंस्थेपुढें आज तीन पर्याय आहेत. हें एकत्रीकरण थांबविणें, त्यांवर कर बसविणें व नियंत्रण प्रस्थापित करणें किंवा तें ताब्यांत घेऊन त्याची व्यवस्था पाहाणें. कुठलाहि पर्याय तिनें स्वीकारला तरी औद्योगिक भांडवलावर सामाजिक नियंत्रण ओघानेंच येतें... समाजवाद्यांपुरतेंच बोलावयाचें तर प्रगतिशील अशा प्रत्येक प्रयत्नास त्यांनीं पाठिंबा द्यावा. औद्योगिक लोकशाहीसाठीं जनमत जागृत व संघटित करून वर्गवितुष्टांतून निर्माण होणारी समाजांतील स्पर्धा, द्वेष व उधळपट्टी, प्रत्येक समाजसुधारकास कमी करतां येईल; वर्गयुद्धाचें पर्व संपवितां येईल." * प्रचलित सामाजिक व औद्योगिक परिस्थितीचा तर्कशुद्ध दृष्टीनें विचार केला तर समाजवादच कां अपरिहार्य आहे हें प्रत्येकास या विवेचनांतून समजून येईल असा दावा फेबियन समाजवादी करतात.

फेबियनवाद्यांच्या आर्थिक दृष्टिकोणाची चर्चा शॉनें आपल्या निबंधांत केली आहे. हेन्री जॉर्ज, रिकार्डो, मिल यांनीं मांडलेला 'खंडाचा सिद्धान्त' शॉ, वेब व इतर फेबियन अर्थशास्त्रज्ञ यांनीं जमिनीप्रमाणें भांडवलालाहि लागू केला. भांडवलशाही खाजगी मालकीचा आधुनिक प्रकार, राष्ट्राच्या औद्योगिक संपत्तीचा लहानमोठा हिस्सा कोणतेंच उत्पादक श्रम न करणाऱ्या भांडवलदारास कायदेशीर मालकी हक्काच्या नांवाखालीं बहाल करतो. समाजवादी हीं दोन्हीं रद्द झालीं पाहिजेत अशी मागणी करतात. जमीन व भांडवल यांचें भिन्न स्वरूप ध्यानांत घेतलें तरी त्यांच्यासंबंधीं ठरविण्यांत येणाऱ्या धोरणांत केला जाणारा फरक

---

* सोशल इकॉनमिक मूव्हमेंट्स : पान २००

आम्हांस पटत नाहीं. कुठल्याहि आर्थिक व्यवहारांत वाढावा हा कुठल्याना कुठल्या स्वरूपांत उकळलेला खंड आहे आणि ज्या अर्थी हा खंड निर्माण होतोच त्या अर्थी शासनसंस्थेनें त्याचा ताबा घेऊन तो समाजहितासाठीं उपयोगांत आणावा.

समाजवादाच्या नैतिक अधिष्ठानाची चर्चा ऑलीव्हरनें आपल्या निबंधांत केली आहे. समाजवाद ही व्यक्तिवादाची विनाशक शक्ति नसून उलट व्यक्तिवादाचें उदात्त स्वरूप त्यांत पाहावयास मिळेल. व्यक्तीच्या सर्वांगीण विकासास आवश्यक अशी सामाजिक व आर्थिक परिस्थिति समाजांत निर्माण करणें हेंच समाजवादाचें कार्य आहे. आजची खाजगी मालमत्तेवर आधारलेली भांडवलशाही समाजव्यवस्था अनैतिक आहे. ज्या समाजव्यवस्थेंत केवळ दुसऱ्यांच्या श्रमावर विलास करणारा ऐतखाऊ वर्ग निर्माण होतो व पोसला जातो ती समाजव्यवस्था नैतिक कशी म्हणावी ? श्रमिकांना काटकसर, संयम, उद्योगप्रियता यांचे धडे देणारा हा ऐतखाऊ वर्ग स्वतः उत्पादनकार्यास कोणताच हातभार न लावतां स्वतःचे चोचले भागविणारे व विकारभावना उद्दीपित करणारे खेळ खेळण्यांत दंग असतो. असत्य, दांभिकपणा व उच्चनीचभाव समाजांत प्रसृत करून आपल्या निरुद्योगाबरोबर हे समाजघातक उपद्व्याप मात्र तो जरूर आरंभितो. प्रत्येक व्यक्तीचें शील व चारित्र्य घडविणारी भोंवतालची परिस्थिति भांडवलशाही समाजव्यवस्थेंत हीन दर्जास पोहोंचते. कुठल्या तरी वर्गाकडून चोपून जास्त काम करून घेतल्याखेरीज ऐतखाऊ वर्गाच्या कामाची भरपाई कशी होणार ? शोषितवर्ग बव्हंशीं उद्योगप्रिय व प्रामाणिक राहातो म्हणूनच ही भरपाई होऊं शकते. पण भांडवलशाही उत्पादनव्यवस्था त्यांच्या उदरनिर्वाहाच्या व्यवसायांतून उलट याच उत्पादकवर्गास अनेक वेळां उठवून लावते. बेकारी व जीवनाची अशाश्वती वाढली कीं परागंदा, भिकारी, अर्धपोटीं माणसें निरुद्योगी होतात. त्यांचें अधःपतन सुरू होतें. त्यांचीं मुलें चोऱ्या करूं लागतात. या अधःपतनांतून मार्ग काढण्यासाठीं प्रत्येकास उत्पादन व्यवसायाची संधि देणारी व ऐतखाऊ वर्ग नष्ट करणारी नवसमाजव्यवस्था निर्माण केली पाहिजे. सुदृढ निरोगी शरीर व सर्वांगीण विकासास आवश्यक अशा जीवनगरजा पुऱ्या

होण्याची शाश्वती प्रत्येक व्यक्तीस लाभेल तरच त्याच्या आवडीनिवडी सुधारणें व शिक्षणानें त्याची बौद्धिक पातळी उंचावणें शक्य बनेल. पण पढित शिक्षणाहून, जेव्हां प्रत्येक व्यक्तीचा जीवनव्यवसाय व उद्योग इतरांच्या सहकारावर अवलंबून राहील, म्हणजेच औद्योगिक सहकार्याची परिस्थिति उत्पादनव्यवस्थेंत निर्माण होईल, तेव्हांच प्रत्येक व्यक्तीला आपलें जीवन समाजाच्या जीवनाशीं एकरूप करण्याची चालना व शिकवण मिळेल. कारखानदारी पद्धत, यंत्रप्रधान उद्योगधंदे, जागतिक व्यापार यामुळें व्यक्तिगत उत्पादनाचे मार्ग कायमचे बंद झाले आहेत. जेव्हां सामुदायिक उत्पादनाची व्यवस्था सामाजिक मालकींतून पूर्णस्वरूप बनेल तेव्हांच सामाजिक नीतिमत्तेचे आदर्श व्यक्तींच्या जीवनांत प्रतिबिंबित होतील. व्यक्तीचें जीवन सुखी बनेल.

वॅलास आपल्या निबंधांत म्हणतात, ‘ उत्पादनाचीं साधनें समाजाच्या मालकीचीं व्हावीं पण उपभोगाचीं साधनें व्यक्तिनिष्ठ राहावीं अशीच समाजवाद्यांची कल्पना आहे. अर्थात् बागा, तळीं, विशिष्ट जमिनी यांचा सामाजिक उपयोग करण्यास तसेंच सामाजिक संपत्तींतून समाजोपयोगी कार्यें हातीं घेण्यास कोणीच हरकत घेण्याचें कारण नाहीं. आज समाज-संपत्तीच्या सामूहिक उपभोगास आवश्यक असलेल्या सहकार्याहून उत्पादनांतील सांघिक सहकार्यास माणसें जास्त राजी आहेत ही वस्तुस्थिति मात्र डोळ्याआड करतां नये.”*

समाजवादी उत्पादनव्यवस्थेंत व्यक्तींची उद्योगप्रियता कशी कायम राहील, त्यांच्या जीवनप्रेरणा कोणत्या असतील याची चर्चा ॲनी बेझंट यांनीं आपल्या निबंधांत केली आहे. उत्पादन कार्यांतील आनन्द, सुधारणेची भूक, समाजाचें प्रशस्तिपत्र मिळविण्याची उत्सुकता, सहिष्णुता व बंधुभावाचा प्रत्यय, तसेंच स्वतःचें गुणसंवर्धन करून इतरांहून अधिक यश संपादन करण्याची ईर्षा हे गुण व्यक्तीचें जीवन संपूर्ण बनण्यास मदत करतील व व्यक्तीस श्रम करण्यास व प्राविण्य मिळविण्यास चालना देतील. आज जीवनगरजांची शाश्वती लाभलेला सैनिक वर्ग देशप्रेमासारख्या भावनांसाठीं त्यागास प्रवृत्त होतो.

* सोशल इकॉनमिक मूव्हमेंट्स : पान २१३

शौर्याचें एक पदक मिळविण्यासाठीं प्राणाशीं खेळ खेळतो. लढाईतील विजया-सारख्या वास्तविक निराकर्षक साध्यासाठीं जर इतकी प्रभावी प्रेरणा मानवी मनांत स्फुलिंग पावते तर त्याहून उच्च व उदात्त आशा आकांक्षांसाठीं प्रेरणांची उणीव कां पडावी ? साध्या खेळांत आपल्या गटास यश मिळावें म्हणून तरुण मनें किती उत्सुकता दाखवितात, स्वतःस विसरून जातात व सांघिक प्रयत्नांची पराकाष्ठा करतात; मग परिस्थितींत फरक घडून आला तर महान् सामाजिक प्रयोगांत ही समरसता तें कां दाखविणार नाहींत ?

फेबियन निबंधांतील शेवटचा निबंध ब्लँडनें लिहिला आहे. पाशवी हिंसक साधनांनीं क्रान्ति घडवून आणण्यांत भरीव यश पदरीं पडणार नाहीं ही बहुसंख्य फेबियन्सची श्रद्धा त्यानें या निबंधांत व्यक्त केली आहे. त्या निबंधांत तो म्हणतो कीं कामगार वर्गजागृत व संघटित होत आहे. राजकीय क्षेत्रांत लोकशाही हक्कांसाठीं झगडून तो सत्तासंपादनाच्या मार्गास लागला आहे. भांडवलशाही शक्तींशीं लढण्यासाठीं तो ऐक्य घडवून आणीत आहे. अनिर्बंध स्पर्धेत एका मर्यादेपलीकडे व्यक्तिगत उत्कर्ष साधणें अशक्य झालेला, स्वतःजवळ भांडवल नसलेला, बुद्धिवादी, कर्तृत्ववान् तरुणवर्ग संकुचित स्वार्थापलीकडे विचार करून सामाजिक उत्कर्षासाठीं भांडवलशाहीविरोधी श्रमिक जनतेच्या गटांत अधिकाधिक संख्येनें सामील होत आहे. समाजवादी ध्येयनिष्ठेच्या प्रकाशांत आजच्या समाजव्यवस्थेतील दुर्गुण व वाईटपणा या तरुणास दिसतो. तो त्याच समाजांत वावरतो, पण अधिक निर्मल, धाडसी व पुण्यशील भावी जीवनाच्या स्वप्नांत दंग होऊन त्या प्रेरणेनें नवजीवन जगण्यास तो प्रारंभ करतो. ध्येयावर दृष्टि ठेवून खंबीर मनानें, उत्साहानें व स्वयंप्रेरणेनें एक एक पाऊल निश्चयानें पुढें टाकीत तो पुढचा मार्ग आक्रमितो. हाच तो फेबियन समाजवादी.

उत्पादनाची सामुग्री व उद्योगधंद्याची संघटना संपूर्ण लोकशाही अनु-भवणाऱ्या जनतेनें निर्माण केलेल्या शासनसंस्थेच्या हातीं सुपूर्त करण्यांत आली पाहिजे ही फेबियन्सची मागणी ‘ फेबियन निबंधांच्या ’ प्रस्तावनेत करण्यांत

आली आहे. खऱ्याखुऱ्या लोकशाहींत शासनसंस्था जनतेची मित्र असते व म्हणून शासनसंस्थेकडून कोणतीं कामें करून घ्यावींत हा प्रश्नच उद्भवत नाहीं. निबंधकारांपैकीं फक्त ब्लेडनेंच शासनसंस्थेवरील आपल्या विश्वासांत जरा संदेह व्यक्त केला आहे. शासनसंस्थेची खरी कसोटी, ती काय कार्य करते यावर न लावतां कुठल्या साध्यावर लक्ष ठेवून ती हीं कामें करते हा मुद्दा ध्यानीं घेऊन लावावयास हवी अशी भूमिका त्यानें मांडली आहे.

फेबियन्सचें एक वैशिष्ट्य हें होतें कीं त्यांनीं समाजवादी संघटनांना स्थानिक–स्वराज्य–संस्थांच्या कारभाराचें महत्त्व पटवून दिलें. मध्यवर्ती शासनसंस्थेइतकेंच महत्त्व या संस्थांच्या कारभाराला आहे असा प्रचार त्यांनीं आग्रहानें केला. फेबियन समाजवाद म्हणजे म्युनिसिपल समाजवाद अशी व्याख्या लोक करूं लागले होते हें लक्षांत घेतलें कीं या मुद्यावर त्यांनीं किती भर दिला होता याची कल्पना येते. आपल्या श्रमाचा संपूर्ण वांटा समाजांतील कुठल्याहि एका व्यक्तीस अगर वर्गास मिळावा असा दावा करणाऱ्या कोणत्याहि तत्त्वज्ञानाबद्दल अगर योजनेबद्दल फेबियन्सना आदर नव्हता. तसेंच खाजगी मालमत्ता अगर मिळकत गृहीत धरून आदर्श समाजाचें चित्र रंगविणाऱ्यांबद्दल त्यांना कधीं आपुलकी वाटली नाहीं. फेबियन्सनीं आपल्या अहर्निश प्रचाराच्या द्वारां समाजवादाबद्दलची बुद्धिजीवी वर्गांतील उपेक्षा व साशंकता दूर करण्याचा कसोशीनें प्रयत्न केला. समाजवादी विचारास व चळवळीस 'प्रतिष्ठा' प्राप्त करून दिली. त्यांचा प्रचाराचा उत्साह अपूर्व होता. १८८९ च्या एप्रीलपर्यंत आपल्या तत्त्वप्रणालीच्या प्रचारासाठीं सातशेंहून अधिक सभा त्यांनीं घेतल्या होत्या. तरुण विद्यार्थीवर्गापासून सनदी नोकरवर्गांतील जुन्या अधिकाऱ्यांपर्यंत त्यांचे चाहाते निर्माण झाले होते. प्रत्येक प्रश्नाचा सखोल अभ्यास करीत असतांना त्यांनीं जमा केलेली माहिती व आंकडेवारी मंत्र्यापासून सनदी नोकरांपर्यंत सर्वांनीं उपयोगांत आणली. त्यांच्या भरीव कामगिरीचा अंदाज सोसायटीच्या सभासद–संख्येवरून कोणासहि करतां येणार नाहीं. कारण ही सभासद संख्या चार हजारांवर कधींच गेली नाहीं.

चालू आर्थिक व सामाजिक शक्तींच्या प्रयत्नांची परिणति समाजवादाच्याच प्रस्थापनेंत होणार आहे असा मार्क्सवाद्यांप्रमाणेंच त्यांचाहि विश्वास होता. पण समाजाच्या नैतिक प्रेरणा जागृत करून, शिक्षणांत प्रगति करून, अधिक परिणामकारक प्रचार व राजकीय कार्य करून व शासनसंस्थेच्या कार्यक्षेत्रांत सतत व्याप्ति घडवून आणून शान्ततेच्या मार्गानें संथ विकास होत होत समाजाची प्रगति करणें शक्य आहे हा त्यांचा विश्वास कर्मठ मार्क्सवाद्यांस न शोभणारा होता. १९२० सालीं प्रसिद्ध झालेल्या 'फेबियन निबंधांच्या' आवृत्तींत वेबनें एका पिढींतील फेबियन कार्याचा आढावा घेतला आहे व आत्मसंशोधनांत त्या चळवळीच्या मर्यादांचें आपणांस झालेलें दर्शन लेखबद्ध केलें आहे. त्यांत ते म्हणतात: "आम्ही सुरवातीला ट्रेड युनियन चळवळीकडे फार कमी लक्ष पुरवलें होतें...व्यावसायिक संघटनांच्या सामाजिक कार्याचें महत्त्व आम्हांस त्यावेळीं उमगलें नाहीं......उद्याच्या शासनसंस्थेची महत्त्वपूर्ण सामाजिक जबाबदारी पार पाडण्यासाठीं या संघटना समाजव्यवस्थेचा कायमचा भाग बनणार आहेत याची कल्पना आम्ही करूं शकलों नाहीं...विसाव्या शतकाच्या आरंभीं आमच्या वैचारिक जाणिवेंतील ही उणीव आम्ही औद्योगिक लोकशाहीच्या अभ्यासानें भरून काढली...सहकारी संस्थांच्या चळवळीबद्दलहि आम्ही फार कमी उत्साह दाखविला. कामगारांचें सहकारी दुकान उद्याच्या समाजव्यवस्थेचा एक कायमचा भाग होऊन बसणार आहे हें आमच्या ध्यानीं आलें नाहीं...समाजवादी शासनव्यवस्थेंत लोकशाहीनिष्ठ व स्वायत्त अशा स्थानिक स्वराज्यसंस्था किती महत्त्वाची कामगिरी बजावणार आहेत याचा पुरा अंदाज आम्हांस लागला नाहीं...उद्योगधंद्यांच्या राष्ट्रीयकरणाचा साद्यंत विचार आम्ही केला नव्हता. शेतीच्या प्रश्नांवर आमचीं मतें मोघम स्वरूपाचीं होतीं व बेकारीचा प्रश्न सोडविण्याचे मार्ग आम्हांस जवळजवळ अपरिचित होते...आम्ही आंतरराष्ट्रीय दृष्टीनें विचार करूं शकलों नाहीं हा आमच्यांत एक ढोबळ दोष राहून गेला. परराष्ट्रीय संबंधांचा प्रश्न व युरोपीय समाजवादी चळवळ यासंबंधीं क्लार्क सोडून आम्हां कोणासच खरें ज्ञान नव्हतें. पण ही उणीवहि आम्ही थोड्या वर्षांच्या कालावधींत भरून

काढली. देशाभिमान व आंतरराष्ट्रीयवाद यांचा संयोग आमच्या भूमिकेंत आम्ही घडवून आणला. आमच्या वंशाबद्दल आम्हांस दर्प नव्हता व साम्राज्य-वादाबद्दल आपुलकी नव्हती हें यथायोग्यच होतें...जोंपर्यंत प्रत्यक्षांत प्रत्येक व्यक्तीस आपण स्वतंत्र आहों असें वाटत नाहीं तोंपर्यंत तो स्वतंत्र आहे असें मानून भागणार नाहीं व जोंपर्यंत आपण राज्य करीत आहों असें त्यास वाटणार नाहीं तोंपर्यंत राज्य चालविण्याचे अधिकार मिळूनहि कार्यभाग होणार नाहीं हें मानसशास्त्र आम्ही ध्यानांत घेतलें नव्हतें. स्वातंत्र्य व बंधुत्व हे लोकशाहीचा प्राण आहेत यासाठीं जो अट्टाहास आम्ही दाखविला तितका आग्रह समता ही समाजवादास प्राणभूत आहे या मुद्यावर आम्ही धरला नाहीं...फेबियन्सचा समाजांतील सर्व थरांत शिरकाव करून समाजवादी दृष्टीचा व योजनांचा प्रचार करण्याचा दंडक मात्र अजूनहि आम्हांस प्रिय वाटतो. इंग्लंडच्या राजकारणांत हुजूर व उदार पक्षांहून स्वतंत्र व विरोधी असा समाजवादी गट स्थापन करून, समाजवादी विचार व त्यांचा निश्चित कार्यक्रम जनतेपुढें ठेवल्याखेरीज, समाजवादाच्या दिशेनें फारशी प्रगति होणार नाहीं याची जाणीव फेबियन्सना होती व असा पक्ष कामगार वर्गांतून व ट्रेड युनियन्सद्वारांच निर्माण होऊं शकेल हा आमचा अंदाज खरा ठरला आहे. " *

वेबच्या या लेखनांतून फेबियन्सची सत्यसंशोधनाची ऊर्मि किति प्रभावी होती याची सहज साक्ष पटेल. प्रत्येक सामाजिक समस्येचा तर्ककठोर बुद्धीनें छडा लावण्याचा त्यांचा बौद्धिक व्यासंग समाजवादी विचारपरंपरा समृद्ध करण्यास फार उपयुक्त ठरला. ब्रिटनमधील आजच्या बलशाली समाजवादी चळवळीचें श्रेय जसें ट्रेड युनियन चळवळीला जातें त्याचप्रमाणें त्या चळवळीला बौद्धिक अधिष्ठान निर्माण करण्यांत फेबियन समाजवादानें केलेल्या अपूर्व ऐतिहासिक कामगिरीकडेहि जातें हें निःसंशय.

---

* सोशल इकॉनमिक मूव्हमेंट्स : पान २१७

• • •

: ९ :

# शासनसंस्थाविषयक अराज्यवादी मीमांसा

अराज्यवादाचा जनक प्रूधाँ हा खाजगी मालमत्तेचा व सत्तेच्या केन्द्रीकरणाचें मूर्तस्वरूप बनलेल्या शासनसंस्थेचा कट्टा विरोधक होता. त्याचा उल्लेख प्रामुख्यानें स्वप्नद्रष्ट्या समाजवाद्यांत होण्याचें कारण राजकीय व आर्थिक केन्द्रीकरणाच्या युगांत विकेन्द्रित समाजव्यवस्थेचा आदर्श जनतेपुढें ठेवण्याचा आग्रह त्यानें दर्शविला हेंच आहे. खाजगी मालमत्ता ही श्रमाची बेशरम लूट आहे अशी विचारसरणी प्रसृत करून समाजवादाचें अधिष्ठान केवळ आर्थिक नसून नैतिक आहे हें दाखविण्याचा प्रयत्न त्यानें केला होता. व्यक्तिजीवनांतील परस्पर सहकाराचें तत्त्व छोट्या समाजगटाच्या जीवन-व्यवहारास लागू व्हावें व उत्पादकांचे स्वयंभू स्थानिक गट समाजव्यवस्थेचा मूलभूत पाया बनावे या प्रूधाँच्या वैचारिक पेरणींतूनच सिंडिकॅलिस्ट व गिल्ड समाजवादी विचारपरंपरा पुढें जन्मास आली.

अराज्यवादी विचारांचें जनकत्व प्रूधाँकडे जात असलें तरी अराज्यवादी चळवळीचें नेतृत्व बाकूनीनकडे जातें. एकोणिसाव्या शतकांतील रशियन क्रान्ति-क़ारी परंपरेंत बाकूनीन वाढला होता. त्यानें तारुण्यांतील अनेक वर्षें तुरुंगांत व

नंतर सैबेरियांतील हद्दपारींत काढलीं. तेथून तो पुढें पळाला व अमेरिकामार्गें युरोपमधील क्रान्तिकारकांत येऊन सामील झाला. स्वदेशांतील अनियंत्रित झारशाहीशीं लढत असतांनाच राज्यसत्तेच्या स्वरूपाचें पहिलें दर्शन त्यास घडलें होतें व दहशतवादी गुप्त संघटना उभारून राज्यसत्तेवर प्रहार करण्याचा एकमेव मार्ग बाकूनीनसारख्या रशियन स्वातंत्र्यवाद्यांपुढें होता. म्हणूनच अराज्यवादी तत्त्वज्ञानास सशस्त्र बंडाच्या कार्यक्रमाची जोड देण्याचा प्रयत्न बाकूनीननें केला. अर्थात् या प्रयत्नामुळें अराज्यवाद्यांच्या एका मर्यादित पंथाचेंच नेतृत्व त्यास पुढें करतां आलें.

मार्क्सची व अराज्यवाद्यांची ऐतिहासिक मीमांसा स्थूलमानानें एकच होती. सर्व ज्ञात मानवी इतिहास हा वर्गयुद्धाचा इतिहास आहे व शासन-संस्था पिळवणुकीचें एक साधन बनली आहे हा मार्क्सचा सिद्धान्तच अराज्यवाद्यांनीं व बाकूनीननें अधिक हिरीरीनें जनतेपुढें मांडला. समाजाच्या पिळवणुकीहूनहि त्या पिळवणुकीसाठीं केली जाणारी हिंसक दडपशाही अधिक निषेधार्ह आहे. तेव्हां ही दडपशाही करूं शकणाऱ्या सत्तेचें अस्तित्वच समाजांतून नष्ट केलें पाहिजे असा बाकूनीनचा आग्रह होता. तो म्हणे, माणसाला आज्ञाधारक व गुलाम बनविणाऱ्या दोन प्रमुख सत्ता आहेत. एक देव व दुसरी शासनसंस्था. या दोन्ही सत्ता माणसानें झुगारून दिल्या कीं माणसाला कोणीहि हुकूम सोडूं शकणार नाहीं व प्रधांच्या सर्वंकष स्वातंत्र्याचें युग सुरू होईल. बाकूनीनच्या बंडखोरी शिकवणीच्या या दोन आघाड्या होत्या. समाजांतील उच्चनीच भाव देवाच्या कल्पनेंतूनच निर्माण झाला आहे. स्वर्गांतील पुरुषोत्तमच पुढें माणसाच्या वा शासनसंस्थेच्या रूपानें मानवी जगांत वावरूं लागतो; समाजांत हुकुमशहा अगर हुकुमशाही निर्माण होते. दैवी शक्तीच्या नांवानें कारभार चालविणारीं चर्चेस व शासनसंस्थाच जनतेला गुलाम बनवितात. धार्मिक माणूस फक्त देवापुढें नमतो. त्याचें नातें महत्त्वाचें समजतो. अशा स्थितींत ती प्रतिष्ठा व प्रेम इतरेजनांच्या वांट्यास क्वचितच येतें. सत्तेच्या अभावीं माणसें ताळ्यावर राहाणार नाहींत हा आक्षेप

त्यास निरर्थक वाटे, तो म्हणे : समाजांतच माणूस हा माणूस राहातो व म्हणून प्रत्येकाचें स्वातंत्र्य सर्वांना समान स्वातंत्र्य उपभोगूं देईल. बाकूनीनच्या या उदात्त व नैतिक व्यक्तिवादी भावना, तो व्यवहारी पातळीवरून क्रांतिवाद्यांच्या जीवननिष्ठेची जेव्हां चर्चा सुरू करतो, तेव्हां मात्र निर्नैतिक (Amoral) बनतात. बाकूनीनचा अनुयायी व रशियन क्रान्तिकारक नेचायेव्ह यानें या बाकूनीनच्या विचारांचा पुढें रशियन क्रान्तिकारी चळवळींत बराच प्रसार केल्यामुळें त्याचा उल्लेख येथें करणें जरूर आहे.

या चर्चेत बाकूनीन म्हणतो, "प्रत्येक क्रान्तिकारकानें स्वतःच्या जीवनांत प्रत्येक स्वहिताचा, भावनांचा व व्यक्तिगत मानवी पाशांचा त्याग केला पाहिजे; सुसंस्कृत जग, त्याचे कायदे व रूढिपरंपरा झुगारून दिल्या पाहिजेत; विनाशाचें एकमेव शास्त्र त्यानें अवगत करून घेतलें पाहिजे; जनमत तुच्छ लेखलें पाहिजे; निर्दय बनलें पाहिजे, भूतदयेची अपेक्षा करतां नये व हाल सहन करण्यास व मरणास सिद्ध असलें पाहिजे; कौटुंबिक ममत्व, मैत्री, प्रेम, आदर व मानमान्यता या भावनांना मनांत वर डोकें काढूं देतां नये; क्रान्तीचें यश व त्यांत आड येणाऱ्या सर्वांचा निःपात यांतच सुख मानावयास शिकलें पाहिजे...प्रत्येक क्रान्तिकारकानें स्वतःच्या साथीदारांविषयीं कोणती दृष्टि ठेवावी याची चर्चा करतांना तो म्हणतो, "ज्या प्रमाणांत व जोंपर्यंत आपला साथीदार समान ध्येयसिद्धीस उपयुक्त आहे तोंपर्यंत दोघांमध्यें खरा भ्रातृभाव असणें जरूर आहे. प्रत्येक क्रान्तिकारकानें आपल्यासाठीं एकदोन दुय्यम क्रान्तिकारकांचा संच बरोबर ठेवला पाहिजे व त्या भांडवलाचा संयमानें उपयोग केला पाहिजे. दग्याफटक्यांत साथीदाराचा बचाव तेव्हांच करणें इष्ट ठरेल जेव्हां त्याचें क्रान्तिकारी मूल्य त्यासाठीं खर्च होणाऱ्या शक्तीची भरपाई करूं शकेल." समाजाकडे क्रान्तिकारकानें कोणत्या दृष्टीनें पाहावें याची चर्चा करतांना तो म्हणतो, "समाजाच्या प्रत्येक घटकांत व विशेषतः पोलीस, चर्च व राजदरबारांत शिरकाव करून घेण्याचा प्रयत्न क्रान्तिकारकानें केला पाहिजे; प्रत्येकाच्या स्थानानुसार त्यास क्रम देऊन

ज्यांना तात्काळ ठार केलें पाहिजे अशाच व्यक्तींची एक यादी व ज्यांचे प्राण कांहीं काळ घेतले नाहींत तर उलट आपल्या क्रूर वागणुकीनें ते जनतेला बंड करण्यास डिंवचतील अशा व्यक्तींची दुसरी यादी, प्रत्येक क्रान्तिकारकानें तयार केली पाहिजे; समाजांतील श्रीमंत व प्रतिष्ठित लोकांचीं गुपितें शोधून काढून त्यांचा उपयोग करण्याची धमकी देऊन अशा लोकांचें शोषण केलें पाहिजे; उदारमताच्या लोकांबरोबर, त्यांना फसविण्यासाठीं, त्यांना वापरून घेण्यासाठीं व बदनामीनें त्यांना अडचणींत पाडण्यासाठीं, फसवी एकजूट केली पाहिजे; फर्डे तत्त्वप्रचारक व बडबड्या कारस्थानी मंडळींना पुढें रेटलें पाहिजे, कारण त्यामुळें बहुसंख्य अनुयायांची लवकर धुळधाण झाली तरी कांहीं वेंचक मंडळी त्या प्रयोगांत तावून सुलाखून निघतील व उचित कामगिरीसाठीं पक्क होतील; स्त्रियांचा त्यांच्यामधील गुणानुसार उपयोग करून घेतला पाहिजे; दुय्यम दर्जाच्या स्त्रिया खर्ची पडल्या तरी हरकत नाहीं पण कांहीं निवडक स्त्रियांची मात्र 'मौलिक सांठा' म्हणून काळजी घेतली पाहिजे." समाजक्रान्तिकारकांनीं लोकांकडे कोणत्या दृष्टीनें पाहावें याची चर्चा करतांना तो म्हणतो: "अरिष्ट व हालअपेष्टांच्या ओझ्याखालीं वांकलेल्या लोकांच्या हालअपेष्टा अधिकाधिक वाढविणाऱ्या प्रत्येक मार्गाचा अवलंब क्रान्तिकारांनीं केला पाहिजे कारण त्यामुळें त्यांची सहनशक्ति खलास होऊन त्यांना सार्वत्रिक उठावास उद्युक्त करणें शक्य बनेल; यासाठीं क्रान्तिकारकांनीं गुन्हेगारांशीं एकजूट केली पाहिजे कारण रशियांत 'तेवढेच प्रामाणिक क्रान्तिकारक आहेत.' आपल्या मार्गांतील प्रत्येक शक्तीचा निःपात करण्यास समर्थ अशी शक्ति संघटित केली पाहिजे.

पुढें रशियन बोलशेविक चळवळींच्या गुप्त संघटनांत या प्रेरणेंतून ज्वलंत क्रान्तिनिष्ठा धारण केलेले कित्येक क्रान्तिकारी सामील झाले व बाकूनीनच्या निर्नैतिक विचारांची छाप रशियांतील चळवळीवर त्यापूर्वीच्या कालखंडांत विशेष दिसून येत होती यासाठींच हे विचार येथें विस्तारानें उद्धृत केले आहेत. झोटिंग झारशाहीबद्दलचा भयंकर द्वेष व तिची गुलामी

सहन करणाऱ्या जनतेबद्दलचा उद्वेगच त्या प्रज्वलित विचारांत प्रतिबिंबित झाला होता. सत्ता माणुसकीचा विचार करीत नाहीं व म्हणून तिचा नाशहि माणुसकीच्या भावनेंतून होणार नाहीं ही त्या विचारांची पार्श्वभूमि होती. समाजवादी विचारांत साध्य व त्यासाठीं उपयोगांत आणावयाचीं साधनें यांचे अन्योन्य संबंध काय असावेत, साध्य–साधन विचारांस कोणतें महत्त्व आहे याची चिकित्सा होण्यास या चर्चेतून व अशा चळवळीं-तून जोराची चालना मिळाली.

अर्थात् बाकूनीनचे क्रान्तिकारकांसंबंधींचे हे विचार व अराज्यवादाची तात्त्विक मीमांसा यांची गल्लत करून चालणार नाहीं. कारण सशस्त्र बंडाचा पर्याय मानणाऱ्या सर्व अराज्यवाद्यांचेहि ते विचार नव्हते. एका प्रमुख रशियन अराज्यवाद्याचे विचार एवढ्या मर्यादित दृष्टीनेंच त्याची दखल घेतली पाहिजे. अराज्यवादी तत्त्वमीमांसा समृद्ध करणारा दुसरा प्रमुख रशियन अराज्यवादी प्रिन्स क्रॉपट्कीन हा बाकूनीनचे बरोबर विरोधी असें दुसरें टोंक होता असें म्हटलें तरी चालेल. माणसांचा सद्भाव व सहकारी भावना याच्या पायावरच त्याच्या विचारसरणीची इमारत उभारलेली आहे. जनतेच्या विधायक व स्वातंत्र्यनिष्ठ प्रवृत्ति सतत वाढविणें व प्रज्वलित करणें हेंच अराज्यवादाचें ऐतिहासिक कार्य आहे अशी शिकवण क्रॉपटकीननें दिली. जीवव्यवहाराचा बळी तो कान पिळी हाच एकमेव न्याय नसून परस्पर सहकार्यांतून जीवन–व्यवहार समृद्ध झाला आहे व विकास पावला आहे असा जीवशास्त्राचा एक मूलभूत सिद्धान्त त्यानें प्रतिपादला व मानवी जीवनव्यवहारास तो लागू करून मानवांच्या सहकारी प्रयत्नांची महान् ऐतिहासिक परंपरा त्यानें लोकांपुढें ठेवली. जर समाजांतील बहुतेक व्यवहार परस्परावलंबी आहेत व परस्पर सहकार्यांतून ते पुरे होतात तर सत्तेच्या अभावींहि समाजधारणा होऊं शकेल हीच त्याची शिकवण होती. तो म्हणे : उत्पादन ही एक सामाजिक प्रक्रिया आहे व म्हणून विभजनहि सामाजिक असलें पाहिजे. मजुरीची प्रथा समाजघातकी आहे, कारण त्यांत उत्पादक हा उत्पादन साधनांचा मालक नाहीं ही कल्पना दृढ बनते.

समाजवादीहि मजुरीची प्रथा स्वीकारून मोठा प्रमाद करीत आहेत. कामाच्या हक्काची मागणी योग्य नसून प्रत्येक व्यक्तीचा ‘ जगण्याचा हक्क ’ समाजानें मान्य केला पाहिजे. माणसानें माणसाच्या चालविलेल्या पिळवणुकींत शासनसंस्था हीच खरी दोषी आहे, कारण अशा पिळवणुकीस ती उत्तेजन वा संरक्षण देते. शासनसंस्थेचें कार्य अधिकाधिक प्रमाणांत स्वयंस्फूर्त विधायक सार्वजनिक संस्थांनीं हातीं घ्यावयास हवें. क्रान्तीसाठीं बुद्ध्या संघटन उभारणें निषिद्ध मानलें गेलें पाहिजे कारण क्रान्ति उत्स्फूर्त असावयास हवी.

कांहीं अराज्यवाद्यांनीं माणसांच्या आंतरिक शक्तींकडे लक्ष वेधलें. माणसाच्या कलात्मक व विधायक प्रवृत्तीच सर्वांत मौलिक आहेत व त्या प्रायः अराजक असतात. समाजवादी सत्ताहि त्यांवर बंधनें घालणार नाहीं कशावरून, अशी साधार भीति त्यानें व्यक्त केली. काम करणें ही माणसाची नैसर्गिक प्रवृत्ति आहे व तिला साद घालूनच सहजीवन साध्य होईल. कुठल्याहि व्यक्तीच्या भौतिक गरजा भागविण्यासाठीं त्याच्यावर कामाची सक्ति होतां नये. तशी सक्ति करणारी अर्थव्यवस्था सदोष ठरेल. गुन्हा व पाप या कल्पना समाज–व्यवहारांतून कायमच्या नष्ट केल्या पाहिजेत. गुन्ह्याची प्रवृत्ति नैसर्गिक नसून तो एक जडलेला रोग आहे व या दृष्टिकोणांतून समाजानें तो प्रश्न हाताळला तर बहुधा पहिला गुन्हा हाच शेवटचा ठरूं शकेल. सरकार व कायदा यांची व्याप्ति वाढविण्याऐवजीं त्यांचें क्षेत्र घटत जाईल. अराज्यवाद्यांचीं श्रद्धा अशा प्रकारची आहे. कुठलाहि अधिकार, हुकूम व निर्बंध यांचें अराज्यवाद्यांना वावडें आहे व त्याचा प्रतिकार करण्याची दीक्षा अराज्यवाद्यांनीं मानवास दिली आहे.

अराज्यवाद्यांत व्यक्तिवादी होते तसेच समतावादीहि. अराजक-समतावादी जमीन व भांडवलाचा वापर आणि मालकी समाजाची राहावी अशा मताचे होते; पण त्यासाठींहि शासनसंस्थेची जरूरी नाहीं असा त्यांचा आग्रह होता. बहुतेक अराज्यवाद्यांनीं समाजव्यवस्थेंत विकेंद्रीकरणावर भर दिला. औद्योगिक समाजाची पुनर्संघटना करतांना शासनसंस्थेची अगर प्रातिनिधिक लोकशाहीची

आवश्यकता नाहीं असें त्यांचें मत होतें. या अराज्यवादी तत्त्व–मीमांसेंतूनच फ्रेंच सिंडिकॅलिस्ट विचारपरंपरा व ब्रिटिश गिल्ड समाजवादी विचारपरंपरा उदयास आल्या. अराज्यवाद्यांत दहशतवादी बाकूनीनपासून सहकारवादी क्रॉपट्‌कीन व शांततावादी टॉलस्टॉयपर्यंत सर्वांचा समावेश करतां येईल. समाजांत बदल घडवून आणण्यासाठीं प्रत्येक व्यक्तिची नैतिक व आध्यात्मिक उन्नति करणें हा एकच बदलाचा शाश्वत मार्ग आहे व शासनसंस्थेचा आणि मालमत्तेचा जनतेनें स्वयंस्फूर्तीनें त्याग करावा अशी शिकवण टॉलस्टॉयनें दिली. अमेरिकेंत जे कांहीं नामवंत अराज्यवादी तत्त्वज्ञानी पुढें आले त्यांत हेन्री थोरो, बेंजामिन टकर व वॉरन यांचा उल्लेख प्रामुख्यानें करावयास हवा. करबंदी व असहकाराच्या चळवळींचा मार्ग त्यांनीं समाजसंघटनांना शिकविला. जर्मनींत मॅक्स स्टीर्नेर व इटलींत मॅलेटेस्टा यांनीं या विचारसरणीचा प्रचार केला.

अराज्यवाद्यांनीं पहिल्या आंतरराष्ट्रसभेच्या कार्यांत बराच पुढाकार घेतला व १७६० नंतर युरोपभर वाढीस लागलेल्या कामगार चळवळीवर आपल्या विचारसरणीची छाप टाकली. पॅरीस कम्यूननें स्थापन केलेल्या मध्यवर्ती समितींत बरेच आराज्यवादी होते व क्रान्तिकालांतहि नवसमाजरचनेचा एक धाडसी प्रयोग त्यांनीं करून पाहिला. कामगार चळवळींत पार्लमेंटरी राजकारणास महत्त्व देतां कामा नये या मुद्यावरूनच मार्क्सशीं बाकूनीन व इतर अराज्यवादी कामगार पुढाऱ्यांचे तीव्र मतभेद झाले होते. अखेर पहिली आंतरराष्ट्रसभा दुभंगली. इतिहासकालांत शासनसंस्था पिळवणुकीचें साधन होत्या हें मान्य करूनहि, राजकीय सत्ता हस्तगत केल्याशिवाय, म्हणजेच शासनसंस्थेचा ताबा घेतल्याशिवाय कामगारांचा वर्गलढा यशस्वी होणार नाहीं या मार्क्सच्या विचारसरणीस अराज्यवाद्यांनीं सक्त विरोध केला. आपल्या ध्येयसिद्धीसाठींहि या पिळवणुकीच्या साधनाचा उपयोग करतां कामा नये. तिच्याशिवायच समाजाची आर्थिक व सामाजिक पुनर्रचना घडवून आणली पाहिजे अशी त्यांची मागणी होती व म्हणूनच मार्क्सवर संधिसाधूपणाचा आरोप करण्यास बाकूनीन दचकला नाहीं. कामगारवर्गाची

हुकुमशाही व्यक्तिस्वातंत्र्यास बाधक ठरल्याशिवाय राहाणार नाहीं असा इशारा अराज्यवाद्यांनीं दिला. झारच्या रशियांत तसेंच फ्रान्स, इटली, स्पेन व इतर लॅटीन प्रदेशांत अराज्यवादी समतावादी चळवळींना बराच पाठिंबा मिळाला.

फ्रान्समधील सिंडिकॅलिस्ट विचारसरणी व शासनसंस्थाविषयक अराज्यवादी मीमांमा फ्रान्समधील विशिष्ट ऐतिहासिक परिस्थितींतूनच उदयास आली होती. फ्रान्समधील कामगार चळवळीवर या विचारसरणीचा विशेष प्रभाव पडला. इंग्लंड, जर्मनीप्रमाणें फ्रान्समध्यें समाजवादी लोकशाहीच्या चळवळींना फारसा पाठिंबा मिळाला नाहीं. फ्रान्समधील अनेक लोकसत्ताक क्रान्त्यांत फ्रान्समधील कामगारवर्गानें पुढाकार घेतला होता. पण या क्रान्त्यांतून त्यांचे आर्थिक व सामाजिक प्रश्न सुटले नव्हते. फ्रान्समधील औद्योगिक उत्पादन–पद्धतिहि इंग्लंड, जर्मनीहून भिन्न होती. तुलनात्मक दृष्ट्या फ्रान्समधील उद्योगधंदे केन्द्रित नव्हते व फार मोठ्या प्रमाणावर त्यांची वाढ झाली नव्हती. ओघानेंच फ्रान्समधील कामगार संघटनांचा पाया स्थानिक होता. फ्रान्समधील कामगार संघटना निरनिराळ्या धंद्यांतील सर्व स्थानिक ट्रेड युनियन्सच्या एकजुटींतून वाढल्या तर इंग्लंड–जर्मनींत विशिष्ट उद्योगधंद्यांतील कामगारांच्या राष्ट्रव्यापी संघटना प्रथम एकत्रित झाल्या. पार्लमेंटरी राजकारणाबद्दलच फ्रेंच कामगार-वर्गाला अविश्वास वाटत असल्यामुळें जर्मनीप्रमाणें फ्रान्समध्यें राजकीय समाजवादी पक्ष फार काल वाढूं शकला नाहीं. पुढें तो स्थापन झाला तरी जर्मनी व इंग्लंडमधील पक्षाप्रमाणें बलशाली बनला नाहीं. महान् क्रान्तिपरंपरा असलेल्या फ्रान्समध्यें कामगारवर्गास शांततेच्या व घटनात्मक मार्गानें सत्ताधिष्ठ होण्याचा कार्यक्रम आकर्षित करूं शकला नाहीं. अशा विशिष्ट ऐतिहासिक परिस्थतींत फ्रेंच कामगार चळवळींतून वाढलेली सिंडिकॅलिस्ट विचारसरणीच फ्रेंच कामगार वर्गानें स्वीकारली.

'सिंडिकेट' या फ्रेंच शद्बाचा सामान्य अर्थ ट्रेड युनियन असाच आहे. तेव्हां सिंडिकॅलिझमला ट्रेड युनियनवाद म्हणून संबोधणें अयोग्य ठरणार नाहीं.

पण इतर देशांतील ट्रेड युनियनवादाहून त्याचें स्वतंत्र अस्तित्व दर्शविण्यासाठीं तो शद्ब रूढ झाला आहे. सिंडिकॅलिझमचा कोणी एक प्रणेता अगर प्रवक्ता नव्हता. पण त्या विचारसरणींतील वैशिष्ट्य सांगतां येण्यासारखें आहे. मार्क्सवादांतील वर्गयुद्धाची भूमिका हीच सिंडिकॅलिझमची मध्यवर्ती कल्पना आहे. उत्पादन–साधनांचे मालक व श्रमशक्ति विकणारा कामगार यांच्यांत सतत संघर्ष सुरू आहे. सिंडिकॅलिस्टांच्या मतें समाजांतील या वर्गविग्रहाबद्दल तिरस्कार वाटण्याचें कांहींच कारण नाहीं. उलट या संघर्षांतूनच कामगारवर्गाचें विमोचन करणाऱ्या क्रान्तिकारी व विधायक शक्ती जन्म घेतात व समृद्ध होतात. स्वतःच्या पायावर उभें राहाण्याची शिकवण कामगारवर्गास मिळते. समाजसंघटनेचा प्राथमिक घटक सिंडिकेट असला पाहिजे. सर्व सामाजिक वर्गवारींत हीच वर्गवारी खरी व शाश्वत आहे. कारण आपल्या आर्थिक गरजा पुऱ्या करणें हीच मानवांपुढील प्रधान समस्या आहे. राजकीय पक्ष, ध्येयवाद्यांचे गट अगर सामुदायिक हितासाठीं झटणाऱ्या इतर स्थानिक संस्था हंगामी व कमकुवतच राहाणार. त्यांत एकत्रित येणाऱ्या व्यक्ति भिन्न भिन्न वर्गांतील व संवादी हितसंबंध नसणाऱ्यांच्या प्रतिनिधी असतात. राजकीय पक्षांतील माणसें समान ध्येयासाठीं व कार्यक्रमासाठीं तात्पुरतीं एकत्र येतात तर सिंडिकेटमध्यें येणारे कामगार एकाच तऱ्हेच्या परिस्थितीला आपल्या व्यक्तिजीवनांत तोंड देत असतात. त्यांची एकजूट अधिक मूलगामी असते. सिंडिकेटमध्यें सामील होण्यांत कामगार एकाद्या पक्षाचा सभासद होत नाहीं, एकादा कार्यक्रम स्वीकारीत नाहीं अगर साधें मत नोंदवीत नाहीं; तर समाजानें त्याच्यावर लादलेल्या विशिष्ट भूमिकेंत स्वतःचें अस्तित्व टिकविण्यासाठीं तो आपल्या सहकाऱ्यांशीं नवें नातें जुळवितो.

वर्गयुद्धाच्या कल्पनेंतूनच समाजवाद निर्माण होतो व तोच समाजवादाचा अखेरचा शब्द आहे. प्रत्यक्ष प्रतिकाराच्या अनुभवांतून कामगार शिक्षण घेतो व आपल्या विमोचनासाठीं निर्णायक लढ्याची सिद्धता करतो. हा प्रत्यक्ष प्रतिकार अनेक प्रकारानें तो करतो. पण संप, बहिष्कार, विध्वंस व सार्वत्रिक संप हेच प्रतिकाराचे प्रमुख प्रकार होत. लोकशाहीची

बैठक समन्वयवादी आहे. ती प्रतिकाराची धार बोथट करते व वर्गविग्रह कमी करण्याच्या प्रयत्नांत राहाते. तेव्हां वर्गयुद्ध व लोकशाही या परस्परविरोधी कल्पना आहेत. संपांत मध्यस्थी अगर सरकारचा हस्तक्षेप कामगारांनीं मान्य करूं नये. स्वतःच्या संघटनासामर्थ्यावर व प्रतिकारशक्तीवर मालकांकडून आपल्या मागण्या पुऱ्या करून घ्याव्यात. संपाला इतर ठिकाणच्या कामगारांची मदत घ्यावी. सहानुभूतीचे संप इतर कामगारांत घडवून आणावे. त्यामुळें वर्ग-बंधुत्वाची व ऐक्याची भावना कामगारांत वृद्धिंगत होईल. प्रत्यक्ष प्रतिकार नेहमींच हिंसात्मक स्वरूप धारण करील असें नाहीं. पण हिंसात्मक प्रतिकाराचें सिंडिकॅलिस्टांना वावडें नाहीं. प्रत्येक संपांतून वर्गविग्रह तीव्र बनेल. कामगार संपाचें शस्त्र वापरण्यांत निपुण बनतील. अखेर अनुकूल परिस्थितींत सार्वत्रिक संप पुकारून प्रस्थापित समाजव्यवस्थेच्या गाड्यास ते खीळ घालतील व नवसमाज रचनेचें कार्य ते आपल्या हातीं घेतील. समाजक्रान्तीसाठीं राज्यक्रान्तीपेक्षां सार्वत्रिक संप हें अधिक प्रभावी साधन आहे असें सिंडिकॅलिस्ट मानतात. सिंडिकॅलिझम हें तत्त्वज्ञान नाहीं. तें एक क्रान्तिशास्त्र आहे.

समाजक्रान्तींत यश लाभलें तर पुनश्च नवी शासनसंस्था निर्माण करण्याची जरुरी नाहीं. स्थानिक सिंडिकेट्स् व सर्व धंद्यांची मध्यवर्ती ट्रेड युनियन संघटना राष्ट्राचें औद्योगिक उत्पादनाचें कार्य यशस्वी तऱ्हेनें पार पाडूं शकेल. उत्पादनव्यवस्थेवर चालू काळांत शासनसंस्था बाहेरून आपलें नियंत्रण लादते व आपल्या निर्णयाची अंमलबजाणी सत्तेच्या जोरावर करून घेते; तर उत्पादन व्यवस्थेचें प्रधान कार्य करणाऱ्या कामगारांच्या संघटना आपल्या स्थानावरून हा प्रश्न अधिक सुलभतेनें सोडवूं शकतील. कामगारांनीं स्वतः घेतलेले निर्णय स्वतःच झुगारून देण्यास ते सहसा प्रवृत्त होणार नाहींत. ही अंगवळणीं पडणारी शिस्त व संयम उत्पादन कार्य पुरें करतांना त्यांच्या मदतीस येईल. प्रत्यक्ष उत्पादन करणाऱ्या कामगारांस वस्तुस्थितीचें अधिक ज्ञान असल्यामुळें लोकसभेतील अननुभवी प्रतिनिधींपेक्षां नवोदित उत्पादनव्यवस्थेचें अधिक व्यवहार्य मार्गदर्शन ते करूं शकतील.

कामगार लढ्यांचें नेतृत्व करणारा जागृत व लढवय्या कामगारांचा अल्पसंख्य गट कामगार चळवळीच्या यशस्वी मार्गदर्शनास अत्यावश्यक आहे. सर्वसामान्य कामगार अगतिक असतो. त्याच्या धाडसी वृत्तीची जोपासना झालेली नसते. अशा परिस्थितींत कामगारांच्या सुप्त शक्तीस चेतावणी देण्याचें कार्य छोट्या धाडसी गटालाच करावें लागतें. पण या अफाट कामगार शक्तीचा पाठिंबा मिळाल्याखेरीज कोणताच कामगार लढा यशस्वी होणार नाहीं. लोकसभेंतील कामगार प्रतिनिधींचा गट व हे छोटे जागृत गट यांच्या कार्यपद्धतींत एक मोठा फरक आहे. लोकसभेंतील प्रतिनिधी कामगार प्रश्न सोडविण्याची सर्व जबाबदारी स्वतःवर ओढून घेतात. त्यामुळें सर्वसामान्य कामगार तसाच निष्क्रिय राहातो; उलट नेतृत्व करणारा अल्प गट नेहमींच आपल्या अनुयायांना जागृत व कार्यप्रवण बनविण्याच्या खटपटींत राहतो. पक्षांतील बहुमताच्या बडग्यानें कार्यनिष्ठ अल्प गटास गप्प करण्याची शक्यता अनेकदां संभवते. साहजिकच या दडपशाहीनें जागृतीच्या व विकासाच्या मार्गांत अडथळे निर्माण होतात. सारांश प्रातिनिधिक लोकशाहीचा मार्ग सर्वसामान्य जनतेच्या जागृतीच्या व प्रगतीच्या दृष्टीनें हितावह नाहीं. रूढार्थानें सिंडिकेट्स बहुसंख्य जनतेचें प्रतिनिधित्व करीतहि नसतील. पण त्या समाजांतील जागृत व उत्पादक शक्तींच्या प्रतिनिधि असतात व इतरेजनांच्या आशा-आकांक्षा आपल्याहून भिन्न नाहींत असा त्यांचा विश्वास असतो.

सिंडिकॅलिस्ट चळवळीच्या नेतृत्वांत प्रथमपासूनच दोन गट स्पष्ट होऊं लागले. कांहीं नेते कामगारवर्गांतून अगर त्यांच्याशीं एकरूप झालेल्या कामगार कार्यकर्त्यांतून पुढें आले तर कांहीं कामगारवर्गाबाहेरील असले तरी त्या चळवळीस तात्त्विक बैठक देण्यास पुढें सरसावले. या गटांत सॉरेल, लागारडेल, एडुअर्ड बर्थ व हार्वे यांची गणना प्रामुख्यानें करावयास हवी. सिंडिकॅलिस्टांना 'डावे फेरविचारवादी' म्हणूनहि संबोधिलें जातें. भांडवलशाही समाजव्यवस्थेचा ऱ्हास अटळ आहे अशी मार्क्सप्रमाणें सॉरेलचीहि श्रद्धा होती. भांडवलशाहीच्या वाढीबरोबरच तिचे संहारक जागृत व संघटित होत आहेत, याबद्दलहि दोघांत

मतैक्य होतें. एवढेंच नव्हे तर सॉरेलचें व बुद्धिवादाचेंच हाडवैर होतें. पण तो म्हणे कीं मार्क्सला भांडवलशाही उत्क्रांतीची जितकी माहिती होती तितकी कामगार संघटनांच्या प्रगतीची असणें संभवनीय नव्हतें; कारण त्याच्या काळांत एवढ्या बलशाली व मोठ्या कामगार संघटनाच अस्तित्वांत नव्हत्या. तेव्हां कामगार लढ्याचें शास्त्र व तंत्र नवपरिस्थिति विचारांत घेऊन सिंडिकॅलिस्टांनींच निर्माण करावयास हवें आहे व तें करीत आहेत. सार्वत्रिक संप ही एक प्रभावी गूढशक्ति आहे. तिच्या अनुभूतीनेंच अनेकवार संपांत येणारें अपयश कामगार-वर्ग सहन करूं शकतो. 'त्या' सार्वत्रिक संपाच्या अपेक्षेनेंच पुनश्च संघटित होऊं लागतो व संपाचा मार्ग धरतो. सार्वत्रिक संप ही एक प्रभावी कल्पना आहे व तिनें कामगारवर्गास अंतिम क्रान्तीचें विराट दर्शन घडतें. सॉरेलनें संपकालीन हिंसेलाहि नैतिक बैठक देण्याचा प्रयत्न केला. लष्करानें रणभूमीवर केलेली हत्त्या जर निंद्य न ठरतां पवित्र मानली जाते तर सार्वत्रिक संपाच्या संग्रामांतील संपाच्या आघाडीवरील हिंसाहि तितकीच पवित्र ठरूं शकेल. वर्गयुद्ध हा समाजांतील दोन परस्परविरोधी शत्रू गटांमधील संग्रामच होय. या हिंसेंतून कामगारवर्गांतील वर्गबंधुत्वाचें नातें दृढ होतें, इतर वर्गांतील सहानुभूतिदार हळुहळु गळूं लागतात व आपण कांहीं विशेष ऐतिहासिक जबाबदारी पार पाडीत आहों ही भावना कामगारांत वाढत जाते. सार्वत्रिक संपांतून स्थिर व्यवस्था उध्वस्त होण्याची व सर्वनाशाची भीति कामगारवर्गास नैतिक आव्हान देते. ते अधिक जबाबदारीनें पुढचें पाऊल टाकतात. सार्वत्रिक संपांतून नव-व्यवस्था निर्माण करावयाची आहे ही जाणीव त्यांना संयम शिकविते. त्यांच्या क्रियाशीलतेला आवाहन करते. 'सार्वत्रिक संपाची कल्पना समाजवादास आधुनिक युगांतील एक प्रभावी नैतिक शक्तीचा लाभ मिळवून देते. कामगारांत आपल्या कार्याबद्दल आत्मीयता वाढविते व आपल्या मुक्तीचा मार्ग स्वतः आक्रमिण्यास प्रवृत्त करते.

मार्क्सनें शासनसंस्था त्याज्य मानली होती, पण ती नष्ट करण्यापूर्वी तिचा ताबा कामगार हुकुमशाही घेणार होती. फेरविचारवादी—मार्क्सवादी, ती त्याज्य

न मानतां उलट तिचें परिवर्तन लोककल्याणकारी संस्थेंत होऊं शकेल असें प्रतिपादीत होते; तर सॉरेल व सिंडिकॅलिस्ट, तिचा कबजा घेण्याच्या खटपटींत न पडतां लढ्याच्या काळांतच ती भस्मसात करण्याच्या मताचे होते. म्हणूनच सिंडिकॅलिस्ट सदासर्वदा राजकीय लढ्याचे विरोधी होते; मग तो लढा हिंसात्मक असो कीं शान्ततामय. तसेंच मार्क्सप्रमाणें ते अर्थकारणास व आर्थिक लढ्यास राजकारणाहून व राजकीय लढ्यांहून अग्रस्थान देत. उलट मार्क्सवाद्यांनीं आपलें लक्ष प्रामुख्यानें राजकीय लढ्यावर केन्द्रित केलें होतें. सिंडिकॅलिस्टांना सिंडिकेट अधिक महत्त्वाची वाटत होती तर मार्क्सवाद्यांना राजकीय पक्ष. सिंडिकॅलिस्ट व मार्क्सवादी दोघेहि मार्क्सच्या लिखाणाचाच आधार घेतात. पण दोघांनींहि नव्या परिस्थितीशीं जुळणारी मार्क्सच्या विचारांच्या फेरविचाराची मागणी केली. या अर्थानेंच सिंडिकॅलिस्ट ' डावे फेरविचारवादी ' बनले.

लागारडेल व हार्वे यांनीं आपल्या लेखनांत राजकीय व आर्थिक प्रश्नावरच अधिक प्रकाश पाडला. समाजवादास व समाजवादी पक्षास लोकशाही हितकारक ठरूं शकेल अशी कबुली त्यांना द्यावी लागली. मात्र औद्योगिक क्षेत्रांतील प्रश्न राजकीय लोकशाहीनें सुटणार नाहींत असें त्यांनीं बजावलें. हार्वेनें युद्ध टाळण्यासाठीं कामगार चळवळीचा उपयोग कसा करून घेतां येईल या प्रश्नावर आपलें लक्ष केन्द्रित केलें होतें. फ्रान्समधील ट्रेड युनियन चळवळींत सिंडिकॅलिस्ट विचारसरणीला प्रथम सर्वत्र पाठिंबा मिळाला; पण कामगारांना राजकीय पक्ष असूं नये ही एकांगी भूमिका या चळवळीला सदैव टिकवितां आली नाहीं. फ्रान्समध्यें उदयास आलेले समाजवादी पक्ष आपआपल्या परीं लोकसभेंत कामगार हितरक्षणासाठीं झगडत होते. समाजवादी पक्षांतील कार्यकर्ते स्वतः कामगार चळवळींत काम करूं लागल्यापासून कामगारांशीं त्यांचा संपर्क वाढला होता. सिंडिकॅलिस्ट्सनीं प्रत्येक कामगारास आपला राजकीय पक्ष व्यक्तिशः निवडण्यास पुढें परवानगी दिली. १९०६ च्या अमीन्स कॉंग्रेसमध्यें ट्रेड युनियन संघटना समाजवादी पक्षास जोडून घ्यावी कीं नाहीं असा प्रश्न जेव्हां जोरानें पुढें आला तेव्हां मात्र सुधारणावादी व जहाल दोन्ही ट्रेड युनियन

गटांनीं एकत्र येऊन समाजवादी पक्षास कामगार संघटना जोडण्याचा ठराव ७२४ वि० ३७१ मतांनीं फेटाळून लावला. सी. जी.टीनें (फ्रेंच ट्रेड युनियन कॉंग्रेस) "सर्व राजकीय पक्षांपासून अलिप्त राहाण्याचें तत्त्व" पुनः घोषित केलें व सार्वत्रिक संपाच्या साधनावरील आपला विश्वास प्रकट केला. ब्रिॲंड, मिलेरॅंड, व्हिव्हिआनी आदि फ्रान्समधील कित्येक बुद्धिवादी कामगार–नेते एकदां लोकसभेंत समाजवादी प्रतिनिधि म्हणून जाऊन बसल्यावर त्यांच्या मतांत मोठें परिवर्तन घडून आलें होतें. मंत्रिमंडळांत सामील झाल्यावर तर कामगारांनीं त्यांना शत्रुस्थानींच लेखलें. बुद्धिवाद्यांची ही कामगार व समाजवादी चळवळींतील ठेकेदारी त्यांना पसंत नव्हती एवढेंच नव्हे तर त्यांचा ते तिरस्कार करूं लागले होते. प्रस्थापित शासनसंस्थेच्या चौकटींत समाजवादी पक्ष काम करतो व म्हणून कामगारांचें खरें हितरक्षण तो करूं शकणार नाहीं अशी टीकेची झोड लोकसभेंतील समाजवादी प्रतिनिधींवर उठविण्यांत येऊं लागली. कामगार सिंडिकॅलिस्ट विचारसरणीचा पुनश्च हिरीरीनें पुरस्कार करूं लागले होते.

सारांश, सिंडिकॅलिझमनें प्रातिनिधिक लोकशाहींतील कमकुवतपणा प्रकाशांत आणला होता. नोकरशाहीच्या मदतीनें कारभार हांकणारा 'शासनसंस्थानिष्ठ' समाजवाद कामगारवर्गाचें खरें हितसंवर्धन करूं शकणार नाहीं याची जाणीव त्यानें कामगारवर्गास करून दिली. समाजवाद्यांस कामगार-संघटनांमधील गर्भित शक्तीचें दर्शन घडविलें, कामगार लढ्याचें तंत्र अधिक पद्धतशीर बनविलें व नवसमाजव्यवस्थेंत उत्पादक कामगारवर्गास असलेलें विशेष स्थान समाजवाद्यांच्या नजरेस आणलें. सिंडिकॅलिस्ट विचारपरंपरेच्या प्रेरणेंतूनच ब्रिटनमध्यें गिल्ड समाजवाद पुढें आला. पहिल्या महायुद्धानंतर फ्रेंच कामगारवर्गावरील सिंडिकॅलिस्ट विचारप्रणालीचा प्रभाव कमी झाला. इटलींत फॅसिझमच्या उदयाबरोबर सिंडिकॅलिस्ट चळवळ नामशेष झाली. अमेरिकेंत १९०५ ते १९१४ पर्यंत आय्. डब्ल्यू. डब्ल्यू. मधील कामगार संघटनांत सिंडिकॅलिझमचा बराच प्रसार झाला होता; पण महायुद्धानंतर ती संघटनाहि निष्प्रभ बनली. स्पेनमधील कामगार चळवळींत सिंडिकॅलिझमला बरीच वर्षे कमीअधिक

पाठिंबा मिळाला. १९३१ च्या लोकसत्ताक क्रान्तींतून स्पेनमध्यें अराज्यवादी सिंडिकॅलिस्ट चळवळ फार मोठ्या प्रमाणांत वाढली. तिचे दहा लाखांवर सभासद होते. पण १९३३ मधील सिंडिकॅलिस्टांचा उठाव निष्फळ ठरल्यावर व नंतर फ्रँकोचें बंड यशस्वी झाल्यावर ही चळवळ नामशेष झाली.

एकाच ऐतिहासिक परिस्थितींत जन्म घेणाऱ्या अनेक चळवळींत व विचारांत बरेंचसें साधर्म्य आढळणें स्वाभाविक असतें. सिंडिकॅलिस्ट व गिल्ड सोशलिस्ट पंथांत असें साधर्म्य बरेंच आढळतें. लोकसत्ताक प्रातिनिधिक लोकशाही समाजपरिवर्तन घडवून आणण्याचें परिणामकारक हत्यार बनूं शकत नाहीं याची सत्यता फ्रेन्च कामगारवर्गाप्रमाणेंच ब्रिटनमधील कांहीं विचारवन्तांस होऊं लागली होती. नवोदित स्वतंत्र मजूर पक्ष संख्येनें वाढूं लागला होता. १८९९ मध्यें ट्रेड युनियन कॉंग्रेसनें ५४६००० वि. ४३४००० मतांनीं पास केलेल्या ठरावानुसार कामगार आपले प्रतिनिधी पार्लमेंटांत पाठविणार होते व इतर समाजवादी पक्षांच्या मदतीनें मोठ्या प्रमाणावर निवडणुका लढविण्यासाठीं मजूर-प्रतिनिधि-समिती स्थापन करण्यांत आली होती. सप्टेंबर १९०० च्या सार्वत्रिक निवडणुकींत मजूर पक्षानें दोन जागा जिंकल्या. १९०६ च्या निवडणुकींत २९ सभासद निवडून आले. पण जनतेच्या अपेक्षा पुऱ्या करण्याइतकें सामर्थ्य एकवटणें मजूर पक्षास शक्य झालें नाहीं. केवळ लोकसभेच्या कारभारावर लक्ष केन्द्रित करून अगर सामाजिक सुधारणांसाठीं पार्लमेंटांतील प्रतिनिधींवर दडपण आणून समाजपरिवर्तनाचें कार्य पुरें होणें शक्य नाहीं हा विचार दृढमूल होत होता. मजूर पक्षाचें पार्लमेंटमधील बल अत्यल्प असल्यामुळें स्वतःचें असें स्वतंत्र धोरण तो कार्यान्वित करूं शकला नाहीं. राजकीय कार्यक्रमावरील कामगारवर्गाचा विश्वास वाढत्या प्रमाणांत ढळूं लागला. या ऐतिहासिक परिस्थितींत गिल्ड समाजवादी विचारसरणी इंग्लंडमध्यें जोरानें फोफावली.

"गिल्ड पद्धतीचें पुनरुज्जीवन" हें पुस्तक ए. जी. पन्टीनें १९०६ सालीं प्रसिद्ध केलें. मध्ययुगीन कालांतील गिल्ड उत्पादन–पद्धत, ट्रेड युनियन्सना नवें स्वरूप देऊन, पुनः पुरस्कारावी अशी भूमिका त्यानें मांडली. १९०६ सालापासून

पहिल्या महायुद्धापर्यंत गिल्ड समाजवादाची चळवळ बरीच फैलावली. १९१५ सालीं राष्ट्रीय गिल्ड लीगची स्थापना झाली व १९२४ सालीं लीग बरखास्त होईपर्यंत इंग्लंडमधील समाजवादी चळवळींत ती एक प्रभावी संघटना मानली जात असे. अर्थात् लीगच्या चळवळीहून गिल्ड समाजवादानें समाजवादी विचारपरंपरेंत घातलेली भर अधिक मोलाची आहे. समाजवादी विचारसरणीस तें एक वैचारिक आव्हान होतें. कामगार संघटना कां व कशासाठीं ? त्यांचें स्वरूप काय असावें ? कार्यपद्धति काय राहावी ? औद्योगिक लोकशाही म्हणजे काय ? कामगार–संघटना अशी लोकशाही कोणत्या प्रकारें स्थापन करूं शकतील ? हे व असे अनेक तात्त्विक व संघटनात्मक प्रश्न गिल्ड समाजवाद्यांनीं कामगारवर्गापुढें उपस्थित केले. जर्मन समाजवादी व इंग्लिश फेबियनवादी समाजपरिवर्तनांत शासनसंस्था हें एक प्रभावी साधन आहे असें मानून शासनसंस्था आपल्या ताब्यांत घेण्यासाठीं राजकीय पक्षसंघटना व मतप्रचार यावर विशेष भर देत; तर गिल्डवादी राजकीय क्षेत्रांहून आर्थिक क्षेत्र अधिक महत्त्वाचें मानून सिंडिकेटला वा गिल्डला आपल्या कार्यांत मध्यवर्ती स्थान असावें अशा मताचे होते. अराज्यवाद्यांप्रमाणें अगर सिंडिकॅलिस्टांप्रमाणें ते शासनसंस्थेस तुच्छ लेखीत नसत पण समाजांतील अनेक उपयुक्त संस्थांपैकीं ती एक आहे एवढेंच महत्त्व ते शासनसंस्थेला देत. साहजिकच फेबियनवादी आणि गिल्डवादी यांच्या धोरणांत व कार्यक्रमांत बरीच तफावत पडे. शासनसंस्थेच्या बरोबरीनें राष्ट्रामधील सर्व औद्योगिक क्षेत्रांत अनुशासन करणारी नॅशनल गिल्ड लीग प्रस्थापित करणें व मजुरीची प्रथा बंद पाडणें या कार्यक्रमावर गिल्डवाद्यांनीं भर दिला.

गिल्ड या शब्दाचा केवळ शब्दकोषीं अर्थ पाहून भागणार नाहीं. त्या शब्दाला कांहीं ऐतिहासिक अर्थ निर्माण झाला आहे. तरीपण सामान्यतः ‘ समाजाचें एकादें उपयुक्त कार्य ( व्यवसाय ) जबाबदारीनें पार पाडण्यासाठीं त्या विशिष्ट व्यवसायांतील परस्परावलंबी मंडळींनीं निर्माण केलेली स्वयंशासित संघटना ’ अशी गिल्डची व्याख्या करतां येईल. एकाद्या धंद्यांत काम करणारांचें

गिल्ड स्थापन झालें कीं त्यांत श्रमिक कामगारांप्रमाणें तंत्रज्ञ, व्यवस्थापक मंडळीहि सामील होऊं शकतात असें गिल्डवादी सांगत. त्याचा अंतर्गत कारभार संपूर्ण लोकशाही तत्त्वानुसार चालला पाहिजे अशी त्यांची कल्पना होती. गिल्ड संघटनांचें स्वरूप अधिक औद्योगिक रहाणार होतें. शासनसंस्थेकडे पाहाण्याचा सर्व गिल्डवाद्यांचा दृष्टिकोण एक नव्हता. म्हणूनच, केवळ उद्योगधंद्याचें राष्ट्रीयीकरण करून भागणार नाहीं; राष्ट्रीयीकरण हीही एक प्रकारें शासनसंस्थेची भांडवलशाहीच होऊं शकेल अशी भीति गिल्डवाद्यांना वाटे. सर्व सत्ता व कारभार शासनसंस्थेच्या हातीं केन्द्रित केला तर शासनसंस्थेची नोकरशाही समाजावर हुकुमशाही गाजवूं लागते. तेव्हां शासनसंस्थेचें विकेन्द्रीकरणच व्हावयास हवें असें त्यांचें मत होतें. औद्योगिक लोकशाही स्थापन होऊन उद्योगधंद्याचें समाजजीवनांतील एक प्रमुख कार्यक्षेत्र, स्वतंत्रपणें कारभार हाकूं लागलें कीं त्या प्रमाणांत शासनसंस्था सर्वंकष बनत जाण्याची शक्यता कमी होईल असा पर्याय त्यांनीं सुचविला. समाजजीवनाचीं सर्व सूत्रें शासन-संस्थेकडे सुपूर्द करण्यांत व तिनें तिचा स्वीकार करण्यांत तिचें लोकशाही स्वरूप केव्हांच नष्ट झालें आहे. सर्व व्यवसायांचें व सर्व हितांचें प्रतिनिधित्व प्रादेशिक मतदार संघामार्फत करण्याचा दावा लोकसभा करते. आजच्या सहस्रविध समाज-व्यवहारांत ही लायकी क्वचितच एकाद्या प्रतिनिधीची असूं शकेल. उलट प्रत्येक नागरिक कुठल्याना कुठल्या व्यवसायांत गुंतलेला असल्यामुळें व तो व्यवसायी असलाच पाहिजे अशी अपेक्षा असल्यामुळें, भिन्न भिन्न व्यवसायांचें प्रातिनिधित्व करणाऱ्यांचेंच पार्लमेंट असावें. घटक जितका लहान तितके त्याचे निर्णय सर्वसंमत होण्याची शक्यता अधिक असते. म्हणून समाज व्यवहारांचा घटक लहान असावा, स्थानिक गिल्ड हेंच त्याचें स्वरूप रहावें व या घटकांमधून कारभार व सत्तेचें विकेन्द्रीकरण व्हावें असे महत्त्वाचे विचार गिल्डवाद्यांनीं जनतेपुढें मांडले. शासनसंस्थेला अशा समाजांत कोणतें स्थान राहणार यासंबंधीं मतभिन्नत्व असल्यामुळें या प्रश्नावर अनेकांनीं आपले विचार स्वतंत्रपणें मांडले. मात्र इतर समाजवाद्यांनीं शासनसंस्थेला दिलेलें महत्त्व अवास्तव आहे असें सर्वच गिल्डवाद्यांचें मत होतें. कांहींनीं दोन सभागृहांपैकीं एक सभागृह

प्रादेशिक मतदारसंघांतून निवडून आलेल्या प्रतिनिधींचें व एक व्यावसायिक प्रतिनिधींचें असावें असें सुचविलें.

मजुरीच्या प्रथेवर गिल्डवाद्यांनीं जोरदार टीका केली. मजुरीवाढीच्या बिलाचें समर्थन करून समाजवादीहि या प्रथेला नकळत मान्यता देत आहेत अशी त्यांची तक्रार होती.. मजुरीच्या प्रथेचें विवेचन करतांना त्यांनीं खालील चार मुद्यांवर भर दिला. मजुरीप्रथा श्रमजीवी कामगारापासून श्रमाची फारकत करून तिचा बाजार करते. जेव्हां धंदा नफ्यांत चालतो तेव्हांच मजुराला मजुरी मिळते; इतर वेळीं टाळेबंदी होते. केवळ मजुरीचा स्वीकार करून कामगार उत्पादन–संघटनेंतील आपले हक्क व आपलें स्थान गमावतो. स्वतः निर्माण केलेल्या उत्पादित वस्तूंवरील सर्व हक्क तो मालकास बहाल करतो. तेव्हां या कारणांसाठीं व विशेषतः कामगारवर्गांत गुलामी व लाचारवृत्ति निर्माण करण्यास मजुरीची प्रथा कारणीभूत बनते म्हणून ती कायमची रद्द करावयास हवी अशी मागणी गिल्ड समाजवाद्यांनीं केली. कामगारवर्गास स्वतःच्या श्रमाचा पूर्ण मोबदला भोगतां आला पाहिजे. कामाच्या तसेंच बेकारीच्या काळांत त्यास आर्थिक शाश्वती मिळेल तरच तो कार्यप्रवण बनूं शकेल. कामगारास उत्पादन प्रक्रियेंत भागीदारी व वाटपांत नियंत्रणाचा हक्क मिळाला तरच उत्पादनवाढींत तो आपली जबाबदारी पार पाडण्यास प्रवृत्त होईल अशी गिल्ड समाजवाद्यांची भूमिका होती.

सिंडिकॅलिस्टांप्रमाणेंच गिल्ड समाजवादीहि राजकीय चळवळीहून आर्थिक व औद्योगिक कामगार–चळवळीवर अधिक भर देत. अर्थसत्ताच राज्यसत्तेला टिकवते व पोसते अशी त्यांची विचारसरणी होती. सिंडिकॅलिस्ट मनोवृत्तीनें अधिक क्रान्तिवादी असल्यामुळें सार्वत्रिक संपावर त्यांची भिस्त होती; तर गिल्ड समाजवादी सनदशीर व उत्क्रान्तीच्या मार्गानें अपेक्षित समाजाचें परिवर्तन घडून येऊं शकेल असा विश्वास बाळगीत. फ्रेन्च व इंग्लिश समाजांमधील फरकच जणुं त्यांत प्रतिबिंबित झाला होता. समाजवाद्यांच्या मतें गिल्ड समाजवादी उत्पादकांच्या दृष्टींतून सर्व प्रश्नांकडे पाहाण्यास जनतेस शिकवीत. तो दृष्टिकोण

एकांगी होता. तर गिल्ड समाजवाद्यांच्या मतें समाजवादी सर्व प्रश्नांकडे गिऱ्हाईकांच्या दृष्टींतून पहात, योग्य वांटपांवर त्यांचा भर असे. उद्योगधंद्याची संघटना व त्यावरील उत्पादक कामगारवर्गाचें नियंत्रण तितकेंच महत्त्वाचें आहे हें ते दृष्टीआड करीत. समाजवादी लोकशाही समाजवादावर जो भर देतात तितकाच भर गिल्ड समाजवाद्यांनीं औद्योगिक लोकशाहीवर दिला आहे. ही औद्योगिक लोकशाही निर्माण करण्यासाठीं मजुरी–प्रथा नष्ट झाली पाहिजे, ती प्रथा टिकविणाऱ्या मालकशाहीचा अन्त झाला पाहिजे व औद्योगिक क्षेत्रांत कामगारवर्गाचें प्रभुत्व प्रथापित झालें पाहिजे अशी मागणी गिल्ड समाजवाद्यांनीं केली. उद्योगधंद्यांच्या राष्ट्रीयीकरणाच्या मुद्यावर उद्योगधंद्य वर विकेंद्रित सामाजिक मालकी प्रस्थापित झाली पाहिजे व औद्योगिक मालमत्ता त्या उद्योगधंद्यांतील गिल्डच्या मालकीची बनली पाहिजे असा पर्याय त्यांनीं सुचविला. ए. जी.पेन्टी, ओरेज, एच्. जी. वेल्स व जी. डी. एच्. कोल यांचा उल्लेख गिल्ड समाजवाद्यांत प्रामुख्यानें करावयास हवा. या लोकांच्या प्रचारामुळेंच औद्योगिक लढा राजकीय लढ्याइतकाच महत्त्वाचा आहे, केवळ उद्योगधंद्यांच्या राष्टीयीकरणाची घोषणा करून भागणार नाहीं कारण त्यांत नोकरशाही बलिष्ठ होण्याचा धोका आहे व सत्तेच्या विकेंद्रीकरणाचा विचार समाजवाद्यांनीं गंभीरपणें करावयास हवा, ही शिकवण ब्रिटनमधील कामगार व समाजवादी चळवळीस मिळाली. उत्पादनव्यवसायाच्या प्रक्रियेंत उत्पादक कामगाराला योग्य स्थान मिळालें पाहिजे हा त्यांचा आग्रह नंतरच्या काळांत न्याय्य मानला गेला. गिल्ड समाजवाद्यांचा स्वतंत्र पंथ आज समाजवादी चळवळींत शिल्लक राहिला नसला तरी व्यापक लोकशाही समाजवादानें त्या विचारप्रणालींतील अनेक मौलिक विचार आपल्या विकासी तत्त्वज्ञानांत गुंफून घेतले आहेत.

• • •

: १० :

# दुसरी आंतरराष्ट्रसभा

**फिलाडेल्फिया** येथें १८७६ सालीं पहिल्या आंतरराष्ट्रसभेचें रीतसर विसर्जन झालें होतें. या संघटनेनें कामगारवर्गाच्या न्याय्य हक्कांसाठीं व सामाजिक सुधारणांसाठीं प्रयत्न केले नाहींत असें नाहीं पण युरोपमधील अनेक देशांत सुरू असलेल्या क्रान्तिकारी लोकशाही प्रयत्नांना आंतरराष्ट्रीय संघटनात्मक बैठक पुरवून, येऊं घातलेल्या क्रान्तींत आपली ऐतिहासिक जबाबदारी पार पाडण्यासाठीं कामगारवर्गाची सिद्धता करणें हेंच तिचें प्रधान उद्दिष्ट होतें. पोलीश जनतेच्या स्वातंत्र्य प्रयत्नांना सहानुभूति व्यक्त करण्यासाठीं भरलेल्या लंडनमधील सभेंतून ती जन्मास आली होती. उलट दुसरी आंतरराष्ट्रसभा जन्मास आली तेव्हां युरोपमधील सर्व औद्योगिक राष्ट्रांतील कामगारवर्ग सामाजिक सुधारणांची एक नवी समपातळी गांठण्यासाठीं आपआपल्या देशांत झगडत होता. सामाजिक सुधारणांस विरोध करणाऱ्या भांडवलदारवर्गाची तक्रार ही होती कीं सामाजिक सुधारणा उत्पादन खर्च वाढवितात. स्पर्धेच्या युगांत एकाद्याच राष्ट्रांत अशा सुधारणा घडून आल्या तर तें राष्ट्र आंतरराष्ट्रीय स्पर्धेत टिकूं शकत नाहीं. कामगारवर्गाच्या अनिर्बंध शोषणांतून व कामगारांच्या खालच्या पातळीवरील रहाणीच्या दर्जामुळें ज्या

मागसलेल्या राष्ट्रांत स्वस्त उत्पादन करणें शक्य होईल तीं राष्ट्रें आंतरराष्ट्रीय स्पर्धेत, कामगारवर्गास सामाजिक सुधारणा अनुभवूं देणाऱ्या राष्ट्रांहून, पुढें जातील. साहजिकच कामगारवर्गाचें हितसंरक्षण व सामाजिक सुधारणा या आंतरराष्ट्रीय समस्या बनल्या होत्या. भांडवशाही राज्यसत्ता व कामगार–पक्ष हे दोघेहि आंतरराष्ट्रीय पातळीवरच हा प्रश्न सोडवूं पहात होते. दोन्ही प्रयत्नांस जर्मनींतूनच चालना मिळाली हा केवळ योगायोग नव्हता. जर्मन पक्ष या काळांत बेकायदा होता. तेव्हां १८८७ मध्यें स्वित्झर्लंडमधील सेंट गाल येथें भरलेल्या पक्षपरिषदेंत या समस्येवर विचार करण्यासाठीं लवकरच कामगारांची एक आंतरराष्ट्रीय कॉंग्रेस बोलावण्याचा निर्णय घेण्यांत आला. आंतरराष्ट्रीय प्रमाणांवर कामगार–हितरक्षक कायदे पास करून घेण्यासाटीं सामुदायिक प्रयत्न हातीं घेणें हेंच तिचें उद्दिष्ट राहाणार होतें. १८९० येथें बर्लिनमध्यें भरलेली अनेक राष्ट्रांतील सरकारी प्रतिनिधींची कांग्रेसहि कामगार–हितरक्षणाचा प्रश्न आंतरराष्ट्रीय पातळीवर कसा सोडवितां येईल याचाच विचार करणार होती. त्या काळांतील विशिष्ट परिस्थितीचा हा प्रश्न द्योतक होता हीच गोष्ट त्यामध्यें सिद्ध होते.

ही कॉंग्रेस जुलै १८८९ मध्यें पॅरीस येथें भरली व दुसरी आंतरराष्ट्रसभा जन्मास आली. अधिवेशनास आलेल्या पक्ष–प्रतिनिधींनीं परस्पर सहकार्य वाढविण्याच्या उद्देशानें तिला शाश्वत संघटनात्मक स्वरूप देण्याचा निर्णय घेतला होता. कामगारवर्गाचें हितरक्षण करण्याच्या दृष्टीनें आंतरराष्ट्रीय हाल-चाल व्हावी म्हणून अधिवेशनांत एक मार्गदर्शक कार्यक्रम स्वीकृत करण्यांत आला. आठ तासांचा कामाचा दिवस कायद्यानें मान्य करून घेण्यांत त्या कार्यक्रमाची फलश्रुति होणार होती. या उद्दिष्टपूर्तीसाठीं सर्वत्र प्रचार व निदर्शनें व्हावीं या हेतूनें दरवर्षी एक मे रोजीं कामगार दिन पाळण्यांत येणार होता. पॅरीस कॉंग्रेसनें घेतलेले हे निर्णय परिस्थितिजन्य व व्यावहारिक असेच होते. पॅरीस कॉंग्रेसपर्यंत कित्येक देशांत उदयास आलेले कामगारांचे समाजवादी राजकीय पक्ष अगर थोड्याच वर्षांत इतरत्र जन्मास येणारे समाजवादी पक्ष यांचें

प्रमुख कार्य उद्योगधंद्यांतील कामगारवर्गाचें आर्थिक हितरक्षण व हितसंवर्धन साधणें हेंच राहिलें. दुसऱ्या आंतरराष्ट्रसभेचा जन्म या उद्दिष्टपूर्तीसाठींच झाला होता.

इसनॅश येथें १८६९ सालीं जर्मन सोशल डेमोक्रॅटिक पक्ष स्थापन झाला होता व १८७५ मध्यें गोथा येथें लासाल पक्षाशीं एकजूट करून या पक्षानें मोठें बळ मिळविलें होतें. १८७१ मध्यें डेन्मार्कमध्यें सोशल डेमोक्रॅटिक पक्ष स्थापन झाला तर १८७२ मध्यें झेकोस्लोव्हाक सोशल डेमोक्रॅटिक कामगार पक्ष उदयास आला. १८७५ मध्यें पोर्तुगालमध्यें सोशलिस्ट पक्षाची स्थापना झाली तर १८७६ मध्यें ऑस्ट्रियांतील झेक समाजवाद्यांनीं आपला पक्ष उभारला. १८९० मध्यें अरमानिया, युक्रेन व अमेरिकेंत; १८९२ मध्यें इटली, पोलंड व अर्जेंटिनांत; १८९३ मध्यें बल्गेरियांत; १८९४ मध्यें हॉलंड व हंगेरींत; १८९६ मध्यें लिथुआनियांत; १८९८ मध्यें रशियांत व १८९९ मध्यें फिन्लंड व जॉर्जियांत समाजवादी पक्ष स्थापन झाले. इंग्लंड व फ्रान्समध्यें विसावें शतक सुरू होईपर्यंत मध्यवर्ती असे समाजवादी पक्ष जरी स्थापन झाले नाहींत तरी छोटे भिन्नभिन्न समाजवादी गट स्थापन होऊन समाजवादी चळवळ वाढविण्यास ते हातभार लावीत होते. युरोपमधील निरनिराळ्या देशांत सामान्यतः एकाच कालखंडांत स्थापन झालेल्या या समाजवादी पक्षाच्या कार्यक्रमांतहि बरेंच साधर्म्य आढळतें. भांडवलदारांच्या अप्रतिहत शोषणास व आर्थिक विषमतेस आळा घालण्यासाठीं व सामाजिक सुधारणा घडवून आणण्यास दडपण आणण्यासाठीं, बलशाली कामगार-संघटना उभारणें, सार्वत्रिक मतदानाच्या हक्कासाठीं झगडून शासनसंस्था अधिक जनताभिमुखी बनविणें, नागरिक स्वातंत्र्यावर व संघटना स्वातंत्र्यावर होणारे घाले एकजुटीनें परतवून लावणें व आपल्या राजकीय पक्षाच्या वतीनें निवडणुका लढवून भांडवलदार-वर्गाशीं राजकीय आघाडीवरहि टक्कर देणें हाच त्यांचा सर्वसामान्य कार्यक्रम होता. शासनसंस्थेचा कारभार आपल्या हातीं घेण्यासाठीं लोकसभेंत बहुमत करण्याची उमेद त्यांनीं बाळगली होती. जे समाजवादी पक्ष या कालखंडांत उदयास आले

त्यांत जर्मन समाजवादी पक्ष सर्वांत बलवान् होता व दुसरी आंतरराष्ट्रसभा निर्माण करण्यांत त्यानेंच पुढाकार घेतला होता. अशा परिस्थितींत या पक्षाचें धोरण व नीति यांचा प्रभाव आंतरराष्ट्रसभेच्या कामकाजावर साहजिकच पडला. त्या पक्षांतील तात्त्विक मतभेदांनींहि आंतरराष्ट्रीय स्वरूप धारण केलें.

आंतरराष्ट्रसभेचें पहिलें अधिवेशन पॅरीस येथें भरविण्यांत आलें होतें व तें १८८९ मध्यें, पहिल्या फ्रेंच राज्यक्रान्तीच्या शतसंवत्सरांत–भरलें होतें. नव्या चळवळीचा पुढाकार मार्क्सवादी जर्मन नेत्यांनीं घेतला होता. पण फ्रेंच क्रान्तीची परंपरा व मार्क्सवादी क्रान्तिनिष्ठा जहाल नेत्यांचा वेध घेत असली तरी ती परिस्थितिनिष्ठ नव्हती. मार्क्स व मार्क्सवाद्यांचा आंतरराष्ट्रीयवाद व आंतरराष्ट्रीय सभेंतील कामगारांचा आंतरराष्ट्रीयवाद यांत फरक होता. विशेषतः ज्या देशांची औद्योगिक भरभराट, उद्योगधंद्यास संरक्षण देऊन–टॅरीफ्स् मार्गें–झाली होती व कामगार हितरक्षणाच्या बाजूनें शासनसंस्थेनें जेथें औद्योगिक उत्पादनक्षेत्रांत हस्तक्षेप केला होता तेथें कामगारांच्या आर्थिक हितरक्षणाचा पाया राष्ट्रवादाचाच होता. त्यांचें आंतरराष्ट्रीय सहकार्य राष्ट्रहिताशीं संवादी राहिलें तोंपर्यंतच टिकलें. समाजवादी पक्षांची बैठकहि राष्ट्रविशिष्टच होती. आंतरराष्ट्रसभेच्या केन्द्रीय मार्गदर्शनाचें स्वरूपहि सल्लामसलत देण्याचें होतें. केन्द्रीय आदेश सोडून सर्व पक्षांकडून त्याची अम्मलबजावणी करून घेण्याइतके अधिकार व शक्ति आंतरराष्ट्रसभेला कधींच लाभली नाहीं. जर्मन पक्षाचें अधिकृत नेतृत्व जहाल मार्क्सवाद्यांकडे होतें तर त्याचा कार्यक्रम व दैनंदिन कारभार प्रथम लासालवाद्यांच्या व नंतर फेरविचारवाद्यांच्या दृष्टीशीं अधिक जुळता होता. आंतरराष्ट्रसभेच्या कामकाजांत कार्यक्रमावर व दैनंदिन प्रश्नांवर क्वचितच मतभेद होत. बहुतेक मतभेद तात्त्विक श्रद्धा व डावपेंचांमधूनच उद्भवत. त्यांच्यावर अधिवेशनांत खडाजंगी उडे व पुनः एकाच कार्यक्रमाच्या अम्मलबजावणींत सर्व गढून जात. भावी समाजवादी समाजव्यवस्था कशी असेल व असावी यासंबंधीं कोणाचेंच विशेष दुमत नव्हतें. दैनंदिन कार्यांत कोणता ताबडतोबीचा कार्यक्रम हातीं घ्यावा यांतहि मतैक्य होतें. कामगारांची वाढती

एकजूट घडवून आणणारी ट्रेड युनियन चळवळ व समाजवादाचा प्रचार करून अधिकाधिक मतें आपल्या बाजूनें मतदानाच्या पेटींत पडावीं यासाठीं संघटनात्मक प्रयत्न, थोडक्यांत निवडणुकीचें राजकारण, हाच तो कार्यक्रम होता. जर्मन सोशल डेमोक्रॅटिक पक्षाचें मतदान प्रत्येक निवडणुकींत लाखांनीं वाढत होतें. पण या कार्यक्रमांतून समाजवादी समाजव्यवस्था कशी निर्माण होणार, त्या संक्रमणावस्थेचें स्वरूप काय, यासंबंधीं आंतरराष्ट्रसभेंतील समाजवाद्यांत कधींच मतैक्य झालें नाहीं व साहजिकच चळवळीचें धोरण व डावपेंच ठरवितांना तीव्र मतभेद उद्भवले. समाजवादी समाजव्यवस्था व निवडणुकी, ट्रेड युनियन संघटनावाढीचा कार्यक्रम यांना एकत्र सांधणारा मार्ग या चळवळीस सांपडला नाहीं.

एकोणिसाव्या शतकाच्या सातव्या व आठव्या दशकांत स्थापन झालेले छोटे कामगार पक्ष व संघटना श्रद्धेनें क्रान्तिकारी होत्या. भांडवलशाही समाजव्यवस्थेनें कामगारवर्गाला पोषक अशा घडवून आणलेल्या सामाजिक सुधारणा क्षुल्लक व क्षणिक आहेत; कामगारवर्गाच्या शाश्वत प्रगतीसाठीं भांडवलशाही व्यवस्था उखडून तिच्या जागीं समाजवादी समाजव्यवस्था निर्माण केली पाहिजे; मध्यंतरींच्या काळांत सामाजिक सुधारणांसाठीं कामगारवर्ग जी हालचाल करील तिच्याकडे सशस्त्र क्रान्तीची पूर्वतयारी म्हणूनच पाहिलें पाहिजे; त्यांच्या तात्त्विक श्रद्धेंत व धोरणांत अशा तऱ्हेनें सांगड बसत होती. कित्येक युरोपीय राज्यसत्तांनीं व विशेषतः बिस्मार्कनें ही उदयोन्मुख समाजवादी चळवळ दडपण्याचे जे प्रयत्न केले व १८७३ नंतर ज्या आर्थिक अरिष्टांतून युरोपीय जनतेला जावें लागलें त्यामुळें चळवळींतील क्रान्तिकारी भावना टिकून राहाण्यास कांहीं काळ मदत झाली. पण एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस व विसाव्या शतकाच्या प्रारंभीं युरोपीय कामगारवर्गाची आर्थिक स्थिति व राजकीय परिस्थिति बरीच सुधारली. सोशल इन्शुअरन्स योजनांतील प्रगति व आर्थिक सुस्थिति कामगार वर्गानें अनुभवली. झारचा रशिया सोडून इतर सर्व राष्ट्रांतील परिस्थितिहि बरीचशी निवळली. साहजिकच चळवळींतील जहालपणा

फिका होऊं लागला. सामाजिक बदलाकडे पाहाण्याची एकेरी क्रान्तिनिष्ठा ढळली. चळवळीच्या सुरवातीच्या काळांत भांडवलशाही उत्पादन-व्यवस्था आर्थिक अरिष्टांतून सहीसलामत बाहेर पडूं शकणार नाहीं अशी समाजवाद्यांची समजूत होती. पण साम्राज्य विस्ताराबरोबर तिला नवें जीवन लाभलें होतें. भांडवलशाही सरकारांचा वाढता शस्त्रसंभार व लष्करांतील वाढ लक्षांत घेतां सशस्त्र क्रान्तीचा मार्ग यशस्वी होण्याची शक्यता राहिली नव्हती. उलट सामाजिक व राजकीय सुधारणांत वाढती अनुकूलता नव्या परिस्थितींत प्राप्त झाली होती. राष्ट्राच्या उद्योगधंद्यांत व संपत्तींत झालेल्या बेसुमार वाढींत कामगार वर्गालाहि फायदा झाला होता. साम्राज्यनीतीला विरोध करणारा उदारमतवादी मध्यमवर्ग वाढत्या लोकशाही हक्कांची व राज्यसत्तेवरील नियंत्रणाची मागणी करूं लागला होता. त्यांच्या सहकार्यानें राजसत्तेचें लोकशाहीकरण शक्य बनलें असतें. भावी क्रान्तीचीं स्वप्नें मनासमोर खेळविण्यापेक्षां चळवळीच्या वाढीवर लक्ष केन्द्रित करून राजसत्तेत परिवर्तन घडवून आणण्याचे प्रामाणिक प्रयत्न कां हातीं घेऊं नयेत असा प्रश्न वाढते पक्ष विचारूं लागले होते.

विसाव्या शतकाच्या पहिल्या दशकांत समाजापुढें दोन पर्याय होते. आपलें लोकशाही ध्येय साधण्यासाठीं प्रगतिशील मध्यम वर्गाशीं व त्यांच्या लोकशाही पक्षांशीं सहकार्य करणें अगर लोकशाही वा समाजवादासाठीं क्रान्तिकारी लढा हातीं घेणें ! दुसरा पर्याय सरकारचें शस्त्रबल वाढलें होतें म्हणून अशक्य होता; एवढेंच नव्हे तर संघटनांचें स्वरूपहि क्रान्तिकारी गट बांधण्याचें नव्हतें तर निवडणूक यंत्रणांचें होतें. ट्रेड युनियन चळवळहि कामगार हितरक्षणाच्या दृष्टिकोणांतून वाढत होती. राष्ट्राच्या व्यापक, राजकीय, एवढेंच काय आर्थिक प्रश्नांकडेहि तिनें दुर्लक्ष केलें. कामगार चळवळ लोकशाहीची व्यापक चळवळ न बनतां कामगारांची अल्पसंख्य वर्गीय चळवळ बनली. येथें मार्क्स व दुसऱ्या आंतरराष्ट्रसभेचे बेबेल, लिबनेश्ट, ज्यूस्डे आदि मार्क्सवादी नेते यांच्या दृष्टिकोणांतील फरक स्पष्ट होतो. मार्क्स ट्रेड युनियन चळवळीचा व समाजवादी पक्षसंघटनांचा पुरस्कर्ता होता. पण कोणत्याहि परिस्थितींत बहुजन समाजापासून

चळवळ अलिप्त होतां कामा नये, बहुसंख्यांकांच्या आकांक्षांचें ती सदैव प्रतीक राहिली पाहिजे, असा त्याचा दंडक होता. प्रत्येक राजकीय शक्याशक्यतेकडे व्यावहारिक दृष्टीनें पाहिलें पाहिजे अशी त्याची नीति होती. अर्थात् त्याच मार्क्सनें एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धातील इंग्लिश समाजाचा अभ्यास करून भांडवलदार व कामगार अशा दोन वर्गांतच भांडवलशाही समाज वाढत्या प्रमाणांत झपाट्यानें दुभंगला जात आहे असें जाहीरनाम्यांत लिहून ठेवलें होतें. त्या शिकवणूकींतूनच, जे कामगार नाहींत ते सर्व 'भांडवलदार' आहेत व म्हणून कोणत्याहि दुसऱ्या वर्गाशीं एकजूट करणें मार्क्सवादाविरुद्ध आहे, असा एकांगी दृष्टिकोण नव्या कामगार चळवळींनीं स्वीकारला होता. भांडवलशाही समाजांतील दुःखद जीवन कंठीत असतांना व हालअपेष्टांना तोंड देतांना ही वर्गभावनाच त्यांच्या मदतीला धांवून येई. भावी समाजवादी समाजव्यस्थेसंबंधींची त्यांची ओढ अधिक प्रज्वलित होई; राज्यकर्त्यांवर दडपण आणण्याची शक्ति आपल्या वर्गसंघटनेंत आहे याचा प्रत्यय येतांच आत्मविश्वास व वर्गनिष्ठा दुणावे. प्रत्यक्ष कार्यक्रम व तात्त्विक श्रद्धेंतील ही विसंगति दूर करण्यासाठींच बर्न्स्टाईन आदि नेत्यांनीं मार्क्सवादाच्या फेरविचाराची मागणी केली होती. पण १९०३ मध्यें ड्रेसडेन येथें भरलेल्या जर्मन पक्षपरिषदेंत त्यांचा पराभव झाला व आंतरराष्ट्र-सभेंतहि जहाल जर्मन समाजवादी नेत्यांचा दृष्टिकोण विजयी ठरला. त्यानंतरहि फेरविचारवादी चळवळींत राहिले याचें कारण दैनंदिन कार्यक्रमांत मतभेद नसल्यामुळें एक दिवस आपला दृष्टिकोण प्रभावी ठरेल अशी आशा त्यांना होती. जहाल नेतेहि अनुकूल परिस्थितीचीच वाट पहात राहिले; त्या परिस्थितीवर स्वार होण्यास आवश्यक अशी क्रान्तिकारी संघटना व जुळवाजुळव त्यांनीं केली नाहीं. दुसऱ्या आंतराष्ट्रसभेच्या यशापयशाचें निदान याच विसंगतीवर बोट ठेऊन होऊं शकेल.

पॅरीस अधिवेशनांत दर तीन वर्षांनीं आंतरराष्ट्रसभेचें अधिवेशन भरविण्याचा निर्णय घेण्यांत आला होता. या निर्णयानुसार १८९१ मध्यें ब्रूसेल्स येथें, १८९३ मध्यें झूरीचला, १८९६ मध्यें लंडनला, १९०० मध्यें पॅरीसला,

१९०४ मध्यें ॲमस्टरडॅमला, १९०७ मध्यें स्टटगार्डला व १९१० मध्यें कोपनहेगनला अशीं एकूण आठ अधिवेशनें झालीं. १९१२ मध्यें बेल ( Basle ) येथें आंतरराष्ट्रसभेचें खास अधिवेशन झालें. १९१४ च्या ऑक्टोबरांत व्हिएन्नाला होणारें अधिवेशन युद्धामुळें होऊं शकलें नाहीं, पण २९ व ३० जुलै १९१४मध्यें ब्रुसेल्स येथें आंतरराष्ट्रसभेच्या ब्यूरोची तांतडीची बैठक युद्धाच्या प्रश्नावर निर्णय घेण्यासाठीं भरली होती. दोन अधिवेशनांच्या मध्यंतरींच्या काळांत आंतरराष्ट्रसभेचें कामकाज चालविण्यासाठीं एक स्थायी सेक्रेटरीएट असावें अशी सूचना लंडन अधिवेशनांत सम्मत झाली होती. १९०० च्या पॅरीस अधिवेशनांत असें सेक्रेटरीएट स्थापन करण्यांत आलें व त्याच्याच जोडीला सोशलिस्ट ब्यूरोहि सुरू करण्यांत आला.

भांडवलशाही सरकारांत समाजवादी पक्षाच्या प्रतिनिधींनीं सामील व्हावें कीं नाहीं व युद्धतयारीसाठीं बजेटमध्यें केलेली तरतूद व मागणी जेव्हां लोकसभेंतून केली जाईल तेव्हां समाजवादी सभासदांनीं कोणतें धोरण स्वीकारावें या दोन प्रश्नांवर आंतरराष्ट्रसभेच्या प्रत्येक अधिवेशनांत प्रतिनिधींमध्यें तीव्र मतभेद होत. १८९१ च्या ब्रूसेल्स अधिवेशनाच्या वेळीं महायुद्धाचे ढग आंतरराष्ट्रीय क्षितिजावर जमा होऊं लागले होते. अधिवेशनांत जर्मन पुढारी लिब्नेश्ट व फ्रेन्च पुढारी एडुअर्ड व्हॅलिएंट यांनीं प्रचार, प्रतिज्ञा, निदर्शनें यांच्या साहाय्यानें व जर्मन फ्रेन्च कामगार एकजूट करून युद्ध टाळण्याची पराकाष्ठा करण्याची संयुक्त प्रतिज्ञा घेतली. तेव्हां डच प्रतिनिधींनीं धाडस करून असा प्रश्न त्यांना टाकला कीं ही प्रयत्नांची पराकाष्ठा करूनहि युद्ध सुरू झालेंच तर काय ? जर आपआपल्या राष्ट्राचें संरक्षण करण्यास येथें जमलेले प्रतिनिधी वचनबद्ध असतील तर हें एकतेचें प्रदर्शन नाटकच ठरेल. कुठलें राष्ट्र आक्रमक आहे व कोण केवळ स्वसंरक्षणासाठीं तयारी करीत आहे हा वादंग निरर्थक होय. आंतरराष्ट्रीय समाजवादी क्रान्तीसाठीं समाजवाद्यांनीं स्वतःच्या भांडवलशाही सरकारांविरुद्ध पुकारलेलें युद्ध सोडल्यास इतर सर्व युद्धांस विरोध करण्यास प्रतिनिधी वचनबद्ध होत असतील तरच ती प्रतिज्ञा बहुमोल ठरेल. अशा युद्धांत लष्करांत

भरती होण्यास विरोध करून कामगारवर्गानें सार्वत्रिक संपाचा पुकार सर्व राष्ट्रांत करणें हा एकच कार्यक्रम समाजवादी देऊं शकतील. त्या दृष्टीनें विचार व्हावयास हवा. पण ही डच प्रतिनिधींची सूचना 'अव्यवहार्य' ठरविली गेली व या विवाद्य मुद्याकडे दुर्लक्ष करण्यांत आलें. झूरीच अधिवेशनांत हाच प्रश्न पुनः उपस्थित झाला तेव्हां प्लेखानोव्ह यानें अशी भूमिका मांडली कीं, युद्धप्रसंगीं सार्वत्रिक संपाचा पुकार कामगारवर्गानें केला तर पश्चिम युरोपमधील पुढारलेल्या कामगार संघटनाच तो यशस्वी करूं शकतील. बाल्यावस्थेंतील रशियन कामगार संघटनांना त्यांत यश लाभणार नाहीं. परिणामीं प्रगतिशील युरोप 'रशियन कोझॅक्सच्या' टापांखालीं तुडविला जाईल. हा प्रश्न पुनः निकालांत निघाल्याबद्दल एंगल्सनें फ्रेन्च पुढारी ला फरागला लिहिलेल्या एका पत्रांत समाधान व्यक्त केलें होतें. पण तेवढ्यानें प्रश्न सुटला नाहीं.

पॅरीस येथील पहिल्या अधिवेशनांत घटनात्मक साधनांचा उपयोग करण्यास कसून विरोध करणाऱ्या अराज्यवाद्यांना आंतरराष्ट्रसभेंत स्थान आहे कीं नाहीं या प्रश्नावर कडाक्याची चर्चा झाली होती. १८९६ च्या लंडन अधिवेशनांत सर्व समाजवाद्यांनीं एकजूट करून अराज्यवाद्यांना आंतरराष्ट्रीय दरवाजा बंद केला. पण त्याच चर्चेतून निघालेल्या दुसऱ्या मुद्यावर समाजवाद्यांत एकवाक्यता नव्हती. घटनात्मक साधनांचाच एक भाग म्हणून भांडवलशाही सरकारांत समाजवाद्यांनीं अधिकार-स्वीकार करणें समर्थनीय ठरेल कीं नाहीं हाच तो दुसरा मुद्दा होय. घटनात्मक राजकारणाचा प्रचाराचें व्यासपीठ म्हणूनच फक्त उपयोग करावा अशी जहाल मार्क्सवादी समाजवाद्यांची भूमिका होती तर राजकीय शक्याशक्यतेचा विचार करून आवश्यक झालें तर मंत्रिमंडळांत जाणें निषेधार्ह ठरण्याचें कारण नाहीं अशी भूमिका दुसऱ्या कांहीं प्रतिनिधींची होती. मध्यंतरींच्या काळांत भांडवलशाही वॉलडेक–रूसो सरकारांत फ्रेंच समाजवादी मिलेरॅण्डनें मंत्रीपद-स्वीकार केला होता. फ्रेंच समाजवाद्यांत या प्रश्नावर दुफळी माजली तेव्हां आंतरराष्ट्रसभेपुढें हा प्रश्न ओघानेंच आला. १९०० च्या पॅरीस कॉंग्रेसमध्यें जहाल मार्क्सवाद्यांचा प्रतिनिधि काउटस्की यानें

तडजोडीची भूमिका मांडली. तत्त्वतः समाजवाद्यांनीं इतर पक्षांच्या मंत्रिमंडळांत सामील होऊं नये; पण आणीबाणीच्या प्रसंगीं अगर कांहीं खास कारणास्तव अपवाद म्हणून अशी मुभा राहावी. या ठरावामुळें अधिकारवादी समाजवादी गटाचा निषेध पॅरीस अधिवेशनांत टळला खरा पण पुढच्या अधिवेशनांत या वादानें तीव्र स्वरूप धारण केलें. मध्यंतरीं १९०३ च्या ड्रेसडेन जर्मन पक्षपरिषदेंत अधिकारग्रहणाविरुद्ध निःसंदिग्ध ठराव पास झाला होता व १९०४ च्या ॲमस्टरडॅम येथील आंतरराष्ट्रसभेच्या अधिवेशनांत अधिकार-ग्रहणविरोधी धोरण अधिकृत बनून अधिकारवादी फ्रेंच समाजवाद्यांचा निषेध करण्यांत आला. अर्थात् हा ठराव धाब्यावर बसवून नंतरहि कांहीं घटक पक्षांनीं अधिकारस्वीकार केला ही गोष्ट निराळी.

युद्ध व शांतता या प्रश्नांवर प्रत्येक अधिवेशनांत चर्चा होई व डावलली जाई. शान्ततेसाठीं सर्व समाजवाद्यांनीं अविश्रांत झटलें पाहिजे याबद्दल अधिवेशनांत कधींच दुमत दिसून आलें नाहीं, पण ते प्रयत्न अपुरे ठरून युद्ध सुरू झालेंच तर काय या मुद्यावर आंतरराष्ट्रसभेस अधिकृत भूमिका घेणें बदलत्या परिस्थितींत क्रमप्राप्त होऊन बसलें होतें. १९०७ च्या स्टटगार्ड अधिवेशनांत 'लष्करशाही व आंतरराष्ट्रीय संघर्ष' हा इतिहासप्रसिद्ध ठराव पास करण्यांत आला. तो इतिहासप्रसिद्ध बनण्याचें कारण, या अधिवेशनांत लेनीननें मारटाव्ह व रोझा लक्झेंबर्गच्या मदतीनें ठरावाचा शेवटचा भाग पास करून घेऊन आपल्या युद्धविषयक धोरणाची पूर्वपीठिका या ठरावान्वयें तयार केली होती. कामगारांचा युद्धास असलेला विरोध संघटित व बलशाली बनविण्याकडे लक्ष पुरवावें, आंतरराष्ट्रसभेच्या मदतीनें युद्धमान राष्ट्रांतील कामगारांनीं व त्यांच्या लोकसभेंतील प्रतिनिधींनीं युद्ध टाळण्याचे शिकस्तीनें प्रयत्न करावे व इतकेंहि करून युद्ध सुरू झालेंच तर शक्य तितक्या लवकर तें संपुष्टांत आणून युद्धजन्य आर्थिक व राजकीय अरिष्टांचा उपयोग प्रजेंतील खालच्या वर्गांत चळवळ उभारून भांडवलशाही राजवटीचें अधःपतन लवकर घडवून आणण्यासाठीं करून घेण्यांत यावा असें मार्गदर्शन या ठरावानें करण्यांत

आलें होतें. सार्वत्रिक संपाची सूचना बहुमतानें फेंटाळली गेली. एकाद्या राष्ट्रास स्वसंरक्षणासाठीं युद्ध लढावें लागलें तर त्या राष्ट्रांतील समाजवाद्यांनीं युद्धसहकार्य करावें कीं नाहीं या प्रश्नाचें उत्तर या मोघम ठरावांत मिळूं शकलें नाहीं.

कोपनहेगन येथील १९१० च्या अधिवेशनांतहि या प्रश्नाचें ठोस उत्तर दिलें गेलें नाहीं. शस्त्रास्त्र निर्मितीवर मर्यादा घालण्यांत यावी, खडें सैन्य बरखास्त करण्यांत यावें, राष्ट्राराष्ट्रांतील मतभेदाचे मुद्दे लवादाकडे सोंपविण्यांत यावे व त्यांचा निर्णय दोन्ही पक्षांवर बंधनकारक राहावा, गुप्त करारांविरुद्ध जनमत निर्माण करावें व युद्धाच्या प्रश्नावर राजसत्तांनीं जनमताचा कौल घ्यावा हे विचार ठरावरूपानें मांडण्यांत आले व त्यावर सर्वांचें एकमत झालें. प्रचाराच्या दृष्टीनें ठराव उपयुक्त असला तरी सरकारांनीं या सूचना न मानून युद्ध पुकारलेंच तर काय ही समस्या कायम राहिलीच. युद्धतयारीच्या बजेटाविरुद्ध लोकसभेंतील प्रतिनिधींनीं मत नोंदावें असा आदेशहि अधिवेशनानें दिला.

युद्धाचे वारे जोरानें वाहूं लागले तसे समाजवाद्यांचे कृतनिश्चय डळमळूं लागले. कालाचा लोंढा व जनमताचे वारे परतवून लावण्याची शक्ति आंतर-राष्ट्रसभेंत नव्हती. १९१२ च्या खास अधिवेशनांत ही शक्ति संघटित करण्याचा प्रयत्न युद्धविरोधकांनीं केला. सर्व देशांतील कामगारांनीं सर्वस्व पणाला लावून शान्ततेसाठीं झटावें असें आवाहन करण्यांत आलें. युद्ध सुरू होण्याच्या बेतांत होतें तेव्हां २९ व ३० जुलैला ब्रूसेल्स येथें आंतरराष्ट्रसभेच्या ब्यूरोची तांतडीची बैठक झाली. पण सर्व घटक पक्षांना परिणामकारक मार्गदर्शन करण्याचें सामर्थ्य आतां संघटनेंत राहिलें नव्हतें. प्रत्यक्ष युद्ध सुरू झालें तेव्हां कित्येक जहाल नेतेहि देशाभिमानाचे पोवाडे गाऊं लागले. जहाल ज्यूरडे फ्रेंच युद्धमंडळांतील एक मंत्री बनला. सार्वत्रिक संपानें युद्धास तोंड द्या अशी गर्जना करणारा गुस्ताव्ह हार्वे युद्ध जिंकण्याची चेतावणी जनतेस देऊं लागला. पॉल लेन्श व पार्व्हस हे रोझाचे सहकारी युद्ध प्रचारक बनले. मार्क्सवादाचा रशियन भाष्यकार प्लेखानोव्ह प्रशियन लष्करशाहीचा बीमोड करण्यासाठीं दोस्त सैन्याचा रंगरूट अधिकारी बनला. विश्वबंधुत्वानें एकत्र आलेले व सर्व देशांतील

कामगारांना आंतरराष्ट्रसभेच्या एका व्यासपीठावरून मार्गदर्शन करणारे निरनिराळ्या राष्ट्रांतील समाजवादी नेते समोरासमोरील खंदकांतून एकमेकांवर तोफेच्या गोळ्यांचा भडिमार करणाऱ्या राष्ट्रीय सैन्याच्या पाठीशीं उभे राहातांच आंतरराष्ट्रसभेच्या चिंधड्या झाल्या.

ऑस्ट्रियन समाजवादी नेता रेनर यानें, १९२९ सालीं गत इतिहासाचें परीक्षण करीत असतांना एकदां १९१० च्या कोपनहेगन अधिवेशनांतील एका प्रसंगाचा उल्लेख केला व आंतरराष्ट्रसभेंत युद्धप्रश्नांवरील चर्चेत शान्ततेचा विचार सदैव कसा प्रबळ ठरे याची चर्चा केली. प्रसंग हा होता : व्यापक ऑस्ट्रियन ट्रेड युनियन संघटनेंतून बहुसंख्य झेक कामगार फुटून निघाले होते. राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठीं झटणाऱ्या झेक जनतेस पाठिंबा देण्याचा व त्यासाठीं स्वतंत्र कामगार संघटन उभारण्याचा अधिकार झेक कामगारांना आहे कीं नाहीं या मुद्यावर आंतरराष्ट्रसभेस मत द्यावयाचें होतें. या प्रसंगास उद्देशून तो लिहितो, " राष्ट्रीय स्वातंत्र्याची भावना जागृत झालेल्या राष्ट्रांबद्दल आंतरराष्ट्रसभा द्विधा मनःस्थितींत सांपडे. त्यांच्या जागृतीबद्दल व स्वातंत्र्याबद्दल त्यांना नितान्त आदर होता व नैतिक पाठिंबाहि होता. पण आपल्या साम्राज्यसंघर्षांत बडीं राष्ट्रें या स्वातंत्र्य चळवळी वापरून घेत व त्यांना युद्धप्रश्न बनवीत. प्रत्येक राष्ट्राच्या इतिहासांत राष्ट्रापुढें एकदां तरी हा कूट प्रश्न उभा राहातो; स्वातंत्र्य कीं शान्तता? १९१० सालीं याच प्रश्नाच्या उत्तरांतून कित्येक समाजवादी पक्षांत फूट पडली. पोलीश, झेक व इतर कांहीं पक्षांतील कांहीं मंडळींची अशी खात्री झाली होती कीं आतां युद्ध अटळ आहे व या युद्धांतूनच अखेर आपल्या राष्ट्रीय स्वातंत्र्याचा प्रश्न सुटूं शकेल अशी श्रद्धा त्यांनीं बाळगली होती. रशियन पक्षांतील अति जहाल गट युद्ध हें संकट नसून मुक्तीची पर्वणी आहे अशा दृष्टिकोणांतून युद्धाकडे पाहात होता. पण आंतरराष्ट्रसभेनें युद्धाकडे अशा दृष्टिकोणांतून न पाहातां जागतिक शान्तता टिकविण्याचा प्रामाणिक भगीरथ प्रयत्न केला. जुना इतिहास उलथून नवा इतिहास निर्माण करणारी लष्करी क्रान्ति व क्रान्तिकारी युद्ध हीं दोन अमोघ साधनें आहेत या उच्छृंखल

मार्क्सवादी प्रमेयापलीकडे जाण्यांत आंतरराष्ट्रसभेनें मोठीच बौद्धिक झेंप घेतली होती. एका विशिष्ट मानवी ऐतिहासिक प्रगतींत युद्धाचें स्वरूप क्रान्तिकारी न राहातां प्रतिगामी बनतें व शान्तता सर्व परिस्थितींत चांगली व श्रेष्ठ ठरते हा विचार पहिल्या महायुद्धानंतर प्रथम पक्व बनूं लागला व अजूनहि तो अविरोध बनलेला नाहीं. पण आंतरराष्ट्रसभेनें १९१० सालींच कोपनहेगन येथें हें तत्त्व सम्मत केलें. सर्वांत अधिक महत्त्व जागतिक शान्ततेला; शान्ततामय उत्क्रान्तींतून राष्ट्रीय स्वातंत्र्य; राष्ट्रीय प्रश्नांची निर्णायक फलश्रुति फक्त समाजवादी समाजांत ! हें तत्त्व तिनें ठराव करून सम्मत केलें नाहीं, तर त्या तत्त्वाचा पुरस्कार करूनच तिनें झेक जनतेच्या अलग होण्याच्या मागणीला विरोध केला." * दुसऱ्या आंतरराष्ट्रसभेनें शान्ततेचें सम्मत केलेलें हें अलिखित राजकीय तत्त्व मार्क्सच्या शिकवणुकीशीं जुळतें नव्हतें असें स्पष्टपणें सांगण्यांत रेनरनें मोठें धाडसच केलें व पुढें असेंहि मत व्यक्त केलें कीं मार्क्स व एंगल्सच्या विचारांहून आंतरराष्ट्रसभेनें पुढची मजल गांठली आहे.

मार्क्स व एंगल्सचा युद्धाकडे पाहाण्याचा दृष्टिकोण खात्रीनेंच शांतता-वादी नव्हता. एंगल्सनें भावी युद्धासंबंधीं आंतरराष्ट्रसभेला मार्गदर्शन करतांना, १८७०–७१ मधील जर्मनी व फ्रान्स यामधील युद्धांत मार्क्सनें जी भूमिका घेतली होती तिकडे समाजवाद्यांचें लक्ष वेधलें. तटस्थतेचें लुळें धोरण अगर कामगारांचीं शान्ततेसंबंधींचीं शाब्दिक निवेदनें निरर्थक होत; सर्वांत प्रमुख शत्रूविरुद्ध सर्व कामगार व क्रान्तिकारी शक्ति खडी करणें हेंच एक अचूक धोरण असूं शकतें. १८७० मध्यें सेडन येथें नेपोलियनचा पाडाव होईपर्यंत सर्वांत प्रमुख शत्रु तो होता. नवें फ्रेंच लोकसत्ताक निर्माण झाल्यावर मार्क्सनें त्याला पाठिंबा दिला व जर्मनीनें अलसेस-लॉरेन्स हे प्रान्त स्वराष्ट्रास जोडून घेऊं नयेत म्हणून जर्मन रिपब्लिक विरुद्ध दडपण आणण्यास त्यानें आवाहन केलें. एंगल्स म्हणे : आज फ्रान्स व रशिया यांचा जर्मनी, ऑस्ट्रिया व इटलीविरुद्ध संधि आहे. इंग्लंड तटस्थ आहे. नव्या युद्धांत जर्मनींतील होहेन झोलर्न राजघराणें

* डेमॉक्रसी ॲन्ड सोशलिझम : पान ३१०

नष्ट होऊन जर्मन समाजवादी पक्ष विजयी होईल. मग रशियावर चालून जाणाऱ्या जर्मन फौजा तेथेंहि क्रान्तीस मदत करतील, झारशाही उलथून पडेल व जर्मन जनता निदान लॉरेन्स प्रान्त तरी फ्रान्सला परत करील. तेव्हां आंतरराष्ट्रसभेनें जर्मनीस पाठिंबा द्यावा. १८९५ मध्यें एंगल्स मृत्यू पावला. पण त्याच्यानंतर मागें राहिलेल्या आंतरराष्ट्रसभेच्या पुढाऱ्यांपुढें प्रश्न इतका सोपा राहिला नव्हता. १९०५ मध्यें इंग्लंडनें फ्रान्सशीं संधि केला. जर्मनींत समाजवादी सत्ताधारी बनले नव्हते व दुसरा विल्यम जर्मन सम्राट होता. दोस्तांना पाठिंबा द्यावा तर जर्मन कामगारांना झारला शरण जा असें सांगण्यासारखें होतें. आणि दुसऱ्या विल्यमला पाठिंबा द्यावा तर फ्रेंच कामगारांना सम्राट विल्यमला शरण जा म्हणून सांगण्यासारखें होतें. पण आंतरराष्ट्रसभेंतील बहुसंख्य समाजवादी उपयुक्त व अनिष्ट अशी युद्धाची मीमांसा करण्यास तयारच नव्हते. त्यांना कोणत्याच प्रकारचें युद्ध नको होतें. ते युद्ध टाळूं शकले नाहींत तेव्हां अर्थातच प्रत्येक देशांतील समाजवाद्यानें आपली युद्धविषयक भूमिका निश्चित केली. आंतरराष्ट्रसभेनें ही वा ती बाजू निवडून आदेश दिला नाहीं.

मार्क्स युद्धाकडे न्याय्य व नैतिक बाजू कोणाची या दृष्टीनें कधींच पाहात नसे. आक्रमक कोण हा प्रश्न नव्हता. विशिष्ट युद्ध व त्या युद्धांतील विशिष्ट पक्षाचा विजय क्रान्तिकारी व कामगार ध्येयास उपयुक्त ठरेल कीं नाहीं याच दृष्टिकोणांतून तो युद्धाचा प्रश्न सोडवूं इच्छित होता. पण रशिया सोडून इतर कुठल्याहि देशांतील कामगार आपल्या सरकारवर युद्धकालांत प्रहार करण्यास तयार नव्हते अगर युद्धाचा धोका असलेलें कुठलेंच धोरण पुरस्कृत करण्यास राजी नव्हते. अशा परिस्थितींत रशियन क्रान्तींत यश मिळविणाऱ्या लेनीननें, साम्राज्यशाही युद्धाचें रूपान्तर गृहयुद्धांत करण्यास ते तयार नव्हते म्हणून व ते युद्धखोर देशाभिमानी आहेत म्हणून, त्यांची निर्भत्सना केली; उलट शान्तता-वादाचा व आंतरराष्ट्रीय सलोख्याचा पुरस्कार त्यांनीं केल्यामुळें देशांतील राष्ट्रीय पक्षांनीं ‘आपण जनतेचे खरे हितरक्षक आहोंत व समाजवादी हे राष्ट्रद्रोही आहेत’ असा प्रचार करून, समाजवाद्यांना अलग ठेवण्याचा प्रयत्न केला.

शान्ततावादाचा पुरस्कार व केवळ कामगारवर्गीय हित डोळ्यापुढें ठेवून चळवळ चालविण्याची दृष्टि यामुळें आंतरराष्ट्रसभेंतील समाजवादी पक्ष आंतरराष्ट्रीय चळवळींत व राष्ट्रीय राजकारणांत अपेशी ठरले होते.

लेनीननें 'साम्राज्यशाही युद्धाचें रूपान्तर गृहयुद्धांत करा' असा सिद्धान्त 'साम्राज्यशाही' युगाची मीमांसा करून मांडला. पुढें क्रान्ति काळांतच 'शासनसंस्था व क्रान्ति' हें पुस्तक त्यानें लिहिलें. हे दोन्हीहि तात्त्विक प्रबंध युरोपीय कामगार वर्गाच्या दृष्टीनें वस्तुस्थिति–निदर्शक नव्हते. स्पर्धानिष्ठ व्यक्तिगत उत्पादन–पद्धतीनें जें औद्योगिक भरभराटीचें ऐतिहासिक कार्य एकेकाळीं केलें होतें तेंच कार्य युरोपमधील कित्येक देशांत शासनसंस्थेनें उद्योगधंद्यास उत्तेजन देऊन एकोणीसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत केलें. एका हस्तक्षेपानंतर दुसरा हस्तक्षेप उद्‌भवे. समाजवादीहि शासनसंस्थेचा प्रत्येक हस्तक्षेप हा उदारवादाचा पराभव आहे म्हणून त्याचा गौरव करीत. प्रत्येक हस्तक्षेपाबरोबर कामगार व राष्ट्रीय शासन-संस्था यांचे संबंध अधिक दृढ बनत होते. अशा परिस्थितींत कामगारांचे आंतरराष्ट्रीयवादाबद्दलचें भावनात्मक आकर्षण कमी झालें. शासनसंस्थेचें रक्षण करणें व तिच्यावर दडपण आणून शांततेच्या मार्गानें तिच्यांत बदल घडवून आणणें हाच मार्ग त्यांना अधिक पसन्त पडला. साम्राज्यशाही कालखंडांत स्वराष्ट्राची औद्योगिक व सांपत्तिक भरभराट होत असली तरी तिचा फायदा सर्व कामगार-वर्गास न होतां फक्त वरच्या अल्प कामगारगटास होतो व म्हणून या पांढरपेशा कामगारगटानें राष्ट्रीय भांडवलदारवर्गाशीं संगनमत केलें तरी बहुसंख्य कामगार वर्ग हें धोरण कधीं स्वीकारणार नाहीं असा निष्कर्ष लेनीननें काढला होता. साम्राज्यलुटींतील तुकडा चघळणारा हा वर्गच युद्धास पाठिंबा देईल, सर्व सामान्य वर्गास राष्ट्रवादाची इतकी ओढ असण्याचें कारण नाहीं अशी त्याची अटकळ होती. पण युरोपीय कामगारवर्गानें ती खोटी ठरविली. कामगारांचें राष्ट्रप्रेम साम्राज्यलुटींत त्यांना भाग मिळतो कीं नाहीं यानें निश्चित होणार नव्हतें तर शान्ततेंत सर्व राष्ट्राचा जो औद्योगिक

उत्कर्ष व जी भरभराट होणार होती त्यांत भांडवलदाराबरोबर कामगारवर्गासहि फायदा होणार होता हें प्रत्यक्ष अनुभवांतून तो शिकला होता. या कारणासाठींच तो युद्धापेक्षां शान्ततेचा पक्षपाती होता. पण एकदां युद्ध सुरूच झालें तेव्हां कामगारवर्गहि स्वराष्ट्र रक्षणासाठीं बहुसंख्येनें शासनसंस्थेच्या पाठीशीं उभा राहिला. आपलें हित राष्ट्रहिताशीं निगडित आहे अशीच त्याची श्रद्धा होती.

दुसऱ्या आंतरराष्ट्रसभेचें यशापयश तिनें युद्धप्रश्नावर कोणती भूमिका स्वीकारली अगर युद्ध सुरू होतांच बहुसंख्य समाजवादी पक्ष व त्यांचे बहुसंख्य नेते युद्धपुरस्कर्ते बनले एवढ्यावरून निश्चित करणें सदोष ठरेल. तिचे शांतता टिकविण्याचे प्रयत्न अपेशी ठरले होते हें पहिल्या महायुद्धानेंच सिद्ध केलें. युद्धकाळांत युद्धास पाठिंबा देणाऱ्यांत केवळ मार्क्सवादी नेते होते एवढेंच नव्हे तर युरोपमधील बहुसंख्य कामगारवर्गहि होता. रशियन समाजवादी चळवळीच्या दृष्टीनें अनियंत्रित झारचा पाडाव कोणत्याहि परिस्थितींत अधिक अनुकूल ठरणार होता; साहजिकच गृहयुद्धाची घोषणा तेथें मूळ धरूं शकली. पण म्हणून रशियन दृष्टिकोणांतून सर्व युरोपीय समाजवादी चळवळीचें मूल्यमापन करणें योग्य ठरणार नाहीं. आपल्या पंचवीस वर्षांच्या कार्यांत आंतरराष्ट्रसभेनें बरीच भरीव कामगिरी केली होती. युरोपमधील औद्योगिक कामगार वर्गाची स्थिति सुधारण्यास व त्यांचा राहाणीचा दर्जा उंचावण्यांत आंतरराष्ट्रसभेनें सामुदायिक प्रयत्न केले होते. समाजवादी पक्षाचें नेतृत्व असलेल्या ट्रेड युनियन चळवळींनीं कामगारवर्गाची सामाजिक प्रतिष्ठा वाढविली होती. आंतरराष्ट्र-सभेस जोडलेल्या समाजवादी पक्षांचा कारभार संपूर्णतया लोकशाहीनिष्ठ होता. सर्व विवाद्य मुद्यांवर अखेरचा निर्णय घेण्याचा अधिकार सामान्य सभासदांना होता. जोंपर्यंत बहुसंख्य सामान्य सभासदांचें मत नेतृत्वाशीं जुळतें राही तोंपर्यंतच ते नेतेपदावर राहूं शकत. समाजवादी संघटनांनीं अशा तऱ्हेनें आपल्या कामकाजांत कामगारवर्गास स्वायत्त कारभाराचें मौलिक शिक्षण दिलें होतें. आंतरराष्ट्रसभेमुळें निरनिराळ्या राष्ट्रांतील समाजवादी चळवळींत वाढते मित्रत्वाचे संबंध वाढले. भांडवलशाहीची आघाडी जशी

अनेकराष्ट्रीय बनली तशी तिला शह देणारी कामगार वर्गाचीहि अनेकराष्ट्रीय आघाडी निर्माण करण्यास आंतरराष्ट्रसभेनें हातभार लावला. दहशतवादी अराज्यवादी चळवळीला आंतरराष्ट्रसभेच्या वाढीबरोबर वाढता आळा बसला. व्यासपीठावरील वैचारिक संघर्षांतून समाजवादी विचारपरंपरेंत भर पडली. विश्वबंधुत्वाची भावना कामगारवर्गांत टिकविण्यासहि आंतरराष्ट्रसभेनें हातभार लावला होता व त्यामुळेंच पहिलें महायुद्ध संपल्यावर ट्रेड युनियन्सचें एक आंतरराष्ट्रीय फेडरेशन सत्वर स्थापन होऊं शकलें. थोड्याच कालावधींत कांहीं समाजवादी पक्ष अधिकाररूढ झाल्यावर आंतरराष्ट्रसभेच्या काळांत निर्माण झालेले मित्रत्वाचे संबंध व परस्पर विश्वास परराष्ट्रीय खात्याच्या कारभारांत त्यांना उपयोगी पडला. युरोपीय समाजवादी व कामगार चळवळींतील दुसऱ्या आंतर-राष्ट्रसभेचें कार्य पहिल्या महायुद्धाबरोबर नामशेष झालें नाहीं; उलट तें पुन-र्संघटित केलें गेलें ही घटनाहि तिचें मर्यादित यश सूचित करण्यास पुरेशी आहे. साम्राज्यशाहीस परिणामकारक विरोध करण्यांत व युद्ध टाळण्यांत तिला अपयश आलें होतें व राजकीय संकटांत सर्व समाजाचें प्रतिनिधित्व करण्याची शक्ति घटक समाजवादी पक्षांत निर्माण झाली नाहीं याच तिच्या यशाच्या मर्यादा होत.



: ११ :

# पहिलें महायुद्ध व समाजवादी पक्ष

**पहिलें** महायुद्ध सुरू झालें तेव्हां लेनीन ऑस्ट्रियाच्या सरहद्दींतील क्रॅको या गांवीं आपली पत्नी क्रुपस्काया हिच्याबरोबर राहात होता. जुलैंत ब्रूसेल्स येथें भरलेल्या तांतडीच्या बैठकींत झालेल्या चर्चेचा वृत्तान्त त्यास समजला होता. प्रत्यक्ष युद्ध सुरू झाल्यावर दुसऱ्या आंतरराष्ट्रसभेंतील अनेक नामवंत नेत्यांनीं स्वराष्ट्राच्या युद्धप्रयत्नास पाठिंबा दिला आहे व विशेषतः जर्मन समाजवादी पक्षानें युद्धविरोधी भूमिकेचा त्याग केला आहे हें त्याला समजलें तेव्हां त्यास जबरदस्त धक्का बसला व त्यानें निर्वासित रशियन समाजवादी नेत्यांची ५ सप्टेंबरला बर्न येथें बैठक बोलाविली. या बैठकींत लेनीननें मांडलेला सात कलमी युद्ध प्रबंधच युद्धकाळांत रशियन सोशल डेमोक्रॅटिक पक्षाचें मार्गदर्शन करणार होता; रशियन क्रान्तीची तात्त्विक पार्श्वभूमि निर्माण करणार होता. तीं सात कलमें हीं होत:

( १ ) युरोपीय महायुद्धाचें स्वरूप पूर्णपणें भांडवलशाही, साम्राज्यशाही व राजघराण्यांतील संघर्षाचें आहे.

( २ ) दुसऱ्या आंतरराष्ट्रसभेंतील ( १८८९-१९१४ ) जर्मन समाजवादी पक्षाची वागणूक समाजवादाचा पूर्ण द्रोह करणारी आहे.

(३) फ्रेन्च, बेलजियम् सोशल डेमोक्रॅटिक नेत्यांचें भांडवलशाही सरकारांत अधिकारपद स्वीकारण्याचें धोरण तितकेंच निषेधार्ह आहे.

(४) दुसऱ्या आंतरराष्ट्रसभेच्या नेत्यांनीं बहुमतानें केलेला समाजवादाचा द्रोह आंतरराष्ट्रसभेच्या वैचारिक दिवाळखोरीचें द्योतक आहे.

(५) युद्धांत भाग घेणाऱ्या नेत्यांनीं आपल्या भूमिकेच्या समर्थनार्थ मांडलेली बाजू अर्थहीन आहे.

(६) बृहन् रशियाला व झारशाहीला उचलून धरणाऱ्या युद्धखोरांविरुद्ध, तसेंच तिला पाठिंबा देणाऱ्या रशियन उदारमतवादी, लोकतंत्रवादी व मूठभर दहशतवादी गटांविरुद्ध निर्दय लढा उभारणें हें रशियन सोशल डेमॉक्रसीचें प्रथम कर्तव्य आहे. कामगारवर्गाच्या व रशियांतील सर्व श्रमिक जनतेच्या हिताच्या दृष्टीनें विचार करतां पोलीश, युक्रेनी व इतर राष्ट्रिकांचें शोषण करणाऱ्या झारशाहीचें व तिच्या सैन्यबलाचें अधःपतन होणेंच कमी घातकी ठरेल.

(७) सोशल डेमॉक्रसीनें खालीं उद्धृत केलेला कार्यक्रम ताबडतोब हातीं घेतला पाहिजे. समाजवादी क्रान्तीचा प्रचार जनतेंत तसेंच सैन्यांत व युद्ध आघाडीवर झाला पाहिजे. समोरच्या खंदकांतील साध्या सैनिकांवर झाडल्या जाणाऱ्या गोळ्या भांडवलशाही सरकार व तिला मदत करणाऱ्या प्रतिक्रान्तिवादी शक्तींवर झाडण्यांत उपयोगांत यावयास हव्या. प्रत्येक देशांतील सैन्यांत गुप्त कट संघटित करून सर्व भाषांतून सर्व सैनिकांत त्याचा प्रचार व्हावयास हवा... समाजवादाचा द्रोह करणाऱ्या आंतरराष्ट्रसभेच्या नेत्यांविरुद्ध प्रचार करून श्रमिक व कामगारवर्गांतील क्रान्तिकारी मनोवृत्ती चेतावल्या गेल्या पाहिजेत... जर्मनी, पोलंड, रशिया व इतर राष्ट्रांत लोकसत्ताक राज्यपद्धतीची मागणी

व चळवळ करतांना युरोपमधील सर्व राष्ट्रांचें एक प्रजासत्ताक-संघराज्य स्थापण्याच्या कल्पनेचाहि प्रचार केला गेला पाहिजे.

स्टटगार्ड येथें १९०७ सालीं भरलेल्या आंतरराष्ट्रसभेच्या अधिवेशनांत पास झालेल्या "लष्करशाही व आंतरराष्ट्रीय संघर्ष" या सुप्रसिद्ध ठरावास लेनीननें एक उपसूचना मांडून ती ठरावांत अंतर्भूत करून घेतली होती. ती उपसूचना या सातकलमी प्रबंधांतील कार्यक्रम सूचित करणारीच होती. ठराव सर्वसम्मत व्हावा या इच्छेनें ठरावांत सामील करून घेतलेल्या या उपसूचने-मागील भावार्थाकडे तेव्हां बहुतेकांनीं दुर्लक्ष केलें होतें. युद्ध होऊं नये म्हणून सर्वतोपरी प्रयत्न करण्याचा निर्धार ठरावाच्या ज्या पहिल्या विभागांत व्यक्त करण्यांत आला होता तीच आंतरराष्ट्रसभेची खरी भूमिका होती. कोपन-हेगनच्या ठरावांत तिचाच पुनरुच्चार झाला व तिला अनुरूप अशा घोषणा आंतरराष्ट्रसभेनें केल्या. म्हणूनच जेव्हां प्रत्यक्ष युद्ध सुरू झालें तेव्हां स्टटगार्ड ठरावाच्या पुढील दोन भागांची अम्मलबजावणी घटक पक्षांतील बहुसंख्यांकांनीं केली नाहीं. युद्ध सुरूच झालें तर तें त्वरित संपुष्टांत आणण्यांत समाजवादी पक्षांनीं पुढाकार घ्यावा व युद्धजन्य आर्थिक व राजकीय अरिष्टांचा उपयोग प्रजेंतील खालच्या वर्गांत चळवळ उभारून भांडवलशाही राजवटीचें अधःपतन लवकर घडवून आणण्यासाठीं करून घेण्यांत यावा हेच ते ठरावाचे दोन पुढील भाग होत.

युद्ध सुरू झाल्यावर जे समाजवादी युद्धप्रयत्नांत सामील न होतां युद्ध-विरोधी चळवळीचें नेतृत्व करीत राहिले त्यांचेहि स्थूलमानानें दोन गट पडले. या दोन गटांतील मतभेद स्टटगार्ड ठरावांतील उपरिनिर्दिष्ट दोन भागांवरच आधारलेले होते. युद्धविरोधी समाजवाद्यांतील बहुसंख्य गट समाजवादी पक्षाच्या संघटित प्रयत्नांनीं युद्ध त्वरित संपुष्टांत आणावें अशा मताचा होता तर अल्पगट या साम्राज्यशाही युद्धांतून निर्माण होणारा असंतोष चेतवून व संघटित करून, क्रान्तिद्वारां युद्धाचा शेवट साधणाऱ्या डावपेंचांचा पुरस्कर्ता होता. हे डावपेंच यशस्वी करण्यासाठीं जनमनांतून समाजवादी नेत्यांना पदभ्रष्ट करणें जरूर होतें.

म्हणूनच या नेत्यांना युद्धखोर, क्रान्तिद्रोही, समाजवादाचे शत्रू म्हणून बदनाम करण्याचा प्रचार युद्धविरोधी समाजवादी चळवळीनें ताबडतोब हातीं घ्यावा अशी अल्पगटाची मागणी होती. या प्रचाराविषयीं युद्धानंतर लिहिलेल्या 'युद्ध व समाजवाद' या पुस्तकांत जर्मन पुढारी काउटस्की लिहितो कीं 'युद्धकाळांतील देशाभिमानाच्या लाटेंत केवळ समाजवादी नेत्यांनींच गटांगळ्या खाल्ल्या हा प्रचार वस्तुस्थितीस धरून नव्हता. तो अपप्रचार होता. देशाभिमानाचे उमाळे नेत्यांहून जनतेच्या हृदयांतूनच अधिक जोरानें वर उसळी घेत होते. क्रान्तिकारी समाजवादाचा द्रोह केल्याचें खापर कुणाच्या माथीं फोडावयाचेंच असेल तर नेत्यांबरोबर बहुसंख्य कामगारवर्गाच्या माथ्यावरहि तें फोडावें लागेल. सर्वसामान्य कामगारवर्ग सदैव निष्कलंक क्रान्तिकारी असतो ही केवळ कपोलकल्पित कथा होय.'

शासनसंस्थेच्या स्वरूपांत एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत घडून आलेला बदल, पश्चिम व मध्य युरोपमधील समर्थ व संपन्न कामगारसंस्था, स्वराष्ट्र–संरक्षणामागें कामगारवर्गाचा दडलेला स्वार्थ, लोकसभांच्या निवडणुकींत समाजवादी प्रतिनिधींना लाभत असलेलें वाढतें यश व त्यामुळें वृद्धिंगत झालेल्या शान्ततामय लोकशाही बदलावरील कामगारवर्गाची श्रद्धा, यांचें अभ्यासू परीक्षण केलें कीं लेनीनच्या 'स्वराष्ट्राच्या युद्धांतील पराभवांतून यशस्वी क्रान्तीकडे' या घोषणेला युरोपीय समाजवादी व कामगार चळवळीकडून अपेक्षित पाठिंबा कां मिळाला नाहीं याची संगति लागते. युद्धसमर्थक बहुसंख्य समाजवादी तर सोडाच पण युद्धविरोधी समाजवाद्यांतील बहुसंख्य समाजवादीहि लेनीनची ही घोषणा मंजूर करूं शकले नाहीत. युद्धविरोधी समाजवाद्यांची संयुक्त आघाडी उभारण्याचा प्रयत्न करणाऱ्या लेनीन व रोझाला त्या आघाडींतहि अल्पमतांत राहावें लागलें.

युद्ध सुरू होतांच आक्रमक जर्मनीविरुद्ध बेलजियम व फ्रान्सला स्वसंरक्षणासाठीं शस्त्र हातीं घ्यावें लागलें. जर्मन सम्राटानें लोकसत्ताक राष्ट्रांवर आक्रमण केलें होतें. तेव्हां दोन साम्राज्यशाह्यांमधील हें युद्ध आहे हा विचार

सर्वसामान्य बेलजियम व फ्रेंच जनतेला तसेंच ब्रिटिश लोकांना पटला नाहीं. जर्मनी व ऑस्ट्रियांतील जनता अनियंत्रित झारशाहीच्या विजयास दचकत होती. फ्रान्स व रशियांत करार न होऊं देण्याच्या दिशेनें जर्मन समाजवादी मुत्सद्देगिरीचे कांहीं डाव युद्ध सुरू होण्यापूर्वी खेळूं शकते, पण त्यावेळीं भांडवलशाही सरकारशीं कोणतेंच सहकार्य न करण्याचा पूर्वग्रह त्यांच्या मार्गांत येत होता. एकदां दोन आघाड्यांवर युद्ध सुरू झाल्यावर पूर्व आघाडीवर झारच्या सैन्याला झोडपीत जावयाचें, मात्र पश्चिम आघाडीवर न लढतां मार खावयाचा अशी भूमिका घेणें जर्मन जनता घेऊं शकत नव्हती. परिणामीं फ्रेंच व जर्मन जनता परस्परांविरुद्ध लढली. रशियांतील स्वातंत्र्यवादी व समाजवादी शक्ती मात्र आपल्या झारशाहीचें समर्थन कोणत्याच अर्थानें करूं शकल्या नसत्या. तरीहि युद्धवादी रशियन समाजवाद्यांनीं आम्ही फ्रान्स व इंग्लंडचे दोस्त आहों असा मुद्दा पुढें मांडलाच.

युद्धानें जोर पकडल्यावर युद्धविरोधी समाजवाद्यांपुढें दोन मार्ग होते. बहुसंख्य युद्धविरोधी समाजवाद्यांनीं युद्ध त्वरित संपुष्टांत आणण्यावर सर्व शक्ति केन्द्रित केली. युद्धांतून क्रान्तीची वाटचाल करूं इच्छिणाऱ्या युद्धविरोधी समाजवाद्यांच्या दृष्टीनें युद्ध लवकर बंद होतें कीं दीर्घकाळ चालू राहातें हा महत्त्वाचा प्रश्न नव्हता. क्रान्तीची तयारी करणें हा एकच कार्यक्रम त्यांच्यासमोर होता. देश–काल–परिस्थितिनुसार भिन्नभिन्न देशांतील समाजवाद्यांची युद्धविरोधाची दृष्टिहि भिन्न होती. जीं राष्ट्रें संभाव्यतः या युद्धाबाहेर राहून युद्धाचें क्षेत्र मर्यादित करूं शकलीं असतीं अशा राष्ट्रांपैकीं इंग्लंड हें एक राष्ट्र होतें. इंग्लंडला युद्धाबाहेर राहाणें शक्य आहे असें इंग्लंडमधील कित्येक उदारमतवाद्यांनाहि वाटत होतें. मॅक्डोनॉल्ड, स्नोडेन हे समाजवादी नेते व स्वतंत्र मजूर पक्ष या भूमिकेवरूनच युद्धास विरोध करीत होते. ब्रिटनचा पराभव ओढवून घेऊन क्रान्तीची वाटचाल करण्याचें युद्धविरोधी धोरण त्यांनीं कधींच स्वीकारलें नसतें. तत्त्वतः हिंसेविरुद्ध व म्हणून युद्धविरोधी असलेले समाजवादीहि इंग्लंडमध्यें होते व त्यांनीं युद्धास विरोध केला.

युद्धांत फार उशीरा जीं राष्ट्रें सामील झालीं तेथें युद्धविरोधी चळवळ अधिक प्रभावी बनली. १९१५ मध्यें बल्गेरिया युद्धांत सामील झाला तेव्हां जहाल समाजवाद्यांबरोबर शेतकरी पक्षहि युद्धविरोधी आघाडींत सामील झाला. जर्मनीच्या बाजूनें युद्धांत सामील होण्यांत बल्गेरियानें घोडचूक केली होती व त्याचा फायदा समाजवादी चळवळीस मिळाला. १९११ सालीं इटलीनें लिबियावर केलेल्या स्वारींत इटॅलियन जनतेनें युद्धाचा अनुभव घेतला होता. त्या युद्धास पाठिंबा देणाऱ्या समाजवाद्यांची समाजवादी पक्षांतून तेव्हांच उचलबांगडी झाली होती. १९१४ च्या महायुद्धांत इटलींतील भांडवलदारवर्गहि स्वहित रक्षणासाठीं इटलीस युद्धाबाहेर ठेवूं इच्छित होता. अशा परिस्थितींत इटली युद्धांत सामील झाला तेव्हां समाजवादी चळवळ बहुतांशानें युद्धाबाहेर राहिली व त्वरित शांतता प्रस्थापित करणाऱ्या युद्धविरोधी समाजवादी गटास तिनें पाठिंबा दिला. ‘ना युद्धास पाठिंबा ना घातपाती चळवळ’ अशी त्यांची घोषणा होती. आपल्या देशाचा पराभव ओढवून घेऊन क्रान्ति घडवून आणण्याचे डावपेंच खेळणें त्यांना हितावह वाटलें नाहीं. स्वित्झर्लंड हें राष्ट्र तटस्थतेचें कट्टें पुरस्कर्तें असल्यामुळें युद्धविरोधी समाजवादी आघाडीचें तें माहेरघर न बनतें तरच आश्चर्य.

स्पेन, हॉलंड व स्कॅंडिनेव्हियन राष्ट्रें महायुद्धांत कधींच सामील झालीं नाहींत. उलट युद्धकाळांत या कांहीं राष्ट्रांची अधिक औद्योगिक भरभराट झाली. साहजिकच या देशांतील समाजवादी चळवळीला आपली शान्ततावादी व युद्धविरोधी भूमिका टिकवितां आली. इंग्लंड व सर्बिया सोडून इतर कुठल्याहि राष्ट्राच्या लोकसभेंत युद्धजाहिरी विरुद्ध एक मतहि नोंदविलें गेलें नाहीं. खुद्द रशियांत प्रथम युद्धखर्चाच्या मागणीवर मतदान झालें तेव्हां एकाहि सभासदानें विरोधी मत दिलें नाहीं. समाजवाद्यांच्या मेन्शेव्हिक व बोल्शेव्हिक या दोन्ही गटांचे लोकसभेंतील प्रतिनिधी तटस्थ राहिले. भावनेचा पहिला भर ओसरल्या-वर दोस्त राष्ट्रांतील समाजवादी पक्षांनीं लोकसभेंत युद्धखर्चाविरुद्ध मत नोंद-विणाऱ्या समाजवादी अल्प गटाकडे सहिष्णुतेनें पाहिलें. त्यांचें समाजवादी

पक्षांतून उच्चाटन केलें नाहीं. जर्मनींत मात्र या प्रश्नावर समाजवादी चळवळ कायमची दुभंगली. १९१७ मध्यें युद्धविरोधी जहाल गटानें यू. एस्. पी. ची (स्वतंत्र समाजवादी लोकशाही पक्षाची) स्थापना केली. यू. एस्. पी.मध्यें सोशल डेमोक्रॅटिक पक्षांतील कित्येक पुढारी व पक्षाच्या अनेक शाखा सामील झाल्या. मात्र ही समाजवादी पक्षांतील दुफळी त्यांनीं ट्रेड युनियन एकजुटीच्या आड येऊं दिली नाहीं. यू. एस्. पी. क्रान्तीसाठीं सोशल डेमोक्रॅटिक पार्टीतून फुटली नव्हती तर लोकशाहीसाठीं व शान्ततेसाठीं ती प्रयत्न करणार होती. पण सुरवातीला यू. एस्. पी. मध्यें क्रान्ति घडवून आणण्याची उमेद बाळगणारी जहाल समाजवादी मंडळीहि सामील झाली. प्रत्येक देशांतील या लहानमोठ्या युद्धविरोधी समाजवादी चळवळींची व संघटनांचो एक आंतरराष्ट्रीय आघाडी उभारण्याचे जे प्रयत्न युद्धकाळांत झाले त्यांचा उल्लेख येथें करणें जरूर आहे.

इटॅलियन समाजवाद्यांच्या प्रेरणेनें व स्विस समाजवाद्यांच्या सहकार्यानें बर्नजवळील झिमरवाल्ड नांवाच्या खेड्यांत युद्धविरोधी समाजवाद्यांची एक आंतरराष्ट्रीय परिषद १ सप्टेंबर १९१५ मध्यें बोलावण्यांत आली. या परिषदेस रशियन पक्षांतर्फे लेनीन, ट्रॉट्स्की, मारटाव्ह, झिनॉव्हिव्ह आदि नऊ प्रतिनिधी हजर होते. जर्मन प्रतिनिधी कार्ल लिबनेश्ट व रोझा हजर राहूं शकले नाहींत, पण हॉपमन, अर्न्स्ट मेयर, बर्था थालमेयर हजर होते. पोलिश पक्षातर्फे रॅडेक, वॉर्स्की व लॅपिन्स्कि हे हजर होते. रशिया, जर्मनी व पोलंडप्रमाणेंच इटली, हॉलंड, रुमानिया, बल्गेरिया, स्वित्झर्लंड व स्कॅन्डिनेव्हिया या देशांचे प्रतिनिधी हजर होते. पासपोर्ट न मिळाल्यामुळें इंग्लडमधील स्वतंत्र मजूर पक्षाचे प्रतिनिधी परिषदेस हजर राहूं शकले नाहींत. बहुतेक देशांचे प्रतिनिधी आपापल्या समाजवादी पक्षांतील अल्पगटाचे प्रतिनिधी होते. युद्धविरोध, त्वरित शान्तता प्रस्थापित करण्यासाठीं कीं क्रान्तिद्वारां सत्ता हस्तगत करण्यासाठीं हा प्रश्न धसास लागला तेव्हां या प्रतिनिधींतील बहुमतानें शान्ततेसाठीं युद्धविरोध असाच कौल दिला. परिषदेनें एक स्थायी कमिटी स्थापन करुन युद्धविरोधी जाहीरनामा प्रसिद्ध केला. युद्धपूर्व काळांत रशियांतील सर्वच समाजवादी कट्टे युद्धविरोधक होते.

पण युद्धविरोधाच्या स्वरूपाबद्दल त्यांच्यांत मतभेद झाले. मारटाव्ह व ट्रॉट्स्की 'शान्ततेसाठीं शान्तता' वा कोणत्याहि परिस्थितींत शान्तता या घोषणेचे पुरस्कर्ते होते तर त्यांना विरोध करणाऱ्या लेनीननें 'साम्राज्यशाही युद्धाचें गृहयुद्धांत रूपान्तर' केलें पाहिजे अशी भूमिका मांडली. प्रत्येक राष्ट्रांतील राज्यकर्त्या वर्गानें आपल्या राष्ट्रास नवे भौगोलिक प्रदेश जोडून घेण्यासाठीं युद्ध आरंभिलें आहे, तेव्हां युद्धांत ताबडतोब संधि घडवून आणा ही समाजवाद्यांची मागणी निरर्थक ठरेल अशी लेनीनची विचारसरणी होती. युद्धाचें रूपान्तर क्रान्तींत करण्याच्या दृष्टीनें तो युद्धाकडे पाहात असल्यामुळें युद्ध लवकर थांबतें कीं उशिरा याचा विचार लेनीन करीत नव्हता. म्हणूनच त्वरित शान्ततेची आशा धरणाऱ्या, अगर त्यासाठीं प्रयत्न करा म्हणणाऱ्या शान्ततावाद्यांन्चें युद्धबाज समाजवाद्यांइतकेंच राजकीय दिवाळें वाजलें आहे अशी प्रखर टीका त्यानें केली. रशियन पक्षाबाहेरील युद्धविरोधी आघाडींतील काउटस्की, बर्न्स्टीईन, मॅक्डोनॉल्ड आदि नेतेंहि त्वरित शांतता प्रस्थापित करण्यासाठींच युद्धविरोध करीत होते. युरोपीय जनताहि शांतता प्रस्थापित होण्यासाठीं भुकेलेली होती, क्रान्ति करण्यासाठीं नव्हे. म्हणूनच युद्धविरोधकांनाहि शान्ततेचीच घोषणा करावी लागली.

रशियन क्रान्ति यशस्वी होईपर्यंत लेनीनच्या 'पराभवजन्य क्रान्तिवादास' फारच थोडे अनुयायी मिळाले. स्वीडन व नॉर्वेमधील क्रान्तिकारी समाजवाद्यांनीं त्याच्या तात्त्विक भूमिकेस पाठिंबा दिला खरा पण तो केवळ शाब्दिकच राहाणार होता. कारण हीं दोन्ही राष्ट्रें युद्धांत न पडल्यामुळें स्वतःच्या राष्ट्राचा पराभव इच्छिण्याची व त्यांतून क्रान्तीची संघटना उभारण्याची पाळी त्यांचेवर कधींच येणार नव्हती. या व्यतिरिक्त रॅडेकचा छोटा पोलीश समाजवाद्यांचा गट व जहाल लॅटव्हीयन समाजवादी हेच फक्त लेनीनचे पुरस्कर्ते होते. १९१६ सालीं बर्नजवळील केंथॉल नांवाच्या दुसऱ्या गांवांत युद्धविरोधी आंतरराष्ट्रीयवाद्यांची दुसरी परिषद झाली. परिषदेस एकूण चाळीस प्रतिनिधी हजर होते. या परिषदेंतहि झिमरवॉल्डप्रमाणें लेनीनच्या युद्धविरोधी भूमिकेचा

पराभव झाला. बहुमतानें ‘ न जेते न जित ’ या तत्त्वानुसार तात्काळ शान्तता तह घडवून आणण्यास दोन्ही युद्धगटांस आवाहन केलें. १९१७ सप्टेंबरमध्यें स्टॉकहोम येथें युद्धविरोधी आंतरराष्ट्रीयवाद्यांच्या परिषदेचें तिसरें अधिवेशन बोलावलें गेलें होतें. बरेच प्रतिनिधी स्टॉकहोमला पोहोंचले होते; पण अधिकृत अधिवेशन झालें नाहीं. जमलेल्या प्रतिनिधींत शान्ततेच्या प्रश्नावर मतभेद असल्याचें पुनः एकवार दृष्टोत्पत्तीस आलें होतें. यानंतर ही आघाडी थंडावली.

दुसऱ्या आंतरराष्ट्रसभेच्या ब्यूरोचे सेक्रेटरी कॅमिल ह्यूसमन्स यांनींहि युद्धकाळांत दोस्त राष्ट्रांतील आंतरराष्ट्रसभेच्या शाखांच्या परिषदा घेण्याचा एकाहून अधिक वेळां प्रयत्न केला. पण सर्व शाखांशीं प्रत्यक्ष संबंध जोडण्यांत त्यांना फारसें यश आलें नाहीं व हे मेळावेहि कोणतीच भरीव कामगिरी करूं शकले नाहींत.

स्वित्झर्लंडमध्यें १९१५ च्या शेवटीं लेनीन निर्वासित अवस्थेंत वास्तव्य करीत होता. त्यावेळीं लिहिलेल्या एका लेखांत त्यानें लिहिलें होतें कीं बोल्शेव्हिक पक्षानें युद्धकाळांत सत्ता हस्तगत केली तर पक्ष एकाच अटीवर युद्धयमान राष्ट्रांमधील शांततेच्या वाटाघाटीस पाठिंबा देईल. सर्व शोषक जनता व सर्व वसाहती, सर्व गुलाम व सर्व परावलंबी राष्ट्रें, पूर्णांशानें बंधमुक्त करण्याची अट त्यांना मंजूर करावी लागेल. आजच्या परिस्थितींत जर्मनी, इंग्लंड, फ्रान्स यांपैकीं कोणतेंच राष्ट्र ही अट मानण्यास तयार होणार नाहीं. परिणामीं पक्षास युद्धाची तयारी व घोषणा करण्याशिवाय गत्यंतर राहाणार नाहीं. एकीकडे झिमरवाल्ड परिषदेंत सर्व युद्धविरोधी शक्तींना एका आघाडींत सामील करून घेण्याचा प्रयत्न होत होता. तर दुसरीकडे लेनीन स्वतःच्या मनांत स्वतंत्र संघटनेचा कार्यक्रम घोळवीत असावा अशी शंका वर उद्धृत केलेल्या लेनीनच्या उताऱ्यावरून येते. आपला सात कलमी प्रबंध लिहितांना दुसऱ्या आंतरराष्ट्रसभेच्या शब्दांपुढें १८८९ ते १९१४ असें साल लिहून आपल्या दृष्टीनें दुसऱ्या आंतरराष्ट्रीय सभेचें आयुष्य संपलें आहे, ती बरखास्त झाली आहे, हें लेनीननें केव्हांच स्पष्ट केलें होतें. याच काळांत केव्हांतरी लेनीननें रोझाजवळ

तिसरी आंतरराष्ट्रसभा स्थापन करण्याचे विचार बोलून दाखविले. दुसऱ्या आंतरराष्ट्रसभेची इतिश्री झाली आहे या लेनीनच्या मतांशीं रोझा सहमत होती. पण लेनीननें ज्या संघटनात्मक दृष्टिकोणांतून बोल्शेव्हिक समाजवादी गटाची उभारणी केली होती त्या दृष्टिकोणाबाबत लेनीनशीं रोझाचे तीव्र मतभेद असल्यामुळें, जागतिक क्रान्तीचें युद्धमंडळ बनण्याची ईर्षा धरणाऱ्या व संघटनेची सर्व सूत्रें केंद्रित करणाऱ्या लेनीनप्रणीत तिसऱ्या आंतरराष्ट्रसभेबद्दल रोझाला आकर्षण नव्हतें व म्हणूनच लेनीनची सूचना तिनें धुडकावून लावली. तिसरी आंतरराष्ट्रसभा स्थापण्यास तिचा तत्त्वतः विरोध नव्हता; पण युद्धाचा पुरस्कार करणारें समाजवादी नेतृत्व बहुसंख्य कामगार वर्गानें झुगारून दिल्यावर निरनिराळ्या देशांतील जागृत कामगारवर्गाच्या या शक्तीच तिसऱ्या आंतरराष्ट्रसभेचें अधिष्ठान बनाव्या असा आग्रह तिनें धरला. परिणामीं पहिल्या महायुद्धाच्या काळांत स्थायी व व्यापक स्वरूपाची समाजवाद्यांची नवी आंतरराष्ट्रीय संघटना जन्मास आली नाहीं. पण १९१७ च्या नोव्हेंबरमध्यें लेनीनच्या नेतृत्वाखालीं रशियांत यशस्वी राज्यक्रान्ती झाल्यावर आंतरराष्ट्रीय समाजवादी चळवळींत लेनीनला विशेष प्रतिष्ठा प्राप्त झाली व या विजयी क्रान्तिकारी नेत्यानें रोझाचा विरोध पत्करुनहि नव्या आंतरराष्ट्रसभेची मुहूर्तमेढ रोवली.



: १२ :

# रशियन समाजवाद : बोल्शेव्हिक व मेन्शेव्हिक

**युरोप** व आशिया या दोन्ही खंडांत हातपाय पसरलेलें रशिया हें राष्ट्र, विपुल भौगोलिक संपत्ति व अफाट लोकसंख्या या दोन्ही दृष्टीनें, एकोणिसाव्या शतकांत प्रथम श्रेणीचें सुसंपन्न राष्ट्र होतें. शेती हा राष्ट्राचा प्रमुख उद्योग होता व समाईक शेती हें तिचें वैशिष्ट्य होतें. झारची अनियंत्रित राजसत्ता प्रजेवर होती व तिला चर्चचा आशीर्वाद व पाठिंबा होता. अमीर उमराव व जमीनदार वर्ग राजसत्तेचे प्रमुख आधारस्तंभ होते. युरोपच्या ज्या ज्या राजसत्तांनीं या अफाट भूप्रदेशाकडे वक्रदृष्टि वळवून रशियावर स्वारी केली त्या सर्वांना खोल पाण्यांत येऊं देऊन नंतर त्यांचा फडशा पाडण्यांत आला. युरोपच्या दिशेनें झालेल्या प्रत्येक आक्रमणाबरोबर रशियन जनतेची राष्ट्रभावना अधिकाधिक प्रज्वलित झाली. पण आधुनिक युरोपीय संस्कृतीची लाट मात्र राज्यकर्त्यांना परतवितां आली नाहीं. तेव्हां दूरदृष्टि असलेल्या राज्यकर्त्यांनीं ती पचवून स्वतःची शक्ति वाढविली. रशियांतील उद्योगधंद्यांची वाढ स्वराष्ट्राचें लष्करी सामर्थ्य वाढविण्याच्या प्रेरणेंतून प्रथम झाली आहे.

कापड गिरण्यांनीं लक्षावधि खड्या सैन्यास खाकी कपडा पुरविला व लोखंड पोलादाच्या कारखान्यांनीं शस्त्रसंभार वाढविला. सरकारी मालकीच्या समाईक शेतजमिनीवर १८१० ते २५ च्या दरम्यान हजारों सैनिक स्वतः राबत होते; धान्य उत्पादन करीत होते.

दुसऱ्या अलेक्झांडरच्या कारकीर्दींत (१८५५-७१) वेठीच्या श्रमांतून शेतकऱ्यांची मुक्तता होऊन त्यांना प्रथमच व्यवसायस्वातंत्र्य लाभलें. जमीनदार-वर्गानेंच नवीन कारखाने काढण्यांत पुढाकार घेतला होता. भूदासापेक्षां मजुराचे श्रम अधिक उत्पादक ठरतात हें ते अनुभवानें शिकले होते व झारनें जाहीर केलेल्या या सुधारणांमागें त्यांचीच प्रेरणा होती. पण युरोपमधील इतर देशांप्रमाणें रशियांतील समाजव्यवस्था यानंतर क्रमाक्रमानें बदलत गेली नाहीं. रशियांतील शहरें स्वतंत्र कारागिरांचीं उत्पादन केन्द्रें न बनतां देवाणघेवाणीच्या बाजारपेठाच राहिल्या होत्या. उद्योधंद्यांची वाढ प्रथम राज्यसत्तेच्या प्रेरणेनें व नंतर परकीय भांडवदारांनीं गुंतविलेल्या प्रचंड भांडवलांतून झाली होती. शेतीउत्पादन प्रामुख्यानें पुरातन समाईक पद्धतींनेंच होत होतें. स्वतंत्र जमीन मालक शेतकरीवर्ग मोठ्या संख्येनें निर्माण झाला नव्हता भांडवलशाही उत्पादन स्पर्धेंत स्वतःचीं छोटीं उत्पादन साधनें गमावून कामगारवर्गांत फार मोठ्या प्रमाणावर सामील होणारा स्वतंत्र व्यवसायी वर्गहि रशियांत नव्हता. एकोणिसाव्या शतकाचे अखेरीस पश्चिम रशियांतील मूठभर औद्योगिक शहरांत लक्षावधि कामगार मजुरी करूं लागले हें खरें पण त्यांचे खेड्यांशीं प्रत्यक्ष व जिव्हाळ्याचे संबंध होते. परिस्थितीच्या दडपणानें उद्योगधंद्यांत झालेली वाढ संतत नव्हती व रशियाच्या अफाट भूप्रदेशांतील कृषि समाजव्यवस्थेंत कोणताच गुणात्मक फरक घडून आला नव्हता.

अनियंत्रित झारशाहीच्या अंमलाखालीं युरोपप्रमाणें लोकशाही चळवळींची वाढहि रशियांत झाली नाहीं. परकीय भांडवलदार रशियन राज्यव्यवस्थेंत सुधारणा घडवून आणण्यास विशेष उत्सुक नव्हते व औद्योगिक क्रान्तींतून युरोपांत वाढलेली समाजवादी लोकशाहीची चळवळ रशियांत मूळ धरील या

भीतीनें देशी भांडवलदार वर्गानेंहि धास्ती घेतली होती. झारची अनियंत्रित सत्ता मर्यादित करून राजसत्तेचा ताबा घेणें भांडवलदार वर्गास आवडलें असतें व म्हणून एका विशिष्ट मर्यादेपर्यंत लोकशाही हक्कांसाठीं झगडण्यास तो उत्सुक होता, पण स्वातंत्र्येच्छु जनतेचें नेतृत्व करण्याची धमक त्या वर्गामध्यें नव्हती; नव्हे अशी चळवळ अखेर आपली सत्ताहि नष्ट करील अशी साधार भीति या वर्गास होती. म्हणूनच कामगार-वर्गानें संपाचा उठाव करतांच तो झारशाहीच्या बाजूनें उभा राही. रशियांतील भांडवलदार वर्गाचें हें स्वरूपच रशियन क्रान्तीच्या दिशा ठरविणार होतें.

दुसऱ्या अलेक्झांडरच्या कारकीर्दीतील सुधारणावादी कालखंडांत रशियांतील हजारों तरुण युरोपला उच्च शिक्षणासाठीं, यंत्रविद्या व नवें उत्पादन-तंत्र शिकण्यासाठीं गेले. पण या शिक्षणाबरोबरच आधुनिक राजकीय विचारांचा पगडा त्यांचे मनावर बसला. कित्येकांना परागंदा रशियन क्रान्तिकारकांचा सहवास लाभला. झारच्या सल्लागारांनीं या नव्या धोक्याची जाणीव राजास करून दिली तेव्हां १८७४ मध्यें फतवा काढून त्यांनीं सर्व रशियन तरुणांना परत बोलाविलें. हजारों विद्यार्थी परतले खरे पण त्यांनीं सरळ खेड्यांचा रस्ता सुधारला. आपला क्रान्तिकारी ध्येयवाद पसरविण्यासाठीं दूरदूरच्या खेड्यांत पसरलेला लक्षावधि शेतकऱ्यांचा समाजच त्यांच्या डोळ्यासमोर होता. शेतकरीवर्गापर्यंत झारशाही विरोधी क्रान्तीचें लोण घेऊन पोहोंचविण्याचें श्रेय या नारोड्निक (जनतावादी) चळवळीस द्यावयास हवें. ही चळवळ नेस्तनाबूद करण्यासाठीं झारनें जेव्हां भीषण दडपशाही आरंभिली तेव्हां या चळवळींतील कांहीं तरुणांनीं दहशतवादाचा मार्ग स्वीकारला. कित्येक पोलीस अधिकारी, सल्लागार व राजघराण्यांतील मंडळी त्यांच्या गोळीची निशाण बनली व १८८३ मध्यें खुद्द झार ठार मारला गेला.

नारोड्निक चळवळींतच रशियन मार्क्सवाद्यांचा गुरु प्लेखॅनोव्ह वाढला होता. १८७९ मध्यें जेव्हां ही चळवळ वैफल्यांतून दहशतवादाच्या मार्गास लागली तेव्हां तो चळवळींतून बाहेर पडला व नंतरच्या दडपशाहीच्या काळांत युरोपमध्यें पळून आल्यावर ॲक्झेलरॉड, ड्यूश व व्हेरा झासूलिच या आपल्या

रशियन मित्रांसह त्यानें १८८३ मध्यें 'कामगार दास्यविमोचन सोसायटी' स्थापन केली. शेतकरी वर्ग हीच रशियांतील खरी क्रान्तिकारी शक्ति आहे अशी नारोड्निक चळवळीची श्रद्धा होती. प्लेखॅनोव्हनें या श्रद्धेवर प्रथम हल्ला चढविला. रशियांत भांडवलशाही उत्पादन-व्यवस्था आपले पाय रोवीत आहे व या उत्पादन-व्यवस्थेंतून जन्म घेणारा कामगारवर्गच रशियन क्रान्तीची प्रेरक शक्ति बनणार आहे, रशियांतील असंतुष्ट शेतकरी वर्ग नव्हे, हा विचार त्यानें पुढें मांडला. मार्क्सप्रणीत ऐतिहासिक क्रान्तिक्रम कालान्तरानें रशियांतहि पुरा होईल हाच निष्कर्ष त्यांतून निघणार होता. १८८३ व १८८४ मध्यें "समाजवाद व राजकीय लढा" व "आमचे मतभेद" हीं दोन पुस्तकें लिहून प्लेखॅनोव्हनें नारोड्निक चळवळींत जणुं वैचारिक आन्दोलन निर्माण केलें. रशियांतील शेतकरीवर्ग क्रान्तिनिष्ठ बनण्याची शक्यता नाहीं; आजची समाइक शेती-पद्धति, शेतकरी कम्यून्स, उद्यां भांडवलशाही उत्पादनपद्धतीचाच भाग बनतील; क्रान्तीचा शेवट कामगारवर्गानें सत्ता हस्तगत करण्यांतच होणार आहे; पण भांडवलशाही लोकशाहीच्या कालखंडांत ही क्रान्ति घडून येणार असल्यामुळें क्रान्ति चळवळीचें प्रथम लक्ष्य ही भांडवलशाही लोकशाही क्रान्ति घडवून आणणें हेंच असलें पाहिजे अशी थोडक्यांत प्लेखॅनोव्हची विचारसरणी होती. दुसऱ्या आंतरराष्ट्रसभेच्या पहिल्या अधिवेशनांत याच श्रद्धेचा त्यानें आंतरराष्ट्रीय व्यासपीठावरून पुकार केला. तो म्हणाला, "एक तर कामगार क्रान्तीच्या स्वरूपांत रशियन राज्यक्रांति विजयी होईल अन्यथा ती कधींच विजयी होणार नाहीं" *

शेतकरीवर्ग हीच रशियांतील खरी क्रान्तिकारी शक्ति आहे असें म्हणणारे नारोडनिकी प्लेखॅनोव्हच्या क्रान्तिमीमांसेवर टीका करतांना असें प्रतिपादीत कीं भांडवलशाहीच्या वाढीच्या काळांत राष्ट्रीय लोकशाही क्रान्तीनें ऐतिहासिक कामगिरी बजावली असली तरी आज त्या अवस्थेंतून रशियन समाजास मुद्दाम

---

* स्टडीज इन् रेव्होल्यूशन : पान १०७

जाण्याची जरूरी नाहीं. रशियन राज्यक्रान्तीचें स्वरूप नव्या परिस्थितींत शेतकरी क्रान्तीचेंच राहाणार आहे. आजचें शेतीचें समाईक उत्पादन, भांडवलशाही उत्पादन व्यवस्थेनुसार व्यक्तिगत बनून, पुनः समाजवादी क्रान्तीनंतर सामुदायिक बनविण्याचा द्राविडी प्राणायाम अर्थशून्य आहे. प्लेखॅनोव्हची सहकारी व्हेरा झासूलिच हिनें हा प्रश्न अधिकृतरीत्या निकालांत काढण्यासाठीं शेवटीं मार्क्स व एंगल्सकडेच धांव घेतली. व्हेराच्या पत्राला लिहिलेल्या उत्तरांत मार्क्स म्हणतो, "...भांडवल ग्रंथांत या प्रश्नासंबंधीं मी केलेली मीमांसा रशियांतील 'मीर' ची (समाईक शेती–उत्पादन करणारें शेती कम्यून) क्रियाशक्ति व जोम अजमावण्यास ना पूरक ठरते ना विरोधी; पण या प्रश्नाचा विशेष अभ्यास केल्यानंतर माझी अशी खात्री पटली आहे कीं कम्यून्सवर सर्व बाजूंनीं होणारें आक्रमण जर लवकर थांबेल व त्यांची स्वच्छंद वाढ होऊं शकेल तर रशियन समाजाच्या पुनर्संघटनेचा तीं आधार बनूं शकतील"* व्हेरानें १८८२ मध्यें कम्युनिस्ट जाहीरनाम्याचें जें नवें रशियन भाषान्तर केलें त्याच्या प्रस्तावनेंत एंगल्स लिहितो, "रशियांतील सामुदायिक शेती–उत्पादन करणारी आजची भ्रष्ट कम्यून व्यवस्था श्रेष्ठ कम्युनिस्ट समाजव्यवस्थेचें एकदम अंग बनूं शकेल कीं यूरोपप्रमाणेंच हीं कम्यून्स ऱ्हास पावणें अटळ आहे हा प्रश्न आपल्यापुढें आहे....जर रशियन राज्यक्रान्ति युरोपमधील कामगार क्रान्तीची नांदी ठरली व त्या क्रान्त्या परस्पर पूरक बनल्या तर आजची कम्यून व्यवस्थाहि कम्युनिस्ट समाज संघटनेस प्रारंभ करूं शकेल हेंच माझें उत्तर आहे." ‡ राज्यक्रान्तीचें स्वरूप, क्रान्तींतील शेतकरी वर्गाचें स्थान व क्रान्त्युत्तर शेती उत्पादन व्यवस्थेचें स्वरूप हे प्रश्न अर्थातच या चर्चेंतून कायमचे निकालांत निघणार नव्हते व त्या वादांनीं नंतरच्या काळांतहि भिन्न भिन्न स्वरूपांत पुनः डोकें वर काढलें.

या काळांत रशियन भांडवलशाहीची जोरानें वाढ होत होती. कामगार संप करूं लागले होते व प्लेखॅनोव्हच्या विचारसरणीस कार्यक्षेत्र लाभलें होतें.

---

* पाथ्स इन युटोपिया : मार्टीन ब्यूबर : पान ९३ ‡ पाथ्स इन युटोपिया : पान ९४

१८९४ मध्यें लेनीननें समाजवादी चळवळींत पदार्पण केलें तेव्हांची ही पार्श्व-भूमि होती. पेट्रोग्राड हें कामगार चळवळीचें मुख्य केन्द्र बनलें होतें व लेनीन, मारटाव्ह आदि तरुण मार्क्सवाद्यांनीं याच केंद्रांत १८९५ मध्यें 'कामगार-वर्गाच्या स्वातंत्र्यार्थ झटणारी संस्था' स्थापन केली. १८९६ च्या हजारों गिरणी कामगारांच्या संपांनीं या संस्थेची शक्ति वाढली व मार्क्सवादी गटानें कामगार चळवळींत आपले पाय रोंवले. लेनीन आदि कामगार नेत्यांना लवकरच सैबेरियांत हद्दपार करण्यांत आलें खरें पण पेट्रोग्राड, मॉस्को, कीव्ह आदि शहरांत स्थापन झालेले स्थानिक सोशल डेमोक्रॅटिक गट नष्ट होऊं शकले नाहींत. १३ मार्च १८९८ ला मीन्स्क येथें जमलेल्या स्थानिक गटांच्या नऊ प्रतिनिधींनीं 'रशियन सोशल डेमोक्रॅटिक वर्कर्स पार्टीची स्थापना केली. रशियन राजसत्ताहि या काळांत नारोड्निक चळवळीला व त्यांच्या दहशतवादी प्रयोगांना अधिक भीत होती; तेव्हां मीन्स्क बैठकींतील प्रतिनिधींवर जरी दडपशाहीची कुऱ्हाड पडली तरी नारोड्निकांवर वैचारिक हल्ला चढविणाऱ्या मार्क्सवादी वाङ्मयास व चर्चामंडळांस कांहीं काल स्वातंत्र्य लाभलें. पोट्रोसोव्ह या प्लेखॅनोव्हच्या अनुयायानें या कालांत प्लेखॅनोव्हचे ग्रंथ रशियन भाषेंत छापून घेतले व त्यांचा जास्तींत जास्त प्रचार केला. पुढें लेनीन म्हणाला 'रशियन मार्क्सवाद्यांची एक पिढी प्लेखॅनोव्हच्या या पुस्तकांनीं वाढवली.'

सोशल डेमोक्रॅटिक पक्षाबरोबरच विसाव्या शतकाच्या प्रारंभीं सोशल रेव्होल्यूशनरी पार्टी उदयास आली. पेट्रोग्राडमधील कामगार संपांतून सोशल डेमोक्रॅटिक चळवळ फोफावली होती तर १९०१ व १९०२ मध्यें रशियांत पडलेल्या भीषण दुष्काळांतून व तद्जन्य शेतकरी बंडांतून सोशल रेव्होल्यूशनरी पार्टी वाढूं लागली. पार्टीनें नारोड्निकी चळवळ पुनरुज्जीवित केली होती व त्या चळवळीस आतां ती तात्त्विक अधिष्ठान पुरविणार होती. त्यांची तात्त्विक भूमिका सारांशानें ही होतीः रशियांत शेतकरीवर्गच बहुसंख्य आहे. त्यांच्या बलावरच क्रान्ति होऊं शकेल. विसाव्या शतकांत भांडवलशाही ही प्रतिगामी शक्ति बनली आहे. रशियाच्या औद्योगीकरणास भांडवलदारवर्गाची व रशियन शासन

संस्थेची धुरा वाहाण्यास भांडवलशाही लोकशाही सरकारची जरूरी नाहीं. जर हा इतिहासक्रम आवश्यक मानला तर जमिनीचें व्यक्तिगत वांटप होऊं देणें व भांडवलदारवर्गास सत्ताधिष्ठ बनूं देणें क्रमप्राप्त बनेल. उलट झारशाहीचा अन्त केल्यावर आजचीं शेतकरी कम्यून्स जमिनीचीं मालक बनतील व शेतीच्या सामुदायिक उत्पादनास तात्काल प्रारंभ करतां येईल. शेतकरीवर्गाची सामूहिक जीवनप्रेरणा नवसमाजरचनेचा आधार बनेल. तेव्हां राष्ट्रीय क्रान्तींतून कामगार-क्रान्तीकडे या घोषणेऐवजीं शेतकरी क्रान्तींतून समाजक्रान्तीकडे हें आपलें घोषवाक्य बनलें पाहिजे.

मार्क्सवादी विचार व वाङ्मय यांच्या प्रसारास जी फुरसत लाभली त्या काळांत प्लेखॅनोव्हहून भिन्न अशा एका मार्क्सवादी विचारानें वर डोकें काढलें. 'इकॉनॉमिस्ट्स' या नांवानें या विचारवाद्यांचा गट ओळखला जातो. त्यांच्या विचारसरणीचा सारांश हा होताः कामगार चळवळीची अप्रतिहत वाढ होण्यास तिनें आपल्या संघर्षाचें क्षेत्र मर्यादित करून घेतलें पाहिजे. युरोपमध्यें भांडवल-दारांनींच स्वतःसाठीं व कामगारांसाठीं राजकीय हक्क मिळविल्यामुळें कामगार-वर्गास राजकीय संघर्षांत प्रत्यक्ष भाग घेणें व आपले आर्थिक प्रश्न सोडवून घेणें शक्य झालें. पण रशियांत अनियंत्रित झारशाहीविरुद्ध स्वसामर्थ्यावर लढा देण्याइतका कामगारवर्ग शक्तिमान नाहीं. तेव्हां त्यानें ट्रेड युनियन संघटना उभारून, आपले आर्थिक लढे लढूनच कामगारांत वर्गजागृति करावी व राजकीय हक्कांसाठीं लढणाऱ्या लोकशाहीवादी गटास पाठिंबा द्यावा. सोशल डेमोक्रॅट पक्षानें कामगारवर्गास हीच शिकवण दिली पाहिजे.

'व्हॉट इज टु बी डन?' या आपल्या पुस्तिकेंत लेनीननें या इकॉनॉमिस्टांवर हल्ला चढविला. "सोशल डेमोक्रॅटनें केवळ ट्रेड युनियन सेक्रेटरी बनण्याचें ध्येय डोळ्यांपुढें ठेवतां नये, तर तो जनतेचा प्रवक्ता बनला पाहिजे...कामगारवर्गाचें केवळ ट्रेड युनियनचें धोरण कामगारवर्गाचें भांडवलशाही धोरण ठरेल." * श्रमिक वर्गाची वर्गभावना आर्थिक लढ्यां-

* स्टडीज इन् रेव्होल्यूशन : पान १२७

बरोबर राजकीय लढे देऊनच खऱ्या अर्थानें जागृत होईल हेंच लेनीनचें इकॉनॉमिस्टांना खणखणीत उत्तर होतें. लेनीनचा हा दृष्टिकोणच झारविरोधी असंतोषास क्रान्तिकारी लोकशाही लढ्याचें अधिष्ठान पुरविणार होता. कामगार-वर्गाची चळवळ समाजांतील एकएका अल्पसंख्य वर्गाची वर्गीय चळवळ बनणार नाहीं याची काळजी तो घेणार होता. अर्थात् त्या क्रान्तिकारी लोकशाही लढ्याचें नेतृत्व भांडवलदार व मध्यमवर्ग रशियांत करूं शकणार नव्हता याची त्यास पुरेपूर जाणीव होती. रशियन सोशल डेमोक्रॅटिक पक्ष कामगार वर्गाबरोबरच गरीब शेतकरी वर्गास घेऊन हा क्रान्तिकारी राजकीय लढा लढणार होता. झारशाही उध्वस्त करून 'कामगार व शेतकरी वर्गाची लोकशाही हुकुमशाही' स्थापन करणार होता. ज्यावेळीं स्वतःस सोशल डेमोक्रॅट म्हणवून घेण्यांत लेनीन अभिमान बाळगीत होता त्यावेळचे त्याचे हे विचार आहेत.

हद्दपारीनंतर लेनीन, मारटाव्ह व पोट्रोसाव्ह युरोपांत आले होते व या तरुण त्रिमूर्तीनें प्लेखॅनोव्ह, अक्झेलरॉड व व्हेरा यांच्या साहाय्यानें रशियन सोशल डेमोक्रॅटिक पक्षाच्या उभारणीस हात घातला. 'इस्क्रा' या मुखपत्राभोंवतीं पक्षसंघटनेचें जाळें गुंफलें जाऊं लागलें. ३० जुलै १९०३ रोजीं ब्रूसेल्स येथें रशियन सोशल डेमोक्रॅट्सची दुसरी कॉंग्रेस भरली. ब्रूसेल्स कॉंग्रेस चालू असतांच तिच्यावर छापा पडला तेव्हां तिचें पुढील कामकाज ११ ते २३ ऑगस्टपर्यंत लंडन येथें झालें. ही कॉंग्रेस रशियांतील समाजवाद्यांचा संयुक्त, घटनाबद्ध व ठोस कार्यक्रम असलेला पक्ष उभारण्याच्या उद्देशानें भरली होती. पण याच कॉंग्रेसमध्यें ऐतिहासिक दुफळी माजली. पक्षसंघटनेचें स्वरूप काय असावें हाच मतभेदाचा मुद्दा होता. लेनीनचा संघटनात्मक दृष्टिकोण सारांशानें हा होता: कुठलीहि चळवळ स्थिर नेतृत्वाखेरीज टिकणार नाहीं व तिच्यांत सातत्य राहणार नाहीं. चळवळींत जितकी जनता अधिक तितकी पक्षसंघटना व तिचें नेतृत्व अधिक स्थायी असावयास हवें. धंदा म्हणून क्रान्तिकार्य हातीं घेतलेल्या पक्ष सभासदांचा भरणाच अशा संघटनेंत विशेषेंकरून हवा. झारसारख्या अनियंत्रित राजसत्तेशीं सामना देतांना पक्षसंघटनेचे सभासद जितके कमी

तितकी त्यांना अटक होण्याची व त्यामुळें संघटना विस्कळित होण्याची भीति कमी व उलट पक्षास पाठिंबा देणाऱ्यांचें व त्यांचें कार्य चालविणाऱ्यांचें वर्तुळ मोठें. कामगारांना अशा पक्षांत प्रथम वाव आहे. पण प्रत्येकाच्या विशेष गुणाची कसोटी लागल्यावर, प्रत्येकाची व्यक्तिगत निवड करूनच. ' मला अशा धंदेवाईक क्रान्तिकारकाची पक्ष संघटना द्या ' म्हणजे मी तुम्हांस यश मिळवून देतों असें त्याचें समाजवाद्यांना आव्हान होतें.

युरोपीय कामगार चळवळींतहि युनियनचे पगारी पूर्ण वेळ सेवक असत. पण त्यांना नेमणें व काढणें सर्वसामान्य सभासदांच्या हातीं राही. समाजवादी पक्ष संघटनाहि संपूर्ण लोकशाही मार्गानें उभारलेल्या व लोकशाहीच्या तत्त्वानुसार चालणाऱ्या असत. लेनीनला निवडक धंदेवाईक क्रान्तिकारकांचा संकुचित पक्ष हवा होता. पक्ष सभासदांवर व स्थानिक व दुय्यम पक्ष समित्यांवर संपूर्ण केन्द्रीय हुकमत त्यास प्रस्थापित करावयाची होती. मारटाव्हनें लेनीनला विरोध केला. पक्षाचा कार्यक्रम व मार्गदर्शन स्वीकारणाऱ्या प्रत्येक व्यक्तीस पक्ष सभासद बनण्याचा अधिकार असला पाहिजे. पक्षाच्या हुकुमाची अम्मलबजावणी एवढीच अपेक्षा कार्यकर्त्यांकडून करतां नये तर त्यांच्या कार्याची छाप पक्ष संघटनेवर पडली पाहिजे व म्हणून प्रत्येक कार्यकर्त्यास पक्ष संघटनेचा दरवाजा खुला असला पाहिजे अशी मागणी त्यानें केली. ॲक्झेलरॉड व ट्रॉट्स्कीनें मारटाव्हला पाठिंबा दिला तर प्लेखॅनोव्हच्या पाठिंब्यावर लेनीननें त्यासंबंधींचें घटनेंतील कलम एक मत अधिक मिळवून पास करून घेतलें. पक्षाचें मध्यवर्ती मुखपत्र व मध्यवर्ती समिती यांचे परस्परसंबंध काय असावे व कोणी कोणाचें नियंत्रण करावें या घटनेंतील कलमावर चर्चा झाली तेव्हां समितीनें मुखपत्राचें नियंत्रण करावें अशी सूचना ट्रॉट्स्कीनें मांडली. लेनीननें सूचनेस विरोध करतांना समिती रशियांतून आमचें मार्गदर्शन करूं शकणार नाहीं, आमचें केन्द्रच अधिक शाश्वत आहे, तेव्हां मुखपत्रच समितीस मार्गदशन करील अशी भूमिका मांडली. सहांच्या संपादक मंडळाऐवजीं प्लेखॅनोव्ह, लेनीन व मारटाव्ह या तिघांचें संपादक मंडळ असावें असें त्यानें सुचविलें. प्लेखॅनोव्हची अध्यक्ष म्हणून निवड

झाली तेव्हां ४४ पैकीं २२ मतें प्लेखॅनोव्हला पडलीं. दोघांनीं कोऱ्या मतपत्रिका दिल्या होत्या व वीस जणांनीं मतदानावर बहिष्कार टाकला होता. अशा 'प्रचंड' बहुमतांतून लेनीननें स्वतःच्या गटास बोल्शेव्हिक (बहुमताचा गट) व विरोधी गटास मेन्शेव्हिक (अल्पसंख्य गट) असें नामाभिधान दिलें होतें. लेनीनचा बोल्शेव्हिक गट जन्मास आला होता. कॉंग्रेसचें कामकाज बारा दिवस चालून एकचतुर्थांश कामहि पुरें झालें नव्हतें. शेवटीं कॉंग्रेस तहकूब झाली.

पंचवीस वर्षांच्या चळवळीनंतर व अडीच वर्षांच्या पूर्वतयारीनें भरलेली कॉंग्रेस सर्व समाजवाद्यांस एकत्र आणण्याऐवजीं दुभंगली होती. कॉंग्रेस झाल्यानंतर सहा महिन्यांच्या आंतच लेनीनला प्लेखॅनोव्हनें सोडलें व इस्क्रा संपादक मंडळांत तो अल्पमतांत गेला. संपादक मंडळांत अल्पमत झालें तेव्हां मध्यवर्ती समितीनें मुखपत्राचें नियंत्रण केलें पाहिजे असें लेनीन प्रतिपादूं लागला व तिच्यांत अल्पमत झाल्यावर रशियान्तर्गत स्थानिक समित्यांच्या अधिकाराची चर्चा तो करूं लागला. १९०४ साल सुरू झालें तेव्हां बोल्शेव्हिक गटाचा पुढारी लेनीन अल्पसंख्य गटाचा नेता बनला होता. पक्षशिस्त धाब्यावर बसवून 'फॉर्वर्ड' हें मुखपत्र आपल्या अनुयायांसाठीं त्यानें सुरू केलें होतें. या सर्व प्रतिकूल परिस्थितींत आपली भूमिकाच सदैव न्याय्य व क्रांतीला पोषक आहे हा आत्मविश्वासच लेनीनला उपयोगी पडे.

रशियांतील राजकीय परिस्थितिहि १९०४ मध्यें बरीच चिघळली. रूसो–जपान युद्ध पेटलें तेव्हां अंतर्गत असंतोषावर कांहीं काळ पडदा पडला खरा पण पोर्ट आर्थरला जपाननें रशियाचा पराभव केल्यावर परिस्थितीनें पुनः स्फोटक स्वरूप धारण केलें. झारच्या नोकरशाहीनें समाजवादी कामगार चळवळीस शह देण्यासाठीं पोलीस पुरस्कृत कामगार चळवळ उभारण्याचा एक अभिनव प्रयोग केला होता. त्या चळवळींतील कामगारांची बाजू मांडण्यासाठीं फादर गॅपनच्या नेतृत्वाखालीं झारच्या विंटर पॅलेसवर २२ जानेवारीला रविवारच्या पवित्र दिनीं एक मोर्चा निघाला होता. 'देव झारचें रक्षण करो' अशी घोषणा करीत हजारों कामगार राजवाड्याकडे चाल करून

येत आहेत अशी बातमी कळतांच झार राजवाड्यांतून पळाला व लष्करानें झारच्या काकाच्या हुकुमावरून कामगारांवर गोळ्यांचा वर्षाव केला. शेंकडों कामगार ठार झाले व या दिवशीं कामगारांच्या मनांतील झारची निष्ठा छिन्नविछिन्न झाली. फेब्रुवारींत मॉस्कोच्या गव्हर्नरचा खून झाला. शेतकऱ्यांनीं बंडें केलीं. प्रोटेमकिन क्रूझरवर खलाशांनीं बंड केलें. अनेक ठिकाणीं कामगारांनीं संप केले. संपावरील कामगारांच्या मध्यवर्ती समित्यांतून सर्वत्र 'सोव्हिएट्स' स्थापण्याचा स्वयंस्फूर्त प्रयत्न झाला. ऑगस्टमध्यें झारनें ड्यूमाची (रशियन लोकसभा) घोषणा केली. ड्यूमाचें स्वरूप सल्लागार समितीचें राहाणार असल्यामुळें त्याचा सर्वत्र धिक्कार झाला. या निषेधाच्या लाटेंतच कॅडेट (लोकशाहीवाद्यांचा) पक्ष स्थापन झाला. घटनात्मक राजेशाही कीं रिपब्लिक या मुद्यांवर कॅडेट पक्षांत मतभेद सुरू झाले होते. पण झारला ही हालचालहि देशद्रोही वाटत होती.

१९०५ च्या एप्रिलमध्यें बोल्शेव्हिकांची लंडनला व मेन्शेव्हिकांची जिनेव्हाला तिसरी पक्ष कॉंग्रेस भरली. १९०५ च्या बंडांत खुद्द रशियांत मेन्शेव्हिक व बोल्शेव्हिक खांद्यास खांदा लावून लढले होते. पक्षाच्या एकजुटीस अनुकूल वातावरण निर्माण झालें होतें. लंडन कॉंग्रेसमध्यें लेनीननें विरोधकांना सवलत देण्यासाठीं आपल्या केन्द्रीय पक्ष संघटनेच्या कल्पनेंत बदल केला. केन्द्रीय हुकुमशाहीच्या कल्पनेनुसार मध्यवर्ती समिति कोणत्याहि स्थानिक समितीच्या नेतृत्वांत हवा तो बदल करूं शकत होती. पण आतां स्थानिक समितीस निवडणुकीचें तत्त्व लागू करण्यांत येणार होतें. त्यांच्या नेतृत्वांत फेरफार करण्याचा अधिकार मध्यवर्ती समितीस राहाणार नव्हता. मध्यवर्ती समितींत विरोध करण्याचा अधिकार अल्पसंख्य गटास मिळणार होता. एक षष्ठांश स्थानिक समित्यांनीं मागणी केल्यास पार्टीची गुप्त यंत्रणा, अधिकृत वाङ्मयाबरोबर, विरोधी गटाचें वाङ्मय वाटण्यास घटनेनें बांधली जाणार होती. सप्टेंबर अखेर कॉंग्रेस भरविण्यासाठीं मेन्शेव्हिक व बोल्शेव्हिक गटांची एक संयुक्त समिती स्थापन झाली.

ऑक्टोबरच्या सुरवातीस ट्रॉट्स्की रशियास परतला. लेनीन रशियाच्या मार्गावर होता. १९ व २० ऑक्टोबरला रेल्वे कामगारांनीं संप पुकारून सार्वत्रिक राजकीय संपास चालना दिली. ड्यूमाचें स्वरूप सल्लागारांचें होतें म्हणून लोकशाही आघाडीहि नाखुष होती व कामगारांस कोणतेंच प्रतिनिधित्व नसल्यामुळें त्यांच्यांतहि असंतोष वाढला होता. रेल्वे संपानें सर्व कारभाराला खीळ पडली. पेट्रोग्राड कामगारांनीं मध्यवर्ती सोव्हिएट स्थापून ३० ऑक्टोबरला प्रतिसरकारची घोषणा केली व हुकूम सोडले. त्याच दिवशीं झारनें नवा जाहीरनामा प्रसिद्ध केला. उदारमतवादी व्हीट पंतप्रधान बनला. विचार, भाषण व संघटना यांचें स्वातंत्र्य जनतेस मिळालें. शेतकरीवर्गास व्यापक मताधिकार मिळाला व कामगारांस प्रतिनिधित्व मिळालें. नव्या लोकसत्ताक ड्यूमाची घोषणा करण्यांत आली. क्रांतीच्या भीतीनें कॅडेट पक्षानें मागें पाय घेतला व व्हीटशीं बोलणीं सुरू केलीं. पेट्रोग्राड सोव्हिएटनें स्वतःला कर देण्याचा हुकूम सोडला होता. मॉस्कोंत एक लाख कामगार संपावर गेले व त्यांनीं बंड पुकारून २३ दिवस आपलें सरकार चालविलें. डिसेंबर अखेर बंडाचा बीमोड झाला व रेल्वेसंपहि मोडला.

१९०५ ची क्रान्ति अयशस्वी झाली होती. क्रान्तिकारी राजकारणाचा भर ओसरला होता. ड्यूमाच्या निवडणुकींत भाग घ्यावा कीं नाहीं? कॅडेट पक्षाशीं एकजूट करावी कीं नाहीं? भावी क्रान्तीचें स्वरूप काय असावें? शेतकरी वर्गाचें त्यांत स्थान काय? हे व असे अनेक प्रश्न स्टॉकहोम संयुक्त काँग्रेसमध्यें धसास लागणार होते. क्रान्तिकालांत सोशल डेमोक्रॅट्सनीं ड्यूमा निवडणुकीवर बहिष्कार घातला तेव्हां जनतेनें ट्यूडोव्हिकी या शेतकरी पक्षास व कॅडेट पार्टीस मतें दिलीं. ट्रॅन्सकॉकेशियसमधील निवडणुकी अजून व्हावयाच्या होत्या. क्रान्तिकारी प्रयत्न अशक्यच होते. तेव्हां मेन्शेव्हिकांनीं निवडणुका लढविण्याचा ठराव स्टॉकहोम काँग्रेसमध्यें मांडला. बोल्शेव्हिक गटांतील फक्त लेनीननें ठरावास पाठिंबा दिला. तारेनें अर्ज भरण्याचा हुकूम झाला व आश्चर्य हें कीं सर्वच्या सर्व मेन्शेव्हिक उमेदवार निवडून आले. समाजवादी चळवळ

पुढें नेण्याचें एक साधन, पक्ष प्रचारास एक संरक्षित व्यासपीठ, या दृष्टीनें लेनीन ड्यूमाकडे पाहात होता तर मेन्शेव्हिक ड्यूमाच्या अधिकारव्याप्तीसाठीं लोकशाही आघाडी निर्माण करून अशा लोकआघाडीमार्फत राष्ट्रीय क्रान्तीचें कार्य पुरें होऊं शकेल असें मानीत होते. ड्यूमावरील बहिष्कार कायम ठेवला तर प्रतिकारात्मक चळवळीच्या अभावीं पक्षाचा जनतेशीं कोणताच संपर्क राहाणार नाहीं या व्यवहारी भूमिकेवरून लेनीननें बहिष्कारवादी बोल्शेव्हिक गटावर टीका केली.

रशियन राज्यक्रान्तीच्या स्वरूपाविषयीं रशियन सोशल डेमोक्रॅटिक पक्षांत तीव्र मतभेद होते. रशियन राज्यक्रान्तीचें स्वरूप भांडवलशाही-लोकशाही क्रान्तीचेंच राहाणार आहे; या क्रान्तींतून जमीनशाही नष्ट होईल, औद्योगिक उत्पादन-व्यवस्था वेग पकडील, लोकसत्ताक राजवट स्थापन होईल व कामगार वर्गास लाभणाऱ्या राजकीय लोकशाही हक्कांतून व संघटनास्वातंत्र्यामुळें कामगार पक्ष युरोपप्रमाणेंच समाजक्रान्तीची वाट चालूं लागेल अशी भूमिका मेन्शेव्हिकांची होती. म्हणूनच या क्रान्तीच्या पूर्तीसाठीं व्यापक लोकशाही आघाडींत समाजवादी चळवळीनें सामील व्हावें व सत्तान्तर झाल्यावर सत्तेंत भागीदारी न करतां विरोधी पक्ष बनून समाजक्रान्तीचें कार्य कामगारवर्गानें पुढें चालवावें असा मार्ग त्यांनीं सुचविला. भांडवलशाही लोकशाही क्रान्तीचें कार्य पुरें करण्यास रशियन भांडवलदार वर्ग उत्सुक नाहीं. समाजवादी क्रान्तीची भीति बाळगणारा हा भेकड वर्ग अखेर झारशाहीचा समर्थक बनेल. तेव्हां कामगारवर्गास असंतुष्ट शेतकरीवर्गाच्या साहाय्यानें स्वतःच्या नेतृत्वाखालीं ही क्रान्ति करावी लागणार आहे. या सशस्त्र क्रान्तींत यश येऊन एकदां कामगार-वर्गाच्या हातीं सत्ता आली कीं तो खाजगी उत्पादन व्यवस्था चालू ठेऊं देणार नाहीं. सामुदायिक शेतीखेरीज राष्ट्राचें औद्योगीकरण वेगानें होणार नाहीं. या कार्यक्रमास भांडवलदार व जमीन मालक शेतकरीवर्गाकडून विरोध होईल व तो विरोध नष्ट करण्यांतच कामगारवर्ग समाजक्रान्ति घडवून आणील. क्रान्तीचें स्वरूप द्विखंडित नसून अखंड–क्रान्तीचें आहे व तिची लाट समाजक्रान्तीस पक्व

अशा युरोपमध्येंहि पसरल्याशिवाय राहाणार नाहीं व म्हणूनच अखेर ती आंतरराष्ट्रीय क्रान्ति बनेल अशी ट्रॉट्स्कीची भूमिका होती. निर्भेळ कामगार हुकुमशाहीचा तो पुरस्कर्ता होता. भांडवलशाही लोकशाही क्रान्तीचें कार्य पुरें करण्याची जबाबदारी रशियांत कामगारवर्गावरच पडणार आहे असें लेनीनचेंहि मत होते. पण या क्रान्तींत जमिनीसाठीं भुकेलेला शेतकरीवर्ग फार मोठ्या प्रमाणावर सामील होईल अशी लेनीनची अटकळ होती. अशा परिस्थितींत कामगार व शेतकरीवर्गाची हुकुमशाही लोकशाहीच ठरेल व सत्ता हस्तगत करणाऱ्या या वर्गास हातीं आलेली सत्ता सोडण्याचें कारण उरणार नाहीं अशी लेनीनची भूमिका होती. म्हणूवच स्वसामर्थ्यावर जमिनीचा ताबा घेणाऱ्या क्रान्तिपूर्वकालीन शेतकऱ्यांच्या चळवळीस त्यानें पाठिंबा दिला. १९०७ ते ११ या काळांत झारचा पंतप्रधान स्टोलॅपिन यानेंहि मोठमोठ्या जमीनदाऱ्या नष्ट करून हजारों शेतकऱ्यांस छोटे जमीन मालक बनूं देऊन झारशाहीस शेतकरी वर्गाचा पाठिंबा मिळविण्याचा प्रयत्न केला. जमिनीसाठीं भुकेलेल्या शेतकरी-वर्गाचा पाठिंबा झारला मिळतो कीं लेनीनला हें क्रान्तिकालाची घटका केव्हां भरते यावरून ठरणार होतें.

१९०७ च्या पांचव्या लंडन कॉंग्रेसमध्यें बोल्शेव्हिक व मेन्शेव्हिक गटांत तात्पुरतें ऐक्य घडून आलें खरें पण १९१२ च्या सहाव्या प्राग कॉंग्रेसपर्यंत त्यांच्यांत कायमची फूट पडली. पक्षराजकारणांत लेनीनची दृष्टि व वृत्ति हुकुमशाही होती; पक्षाच्या उघड राजकारणाबरोबरच पक्षाच्या गुप्त संघटनेचें जाळें लेनीननें मेन्शेव्हिकांचा विरोध धाब्यावर बसवून उभारलें होतें व गुप्त कट उभारून लुटलेली संपत्ति या संघटनेच्या वाढीसाठीं तो वापरीत होता असे आरोप मारटाॅव्हच्या मेन्शेव्हिक पक्षानें लेनीनवर पुराव्यानिशीं केले. उलट रशियन सशस्त्र क्रान्तीची साधना युरोपीय समाजवादी पक्षाच्या कार्यपद्धती स्वीकारून पुरी होणार नाहीं, क्रान्तिकारी शक्तींना चालना देणारी व मार्गदर्शन करणारी धंदेवाईक क्रान्तिकारकांची पक्षसंघटना रशियन क्रान्तीस आवश्यक आहे व अशा पक्षानें सत्ता हस्तगत करण्याचें उद्दिष्ट डोळ्यांपुढें ठेवून सर्व

डावपेंच खेळले पाहिजेत हा दृष्टिकोण लेनीननें पक्षास दिला. "सत्ता हिसकावून घेणें हें क्रान्तीचें उद्दिष्ट आहे, सत्ता हातीं आल्यावरच तिचा राजकीय कार्यक्रम स्पष्ट होईल,"* या सत्तानिष्ठ राजकारणाच्या भूमिकेंतूनच तो क्रान्तीकडे पाहात होता.



* 'श्री हू मेड ए रेव्होल्यूशन' : ब्रेत्रॅम वूल्फ : पान २९६

: १३ :

# रशियन राज्यक्रान्ति

**पहिलें** महायुद्ध सुरू झालें तेव्हां रशियन समाजवादी चळवळींत युद्धप्रश्नावर तीन ढोबळ मनोवृत्ती स्पष्ट दिसत होत्या. रशियाचें संरक्षण करूं मागणारे, केवळ रशियाच्या संरक्षणास विरोधी पण 'न जेते न जित' या भूमिकेवरून युद्ध तहकुबीची मागणी करणारे व रशियाच्या परभवांतून क्रान्ति घडवून आणूं इच्छिणारे. युद्ध लांबू लागलें तसा रशियन समाज-व्यवस्थेवर असह्य ताण पडला. हें युद्ध कशासाठीं याचा विचार जनता करूं लागली. देशाभिमानास उतरती कळा लागली. राजदरबारचें विलासी जीवन, नोकरशाहीची अपरिमित लांचखोरी, सतत घटत जाणारें धान्योत्पादन व प्राथमिक गरजा पुऱ्या होण्याच्या अभावीं शहरांतील कामगारवर्गात सतत वाढणारा असंतोष अनियंत्रित झारशाहीस आव्हान ठरला. १९१६ पर्यंत एक कोटीहून अधिक तरुण सैन्यांत भरती करण्यांत आले होते व २० लाख घोडे सरकारनें शेतकऱ्यांकडून काढून घेतले होते. अशा परिस्थितींत धान्य-टंचाई व शेतीउत्पादनांत घट न होती तरच नवल.

युद्ध लांबू लागलें तशी ड्यूमामधील लोकशाही गटांची जबाबदार राज्य-पद्धतीची मागणी तीव्र बनूं लागली. १९१५ व १९१६ मध्यें या प्रतिनिधींच्या

मागणीस ड्यूमा स्थगित करून व प्रतिनिधींचें सभासदत्व रद्द करून झारनें प्रत्युत्तर दिलें. वर्षाच्या अखेरीस रशियांतील अर्थव्यवस्था खिळखिळी झाली होती, संप व दडपशाहीला ऊत आला होता. जीवनोपयोगी वस्तु दुर्मिळ झाल्या होत्या व ज्या थोड्या मिळत त्यांच्या किंमती भरमसाट वाढल्या होत्या. सैन्याच्या रेशनमध्येंहि घट झाली होती. २३ फेब्रुवारीला रेशनसाठीं उभ्या असलेल्या पेट्रोग्राडमधील स्त्रियांनीं धान्यकोठारावर छापा घातला. पेट्रोग्राडमधील कामगार संपावर गेले. इंपीरियल गार्डमधील सैनिकांनीं बंड केलें. राजधानींतील पंधरा-हजार फौज क्रान्तींतील पांच दिवसांत वितळून गेली. १९०५ मध्यें बहुतेक सैन्य राजसत्तेस इमानदार राहिलें पण तीन वर्षांच्या निरर्थक युद्धानंतर यावेळीं सैनिक कंटाळले होते. तेव्हां १९१७ च्या संपकाळांत पुनश्च सोव्हिएट स्थापन झालें तें सैनिक व कामगार या दोन घटकांचें बनलें. २७ तारखेस सोव्हिएटनें झारच्या मंत्र्यांना अटक केली व राजवाडा ताब्यांत घेतला. झार व झारचे प्रतिनिधी पदच्युत होतांच ड्यूमामधील लोकप्रतिनिधींनीं अस्थायी सरकारची घोषणा केली. मार्च ते नोव्हेंबरपर्यंत अस्थायी सरकार व मध्यवर्ती सोव्हिएटचें कार्यकारी मंडळ यांच्यांत सत्ता वांटली गेली होती. कोणतीहि एक सत्ता सार्वभौम बनूं शकली नाहीं. सर्व राजबंदी मुक्त झाले होते व समाजवादी पुढारी सैबेरिया व युरोपांतून राजधानीस परतत होते.

राज्यकारभार व युद्ध या दोन प्रमुख समस्या नव्या सत्तेपुढें होत्या. कॅडेट पक्षास क्रान्तिकारी जनतेस कह्यांत ठेवणें अशक्यच होतें. सोशल रेव्होल्यूशनरी पक्षास शेतकरीवर्गाचा पाठिंबा होता व मेन्शेव्हिकांचें बहुतेक प्रमुख सोव्हिएट्समध्यें बहुमत होतें. मेन्शेव्हिकांतील उजवा गट युद्ध चालू ठेवण्याच्या बाजूस प्रथमपासूनच होता. झिमरवाल्डवादी सेरेटली, डॉन व मारटाव्ह यांच्यापैकीं सेरेटली व डॉन यांनीं फेब्रुवारी क्रान्तीनंतर क्रान्तीच्या संरक्षणार्थ युद्ध चालू ठेवावें अशी भूमिका घेतली तेव्हां ड्यूमांतील मेन्शेव्हिक गटाचा अध्यक्ष चिडझे व चळवळीचा नेता सेरेटली यांच्याकडे सोव्हिएट्सचें नेतृत्व आलें. केरेन्स्की व घटना समितीचा

अध्यक्ष चेरनॉव्ह या काळांत सोशल रेव्होल्यूशनरी पक्षाचें प्रतिनिधित्व करीत होते. क्रान्तीनंतर सर्वत्र स्थापन झालेल्या सोव्हिएट्समधील सैनिक व कामगार प्रतिनिधींनीं आपल्या नेतृत्वाविरुद्ध उघड बंड बराच काळ केलें नाहीं हें खरें पण अस्थायी सरकारची हुकूमत मात्र त्यांनीं कधींच जुमानली नाहीं. साहजिकच सोव्हिएट्सचें सत्ताप्रभुत्व वाढत गेलें. रशियांतील राज्यक्रान्तीचें स्वरूप भांडवलशाही लोकशाहीचें असेल तर तिच्या प्रतिनिधींना, अस्थायी सरकारमधील लोकशाही गटास, डावलून चालणार नाहीं ही समाजवादी नेत्यांची सैद्धान्तिक भूमिकाच अस्थायी सरकार या काळांत टिकून राहाण्यास कारणीभूत झाली होती. मात्र अशा सरकारांत सत्तेची भागीदारी न करतां आपण विरोधी गटांत राहिलें पाहिजे या पूर्व श्रद्धेस मेन्शेव्हिक चिकटून राहिले नाहींत. जनतेच्या असंतोषाचें परिमार्जन करण्यांत व युद्ध आघाडीवरील माघार थांबविण्यांत अपयश आल्यावर या चुकीबद्दल त्यांना जबर किंमत द्यावी लागली. सत्तेच्या लढ्यांतून ते कायमचे उठले. अर्थात् फेब्रुवारी क्रान्तींतून सोव्हिएट्सच्या हातीं आलेली सत्ता सोव्हिएट्सचे प्रातिनिधिक मेन्शेव्हिक नेते सहजगत्या झिडकारूं शकत नव्हते हेंहि तितकेंच खरें.

मार्चच्या ८ तारखेस बोल्शेव्हिक पक्षांतील तीन प्रमुख पुढारी कामेनाव्ह स्टॅलीन व डयूमा प्रतिनिधि म्युरेनाव्ह पेट्रोग्राडला येऊन पोहोंचले. त्यांनीं सुरू केलेल्या प्रवदा पत्राचा सूरहि, एप्रिलमध्यें लेनीन परत येईपर्यंत अस्थायी सरकारला सशर्त पाठिंबा देण्याचाच होता. २९ मार्चच्या बोल्शेव्हिक पक्षाच्या बैठकींत तशा स्वरूपाचा राजकीय ठराव खुद्द स्टॅलीननें मांडला. प्रवदाच्या पहिल्या अंकांत संपादक लिहितात "लोकशाही प्रजासत्ताक स्थापन करणें हाच आजचा मूलभूत प्रश्न आहे."* मॉस्को कमिटीनें कामगार प्रतिनिधींना केलेल्या मार्गदर्शनांत ती म्हणते, "समाजवादाचें अंतिम उद्दिष्ट साधण्यासाठीं आवश्यक तें स्वातंत्र्य मिळविणें हेंच कामगारवर्गाचें उद्दिष्ट आहे."* ३ एप्रिलला लेनीन,

* रशियन रेव्होल्यूशन : ट्रॉट्स्की : पान ३०२

झिनाव्हिव्ह आदि नेते रशियाला परततांच लेनीननें कामेनाव्ह, स्टॅलीन आदि बोल्शेव्हिक नेत्यांवर टीकेचा भडिमार केला. पेट्रोग्राड बोल्शेव्हिकांपुढील पहिल्याच भाषणांत लेनीन म्हणाला...“ आम्हांला पार्लमेंटरी लोकसत्ताकाची आवश्यकता नाहीं. आम्हांला भांडवलशाही लोकशाहीची जरूरी नाहीं. कामगार, सैनिक, शेतमजुरांच्या सोव्हिएटखेरीज इतर कोणत्याच सरकारची आम्हांस उपयुक्तता नाहीं. ” * शेतीविषयक सुधारणांचे कायदे लेनीनला नको होते; जमिनीसाठीं भुकेलेल्या शेतमजुरांनीं जमिनी हिसकावून घेण्यास त्याचा पाठिंबा होता. दुसऱ्याच दिवशीं लेनीननें पक्षापुढें आपला सुप्रसिद्ध एप्रिल प्रबंध ठेवला. प्रबंधाचा सारांश थोडक्यांत हा होता : फेब्रुवारी क्रान्तींतून जन्मास आलेलें लोकसत्ताक आमचें नाहीं व त्यांनीं चालविलेलें युद्धहि आमचें नाहीं. साम्राज्य सरकारला उलथून टाकणें हेंच बोल्शेव्हिकांचें कर्तव्य आहे. पण जनतेचा प्रामाणिक पाठिंबा असलेल्या सोशल रेव्होल्यूशनरी व मेन्शेव्हिकांच्या पाठिंब्यावर सरकार आज उभें आहे. आपण अल्पमतांत आहों. अशा परिस्थितींत आमच्या बाजूनें तें उलथण्याचे हिंसात्मक प्रयत्न होतां नयेत. या समझोतावादी व ‘संरक्षक’ युद्धवाद्यांवर विश्वास न ठेवण्यास ‘ आपण धैर्यानें व चिकाटीनें जनतेला शिकविलें पाहिजे. ’ या धोरणास खात्रीनें यश येईल व भांडवलशाही राजसत्ते-पलीकडील कामगारवर्गाची हुकुमशाही प्रस्थापित होईल. भांडवलदारांपासून आपण संपूर्ण फुटूं, त्यांचे गुप्त करार छापूं व जगांतील कामगारांस भांडवलशाही झुगारून देण्यास आवाहन करुन युद्धाचा शेवट घडवून आणूं. आंतरराष्ट्रीय क्रान्तीस आपण प्रारंभ करणार आहों. तिचें यशच आपलें यश शाश्वत बनवील व समाजवादी समाजव्यवस्था स्थापण्यास आपणांस अनुकूलता लाभेल. पार्टी कॉन्फरन्समध्यें कामगार हुकुमशाहीची चर्चा केवळ तात्त्विक आहे असा सूर निघाला तेव्हां लेनीन म्हणाला तिची संघटना करणें हाच एक आजचा व्यवहार्य कार्यक्रम आहे. त्यानें एप्रिल–प्रबंधांत लिहिलें होतें कीं, “ कामगार-वर्गाच्या जागृतीच्या व संघटनेच्या अभावीं फेब्रुवारी क्रान्तीनें सत्ता भांडवलशाहीच्या

* रशियन रेव्होल्यूशन : पान ३१२

हातीं दिली पण क्रान्तीच्या दुसऱ्या अवस्थेंत ही सत्ता कामगार व गरीब शेतकरीवर्गाच्याच हातीं येणार आहे." * सारांश एप्रिलमध्यें एकटा लेनीन आत्मविश्वासानें कामगार क्रान्तीची भाषा बोलत होता तर रशियांतील सर्व गटाचे समाजवादी नेते स्थायी सरकार निर्माण करण्याच्या मनोभूमिकेंत होते. अखेर लेनिनला यश मिळालें याचें कारण त्याच्या एप्रिल-प्रबंधांतच जनतेच्या सुप्त इच्छा प्रतिबिंबित होत होत्या; केवळ कणखर नेतृत्वाच्या अभावीं त्या अजूनपर्यंत कार्यान्वित झाल्या नव्हत्या, हेंच आहे.

'शान्तता, धान्य व जमीन' हीच या काळांत जनतेची मागणी होती. अस्थायी सरकार व सोव्हिएट्सचें कार्यकारी मंडळ यांनीं जनतेस युद्ध चालू ठेवण्यासाठीं हरतऱ्हेनें उद्युक्त करून पाहिलें. पण फेब्रुवारी क्रान्तीचें रक्षण करण्यासाठीं लक्षावधींनीं बलिदान करावें अशी कोणतीच गोष्ट फेब्रुवारी क्रान्तीनें जनतेस दिली नव्हती. सैन्याला अन्नपुरवठा होत नव्हता. शहरांतील कामगारांना धान्य दुर्मिळ झालें होतें. दळणवळणाची यंत्रणा मोडकळीस आली होती. रणांगणापेक्षां रोगांस जास्त सैनिक बळी पडत होते. घटनासमिती भरून ती कायदा करील तेव्हां शेतमजुरांच्या हातीं जमीन पडणार होती तर गंभीर युद्धपरिस्थितीच्या नांवाखालीं घटना समिती बोलावणें लांबत होतें. युद्ध चालू ठेवणारी कोणतीहि सत्ता या परिस्थितींत अपेशी ठरली असती व तें चालू ठेवण्यांत फेब्रुवारी सत्तेनें आपलें मरण ओढवून घेतलें होतें. सैनिकांस शांतता, शेत-मजुरांस जमिनी व कामगारांस सत्ता मिळवून देण्याची ग्वाही लेनीननें दिली तेव्हां वाढत्या बिकट परिस्थितींत सैनिक, कामगार व शेतकरी-सोव्हिएट्स हळु हळु बोल्शेव्हिक पक्षाच्या नेतृत्वाखालीं येऊं लागलीं. मेमध्यें ट्रॉट्स्की पेट्रोग्राडला येऊन पोहोंचला तेव्हां त्याचेंहि १९०५ चा सोव्हिएट नेता म्हणून प्रचंड स्वागत झालें. ट्रॉट्स्कीनें याचवेळीं लेनीनच्या धोरणास आपला निःसंदिग्ध पाठिंबा जाहीर केला. जुलैमध्यें सैनिकांनीं व कामगारांनीं स्वतःच्या जबाबदारीवर

---

* रशियन रेव्होल्यूशन : पान ३२०.

सशस्त्र उठाव करून "सोव्हिएटच्या हातीं सर्व सत्ता" ही घोषणा मध्यवर्ती कार्यकारी मंडळाच्या गळीं उतरविण्याचा अटीतटीचा प्रयत्न केला. पण मेन्शेव्हिक नेत्यांनीं तिचा स्वीकार केला नाहीं. भांडवलदार प्रतिनिधींनीं राजीनामे दिले असूनहि त्यांनीं अस्थायी सरकार बरखास्त केलें नाहीं. सत्ता ताब्यांत घेणें म्हणजे युद्धतहकुबी होय हें ते पुरेपूर जाणून होते. शेवटीं आघाडीवरील कांहीं तुकड्या राजधानींत येऊन पोहोंचल्या तेव्हांच हा उठाव शमला. ऑगस्टमध्यें जनरल कॉर्निलाव्हनें केरेन्स्की सरकारविरुद्ध बंड केलें तेव्हां भांडवलशाही शक्ती व सोव्हिएट्स आपलें बलाबल अजमावीत होत्या. कॉर्निलाव्हचें बंड फिसकटल्यावर सोव्हिएटची वरचढ सत्ता पुनः प्रस्थापित झाली. लेनीनच्या शब्दांत जुलैमधील कामगारविरोधी सोव्हिएट्स ऑगस्टअखेर भांडवलशाही विरोधी लढ्याचा मध्यबिन्दु बनलीं होतीं. सप्टेंबरमध्यें प्रथमच पेट्रोग्राड सोव्हिएटमध्यें बोल्शेव्हिक नेतृत्व प्रस्थापित झालें व नंतर थोड्याच दिवसांत अनेक सोव्हिएट्समध्यें त्यांना बहुमत मिळालें. सोव्हिएट्सच्या बलावर व सोव्हिएट्सच्या नांवानेंच बोल्शेव्हिक पक्ष सत्ता हस्तगत करणार होता.

कॉर्निलाव्ह बंडाच्या वेळीं घटना समिती भरेपर्यंत सरकारवर नियंत्रण ठेवणारी एखादी तात्पुरती संस्था स्थापन करण्याचा निर्णय घेण्यांत आला होता. त्यानुसार १४ सप्टेंबरला 'लोकशाही परिषद' भरविण्यांत आली. सोव्हिएट–सरकार स्थापन करूं मागणाऱ्या बोल्शेव्हिक पक्षास काटशह देण्याच्या इराद्यानेंच सेरेटलीनें हें पाऊल उचललें होतें. कॉर्निलाव्हला रस्ता मोकळा करून देणाऱ्या कॅडेट पक्षास सरकारमध्यें स्थान आहे कीं नाहीं या मुद्यावर पुनः मेन्शेव्हिक गटांत एकविचार होऊं शकला नाहीं. साहजिकच केरेन्स्की सरकारचे हात मजबूत करण्याचें कार्य लोकशाही परिषदेकडून पुरें झालें नाहीं. परिषद संपण्यापूर्वी एक स्थायी संस्था निर्माण करण्यांत आली. हें कौन्सिल ऑफ रिपब्लिक (प्री-पार्लमेंट) घटना समिती भरेपर्यंत राष्ट्राचें प्रतिनिधित्व करणार होतें. या कौन्सिलमध्यें जावें कीं नाहीं याचा विचार करण्यासाठीं २० सप्टेंबरला जेव्हां बोल्शेव्हिकांची बैठक झाली तेव्हां

बहिष्कार ठराव ७७ वि० ५० मतांनीं नापास झाला. लेनीनचा एप्रिल-प्रबंध पक्षानें स्वीकारला असला तरी डावपेंचाच्या प्रत्येक महत्त्वाच्या प्रश्नावर निर्णय घेतांना अजून सशर्त सहकाराची मनोवृत्ति कित्येक पक्ष–नेत्यांत दिसून येई याचेंच हें द्योतक होतें. लेनीन अजून अज्ञातवासांतच होता. निर्णय घेऊन झाल्यावरच त्याची प्रतिक्रिया पक्षापुढें आली. २३ सप्टेंबरला त्यानें लिहिलें: "आपण कौन्सिलवर बहिष्कार घातला पाहिजे. सोव्हिएट्सनीं लढ्यासाठीं जनतेस आवाहन केलें पाहिजे."*

केरेन्स्कीनें कौन्सिल स्थापनेनंतर अखेरचें संमिश्र सरकार बनविलें. कॅडेट पक्षानें आपलें सहकार्य देतांना कौन्सिलचे अधिकार नाममात्र राहतील असें आश्वासन मिळविलें होतें. या आश्वासनानुसार घटना समिती भरेपर्यंत कौन्सिल कुठलेच कायदे करूं शकणार नव्हती. उलट नव्या सरकारासंबंधींचा पेट्रोग्राड सोव्हिएटचा ठराव म्हणतो "सर्व क्रान्तिकारी लोकशाही शक्ती नव्या सरकारचें स्वागत एकाच घोषणेनें करतील. 'राजीनामा द्या'......या शक्तींच्या पाठिंब्यावर अखिल रशियन सोव्हिएट कॉंग्रेस खरेंखुरें क्रान्तिकारी सरकार अखेर स्थापन केल्याशिवाय राहाणार नाहीं."† नवें सरकार स्थानापन्न झालें तरी जुन्या समस्या सुटल्या नव्हत्या. उत्पादन घटत होतें, वस्तूंच्या किंमती वाढत होत्या, कामगार संप पुकारीत होते. सप्टेंबरमध्यें धान्याच्या रेशनमध्यें आणखी कपात झाली. सरकारमधील भिन्न पक्षांचा एकमेकांवर विश्वास नव्हता. या परिस्थितींतून फेब्रुवारी क्रान्ति झाली. ती परिस्थितीच अस्थायी सभेचा बळी घेणार होती.

सर्व ऑक्टोबर महिन्यांत अखिल रशियन सोव्हिएट कॉंग्रेसचा प्रश्नच प्रमुख राजकीय प्रश्न बनला होता. 'सोव्हिएटच्या हातीं सत्ता' या घोषणेखालींच बोल्शेव्हिक पक्ष सशस्त्र क्रांतीची तयारी करीत होता. ही कॉंग्रेस पुढें ढकलण्याचा प्रयत्न पूर्वीचें कार्यकारी मंडळ करीत होतें, तर कॉंग्रेस ताबडतोब

* रशियन रेव्होल्यूशन : पान ८४३ † रशियन रेव्होल्यूशन पान ८४७

भरवा या मागणीभोंवतीं बोल्शेव्हिक्स सोव्हिएट्समध्यें वाढता शिरकाव करून घेत होते. खेड्यांतील शेतकरी–उठाव वाढत होते, स्वयंनिर्णयाच्या घोषणेभोंवतीं राष्ट्रिकांच्या चळवळी स्फोटक बनत होत्या; युद्ध–आघाडी अधिकाधिक विस्कळित होत होती, सहकार्याच्या अभावीं सरकार जनतेवर वाढती सक्ती करीत होतें व या प्रत्येक प्रश्नाशीं सत्तेचा प्रश्न निगडित होत होता. सत्तेच्या प्रश्नाचें उत्तर सोव्हिएट कॉंग्रेसच देऊं शकणार होती.

जुलै ६ ते ऑक्टोबर २५ पर्यंत लेनीन अज्ञातवासांत होता. या काळांतच त्यानें 'शासनसंस्था व क्रान्ति' हें सुप्रसिद्ध पुस्तक लिहिलें. सशस्त्र क्रान्तीनें सत्ता हस्तगत केली तर शासनसंस्थेची यंत्रणा कशी निर्माण होणार? कामगार तिच्यावर कसें प्रभुत्व गाजवूं शकतील? या वारंवार निर्माण होणाऱ्या प्रश्नास त्यानें या पुस्तकांत उत्तर दिलें होतें. शासनसंस्थेच्या यंत्रणेंत सुधारणा घडवून आणण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाहीं, कारण तिच्या ठिकऱ्याच उडविण्यांत येतील... तिची जागा कामगार–सैनिक–शेतकऱ्यांचीं सोव्हिएट्स भरून काढतील... क्रान्तिकाळांत क्रान्तिकारी जनतेचें नेतृत्व करणारीं सोव्हिएट्स क्रान्तीनंतर नव्या शासनव्यवस्थेची धुरा वाहाण्यास खात्रीनें समर्थ ठरतील. सप्टेंबरअखेर शेतकरी उठाव होऊं लागले तेव्हांपासून लेनीन सशस्त्र क्रान्तीची मागणी करूं लागला. पक्षाची मध्यवर्ती समिती, दुसरी सोव्हिएट कॉंग्रेस भरेपर्यंत उठाव करूं नये अशा मताची होती तर लेनीन 'केरेन्स्कीला खालीं ओढून नंतरच कॉंग्रेस बोलवा' असें दडपण आणीत होता. १० ऑक्टोबरच्या पक्ष–बैठकींत अखेर लेनीनच्या सशस्त्र क्रान्तीचा ठराव पास झाला. पेट्रोग्राड सोव्हिएटनें क्रान्तिकारी-लष्कर-समितीची स्थापना केली. २४ ऑक्टोबरला या समितीला अटक करण्याचा, बोल्शेव्हिक वृत्तपत्रें बंद पाडण्याचा हुकूम केरेन्स्कीनें सोडला व सरकारच्या संरक्षणासाठीं आघाडीवरील लष्करी कुमक त्यानें मागविली. २५ ऑक्टोबरला विंटर राजवाड्याभोंवतीं गराडा टाकून बोल्शेव्हिकांनीं सशस्त्र क्रान्तीला प्रारंभ केला. लष्कर क्रान्तिकारकांना येऊन मिळालें. २६ तारखेस अस्थायी सरकारची सत्ता समाप्त झाल्याचें ट्रॉट्स्कीनें सोव्हिएट कॉंग्रेसमध्यें जाहीर केलें. अज्ञातवास

संपवून लेनीन प्रथमच सोव्हिएट कॉंग्रेसला हजर राहिला होता. त्यानें आपल्या भाषणांत जुनी सरकारी यंत्रणा नष्ट करण्याचा, सोव्हिएट्सनिष्ठ नवी राज्यपद्धति निर्मिण्याचा, दुसऱ्या देशांतील क्रान्तिकारी उठावावर भिस्त ठेवून ताबडतोब युद्धतहकुबीचीं बोलणीं सुरू करण्याचा, जमीनदारांचे मालकी हक्क नष्ट करून शेतकऱ्यांचा विश्वास संपादन करण्याचा व उद्योगधंद्यांतील उत्पादन, कामगार नियंत्रणाखालीं आगण्याचा कार्यक्रम कॉंग्रेसपुढें ठेवला. सोव्हिएट कॉंग्रेसची बैठक होईपर्यंत सत्तेचा कब्जा घेण्याचा कार्यक्रम पुढें कां ढकलण्यांत आला नाहीं या प्रश्नास 'जर आम्ही प्रथम सत्ता न घेतों तर केरेन्स्कीच्या प्रतिगामी जंकर्सच्या गराड्यांत भरलेल्या सोव्हिएट कॉंग्रेसच्या हातीं सत्ता कधींच सुपूर्त केली गेली नसतीं 'असें उत्तर देण्यांत आलें. सत्ताधारी सोव्हिएट्च्या एकशे एक सभासदांच्या पहिल्या कार्यकारी मंडळांत ६२ बोल्शेव्हिक्स व २९ जहाल सोशल रेव्होल्यूशनरी सभासद होते. मध्यवर्ती कार्यकारी मंडळ उरलेल्या जागा नंतर भरणार होतें. कौन्सिल ऑफ पीपल्स कोमिसार्स ( मंत्रिमंडळ ) फक्त बोल्शेव्हिक पक्षानें बनविलें.

सत्ता मिळेपर्यंत सत्तेचा वापर कोणत्या मूलभूत तत्त्वानुसार व्हावयाचा याचा विचार बोल्शेव्हिक पक्षानें क्वचितच केला होता. समाजवादी समाज-व्यवस्थेचीं कांहीं स्वप्नें समाजवाद्यांनीं मनांत घोळविलीं होतीं. सत्ता हातीं येतांच तीं व्यवहारांत आणण्याचा लेनीननें प्रयत्न केला. क्रान्तिकारी शक्तींची व्यापक आघाडी उभारतांना लेनीननें कांहीं मागण्या अगोदरच मंजूर केल्या होत्या. सत्ता हातीं येतांच त्या पुऱ्या करण्यांत येणार होत्या. सोव्हिएटचा अंतर्गत कारभार लोकशाहीनिष्ठ राहाणार होता. घटना समिती त्वरित बोलावण्यांत येणार होती. सर्व राष्ट्रिकांना स्वयंनिर्णयाचा हक्क मिळणार होता. झारच्या साम्राज्याचें दिवाळें फुंकलें जाणार होतें. पोलीस, लष्कर, नोकरशाहीची परंपरागत चौकट उध्वस्त करण्यांत येणार होती. सर्वांना सारखें वेतन मिळणार होतें. शेतकरी जमिनीचा कब्जा घेणार होते, सैनिक आघाडीवरून घरीं परतणार होते व कामगार कारखान्यांचे व्यवस्थापक बनून

उत्पादनाचें महान् कार्य स्वतःच्या हातीं घेणार होते. क्रान्तीनंतर उत्साहाच्या भरांत हीं स्वप्नें व हीं आश्वासनें पुरीं करणारे अनेक फतवे लेनीनच्या मंत्रि-मंडळानें प्रथम काढले. पण समाजवाद्यांची क्रान्ति म्हणजे समाजवादी क्रान्ति नव्हे याची सत्यता पटण्यास अजून फार काल मागें पडावयाचा होता.

हळु हळु विरोधी पक्षांचें स्वातंत्र्य नष्ट झालें. सोव्हिएट अंतर्गत काम-काजांत लोकशाहीनिष्ठ विरोध चालू ठेवण्यास कांहीं काळ मारटाव्हला संधि मिळाली पण पुढें त्या हक्कांसहि घटनात्मक संरक्षण मिळालें नाहीं. क्रान्ती-पूर्वी लेनीन, ट्रॉट्स्कीसह सर्व नेते घटना समितीची मागणी जोरजोरानें करीत होते. क्रान्ति झाल्यानंतर लेनीन मंत्रिमंडळानें काढलेले सर्व फतवे सम्मतीसाठीं घटना समितीपुढें ठेवण्यांत येणार होते. घटना समितींत सत्ताधारी बोल्शेव्हिकांचेंच बहुमत होईल याची त्यांना खात्री होती. पण प्रत्यक्ष निवडणुकी झाल्या तेव्हां सोशल रेव्होल्यूशनरी, मेन्शेव्हिक व बोल्शेव्हिक या तिन्ही समाजवादी पक्षांस जरी ७७ टक्के मतें व ८७ टक्के जागा मिळाल्या होत्या तरी फक्त बोल्शेव्हिक पक्षास केवळ २१ टक्केच मतें मिळालीं होतीं. तेव्हां सर्व समाजवाद्यांचें मंत्रिमंडळ बनवून प्रचंड बहुमताच्या जोरावर लोकशाही राज्यकारभार हांकणें अगर घटना समिती बरखास्त करून अल्पमतधारी बोल्शेव्हिक पक्षाची हुकूमत सोव्हीएटद्वारां राष्ट्रावर लादणें हे दोनच मार्ग लेनीनला उपलब्ध होते. त्यानें खास फतवा काढून घटना समिती बरखास्त केली व जानेवारी १९१८ मध्यें तिसऱ्या सोव्हिएट कॉंग्रेसनें त्या फतव्यावर शिक्कामोर्तब केलें. हुकुमशाही कामगारवर्गाच्या नांवानें होणार होती, पक्षाच्या नव्हे; पण लेनीनच्याच शब्दांत, “ बोल्शेव्हिक पक्षाचें मार्गदर्शन असलेल्या सोव्हिएट्समधून संघटित झालेला कामगारवर्ग ” ती हुकुमशाही गाजविणार होता. दुसऱ्या शब्दांत बोल्शेव्हिक पक्षाव्यतिरिक्त दुसरा पक्ष कामगार काढते तर त्या कामगारांस व त्या कामगार पक्षास सत्तेची अम्मलबजावणी करण्याचा अधिकार नव्हता. अशातऱ्हेनें कामगारांच्या एकमेव बोल्शेव्हिक पक्षाची हुकूमत लेनीननें रशियांत प्रस्थापित केली.

या काळांत कामगारांचे विरोधी राजकीय पक्ष नष्ट झाले पण खुद्द बोल्शेव्हिक पक्षांत पक्षान्तर्गत लोकशाही होती. १९२१ मध्यें क्रोन्सडॅट नौसैनिकांच्या बंडानंतर लेनीननें, पक्षांतील बहुमताची हुकुमशाही मंजूर करून पक्षान्तर्गत विरोधी गटास मज्जाव केला. पक्षांत संघटित विरोधी गट असेल तर पक्षसंघटना टिकणार नाहीं असा दृष्टिकोण मांडणारे समाजवादी लोकशाहीच्या तत्त्वानुसार स्वतंत्र विरोधी राजकीय कामगार पक्षांना घटनात्मक संरक्षण देण्यास तयार असतात. पक्षांत विरोधी गट सहन केला नाहीं तरी राजकारणांत विरोधी पक्षास वाव देतात. लेनीनच्या मृत्यूपुर्वी रशियांत या दोन्ही पर्यायांवर बोळा फांसण्यांत आला. ना घटनात्मक विरोधी पक्ष ना पक्षान्तर्गत ! पक्षांतील बहुमताचा पाठिंबा असलेल्या नेत्याच्या व्यक्तिगत हुकुमशाहीची एकच पायरी आतां चढावयाची राहिली होती. झारच्या साम्राज्यांतील स्वतंत्र राष्ट्रीय गटांचें स्वातंत्र्य ऑक्टोबर क्रान्तीनें मंजूर केलें होतें. १९२० च्या मेपर्यंत मॉस्कोनें जॉर्जियन लोकसत्ताकाचें स्वातंत्र्य मंजूर केलें होतें. लोकसत्ताकाचें सरकार मेन्शेव्हिक होतें. पण तें सरकार नंतर सोव्हिएटनें उधळून लावलें. क्रान्तीनंतर जीं स्वप्नें व जीं आश्वासनें मूर्तस्वरूपांत आणण्याचा प्रयोग लेनीननें केला त्या प्रयोगाच्या कालौघांत ठिकऱ्या उडाल्या. क्रान्तिपूर्व कालांत लेनीन व मारटाव्ह यांच्यांत पक्ष—संघटनेच्या प्रश्नावर जेव्हां मूलभूत मतभेद झाले तेव्हां मारटाव्हला पाठिंबा देणाऱ्या ट्रॉट्स्कीनें १९०४ मध्येंच लिहिलें होतें कीं लेनीनच्या पक्षसंघटनेचा दृष्टिकोण मान्य केला तर कालौघांत "पक्षाची जागा पक्षाची संघटना, पक्षसंघटनेची जागा संघटनेची मध्यवर्ती कमिटी व मध्यवर्ती कमिटीची जागा हुकुमशहा पक्षनेता घेईल. * १९१७ च्या क्रान्तीनंतर लेनीन व ट्रॉट्स्कीच्या काळांत कामगारांच्या व शेतकऱ्यांच्या लोकशाही हुकुमशाहीची जागा कामगार व गरीब शेतकऱ्यांच्या हुकुमशाहीनें पुढें तिची जागा कामगारवर्गाच्या हुकुमशाहीनें व नंतर कामगार वर्गाच्या हुकुमशाहीची जागा कामगारवर्गाच्या बोल्शेव्हिक पक्षानें भरून काढली.

* स्टडीज इन रेव्होल्यूशन : पान १३२

लेनीननंतर ट्रॉट्स्कीनें वर्तविलेल्या भविष्यानुसार पक्षाची जागा अखेर पक्षनेत्यानें घेतली. अर्थात् ऑक्टोबर क्रान्ति झाली तेव्हां प्रत्येक बोल्शेव्हिक पुढारी आंतरराष्ट्रीय क्रान्तीच्या चष्म्यांतून ऑक्टोबर क्रान्ति व तिच्या समस्या यांकडे पाहात असल्यामुळें ऑक्टोबर क्रान्तीचें खरें स्वरूप त्यांना तेव्हां दिसलें नाहीं. रशियांतील इतर समाजवाद्यांनाहि रशियाच्या सामाजिक परिस्थितींतील मूलभूत विसंगति ध्यानीं आली नाहीं. ती विसंगति ही होती कीं ज्या १९१७ मध्यें युरोपीय लोकशाही समाजवादाखेरीज जिवन्त राहूं शकत नव्हती व समाजवादी चळवळ युरोपांत सत्तेच्या उंबरठ्यावर आली होती त्या १९१७ मध्यें ती सामाजिक विकासाची अवस्था गांठलेल्या रशियांत क्रान्ति होत होती. तर तिची मागसलेली समाज व उत्पादन-व्यवस्था स्वतंत्र लोकशाही पद्धतीनें समाजवादी समाजव्यवस्था निर्माण करूं शकत नव्हती. अखेर रशियन राज्यक्रान्ति भांडवलशाही लोकशाहीहि ठरली नाहीं व समाजवादीहि बनली नाहीं. कदाचित रशियन क्रान्तींतून जर्मनी-सारख्या पुढारलेल्या राष्ट्रांत समाजवादी क्रान्ति होती, औद्योगिक जर्मनी व विशाल, सुसंपन्न, शेतीप्रधान रशिया यांच्या संयोगांतून एकसंध समाजवादी समाज निर्माण होता तर ही विसंगति नष्ट होऊन लोकशाही व समाजवाद या दोन्ही प्रेरणांच्या संगमांतून समाजवादी क्रान्तीचें स्वप्न साकार होण्याचा संभव होता. पण या संभवामागें अनेक असंभाव्य घटना दडलेल्या होत्या.



: १४ :

# तिसरी कम्युनिस्ट आंतरराष्ट्रसभा

**पहिल्या** महायुद्धांत जर्मन व ऑस्ट्रो-हंगेरीयन साम्राज्यशाही लष्करी सत्तांचा पराभव झाल्यावर त्यांच्या जागीं कामगार–सैनिक–समित्यांच्या बलावर लोकसत्ताक शासनसंस्था कायम झाल्या. रशियांत उसळलेली क्रान्तीची लाट बाल्कन राष्ट्रांत पसरून इटली व फ्रान्सच्या सरहद्दीवर येऊन थडकली. युद्धोत्तर समाजवादी चळवळींत या कालांत दोन विचारधारा प्रामुख्यानें पुढें आल्या. प्रायः रशियन क्रान्तींतील मेन्शेव्हिक व बोल्शेव्हिक दृष्टिकोणाच्याच त्या प्रतिनिधी होत्या. रशिया व मध्ययुरोप यांतील उध्वस्त साम्राज्यसत्तांच्या जागीं लोकशाही शासनसंस्था व लोकशाही प्रथा प्रस्थापित करून लोकशाही राष्ट्रीय क्रान्तीचें ऐतिहासिक कार्य पुरें करावें व व्यापक स्वातंत्र्याचें वातावरण निर्माण करून व कायम टिकवून समाजवादी समाजपरिवर्तनाचें कार्य पुरें करण्यासाठीं समाजवादी शक्ती संघटित कराव्या अशी मेन्शेव्हिक व युरोपीय समाजवादी यांची विचारसरणी होती. तर पोलीस, लष्कर व नोकरशाही यांची खिळखिळी झालेली प्रचलित चौकट उध्वस्त करून सशस्त्र क्रान्तीच्या मार्गें कामगारवर्गाची सत्ता प्रस्थापित करून समाजवादी क्रान्ति घडवून आणावी अशी विचारसरणी लेनीन आणि बोल्शेव्हिक व रोझा, लिबनेश्ट आदि जर्मन क्रान्तिकारी

समाजवादी मांडीत होते. भांडवलशाही समाजांत मूलभूत सुधारणा घडवून आणणें अशक्य आहे; सशस्त्र उठावाच्या मार्गेंच कामगारवर्गास सत्तेचा कबजा घ्यावा लागेल. मध्यंतरींच्या काळांत केले जाणारे संप व उठाव, निवडणुका व कायदेमंडळांतील राजकारण या अंतिम क्रान्तीच्या पूर्वतयारीचाच भाग होता या कमठ मार्क्सवादी भूमिकेचे ते पुरस्कर्ते होते. मूलतः शासनसंस्थाविषयक दृष्टिकोणांतूनच हे मतभेद तीव्र झाले होते.

बोल्शेव्हिक लेनीन व क्रान्तिकारी समाजवादी रोझा यांच्यांत तात्त्विक मतैक्य असूनहि त्यांच्या कार्यपद्धतींत पूर्व–पश्चिम इतकें अन्तर होतें. जोंपर्यंत बहुसंख्य कामगार जुन्या नेतृत्वाचा धिक्कार करून नव्या संघटनेची पायाभरणी करण्यास पुढें सरसावणार नाहींत तोंपर्यंत नव्या आंतरराष्ट्रसभेंत जिवन्तपणा येणार नाहीं व परिणामीं नवी संघटना समाजवादी व कामगार यांच्या चळवळींत फूट पाडून त्या चळवळींना दुबल बनवील अशी भीति रोझास होती. परिस्थिति क्रान्तीस जितकी अनुकूल बनेल तसा बहुसंख्य कामगारवर्ग क्रान्तिकारी विचार-सरणीचा पुरस्कर्ता बनून क्रान्तीचें कार्य सुलभ होईल, तिचें स्वरूप स्वयंस्फूर्त व लोकशाहीनिष्ठ राहील अशी तिची श्रद्धा होती. क्रान्तिकारी समाजवाद ही पक्षविशिष्ट शक्ति नसून कामगार चळवळीची ती आंतरिक प्रेरणा आहे व "केन्द्रीय हुकुमशाही नेतृत्वाच्या अचूक मार्गदर्शनाहून स्वयंस्फूर्त क्रान्तिकारी समाजवादी चळवळीनें केलेल्या चुका ऐतिहासिकदृष्ट्या अधिक उद्गामी व स्वागतार्ह आहेत" * असें तिचें मत होतें. रशियन क्रान्तीनंतर जर्मन लष्करी सत्तेबरोबर बोल्शेव्हिकांनीं ब्रेस्ट लिटोव्हस्क येथें केलेल्या तहांतून क्रान्तिकारी समाजवादी शक्तींचा फायदा होईल कीं लष्करशाहीचा याबद्दल जमन समाजवादी साशंक होते. आपल्या क्रान्तिकारी प्रयत्नांचें बल वाढावें म्हणून लेनीननें पुरस्कृत केलेलें स्वयंनिर्णयाचें तत्त्व व तद्जन्य राष्ट्रीय चळवळी क्रान्तिकालांतून जाणाऱ्या मध्ययुरोपमधील क्रान्तिकारी शक्तींचा बुद्धिभेद करण्यास कारणीभूत होतील व समाजक्रान्ति कीं राष्ट्रीय स्वातंत्र्य या संभ्रमांत त्यांची दिशाभूल

* स्टॅलीन ॲण्ड जर्मन कम्युनिझम : रुथ फिशर : पान २०

होईल अशी टीका रोझानें लेनीनच्या मार्गदर्शनावर केली. लेनीनच्या बोल्शेव्हिक पक्षसंघटनेच्या कल्पनांची ती प्रखर टीकाकार होती व या संघटनात्मक कल्पनांवर आधारलेल्या नव्या आंतरराष्ट्रसभेस तिचा विरोध होता. पण १५ जानेवारी १९१९ च्या क्रान्तिकारी उठावांत रोझा व लिब्नेश्ट हे दोन्ही जर्मन क्रान्तिकारी नेते ठार झाल्यामुळें क्रान्तिकारी समाजवादी चळवळींतील लेनीन व तिसऱ्या आंतरराष्ट्रसभेचें नेतृत्व अविरोध बनलें.

नोव्हेंबर १९१८ मध्यें जर्मनींत क्रान्ति होऊन बर्लीन–कामगार–सैनिक–कौन्सिलनें जर्मन समाजवादी लोकसत्ताकाची घोषणा केली. शीडमनच्या नेतृत्वाखालीं समाजवाद्यांच्या सरकारनें शासनसंस्थेचा ताबा घेतला तर पेट्रोग्राड-प्रमाणेंच बर्लीन कौन्सिल सरकारवर अंकुश धरून होतें. अल्पमतवादी जहालांचा विरोध पत्करून १८ डिसेंबरला कौन्सिलनें घटनासमिती भरविण्याचा आदेश दिला. शान्तता व सुसह्य तह लाभण्यास घटनानिष्ठ मध्यवर्ती राजसत्तेची जरूरी आहे असें बहुमताचें म्हणणें होतें. अल्पमतवाद्यांच्या जहाल समाजवादी गटानें व रोझाच्या स्पारटेकस् संघटनेनें ३१ डिसेंबरला जर्मन कम्युनिस्ट पक्षाची स्थापना केली. जर्मनींत समाजवादी क्रान्ति होऊं शकेल पण त्याची पूर्वतयारी व्हावयास हवी व मध्यंतरींच्या काळांत घटनासमितींत जाणें हितावह आहे ही रोझानें पक्षांत मांडलेली भूमिका इतर कम्युनिस्ट नेत्यांनीं स्वीकारली नाहीं व जानेवारींत समाजवादी सरकारविरुद्ध कम्युनिस्टांनीं सशस्त्र उठाव केला. संरक्षणमंत्री नोक्सच्या नेतृत्वाखालीं सरकारशीं इमानदार असलेल्या जर्मन लष्करानें उठाव मोडून काढला. या उठावांतच रोझा व लिब्नेश्टला सैनिकांनीं गोळ्या घालून ठार केलें. बर्लीन उठावानतर मार्चमध्यें हंगेरींत व एप्रिलमध्यें बव्हेरिया व ऑस्ट्रियांत असेच क्रान्तिकारी उठाव झाले. या प्रत्येक ठिकाणीं हे उठाव सरदार, जमीनदार, सेनानी, भांडवलदार आदि प्रतिक्रान्तिकारक गटांविरुद्ध झाले नव्हते; तर स्थिर लोकसत्ताक राजवटी निर्माण करूं मागणाऱ्या व बहुसंख्य समाजवादी व कामगार चळवळींचा पाठिंबा असलेल्या समाजवादी राजवटींविरुद्ध होते. या सर्व देशांतील जनता लोकशाहीचा प्रयोग करून पाहाण्यास अनुकूल

होती. ती भांडवलशाहीविरोधी होती, लोकशाहीविरोधी नव्हती. अशा परिस्थितींत समाजवादी चळवळींतील या अंतर्गत यादवींतून अखेर समाजवादी लोकशाही जनशक्ती क्षीण झाल्या. फॅसिझमला अनुकूल भूमि निर्माण झाली.

रोझाचा बळी घेतलेल्या अपेशी जर्मन उठावानंतर मार्च १९१९ मध्यें रशियन बोल्शेव्हिकांच्या प्रेरणेनें तिसऱ्या कम्युनिस्ट आंतरराष्ट्रसभेची मुहूर्तमेढ रोंवली गेली. २ ते ६ मार्च १९१९ पर्यंत मॉस्कोमध्यें आंतरराष्ट्रसभेची पहिली कॉंग्रेस भरली. कॉंग्रेसनें स्वीकृत केलेल्या जाहीरनाम्याची सुरवात, "कामगार क्रान्तीचे भविष्यकार मार्क्स व एंगल्स यांनीं लिहिलेल्या कम्युनिस्ट जाहीर-नाम्याच्या रूपानें ७२ वर्षांपूर्वी कम्युनिस्ट पक्षाने आपला कार्यक्रम जगापुढें ठेवला" * या वाक्यानें झाली आहे. पण तो जाहीरनामा मार्क्सनें कोणत्याच कम्युनिस्ट पक्षासाठीं लिहिला नव्हता व एंगल्सच्या नेतृत्वाखालींच दुसऱ्या आंतरराष्ट्रसभेनें समाजवादी हें नांव धारण केलें होतें या ऐतिहासिक घटनांवर व मध्यंतरींच्या काळांतील सर्व समाजवादी चळवळींवर एका लेखणीच्या फटकाऱ्यांत या वाक्यानें पडदा टाकला होता. मार्क्स, एंगल्स व रशियन कम्युनिस्ट पक्षाचा नेता [ रशियन पक्षानें आपलें 'बोल्शेव्हिक' हें नांव बदलून 'कम्युनिस्ट' हें नांव घेतलें होतें ] लेनीन यांच्या सलग परंपरेची आंतरराष्ट्रसभा वारसदार बनली होती. जाहीरनाम्याच्या शेवटीं जगांतील कामगारांना कामगार–हुकुमशाहीच्या प्रस्थापनेसाठीं आंतरराष्ट्रसभेच्या झेंड्या-खालीं संघटित होण्यासाठीं आवाहन करण्यांत आलें होतें.

पहिल्या कॉंग्रेसनें पास केलेली घटनाहि लेनीनच्या केन्द्रीय संघटनेच्या कल्पनांवर आधारलेली होती; नव्हे तिनें एक पाऊल पुढें टाकलें होतें. या घटनेच्या आधारें रशियन पक्षनेत्यांचें प्रभुत्व असलेली आंतरराष्ट्रसभेची मध्यवर्ती समिती भिन्न भिन्न देशांतील कम्युनिस्ट पक्षांवर सत्ता चालविणार होती. या छत्तीस कलमी घटनेचा अभ्यास केल्यास व कांहीं प्रमुख कलमें ध्यानांत

---

* फर्स्ट फाइव्ह इयर्स ऑफ कम्युनिस्ट इंटरनॅशनल : ट्रॉट्स्की : पान १९

घेतल्यास ही गोष्ट सहज स्पष्ट होते. या घटनेनुसार प्रत्येक देशांत एकच अधिकृत कम्युनिस्ट पक्ष राहाणार होता व आंतरराष्ट्रसभेची त्या देशांतील शाखा म्हणून तो पक्ष कार्य करणार होता. आंतरराष्ट्रीय कॉंग्रेससाठीं धाडावयाच्या प्रतिनिधींची संख्या आंतरराष्ट्रसभेची मध्यवर्ती समिती निश्चित करणार होती. मध्यवर्ती समितीस राष्ट्रीय घटक पक्षांच्या मध्यवर्ती समितीचे व कॉंग्रेसचे निर्णय रद्द व दुरुस्त करण्याचा अधिकार राहाणार होता व मध्यवर्ती समितीनें घेतलेले सर्व निर्णय घटक पक्षांवर घटनेनें बंधनकारक राहाणार होते. समितीला सबंध घटक पक्ष अगर सभासद यांना आंतरराष्ट्रसभेतून हांकलून लावण्याचा अधिकार घटनेनें दिला होता. कोणत्याहि घटक पक्षानें आपला कार्यक्रम पास करण्यापूर्वी मध्यवर्ती समितीची अनुमति घ्यावयाची होती व तिच्या पूर्वसम्मतीनेंच कॉंग्रेस भरवितां येणार होती. आंतरराष्ट्रसभेच्या घटनेंतील हीं कलमें संघटनेच्या केन्द्रीय हुकुमशाही स्वरूपावर स्पष्ट प्रकाश टाकतात.

मॉस्को येथें आंतरराष्ट्रसभेची मध्यवर्ती कचेरी राहाणार होती. सिनॉव्ह-जिव्हची अध्यक्षस्थानीं निवड झाली. तो, बुखारीन व जर्मन प्रश्नाचा प्रवक्ता रॅडेक हे बोल्शेव्हिक नेते मध्यवर्ती समितीचें नेतृत्व करणार होते. ‘कम्युनिस्ट इंटरनॅशनल’ या नांवानेंच मुखपत्र सुरू होणार होतें व १ मेला सुरू होणाऱ्या या पक्षमुखपत्राचा झिनॉव्हिव्ह संपादक बनला होता. रशियन, जर्मन, इंग्लिश व फ्रेन्च भाषेंत तें प्रसिद्ध होणार होतें. पहिल्या कॉंग्रेसनंतर कांहीं आठवड्यांतच हंगेरींत व त्याच्या पाठोपाठ बव्हेरिया व ऑस्ट्रियांत उठाव झाले; लगेच आंतर-राष्ट्रसभेच्या नेत्यांना मार्क्सप्रमाणेंच आंतरराष्ट्रीय क्रान्तीचीं स्वप्नें न पडतीं तरच नवल. झिनॉव्हिव्हनें १ मेच्या जाहीरनाम्यांत लिहिलें कीं “वर्ष संपण्यापूर्वी सर्व युरोप सोव्हिएट पद्धतीचा स्वीकार करील.” अध्यक्ष सिनॉव्हजिव्हनेंहि पहिल्या अंकांत तीच आशा प्रकट केली; एवढेंच नव्हे तर “सोव्हिएट रिपब्लिक स्थापण्यासाठीं आपण लढलों होतों याची स्मृतिहि युरोपला राहणार नाहीं” या शब्दांत तें यश किती झटपट मिळणार आहे हें सूचित केलें. युरोपप्रमाणेंच, जगांतील वसाहती राष्ट्रांत आंतरराष्ट्रसभेनें साम्राज्यविरोधी

चळवळी सुरू केल्या. ही आघाडी उघडून आंतरराष्ट्रसभेनें वसाहतींतील राष्ट्रीय चळवळींची सहानुभूति मिळविण्यांत आपली धूर्तता सिद्ध केली होती. अर्थात् या आघाडीवर लढणाऱ्या आंतरराष्ट्रसभेचें वसाहतींतील राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्यांसंबंधीचें प्रेम निर्हेतुक व खरें नव्हतें हें पुढील इतिहासांत स्पष्ट झालें; पण कांहीं काळ या राष्ट्रांतून कम्युनिस्ट चळवळी वाढण्यास त्याचा मोठा फायदा झाला. राष्ट्रिकांच्या स्वयंनिर्णयाच्या चळवळींचा व वसाहतींतील जनतेच्या स्वातंत्र्य लढ्यांचा पुरस्कार प्रथम आंतरराष्ट्रसभेनें तत्त्वनिष्ठेनेंहि केला असेल, पण आंतरराष्ट्रसभेच्या पुढील इतिहासांत जागतिक सत्ता संपादनाच्या धोरणाचे ते विशिष्टकालीन डावपेंच म्हणूनच ते लढे पुरस्कारिले गेले होते.

पहिल्या कॉंग्रेसनंतर झालेले क्रान्तिकारी उठाव फसल्यानंतर या देशांतील कम्युनिस्ट पक्षांतील नेत्यांत लाथाळी सुरू झाली. क्रान्तीच्या अपयशाची मीमांसा नेतृत्वांतील दोषावर येऊन धडकली. रशियन क्रान्तींत यश संपादन करणारे नेते कम्युनिस्ट चळवळींत असामान्य ठरले. इतर देशांतील पक्ष रशियन पक्षाच्या नेत्यांच्या अधिक आहारीं गेले. या पराभूत कम्युनिस्ट शक्तींना पुनर्संघटित करण्याचे प्रयत्न करतांना जुलै-ऑगस्ट १९२० मध्यें भरलेल्या आंतरराष्ट्रसभेच्या दुसऱ्या कॉंग्रेसनें या कम्युनिस्ट पक्षांवरील आपली केन्द्रीय पकड अधिक बळकट बनविली. पोलादी पक्षसंघटनेखेरीज क्रान्ति अशक्य आहे असा बोल्शेव्हिकांचा प्रथमपासून दावा होता. पण आतां क्रान्तिकारी वातावरण निवळल्यावर पोलादी नेतृत्व संघटित केलें जाणार होतें. अर्थात् पुनः क्रान्तिकारी परिस्थिति निर्माण झालीच तर क्रान्तीचें यश निश्चित करण्यासाठींच तो प्रयत्न होणार होता. आंतरराष्ट्रीय चळवळींत व्यक्त होणाऱ्या दोन मनोवृत्तींविरुद्ध या या काळांत लेनीन लढला. कांहीं चळवळी घटनात्मक राजकारणास तीव्र विरोध करूं मागत होत्या तर दुसरीकडे मोठ्या प्रमाणावर पुनश्च समाजवादी चळवळींच्या एकजुटीची भाषा बोलली जात होती. ही मागणी कार्यान्वित झाली तर स्वतंत्र कम्युनिस्ट आंतरराष्ट्रसभेचा पायाच ढांसळेल अशी भीति लेनीनला होती. तेव्हां दुसऱ्या कॉंग्रेसनें आंतरराष्ट्रसभेच्या झेंड्याखालीं

येऊं पाहाणाऱ्या समाजवादी पक्षांवर व चळवळींवर सुप्रसिद्ध एकवीस शर्तींचा ठराव लादला. त्याची कांटेकोर अम्मलबजावणी करणारेच यापुढें आंतरराष्ट्रसभेंत राहूं शकणार होते. 'युद्धखोर व शान्ततावादी युद्धविरोधी नेतृत्वाची' पक्षांतून हकालपट्टी केल्याखेरीज कोणत्याहि समाजवादी पक्षास आंतरराष्ट्रसभेंत सामील होतां येणार नाहीं. (कलम ७), ॲमस्टरडॅम ट्रेड युनियन काँग्रेसविरुद्ध घटक पक्षांनीं कामगारांत प्रचार करून लाल बावटा ट्रेड युनियनमध्यें आपल्या संघटनांना गोवलें पाहिजे (कलम १०), घटक पक्ष केन्द्रीय हुकुमशाहीच्या बोल्शेव्हिक संघटना तत्त्वानुसार पुनर्संघटित झाले पाहिजेत (कलम १२), प्रत्येक घटक पक्षानें कम्युनिस्ट नांव धारण केलें पाहिजे व कामगारांशीं द्रोह केलेल्या सर्व समाजवाद्यांविरुद्ध जोरदार प्रचार केला पाहिजे (कलम १७) व प्रत्येक पक्षानें चार महिन्यांच्या आंत खास पक्ष काँग्रेस भरवून या शर्तींची अम्मलबजावणी केली पाहिजे, अन्यथा त्यांना आंतरराष्ट्रसभेंत स्थान राहाणार नाहीं असा हा एकवीस कलमांचा मुसुदा होता. इतर कलमांन्वयें पक्षाची गुप्त यंत्रणा उभारणें, सैन्यांत प्रचार करणें आदि बोल्शेव्हिक तंत्राच्या अम्मलबजावणीची मागणी करण्यांत आली होती.

कामगार व समाजवादी एकजुटीचें वातावरण कायमचें नष्ट करून प्रत्येक देशांत हुकमी कम्युनिस्ट पक्ष व स्वतंत्र कामगार संघटना उभारण्याचा व भावी क्रान्तीस निर्भेळ कम्युनिस्ट नेतृत्व पुरविण्याचा उद्देश या ठरावामागें होता. दुसऱ्या काँग्रेसच्या काळांतच लोसोव्हस्कीच्या नेतृत्वाखालीं मॉस्को येथें लाल ट्रेड युनियन इंटरनॅशनल (प्रोफिन्टर्न) स्थापन करण्यांत आली. दुसऱ्या काँग्रेसच्या आदेशानुसार हाल येथें जर्मन पक्षाची, टूर्स येथें फ्रेन्च पक्षाची, लेगहार्न येथें इटॅलियन समाजवादी पक्षाची काँग्रेस भरली तेव्हां समाजवादी व कामगार एकजुटींत फूट पाडण्याच्या दुसऱ्या काँग्रेसच्या आदेशावर रणें माजलीं. प्रत्येक पक्षांत फूट पडली. पण या फुटींतूनहि ज्या समाजवादी व कामगार-शक्ती आंतरराष्ट्रसभेस मिळाल्या त्यांतूनच युरोपांत कांहीं कम्युनिस्ट जनपक्ष आंतरराष्ट्रसभेच्या झेंड्याखालीं आले. विशेषतः फॅसिस्ट मुसोलिनीनें ज्या काळांत

कामगार व समाजवादी चळवळींविरुद्ध शस्त्र उगारलें होतें त्या काळांत एकवीस शर्ती लादून कोमिन्टर्ननें (आंतरराष्ट्र सभा) या चळवळीच्या चिंधड्या उडविल्या व फॅसिझमच्या विजयास वाट मोकळी करून दिली. 'इटॅलियन लेफ्ट' या पुस्तकांत हिल्टन यंगनें लिहिलें आहे कीं, १९२० मध्यें इटलींतील समाजवादी व कामगार चळवळ शिखरास पोहोंचली होती. पार्लमेंटमधील तो सर्वांत मोठा पक्ष होता. पक्षाचे लक्षावधी सभासद होते व तीस लाख कामगार पक्षाच्या झेंड्याखालीं संघटित झाले होते. पण लेगहार्न कॉंग्रेसच्या वेळीं कोमिन्टर्ननें एकवीस शर्तींचा ठराव इटॅलीयन चळवळीवर लादल्यामुळें ही मोठी चळवळ उध्वस्त झाली. प्रत्येक छोट्या ट्रेड युनियन व शेतमजूर संघटने-पर्यंत ही दुफळी जाऊन पोहोंचली.

आंतरराष्ट्रीय समाजवादी चळवळींनीं कोमिन्टर्नची अविभक्त ठेकेदारी निर्माण करून क्रान्तिद्वारां कम्युनिस्टांची एकेरी हुकूमत युरोपांतील राष्ट्रांत स्थापन करणें हेंच दुसऱ्या कॉंग्रेसनंतर कोमिन्टर्नचें प्रधान उद्दिष्ट बनलें होतें. समाजवादी व कामगार चळवळींत हुकमी नेतृत्व प्रस्थापित करण्याचा आग्रह त्यासाठींच होता. बदलत्या परिस्थितींत आंतरराष्ट्रसभा यापुढें अनेक डावपेंच खेळली. ज्या कम्युनिस्ट नेत्यांना पक्षांत फूट पाडून चळवळ दुभंगण्यास भाग पाडलें गेलें त्यांनाच पुढें समाजवादी एकजुटीच्या धोरणाची अम्मलबजावणी करण्याचा आदेशहि अंमलांत आणावा लागला. त्यांचें स्वयंप्रकाशी नेतृत्व या परस्परविरोधी डावपेंचांची अम्मलबजावणी करण्यांत नष्ट झालें व थोड्याच वर्षांत कोमिन्टर्नचा प्रत्येक आदेश शिरसावंद्य मानणारें परप्रकाशी नेतृत्व प्रत्येक राष्ट्रांतील कम्युनिस्ट चळवळींत पुढें आलें. १९२१च्या जून–जुलैंत भरलेल्या तिसऱ्या कॉंग्रेसनें युरोपच्या राजकीय व आर्थिक परिस्थितीचा नव्यानें आढावा घेतला. युद्धोत्तर क्रान्तिकाल संपला आहे. भांडवलशाहीनें युरोपमध्यें राजकीय व आर्थिक क्षेत्रांत पुनश्च तोल संभाळला आहे, तिला शह देण्यासाठीं संघटित प्रयत्नांची व पूर्वतयारीची आवश्यकता आहे, तेव्हां एकजुटीच्या नांवाखालीं कम्युनिस्टांनीं समाजवादी व कामगार चळवळींत शिरून पक्षास व्यापक

पाठिंबा या काळांत मिळविला पाहिजे असें मार्गदर्शन तिसऱ्या कॉंग्रेसनें कम्युनिस्ट पक्षांना केलें.

जर्मनींत रॅडेकनें या धोरणाचा एक आविष्कार म्हणूनच दोस्त राष्ट्र-विरोधी जर्मन राष्ट्रभावना प्रज्वलित करण्याचा प्रयत्न केला. रशियांतील गृहयुद्ध शमलें होतें. रशिया युरोपशीं नवे स्नेहसंबंध व व्यापारी संबंध जोडूं पाहात होता. 'नेप' या नव्या आर्थिक धोरणानुसार, समाजवादी समाजव्यवस्था निर्माण करण्याचे स्वप्नाळू प्रयोग झिडकारून, रशियांत शेतकरीवर्गास नवें स्वातंत्र्य अनुभवूं देण्यांत येणार होतें. कारखान्यांची व्यवस्था मॅनेजर पाहाणार होते. व्यवस्थेचें अपुरें कार्य कम्युनिस्ट राजवट आतां रशियांत पुरें करूं मागत होती. तेव्हां अंतर्गत व्यवस्थेशीं जुळतें असेंच धोरण रशियन श्रेष्ठींनीं कोमिन्टर्नच्या गळीं उतरविलें होतें. मग एक वर्षापूर्वीच समाजवादी व कामगार चळवळींत फूट पाडण्याची व भांडवलशाही व समाजवादी शक्तींविरुद्ध एकाच वेळीं युद्ध पुकारण्याची गरज काय होती असा प्रश्न अनेक कम्युनिस्ट नेत्यांना पडला. ती गरज कोमिन्टर्नचें एकतंत्री नेतृत्व समाजवादी चळवळींत निर्माण करण्याच्या प्रेरणेंतून उद्भवली होती, राजकीय व आर्थिक परिस्थितींतून नव्हे, हें समजण्या-इतके ते अजून मुरब्बी बनले नव्हते. रशियाला या काळांत पराभूत जर्मनी हाच आंतरराष्ट्रीय दोस्त होता. १९२२ च्या सुरवातीस फ्रान्स व बेलजियम सरकारनें तहानुसार समृद्ध रूहर भाग पादाक्रान्त करण्यास सुरवात केली होती. जिनेव्हा येथें दोस्त राष्ट्रांची बैठक तहाच्या अम्मलबजावणीचा पुनर्विचार करण्यासाठीं एप्रिलमध्यें भरणार होती. तेव्हां रशियानें जर्मन सरकारशीं (या काळांत उजव्या गटाचें सरकार जर्मनींत होतें) रॅपेलो येथें दोस्तीचा करार करून जिनेव्हा परिषदेस सुरुंग लावला. शस्त्रास्त्र निर्मितीचीं बंधनें जर्मनीस डावलतां यावीं म्हणून रशियन भूमींत जर्मन शस्त्रनिर्मितीस सवलत देण्याचें गुप्त कलम रॅपेलो करारांत होतें. (लेनीननें क्रान्ति होतांच गुप्त करार निषिद्ध ठरवले होते हें ध्यानांत ठेवलें पाहिजे) रशियाच्या या परराष्ट्रधोरणाच्या तालावरच रॅडेकनें रुहर प्रश्नांवर चिडलेल्या जर्मन जनतेच्या राष्ट्रभावना अधिक

उद्दीपित केल्या. श्लगेटर या जर्मन राष्ट्रवाद्यास फ्रेन्चविरोधी विध्वंसनाबद्दल फांशीं दिलें गेलें तेव्हां आत्यंतिक राष्ट्रवाद्यांच्या व्यासपीठावर कम्युनिस्टहि श्लगेटरचा उदोउदो करूं लागले. जर्मन जनतेंतील दुखऱ्या राष्ट्रभावनांवर स्वार होऊन कम्युनिस्ट चळवळीस बल मिळविण्याचें संधिसाधु धोरण रॅडेकनें स्वीकारलें होतें. पण त्यास तात्त्विक आवरण देण्यासाठीं पराभूत जर्मनींतील भांडवलदारवर्ग कामगारवर्गाइतकाच दोस्तांच्या आर्थिक शोषणाचा बळी बनला आहे व म्हणून तो मित्र आहे असा सिद्धान्त प्रतिपादण्यांत आला. कम्युनिस्ट पक्ष या धोरणामुळें कांहीं काळ लोकमान्य बनला. त्यांची संघटना वेगानें फोफावली व १९२३ च्या सप्टेंबरमध्यें या फुगोटीचा अर्थ कम्युनिस्ट शक्ति असा लावून यावेळीं कोमिन्टर्ननें स्वतःच्या मार्गदर्शनाखालीं जर्मनींत पुनश्च क्रान्तीचा प्रयत्न केला. समाजवादी व कामगार शक्ती यांनीं या उठावास मुळींच पाठिंबा दिला नाहीं व सॉकेटच्या नेतृत्वाखालीं जर्मन लष्करानें उठाव झोडपून काढला. हिटलरनेंहि या राष्ट्रवादी लाटेंत म्यूनीच येथें अयशस्वी बंड करून पाहिलें.

१९२३ मध्यें खुद्द रशियन पक्षांत अंतर्गत झगड्यांनीं प्रकट स्वरूप धारण केलें. लेनीन आसन्नमरण अवस्थेंत होता. क्रोन्स्टॅट बंडानंतर पक्षान्तर्गत लोकशाही लोप पावली होती. तेव्हां पक्षशिस्त धाब्यावर बसवून ४६ कम्युनिस्ट नेत्यांनीं पक्षान्तर्गत लोकशाहीसाठीं जाहीर पत्रक काढलें. मार्च १९२२ मध्यें स्टॅलीन पक्षाचा जनरल सेक्रेटरी बनला होता. त्यानें झिनोव्हिव्ह व कामेनोव्ह-च्या मदतीनें हा अंतर्गत विरोध मोडून काढला. ट्रॉट्स्कीला सक्तीची विश्रान्ति देण्यांत आली. २१ जानेवारी १९२४ ला लेनीन मृत्यू पावल्यावर स्टॅलीनला स्वतःच्या मतानुसार संघटनात्मक चौकट निर्माण करण्यास स्वातंत्र्य लाभलें. ट्रॉट्स्कीला पक्षराजकारणांतून तात्पुरतें उठविल्यावर जर्मन क्रान्तीच्या अपयशास झिनोव्हिव्ह आदि कोमिन्टर्न नेत्यांस जबाबदार धरून त्यांनाहि पक्षनेतृत्वांतून स्टॅलीननें उठविलें. आंतरराष्ट्रीय क्रान्तीची आशा लोपली होती. रशियाच्या संरक्षणाचें कार्य क्रान्तिकारी दडपणाच्या ऐवजीं डावपेंची परराष्ट्रीय धोरणामार्फत आतां साधलें जाणार होतें. क्रान्तिवादी कम्युनिस्टांऐवजीं रशियाचें परराष्ट्रधोरण

परिणामकारक व्हावें यासाठीं खेळ खेळणाऱ्या कम्युनिस्ट नेतृत्वाची रशियाला व स्टॅलीनला आतां गरज होती. रशियन पक्षान्तर्गत झगड्यांत स्वतःस पाठिंबा देणारे परराष्ट्रीय कम्युनिस्ट नेते स्टॅलीनला हवे होते. झिनॉव्हिव्हची उचलबांगडी करून हें कार्य त्यानें सुकर बनविलें. आपल्या कार्यास रशियन जनतेचा पाठिंबा मिळविण्यासाठीं त्यानें या काळांत एकदेशीय समाजवादाच्या तत्त्वाचा पुकार केला. एकट्या रशियांत समाजवाद प्रस्थापित होणें शक्य आहे व अशा समाजवादी रशियास जागतिक भांडवलशाहीनें घेरलें असतां पक्षान्तर्गत झगडे करणारे समाजवादाचा द्रोह करीत आहेत असा प्रचार स्टॅलीननें केला. रशियाच्या परराष्ट्रीय धोरणाचें समर्थन व त्यास अनुकूल असें राजकारण हाच कोमिन्टर्नचा कार्यक्रम बनला. त्यास विरोध करणारे आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळींतील बिगर रशियन नेते हेहि समाजवादाचे द्रोही मानले जाऊं लागले. आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळ यापुढें रशियावादी कम्युनिस्ट चळवळ बनणार होती. पार्टीनिर्मित, प्रेरित व नियंत्रित सोव्हिएट शासनसंस्थेंत कायापालट होऊन रशियन पक्ष कायाकल्पित शासनसंस्थेशीं स्वामिनिष्ठ असा पक्ष ( State Party ) बनला होता. कामगार व समाजवादी शक्तींच्या क्रान्तिसामर्थ्याबद्दल स्टॅलीनला फारसा भरंवसा राहिला नव्हता. तेव्हां ती जागा रशियाचें लष्करी व यांत्रिक सामर्थ्य वाढवून तो भरून काढणार होता. रशियांतील जनतेनेंहि स्वराष्ट्राचें वैभव व प्रतिष्ठा वाढविणाऱ्या स्टॅलीनच्या ‘ एकराष्ट्रीय समाजवादाच्या ’ तत्त्वास पाठिंबा दिला असल्यास नवल नाहीं.

पांचव्या कॉंग्रेसनंतर रशियन पक्षांतील विरोधी शक्तींनीं संयुक्त आघाडी उभारली. एकट्या रशियांत समाजवादी अर्थव्यवस्था व समाजव्यवस्था निर्माण होणें अशक्य आहे; आंतरराष्ट्रीय क्रान्तिवादी दृष्टिकोण झिडकारून देणें चूक आहे; ‘ नेप ’ धोरण कामगार व शेतमजुरांविरुद्ध कुलक्सना ( जमीनमालक शेतकरीवर्ग ) वाढवीत आहे; औद्योगिक लोकशाही व कामगार नेतृत्वाच्या अभावीं मॅनेजर, सेनानी व नोकरशाही यांची हुकुमशाही रशियांत स्थिर होत आहे; दोस्त परराष्ट्र सरकारांशीं नवे हितसंबंध जोडण्याचें परराष्ट्रीय धोरण भांडवलशाही

विरोधी आंतरराष्ट्रीय आघाडी कमकुवत करीत आहे; ब्रिटिश ट्रेड युनियनशीं स्टॅलीननें सुरू केलेला मधुचंद्र त्याचेंच एक दर्शन आहे अशा तऱ्हेची प्रखर टीका विरोधी आघाडीनें उघड उघड सुरू केली. १९२६ ते १९२८ पर्यंत ही पक्षान्त-र्गत रणधुमाळी जारी होती. ट्रॉट्स्की १९२८ च्या जानेवारींत हद्दपार झाला. झिनॉव्हिव्हचें पक्ष सभासदत्व गेलें. कामेनाव्ह आदींची पक्षाच्या मध्यवर्ती-समितींतून उचलबांगडी झाली. फक्त बुखारीनचा एकमेव गट या काळांत स्टॅलीननें आपल्याबरोबर ठेवला. बुखारीनकडे कोमिन्टर्नचें मार्गदर्शन आलें. १९२४ च्या पांचव्या कॉंग्रेसपासून १९२८ मध्यें भरलेल्या सहाव्या कॉंग्रेसपर्यंत कोमिन्टर्नचें धोरण पूर्वीप्रमाणें एकसूत्री राहिलें नव्हतें. जर्मनी, फ्रान्स, पोलंड, झेकोस्लोव्हाकिया, बल्गेरिया आदि देशांत तिसऱ्या कॉंग्रेसच्या मीमांसेनुसार एकजुटीचे अपयशी प्रयत्न झाल्यावर हे पक्ष एकांगी धोरणाचा पुनः पुरस्कार करूं लागले होते, तर ब्रिटनमध्यें कामगार एकजुटीचा प्रयोग सुरू होता. पांचव्या कॉंग्रेसमध्यें प्रोफिन्टर्नप्रमाणें क्रेस्टिन्टर्न ( शेतकरी संघटनांची आंतरराष्ट्रीय कोमिन्टर्नची आघाडी ) स्थापन करण्यांत आली होती व अमेरिका, युगोस्ला-व्हिया आदि देशांत शेतकरी चळवळींशीं एकजूट करण्याचे प्रयोग याच एकांगी धोरणाच्या काळांत सुरू होते. पूर्वेकडील राष्ट्रांत व विशेषतः चीनमध्यें लेनीनच्या काळापासून डॉ. सन येत् सेनच्या राष्ट्रीय चळवळीशीं व कोमिंगटँग पक्षांशीं रशियन कम्युनिस्टांनीं सलगी केली होती. चीनलाहि साम्राज्यवाद्यांशीं लढतांना रशियाच्या दोस्तीची गरज होती. म्हणून नवोदित चिनी राष्ट्रीय सरकारनें आपली राजकीय व लष्करी संघटना मजबूत करण्यासाठीं रशियन राजकीय व लष्करी सल्लागार मागितले होते. अशा राष्ट्रीय सरकारमार्फत आपलें पूर्वेकडील राजकारण खेळावें कीं १९२० सालीं स्थापन झालेल्या कम्युनिस्ट पक्षामार्फत, याविषयीं रशियन नेते नेहमीं द्विधा मनःस्थितींत राहात. २० मार्च १९२६ रोजीं स्वतःच्या नेतृत्वाखालीं कॅन्टन सरकारची पुनर्संघटना करून चँग कै शेकनें कम्युनिस्टविरोधी आघाडी उघडेपर्यंत रशियन नेत्यांनीं चिनी राष्ट्रीय सरकारशीं एकजूट करण्याचेंच धोरण कायम ठेवलें. म्हणून चीनमधील कम्युनिस्ट पक्षाचें धोरणहि इंग्लंड, अमेरिका, युगोस्लाव्हियामधील पक्षांप्रमाणें या काळांत इतर राष्ट्रांतील एकांगी

धोरणांहून बुद्ध्या स्वतंत्र राखण्यांत आलें होतें. पण इंग्लंडमधील सार्वत्रिक संप अयशस्वी झाल्यावर तेथील एकजुटीचे प्रयत्न संपुष्टांत आले. क्रिस्टिन्टर्नची आघाडीहि यशस्वी झाली नाहीं. चीनमध्यें कॅन्टन सरकारचा प्रमुख चँग उत्तरेची यशस्वी मोहीम उरकून शांघायला स्थानापन्न झाल्यावर त्यानें निर्दयपणें कम्युनिस्ट मोहीम झोडपून काढली. या काळांत चिनी पक्षाचें कार्य विशेषतः कामगारवर्गात होतें. या हल्लयांत चँगनें सर्व कामगार संघटना उध्वस्त करून टाकल्या. एकजूट दुभंगली होती. कम्युनिस्ट शक्ती नामोहरम झाल्या होत्या. चिनी सरकार कीं चीन कम्युनिस्ट पक्ष या रशियन नेत्यांच्या संदेहाचा चँगनें फायदा उठविला होता. पण आश्चर्य हें कीं कम्युनिस्ट शक्ति खची झाल्यानंवर स्टॅलीनच्या मार्गदर्शनानुसार आंतराष्ट्रसभेनें चिनी कम्युनिस्टांना डिसेंबर १९२७ मध्यें कॅन्टन येथें बंड करण्याचा आदेश दिला व न्यूमन या जर्मन कम्युनिस्टाला मार्गदर्शनासाठीं पाठविलें. बंडाच्या तारखा पंधराव्या रशियन कॉंग्रेसशीं नेमक्या जुळत होत्या.याच कॉंग्रेसमध्यें स्टॅलीन, ट्रॉट्स्की आदि जहाल नेत्यांस पक्षांतून हांकलून लावणार होता. हें कार्य सुकर होण्यासाठीं स्टॅलीननें कॅन्टन बंडाचा व्यूह रचला असा आक्षेप कोमिन्टर्नच्या अनेक टीकाकारांनीं घेतला आहे. रशियन पक्षान्तर्गत झगड्यासाठीं परराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळ वापरून घेण्याचें हें एक ढोबळ उदाहरण आहे. चँगनें प्रथम चढाई केली तेव्हांच बंड होतें तर कांहीं तरी परिणामकारक विरोध होता. पण त्यावेळीं आपलीं शस्त्रें भूमींत गाडून ठेवण्याचा आदेश चिनी कम्युनिस्टांना स्टॅलीननें दिला होता. तेव्हां निश्चित अपयश वाढून ठेवलें असतां कॅन्टन बंड घडवून आणण्याचा प्रयोग स्टॅलीननें कां केला यास दुसरें सार्थ स्पष्टीकरण मिळत नाहीं. अशा तऱ्हेनें, १९२५ पासून ज्या देशांत एकांगी धोरणाचा पुरस्कार झाला नव्हता तेथें अपयश पदरीं आल्यावर, १९२८ च्या जुलै-ऑगस्टमध्यें भरलेल्या सहाव्या कॉंग्रेसनें सर्वत्र आत्यंतिक धोरणाचा पुरस्कार करून कोमिन्टर्नच्या धोरणांत पुनश्च एकसूत्रता आणली.

सहाव्या कॉंग्रेसच्या वेळीं बुखारीन आंतरराष्ट्रसभेचा अध्यक्ष होता. तिसऱ्या

कॉंग्रेसच्या वेळीं युरोपीय परीस्थितीच्या केलेल्या मीमांसेंत कोमिन्टर्ननें भांडवलशाहीनें नवा समतोलपणा साधला आहे असें म्हटलें होतें. तर या काग्रेसनें आतां नवा कालखंड (Third period) सुरू झाला आहे अशी घोषणा केली. स्थिरावलेलीं भांडवलशाहीं सरकारें आतां स्थिरता सोडून आक्रमक बनतील, अन्यथा त्यांच्या अर्थव्यवस्थेतून नवीं अरिष्टें निर्माण झाल्याशिवाय राहाणार नाहींत अशी या कालखंडाची मीमांसा करण्यांत आली होती. भांडवलशाहीमधील संघर्ष तीव्र होवोत वा संघर्षाच्या अभावीं आर्थिक अरिष्टें येवोत, परिस्थिति स्फोटक व म्हणून क्रान्तिजन्य आहे; तेव्हां सर्वत्र निर्भेळ कम्युनिस्ट नेतृत्व प्रस्थापित केलें पाहिजे व आत्यंतिक जहाल धोरणाचा अवलंब केला पाहिजे असा निष्कर्ष कॉंग्रेसनें काढला. जनतेला जागतिक क्रान्तीच्या कम्युनिस्ट कार्यक्रमाकडे आकर्षित करणें व अशा क्रान्तींतील आपल्या प्रतिस्पर्ध्यांस म्हणजेच समाजवादी नेतृत्वास बदनाम करणें हाच नव्या धोरणाचा पाया बनला. समाजवादी लोकशाही ही भांडवलशाहीची जहाल आघाडी' आहे असें सांगण्यांत आलें. कॉंग्रेसचा प्रबंध म्हणतो "मवाळ जहाल अशा सर्व छटांची आंतरराष्ट्रीय समाजवादी लोकशाही, भांडवलशाही समाजाची अखेरची राखीव तुकडी व तिचा सर्वांत शाश्वत आधारस्तंभ आहे...भांवडलशाहीला सर्वांत मोठ्या संकटाची परिस्थिति निर्माण होते अशा काळांत समाजवादी लोकशाही कित्येकदां फॅसिझमची भूमिका पार पाडते.'* म्हणूनच आंतरराष्ट्रसभा युरोपमधील वाढत्या फॅसिस्ट शक्तींशीं लढण्याऐवजीं प्रथम तिच्या राखीव तुकडीशीं म्हणजेच समाजवादी लोकशाहीशीं लढून तिचा निःपात करण्याचा आदेश घटक कम्युनिस्ट चळवळींना सहाव्या कॉंग्रेसच्या रूपानें देत होती. तिचा निःपात झाला व मग भांडवलशाही संकटांत कोसळली (कारण भांडवलशाहीचा नाश अटळ आहे हीच मार्क्सवादाची शिकवण आहे) कीं क्रान्तींत एकटे कम्युनिस्ट पक्षच सत्तेचे वारसदार बनणार होते. म्हणूनच सहाव्या कॉंग्रेसनें हिंदी कम्युनिस्टांना भांडवलशाही राष्ट्रीय चळवळीच्या क्रान्तिद्रोहाची जाणीव करून दिली व सोव्हिएट लोकसत्ताक व कामगारवर्गाची

* प्रोग्रॅम ऑफ कम्युनिस्ट इंटरनॅशनल १९२८. (अधिकृत प्रकाशन)

हुकुमशाही प्रस्थापित करण्याचें उद्दिष्ट डोळ्यापुढें ठेवून क्रान्तीची सिद्धता करण्याचा आदेश दिला.

१९२८ च्या सुरवातीस रशियन पक्षांतील जहाल विरोधकांची आघाडी स्टॅलीननें उध्वस्त केली होती. आतां बुखारीनचा एकमेव मवाळ गट नष्ट करण्याचें कार्य तेवढें शिल्लक राहिलें होतें. जहाल विरोधकांविरुद्ध चालू असलेल्या मोहिमेला बुखारीननें पुरेसा पाठिंबा दिला नाहीं अशी टीका होऊं लागली. रशिया औद्योगीकरणाच्या पंचवार्षिक योजना आतां हातीं घेणार होता. त्यासाठीं मोठ्या भांडवलाची गरज होती. जमीन–मालक शेतकरी वर्ग शासनसंस्थेच्या पूर्ण नियंत्रणाखालीं नव्हता. यंत्रसामुग्रीच्या आयातीसाठीं परदेशांत धान्य रवाना करण्याची निकड होती. पण हें हुकमी धान्य मोठ्या प्रमाणावर शेतकऱ्यांनीं योग्य भावांत पुरवलेंच असतें असें नाहीं. तेव्हां जून १९२८ मध्यें स्टॅलीननें लिहिलें कीं " आम्हांस वसाहती नाहींत, पत नाहीं व कर्जहि मिळत नाहींत. ते ( आंतरराष्ट्रीय भांडवलदार ) आम्हांस हीं कर्जें देणारहि नाहींत. साहजिकच शेतकरीवर्गावर कर बसविण्याखेरीज आम्हांस गत्यंतर नाहीं " * स्टॅलिनचा हा लेख म्हणजे नेप धोरणांतून निर्माण झालेल्या शेतकरीवर्गाविरुद्ध निर्दय लढ्याचा इशाराच होता. कामगारवर्गाची अस्मिता ' नेप ' काळांत नष्ट झाली होती. सक्तीच्या सामुदायिक शेतीमुळें आतां शेतकरी वर्गाचा स्वयंस्फूर्त पाठिंबाहि नष्ट झाला. पक्षहुकुमशाही व सोव्हिएट नोकरशाहीच्या जोरावर सर्व वर्गांवरच आतां स्टॅलीन हुकूमत चालविणार होता. बुखारीनला सहाव्या कॉंग्रेसच्या वेळीं आपल्या भवितव्याची पुरेपूर कल्पना आली होती. म्हणूनच या व्यासपीठाची संधि घेऊन आपल्या असंतोषाला त्यानें वाचा फोडली. संघटनेंत वैचारिक हुकुमशाही प्रस्थापित करण्याचे ( सक्तीच्या सामुदायिक शेतीच्या स्टॅलीनच्या विचारास उद्देशून हा उल्लेख असावा ) व नेतृत्वांत वेळोवेळीं फेरफार करण्याचे मार्ग निषेधार्ह आहेत असें त्यानें बजावलें व लेनीननें सिनॉव्हजिव्हला पाठविलेलें एक पत्र तेथें प्रथमच

* सोशल इकॉनामिक मूव्हमेंट्स : पान ३१६, टीप.

वाचून दाखविलें. त्यांत लेनीन म्हणतो "जे आपल्या म्हणण्याला होस हो म्हणत नाहींत अशा स्वतंत्र बुद्धिमत्तेच्या माणसांचा जर सारखा पाठलाग झाला व रेमेडोके होयबा संघटनेंत शिल्लक राहिले तर पक्ष खात्रीनेंच नाश पावेल!" * कॉंग्रेसनंतर स्टॅलीननें या बुद्धिवाद्यांची नशा उतरविली. ब्रिटनची रशियावर स्वारी होण्याचा संभव आहे लंडन व नानकिंग दोन्ही राजधान्यांमधील रशियाचे संबंध तुटले आहेत; राष्ट्र भीषण परिस्थितींतून जात आहे असा प्रचार रशियांत सर्वत्र सुरू झाला. संकटास तोंड देण्यासाठीं पक्षशुद्धीकरणाची 'मागणी' 'जनता' करूं लागली. सहाव्या कॉंग्रेसच्या धोरणाची अम्मलबजावणी करण्यासाठीं कोमिन्टर्नमार्फत स्टॅलीननें इतर राष्ट्रांतील कम्युनिस्ट नेतृत्वांतहि बदल घडवून आणले. १९२९ मध्यें लेनीनच्या मृत्युदिनाच्या दिवशीं बुखारीननें नव्या शेतकरी चढाईविरुद्ध प्रकट विरोध केला. बुखारीन, टॉट्स्की, रायकाव्ह, ल्यूनाचार्स्की आदि नेत्यांना या शुद्धीकरणांत स्टॅलीननें पदभ्रष्ट केलें.

बुखारीनला काढल्यावर स्टॅलीननें आंतरराष्ट्रसभेच्या अध्यक्षपदीं कोणाचीच निवड केली नाहीं. मोलोटाव्ह, मॅन्यूलस्कि, कुसिनिन ही स्टॅलीनवादी मंडळी तें काम पाहूं लागली. १९२९ चा मे दिन रक्तरंजित ठरणार होता. सर्व पक्षांनीं एकत्र येऊन मे दिन साजरा करण्याचा आजपर्यंतचा पायंडा नव्या धोरणानुसार कम्युनिस्टांनीं मोडला. दंग्याच्या नांवाखालीं मिरवणुकीस बंदी झाली तेव्हां ती कम्युनिस्ट पक्षांनीं मोडली. बर्लीन, पॅरीसमध्यें गोळीबार झाले. निषेध–संप करण्याच्या कम्युनिस्ट आदेशाला फारसा पाठिंबा मिळाला नाहीं. गोळ्या झाडणाऱ्या लोकसत्ताक सरकारांना समाजवाद्यांचा पाठिंबा आहे; लोकशाहीविरोधी लढाच खऱ्या अर्थानें फॅसिझमविरोधी लढा आहे; तेव्हां सोशल फॅसिस्ट समाजवाद्यांविरुद्ध प्रथम लढा दिला पाहिजे अशा तऱ्हेचा प्रचार कम्युनिस्ट करूं लागले. जर्मनींत कम्युनिस्टांनीं समाजवाद्यांविरुद्ध सार्वत्रिक चढाई सुरू केली. १९३० च्या जुलैंत समाजवाद्यांच्या नेतृत्वाखालील जर्मनींतील संमिश्र सरकार गडगडलें. पण प्रशियन प्रांतिक सरकारांत त्यांचें प्रभुत्व होतें.

* स्टॅलीन : बोरीस सुव्हारीन : पान ४९६

तेथें नाझींनीं सार्वमताची मागणी केली होती. कम्युनिस्टांनीं त्या मागणीस पाठिंबा दिला. लोकशाहीच्या पराभवांतून सत्तेकडे, अशीच जणुं दोघांचीहि घोषणा होती. सत्तांतर झालेंहि, पण समाजवादी व कम्युनिस्ट यांत फरक न करतां दोघांनाहि कंठस्नान घालणारें हिटलरचें नाझी सरकार सत्तारूढ झालें. जर्मनींत या धोरणानें जितकें भीषण स्वरूप धारण केलें तेवढें इतरत्र केलें नसेल, पण प्रत्येक देशांतील कम्युनिस्ट पक्षानें इमानदारीनें या आत्यंतिक धोरणाचा अवलंब केला. वसाहतींतील राष्ट्रीय चळवळ साम्राज्यविरोधी व म्हणून पुरोगामी असते हें आंतरराष्ट्रसभेचें मूलभूत मार्गदर्शनहि या खेपेस झिडकारलें गेलें. १९३० सालीं हिंदुस्थानांतील लक्षावधी जनतेनें केलेली कायदेभंगाची चळवळ तुच्छ लेखली गेली. सहाव्या कॉंग्रेसच्या धोरणानुसार कम्युनिस्टांनीं तिला प्रत्यक्ष विरोध केला. आंतरराष्ट्रसभा, स्टॅलीन व रशियन परराष्ट्र खात्याच्या हातचें १९३० नंतर अशा तऱ्हेनें खेळणें बनली होती.



: १५ :

# युद्धोत्तर समाजवादी चळवळ

**युद्धकाळांत** समाजवादी पक्षांमध्यें दोन गट पडले होते. युद्धवादी गटांतील समाजवादी स्वराष्ट्र संरक्षणासाठीं प्रस्थापित राज्यसत्तेला बिनशर्त सहकार्य देत होते तर झिमरवाल्ड समाजवादी त्वरित शान्ततेच्या घोषणेखालीं युद्धविरोधी आघाडींत सामील झाले होते. युद्ध समाप्तीनंतर ज्या पक्षांत युद्धपुरस्कर्त्यांचें बहुमत होतें अशा पक्षांनीं दुसरी आंतरराष्ट्रसभा पुनरुज्जीवित करण्यासाठीं १९१९ मध्यें बर्न येथें व जुलै १९२० मध्यें जिनेव्हा येथें, दोन परिषदा भरविल्या. ब्रिटिश मजूर पक्ष, जर्मन सोशल डेमोक्रॅटिक पक्ष बेल्जियम, डच व स्वीडिश समाजवादी लोकशाही पक्ष यांनीं आपले प्रतिनिधी या परिषदांस धाडले होते. जुन्या आंतरराष्ट्रसभेची कचेरी ब्रूसेल्सहून लंडन येथें हलविण्यांत आली होती. आंतरराष्ट्रसभेच्या पुनर्संघटनेचे हे प्रयत्न निष्फल ठरविण्याच्या हेतूनेंच तिसऱ्या आंतरराष्ट्रसभेनें ' समाजवादी नेत्यांना बदनाम करण्याची शर्त ' नव्या संघटनेंत येऊं इच्छिणाऱ्या समाजवादी गटांवर घातली होती. संभाव्य ऐक्याचा पाया मुळांतच दुंभगून टाकण्याची योजना त्यामागें होती. या योजनेचा तात्कालिक परिणाम एवढाच झाला कीं जे झिमरवाल्डवादी समाजवादी एकवीस शर्तींचा ठराव पसन्त न पडल्यामुळें तिसऱ्या आंतरराष्ट्रसभेंत

गेले नाहींत त्यांनीं पुनश्च जुनी आंतरराष्ट्रसभा पुनरुज्जीवित करण्यासहि उत्सुकता दाखविली नाहीं. 'समाजवादी पक्षांची आंतरराष्ट्रीय वर्किंग युनियन' ही स्वतंत्र संघटना त्यांनीं स्थापन केली. ऑस्ट्रियन, स्विस व फ्रेन्च समाजवादी पक्ष तसेंच ब्रिटनमधील स्वतंत्र मजूरपक्ष (I. L. P.) व जर्मनींतील काउटस्की आदींचा स्वतंत्र समाजवादी लोकशाहीपक्ष (U. S. P. D.) हे सर्व पक्ष या संघटनेंत सामील झाले. हे ब्रिटिश व जर्मन पक्ष आपल्या राष्ट्रांतील समाजवादी चळवळींत अल्पमतवादी गट होते. समाजवादी चळवळीच्या इतिहासांत 'व्हिएन्ना युनियन' किंवा 'सेकंड ॲण्ड हाफ इंटरनॅशनल' या नांवानें ही संघटना ओळखली जाते. हे पक्ष रशियन राज्यक्रान्तीचे चाहाते होते पण आपल्या चळवळींत बोल्शेव्हिक संघटना तंत्राचा अवलंब करण्यास या पक्षांचा विरोध होता. तेव्हां २१ शर्तींच्या सक्तीचा त्यांनीं पूर्ण धिक्कार केला.

व्हर्साईल तहाच्या अम्मलबजावणीचा पुनर्विचार करण्यासाठीं विजयी दोस्त राष्ट्रांची १० एप्रिल १९२२ रोजीं जिनेव्हा येथें परिषद भरणार होती. तिला शह देण्यासाठीं रशियानें जर्मन सरकारशीं जसा रॅपेलो करार केला तसाच तिसऱ्या कॉंग्रेसच्या धोरणाच्या अनुषंगानें रॅडेकनें समाजवाद्यांच्या संघटनात्मक एकजुटीच्या प्रयत्नाचाहि पुरस्कार केला. 'न जेते न जित' या भूमिकेवरून पराभूत राष्ट्रास न्याय मिळवून देण्यास झिमरवाल्डवादी समाजवादीहि वचनबद्ध होते. तेव्हां सुसह्य तहाच्या व्यासपीठाभोंवतीं समाजवादी एकजूट घडून येण्याची शक्यता होती. व्हिएन्ना युनियनचा नेता ॲडलर यानें २ एप्रिलला बर्लीन येथें या उद्देशानें पुनरुज्जीवित दुसरी आंतरराष्ट्रसभा, तिसरी आंतरराष्ट्रसभा व व्हिएन्ना युनियन यांच्या प्रतिनिधींची एक संयुक्त बैठक बोलावली. लेनीन, झिनाव्हिव्ह आदींचा विरोध असतांहि कोमिन्टर्ननें रॅडेक व बुखारीन (रशियन), क्लारा झेटकीन (जर्मन), फ्रोसार्ड व रोझमेअर (फ्रेंच), वॉर्स्की (पोलीश), कात्यायामा (जपानी) यांना बर्लीन बैठकीस प्रतिनिधी म्हणून धाडलें. समाजवादी एकजुटीच्या प्रयत्नांस मूर्तस्वरूप देण्यासाठीं प्रत्येक संघटनेच्या तीन प्रतिनिधींची एक समिति बर्लीन बैठकींत स्थापनहि झाली. पण जूनमध्यें रशियांत जहाल

समाजवाद्यांविरुद्ध राजकीय खटले भरण्यांत आले तेव्हां तिसऱ्या आंतरराष्ट्र-सभेचे प्रतिनिधी नांवापुरते ऐक्यप्रयत्नांत सामील झाले आहेत असा निष्कर्ष समाजवादी नेत्यांनीं काढला. बेल्जियम पुढारी व्हँडरव्हेल्डे व जर्मन पुढारी कर्ट रोझेन फेल्ड खटल्यांत बचावाचें काम करीत होते. आरोपींना रशियन सरकारनें जबर शिक्षा ठोठावल्यावर या पुढाऱ्यांनीं आंतरराष्ट्रीय व्यासपीठावरून रशियन हुकुमशाहीचा तीव्र निषेध केला; तर इकडे लेनीननें 'एकजुटीची भारी किंमत' हा लेख लिहून रॅडेक आदींच्या प्रयत्नाचा धिक्कार केला. रशियन क्रान्तीबद्दल सहानुभूति असणारे व्हिएन्ना युनियनमधील समाजवादीहि रशियांतील या वाढत्या हुकुमशाहीनें अस्वस्थ झाले होते. तीन्ही संघटनांच्या ऐक्याचा पाया नष्ट झाल्यावर समाजवादी व झिमरवाल्डवादी अधिक जवळ आले. डिसेंबर १९२२ मध्यें समितींतील या दोन संघटनांच्या प्रतिनिधींची हेग येथें बैठक झाली व लवकरच एक संयुक्त आंतरराष्ट्रीय संघटना उभारण्याचा निर्णय त्यांनीं घेतला. मे १९२३ मध्यें हॅम्बर्ग येथें ही संयुक्त परिषद भरली. समाजवादी पक्षाचे ३० राष्ट्रांतील ६२० प्रतिनिधी या परिषदेस हजर राहिले होते. नवी घटना तयार केली गेली. 'कामगार व समाजवादी आंतरराष्ट्रसभेनें' (L. S. I.) जन्म घेतला. समाजवादी व कामगार चळवळींत ऐक्य घडवून आणणें व ॲमस्टरडॅम जागतिक ट्रेड युनियन काँग्रेसशीं जिव्हाळ्याचे संबंध जोडणें हें तिचें पहिलें कार्य मुक्रर झालें. ॲमस्टरडॅम युनियनला सुरुंग लावण्यासाठींच प्रोफिन्टर्न (लालबावटा ट्रेड युनियन) स्थापन करण्याचा निर्णय तिसऱ्या आंतरराष्ट्रसभेनें घेतला होता. तेव्हां साहजिकच ॲमस्टरडॅम युनियन समाजवादी आंतरराष्ट्रसभेकडे आपली राजकीय आघाडी म्हणून पाहूं लागली.

पण पूर्ण दुफळी होऊनहि समाजवाद्यांची व कामगारांची रशियन जनतेबद्दलची व त्यांनीं केलेल्या क्रान्तीबद्दलची आपुलकी व निष्ठा नष्ट झाली नव्हती. म्हणूनच हॅम्बर्ग परिषदेनें एका ठरावांत 'रशियाच्या अंतर्गत कारभारांत कोणाहि साम्राज्यसत्तेनें ढवळाढवळ केली तर कामगारांनीं एकजुटीनें त्यास

विरोध केला पाहिजे, असें स्पष्ट मार्गदर्शन केलें होतें. ब्रिटिश मजूर पुढारी बेव्हीननें याच श्रद्धेनें आपल्या सरकारनें अशी ढवळाढवळ केली तर ब्रिटनमध्यें सार्वत्रिक संप घडवून आणण्याची धमकी दिली होती. राजकीय ठरावांत स्वातंत्र्याच्या व लोकशाही मूलतत्त्वावर शासनसंस्थेची पुनर्रचना करून रशियन नेत्यांनीं एकपक्षीय हुकुमशाही राज्यपद्धतीचा त्याग करावा अशी मागणी करण्यांत आली होती. त्यामुळें सर्व समाजवादी शक्तींचें शाश्वत ऐक्य घडवून आणणें शक्य बनणार होतें. पण कम्युनिस्ट नेत्यांना ऐक्य नकोच होतें. रोझाचा विरोध पत्करूनहि नवी आंतरराष्ट्रसभा स्थापन करण्याची घाई करणाऱ्या व त्याच्याहि पुढें जाऊन समाजवादी पक्षांवर एकवीस शर्ती लादणाऱ्या रशियन नेत्यांना समाजवादी व कामगार चळवळींत आपलें अविरोध एकतंत्री नेतृत्व प्रस्थापित करावयाचें होतें. या अंतिम उद्दिष्टपूर्तीसाठीं या संघटनांत प्रवेश मिळविण्याच्या व त्यांना आंतून सुरुंग लावण्याच्या इराद्यानेंच रॅडेकनें एकजुटीच्या धोरणाचा वरपांगी पुरस्कार केला होता. समाजवाद्यांविरुद्ध रशियांत चढाई करून या रॅडेकच्या प्रयत्नास खो देण्यांत कम्युनिस्ट नेत्यांचे दुटप्पी डावपेंच चवाट्यावर आले. हिटलरच्या फॅसिस्ट राजवटींत सर्व समाजवाद्यांवर प्रहार झाला तेव्हां कांहीं युरोपीय कम्युनिस्ट व समाजवादी नेत्यांनीं पुनश्च एकजुटीचा प्रयत्न केला, पण रशियन प्रतिनिधींनीं त्यांत प्रत्यक्ष भाग घेतला नाहीं. ते प्रयत्नहि फोल ठरले.

१९२३ मधील हॅम्बर्ग परिषदेनंतर १९२५ मध्यें मार्सेल्स येथें, १९२८ मध्यें ब्रूसेल्सला व १९३१ मध्यें व्हिएन्ना येथें, समाजवादी आंतरराष्ट्र-सभेच्या एकूण चार परिषदा झाल्या. आंतरराष्ट्रसभेच्या घटनेचा विचार करतां ही संघटना कोमिन्टर्नप्रमाणें एकजीव व एकमुखी धोरणाचा पुरस्कार कधींच करूं शकली नाहीं. घटक पक्षांची उभारणीहि एकसांच्याची नव्हती. कांहीं पक्षांचें सभासदत्व वैयक्तिक होतें तर कांहींनीं जनसंघटनांच्या सामुदायिक सभासदत्वाचा स्वीकार केला होता. परिषदेनें पास केलेल्या ठरावांचें स्वरूप मार्गदर्शनात्मक होतें, आदेशाचें नव्हतें. आंतरराष्ट्रसभेनें व तिनें नेमलेल्या खास समित्यांनीं

वसाहतींतील स्वातंत्र्य चळवळी, निःशस्त्रीकरण, फॅसिझमविरोधी चळवळींचें स्वरूप आदि अनेक महत्त्वाच्या प्रश्नांवर अभ्यासपूर्ण अहवाल तयार केले व त्याभोंवतीं जनमत संघटित करण्याचा प्रयत्न केला. पण दोन महायुद्धांच्या मध्यंतरींच्या काळांतील राजकारणास इष्ट वळण देण्याइतकें प्रखर सामर्थ्य तिला कधींच लाभलें नाहीं. आंतरराष्ट्रसभेच्या मध्यवर्ती संघटनेभोंवतीं समाजवादी युवकसभा, समाजवादी स्त्रीसंघटना, आर्थिक व शैक्षणिक संघटना अशा कित्येक आंतरराष्ट्रीय आघाड्या निर्माण झाल्या. फॅसिझमला बळी पडणाऱ्या समाजवादी व कामगार कार्यकर्त्यांना व राजकीय संघटनांना आर्थिक मदत पुरविण्याचें कार्यहि आपल्यापरी आंतरराष्ट्रसभेनें केलें. १९३१ च्या व्हिएन्ना कॉंग्रेसच्या वेळीं आंतरराष्ट्रसभेस छत्तीस पक्ष जोडलेले होते, या सर्व पक्षांच्या सभासदांची संख्या ६२ लाख होती व नव्या निवडणुकींत या सर्व पक्षांतील लोकप्रतिनिधींना २ कोटी ६४ लाख मतदान झालें होतें. पण एवढ्या मोठ्या संख्येनें पाठिंबा असलेल्या आंतरराष्ट्रसभेसहि युरोपच्या राजकीय व आर्थिक परिस्थितींत परिणामकारक बदल घडवून आणतां आला नाहीं व फॅसिझमपासून युरोपला ती वांचवूं शकली नाहीं. अखेर दुसरें महायुद्ध सुरू झालें.

पहिलें महायुद्ध साम्राज्यतृष्णेंतून उद्भवलें होतें. युरोपमध्यें सर्वत्र साम्राज्यवादी शक्ती चढाईवर होत्या. अशा परिस्थितींत व्हर्साईलचा तह उदार मनोवृत्तीचें द्योतक ठरण्याची आशा धरणें व्यर्थ होतें. पराभूत मध्य युरोपमध्यें कांहीं काल समाजवादी व लोकशाही प्रवृत्तींच्या हातीं सत्ता आली खरी, पण जुलमी तहांतून स्फोट घेणाऱ्या राष्ट्रवादी भावना व पराभूत साम्राज्यवादी शक्ती नव्या राजवटीला पूरक ठरण्याची शक्यता नव्हती. अनुकूल संधीची वाट पाहात प्रस्थापित राजवट कमकुवत करण्याचाच डाव ते खेळत होते. त्या राजवटींना या प्रतिगामी शक्ती एकीकडून धक्का देत होत्या तर दुसऱ्या बाजूनें जहाल क्रान्तिकारी शक्तींनीं व नंतर कम्युनिस्ट शक्तींनीं तिचा शक्तिपात आरंभिला होता. समाजवादी लोकशाही कीं अधिक प्रगल्भ कम्युनिस्ट लोकशाही असा प्रश्न या चळवळींनीं मध्य युरोपीय जनतेपुढें ठेवला नाहीं तर लोकशाही कीं कामगार

हुकुमशाही अशा स्वरूपांत तो प्रश्न जनतेपुढें मांडला लोकशाहीच्या प्रयोगाला संधि देण्याची इच्छा असलेल्या जनतेचा त्यामुळें बुद्धिभेद झाला नसता तरच नवल. थोडक्यांत उजव्या व डाव्या दोन्ही शक्तींच्या कात्रींत युद्धोत्तर लोकशाही प्रयत्नांचीं खांडोळीं झाली. जगांतील वसाहतींचें विषम वांटप झालेलें होतें. कांहीं युरोपीय राष्ट्रांनाच हुकमी बाजारपेठा होत्या. इतर राष्ट्रांची औद्योगिक व व्यापारी भरभराट त्यामुळें खुंटली होती. या स्वार्थ संघर्षांतूनच युद्ध भडकलें होतें. तेव्हां युद्धोत्तर काळांत पूर्वीचेंच वांटप कायम ठेवूं मागणाऱ्या विजयी दोस्त राष्ट्रांची शांततेची व सुव्यवस्थेची घोषणा स्वार्थानें बरबटलेली व ढोंगी वाटणें स्वाभाविक होतें. अशा परिस्थितींत लोकशाहीवादी शक्तींनीं जेव्हां आपल्या देशांतील जनतेपुढें शान्ततेचें व सुव्यवस्थेचें तत्त्व मांडलें. तेव्हां त्याचा अर्थ जनतेनें हे प्रस्थापित विषमतेचे व साम्राज्यवादी दोस्त शक्तींचे हस्तक आहेत असाच लावला. नवोदित लोकशाही राजवट स्थिर करण्याच्या शुद्ध हेतूनें जरी ते ही मागणी करीत होते तरी परिणामीं त्यांचें राजकारण स्थितिप्रिय (of Status quo) ठरलें. सामुदायिक सुरक्षिततेचें (Collective Security) परराष्ट्रीय धोरण, राष्ट्राराष्ट्रांतील वसाहती व बाजारपेठा यांच्या विषम वांटणीच्या अवस्थेंत, शाश्वत यश संपादन करण्याचा सुतराम् संभव नव्हता. अशा परिस्थितींत शान्तता व निःशस्त्रीकरणाची मूलतः पुरोगामी घोषणाहि निष्प्रभ व कलंकित बनली.

पराभूत साम्राज्यवादी शक्ती विषम वांटणींतून लोकशाहीच्या विरोधक बनल्या होत्या, तर वसाहतींतील स्वातंत्र्यासाठीं झटणाऱ्या साम्राज्यविरोधी शक्ती लोकशाहीचें अधिष्ठान नैतिक नाहीं हें स्पष्ट करीत होत्या. तेव्हां समाजवादी आंतरराष्ट्रसभा युरोपांतील समाजवादी लोकशाही शक्ती व वसाहतींतील स्वातंत्र्यवादी शक्ती यांची विशुद्ध एकजूट घडवून आणूं शकली नाहीं. आपल्या साम्राज्यवादी सरकारांहून स्वतंत्र व एकसंध असें परराष्ट्रीय धोरण आंतरराष्ट्रसभेच्या साम्राज्यवादी राष्ट्रांतील घटक पक्षांना घेतां आलें नाहीं. आंतरराष्ट्रसभेचा पाया व दृष्टि त्यामुळेंच केवळ युरोपीय व जागतिक राजकारणाच्या दृष्टीनें संकुचित राहिली.

हें स्वतंत्र धोरण पुरस्कारण्याइतकें निर्णायक बहुमतहि कुठल्याच मोठ्या राष्ट्रांतील समाजवादी पक्षास मिळालें नव्हतें हेंहि खरें आहे. आंतरराष्ट्रसभेंतील घटक समाजवादी पक्षांत परराष्ट्रीय धोरणाबाबत जसें एकमत नव्हतें तसें सर्व-मान्य समाजवादी आर्थिक धोरणहि आंतरराष्ट्रसभेस कधीं आंखतां आलें नाहीं. सर्व घटक पक्षांचें राष्ट्रहित संवादी नव्हतें. मध्य युरोपमधील समाजवादी शक्ती संधिकालांत सरकारांत गेल्या होत्या. सरकारी यंत्रणेमार्फतच त्यांचें बव्हंश कार्य होत होतें. उलट सरकारी यंत्रणा कोणत्याहि मूलगामी सामाजिक सुधारणा आणण्यास प्रवृत्तीनें विरोधी होती. त्यामुळेंच नवसमाजव्यवस्थेंत अभिप्रेत असलेला सामाजिक नात्यांतील आमूलाग्र बदल या कालांत घडून आला नाहीं. वर्गनिष्ठ समाजव्यवस्थेच्या बैठकींत परिवर्तन झालें नाहीं.

इंग्लंड सोडून इतर सर्व युरोपीय राष्ट्रांतील साम्राज्यवादी शक्ति महायुद्धानंतर लोकशाहीच्या उघड विरोधक बनल्या होत्या. फ्रान्समध्यें प्रतिगामी ‘ उजवा गट ’ सत्तेचीं सूत्रें हलवीत होता तर इटलींत फॅसिस्ट हुकुमशाहीच्या स्वरूपांत बंडखोर साम्राज्यवादी शक्ति प्रगट झाल्या होत्या. पूर्वीच्या दोन पिढ्यांचें उदार लोकशाही राजकारण आधुनिक इटलीची संस्थापना करण्याच्या मार्गांत आड आलें होतें. महायुद्धानंतर या उदार लोकशाही परंपरेस साम्राज्यवादी दूर सारतात कीं समाजवादी हाच प्रश्न होता. इटली फार उशिरा युद्धांत सामील झाला होता खरा पण युद्धांतील विजयांतून युद्धोत्तर वांटपांत आपली वसाहतींची निकडहि थोडीफार पुरी होईल अशी इटॅलियन साम्राज्यवाद्यांची अपेक्षा होती. ती फोल ठरल्यामुळें ते असंतुष्ट होते तर आघाडीवरून परतलेले सैनिक व युद्ध कारखान्यांत काम करणारे लक्षावधी कामगार युद्धसमाप्तीबरोबर बेकार बनल्यामुळें तेहि असंतुष्ट होते. प्रथम समाजवादी झेंड्याखालींच कामगार संघटित झाले. त्यांनीं जमिनी व कारखाने ताब्यांत घेण्यास सुरवात केली. पण कच्चा माल, भांडवल, बाजारपेठ व राज्यसत्तेच्या पाठिंब्याच्या अभावीं ते कारखान्यांचा वापर करूं शकले नाहींत. संपांतून कारखान्यांचा व जमिनींचा ताबा घेतलेली ही क्रान्तिकारी लाट सर्व राजकीय सत्ता स्वतःच्या हातीं घेण्याच्या दुर्दम्य इच्छाशक्तीच्या अभावीं

मधेंच फुटली. १९१९ च्या निवडणुकींत समाजवादी पक्ष लोकसभेंतील सर्वांत प्रमुख पक्ष बनला होता. ट्यूराटी आदि नेत्यांनीं आपल्या सामर्थ्यानुसार आपण संमिश्र सरकार बनवावें अशी भूमिका घेतली होती; तर सेराटी व लाझारी यांनीं पक्षांतील बहुमताच्या जोरावर अधिकारग्रहणास विरोध केला. पण हिंसात्मक क्रान्ति करून सत्तेचा ताबा घेण्याची उभारीहि त्यांनीं दाखविली नाहीं. सत्तेचें राजकारण कधींच फार काल राजकीय पोकळी राखूं शकत नाहीं. इटलींतील ही राजकीय कोंडी, अखेर समाजवाद्यांतून फुटून बाहेर पडलेल्या मुसोलिनीनें ब्राऊन शर्ट तरुणांची खाजगी सेना उभारूनच फोडली. गॅरिबाल्डीनेंहि एकेकाळीं लाल शर्टवाल्या तरुणांची अशी सेना इटलींत उभारली होती, पण तिनें साम्राज्यवादी ऑस्ट्रिया, पोप, नेपल्समधील सत्ताधारी यांच्यावर हल्ला चढविला होता. मुसोलिनीच्या ब्राउन शर्ट्सनीं देशांत अस्थिरता निर्माण करणाऱ्या ट्रेड युनियन्सविरुद्ध व राजकारणांत पोकळी निर्माण करणाऱ्या द्विमनस्क समाजवादी पक्षाविरुद्ध मोहीम उभारली. फॅसिझमनें पहिल्याप्रथमच इटलींत शासनसंस्थेचा ताबा घेतला होता. साम्राज्यवादी फॅसिस्ट राजवट आधुनिक इटलीची संस्थापना करणार होती.

जर्मनींतहि सत्ताधिष्ठ समाजवादी लोकशाही पक्ष स्थिर समाजवादी लोक-सत्ताक निर्माण करूं शकला नाहीं. कैसरचा पराभव झाला तरी पुनर्संघटनेंत जर्मन लष्कर प्रथमपासूनच प्रतिगामी शक्तींचें हत्यार बनलें होतें. कांहीं काळ लष्करशाहीनें प्रस्थापित लोकसत्ताकाला वरकरणी पाठिंबा देऊन आपली कातडी बचावली पण आपलें बलशाली जर्मन साम्राज्य स्थापण्याचें अधुरें स्वप्न तिला पुरें करावयाचें होतें. हळु हळु मक्तेदारी भांडवलशाहीनें आपलें डोकें वर काढलें. जर्मन समाजवादी चळवळींतील जहाल क्रान्तिकारी शक्तीहि बलशाली होत्या. त्यांनीं प्रस्थापित समाजवादी राजसत्तेविरुद्ध उघड हिंसक बंडें करून तिला लष्करशाहीची मदत घेणें भाग पाडलें व परिणामीं लष्करशाहीच प्रबल बनली. समाजवादी सरकारांनीं प्रथम अनेक मूलभूत सामाजिक सुधारणांना हात घातला. पण त्या कार्यान्वित करणारी स्वतंत्र बलशाली राजकीय यंत्रणा समाजवाद्यांच्या हातीं

नव्हती. त्यांना जुन्या राजकीय चौकटीवर—पोलीस, लष्कर व नोकरशाहीवर—विसंबून राहावें लागलें. त्या यंत्रणेनें लोकसत्ताकाला आंतून पोखरलें. समाजवाद्यांतील अंतर्गत यादवी पराकोटीला गेली तेव्हां तिनें अनुकूल संधि लाभतांच लोकसत्ताक उधळून देऊन नाझी पक्षाशीं समेट केला. जनता अपमानास्पद तहाचा सूड उगवून राष्ट्रीय पुनरुत्थापनास हपापलेली होती तेव्हां सत्ताधिष्ठ समाजवादी लोकशाही 'शातन्ता व आंतरराष्ट्रीय सहकार्य' हा दृष्टिकोण जनतेपुढें मांडत होती. साहजिकच आक्रमक राष्ट्रवादाचा समर्थ पुरस्कर्ता पुढें आला तेव्हां स्थैर्य, शांतता व कायदानिष्ठ भूमिका यांचा त्याग करून तिनें नाझी हिटलरला पाठिंबा दिला. या पाठिंब्यावर अधिष्ठित लोकसत्ताक गडगडलें. जर्मन समाजवादी चळवळ व कामगार चळवळ प्रथमपासूनच वर्गनिष्ठ होती. वर्गहित व राष्ट्रहित यांत झगडा आला तर वर्गहित कांहीं काळ बाजूला ठेवण्याचें शिक्षण या चळवळीनें कामगारांना कधींच दिलें नव्हतें. युद्धोत्तर जर्मनीचे आर्थिक प्रश्न हाताळतांना ही कामगार चळवळीची मर्यादा व सकुंचित दृष्टि समाजवादी अर्थमंत्र्यास एकाहून अधिक वेळां जाचक ठरली. वर्गातीत भूमिकेवरून समाजवादी नेते राष्ट्रीय प्रश्न सोडवूं मागते तर त्यांचा ट्रेड युनियन पाठिंबाहि नष्ट झाला असता. म्हणूनच १९२०–२१ व १९३० मध्यें आलेल्या भीषण आर्थिक मंदींतून लोकसत्ताक सहीसलामत बाहेर पडूं शकलें नाहीं. भांडवलदारांच्या व कामगारांच्या स्वहितरक्षणाच्या लढ्यांत मध्यमवर्ग पोळून निघाला. लोकसत्ताक सरकार त्याचें आर्थिक हित संरक्षित करण्यास असमर्थ ठरलें होतें. अशा परिस्थितींत आक्रमक राष्ट्रवादी तत्त्वज्ञानास व चळवळीस मध्यमवर्गानें पाठिंबा दिला. लोकशाहीला प्रथम संधि देऊनहि आपला प्रश्न सोडविण्यास ती अपुरी पडत आहे याची जाणिव झाल्यावर जर्मन जनताहि हुकुमशहाच्या मागें धांवली. आक्रमक साम्राज्यवाद व जनतेचा पाठिंबा मिळविणारा हुकुमशहा यांची इतिहासांत प्रथमच भीषण युति घडून आली होती.

इटली व जर्मनीमध्यें जें घडलें तेंच थोड्या फार फरकानें पोलंड, हंगेरी, आदि बाल्कन राष्ट्रें व पोर्तुगाल व स्पेनमध्यें घडून आलें. कुठल्या ना कुठल्या

स्वरूपांत फॅसिझमनें या देशांत वर डोकें काढलें. फ्रान्समध्यें १९२४ नंतर लोकशाही शक्ती अनेक वेळां सत्ताधारी बनल्या पण प्रत्येक संकटाच्या वेळीं आपलें धोरण सरकारवर लादण्यांत उजव्या गटास यश लाभलें होतें. लोकशाहीच्या ऱ्हासाबरोबर तिच्याच पोटीं जन्म घेतलेल्या व लोकशाही वातावरणांत विकास पावलेल्या समाजवादी शक्तीहि निष्प्रभ बनल्या. १९३१ नंतर कामगार समाजवादी आंतरराष्ट्रसभेचें एकहि अधिवेशन झालें नाहीं हें त्याचेंच द्योतक नव्हे काय? पहिल्या महायुद्धानंतर समाजवादी शक्ती कुठें सत्ताधिष्ठ तर कुठें सत्तेच्या उंबरठ्यावर येऊन पोहोंचल्या होत्या. पुण युरोपमधील अनेक राष्ट्रांतील फॅसिझमच्या वाढत्या विजयापुढें त्यांना स्वसंरक्षणार्थ माघारीचा पवित्रा घेणें भाग पडलें. लोकशाही कीं हुकुमशाही या मूलभूत संघर्षांत आपलें स्वतंत्र धोरण समाजवादी चळवळींना कार्यान्वित करतां आलें नाहीं.



: १६ :

# फॅसिझम, कम्युनिझम व समाजवाद

**इटलींत** मुसोलिनीची फॅसिस्ट हुकुमशाही स्थापन झाली तव्हां इटलीच्या विशिष्ट सामाजिक व राजकीय परिस्थितींतून तिनें जन्म घेतला आहे, फॅसिझमचें स्वरूप राष्ट्रीय आहे, असें समाजवादी मानीत होते. "फॅसिझम ही निर्यातीची वस्तु नाहीं' असें खुद्द मुसोलिनीहि म्हणत होता. पुढारलेल्या औद्योगिक राष्ट्रांत लोकशाही व्यवस्थाच नैसर्गिक असल्यामुळें या देशांतील वाढत्या समाजवादी शक्तींना फॅसिझमपासून भिण्याचें कारण नाहीं हा फ्रॅन्सिस डेलायसीचा राजकीय सिद्धान्तच समाजवादी नेते गृहीत धरीत होते. पण वस्तुतः युद्धोत्तर आर्थिक संकटांतून व भांडवलशाहीला आव्हान म्हणूनच फॅसिझमचा उदय झाला होता. कामगार व मध्यमवर्गाचा सत्ताप्रभुत्वाचा डाव कुजल्यामुळें जनतेनें वैतागून सामाजिक स्थिरता निर्माण करण्याचें वचन देणाऱ्या हुकुमशहास कवटाळलें होतें. जर्मनींत राष्ट्रीय समाजवादी पक्षानें ( नाझी पक्षानें ) लोकशाही प्रथा व लोकशाही चौकट उध्वस्त करून हिटलरची हुकुमशाही जर्मनींत स्थापन केली तेव्हां पुढारलेल्या औद्योगिक राष्ट्रांना लोकशाही व्यवस्था अटळ आहे या सिद्धान्तासहि सुरुंग लागला. तसेंच फॅसिझमचें संकट राष्ट्रविशिष्ट न राहातां आंतरराष्ट्रीय बनलें. मार्च १९३३ मध्यें हिटलरच्या हातीं

पूर्ण सत्ता आल्यावर त्यानें जर्मन लोकशाही, कामगार संघटना व समाजवादी चळवळ नामशेष करून टाकली. पण कम्युनिस्टांनीं सहाव्या कॉंग्रेसचें धोरण बदललें नाहीं. फॅसिझम जनतेचे आर्थिक प्रश्न सोडवूं शकणार नाहीं, त्याचा विजय क्षणिक आहे व लोकशाहीवरील जनतेचा विश्वास नष्ट करण्यांत व समाजवाद्यांना झोडपून काढण्यांत तो कम्युनिस्ट क्रान्तीचाच रस्ता मोकळा करून देत आहे अशी कम्युनिस्टांची विचारसरणी होती. १ एप्रिलच्या कम्युनिस्ट आंतरराष्ट्रीय बुलेटिनमध्यें संपादक लिहितात : “ फॅसिझमचा विजय तात्कालिक आहे... हिटलरच्या नंग्या हुकुमशाहींत जनता आपली शान्तता-वादी लोकशाहीनिष्ठा झटकून टाकून क्रान्तीस सिद्ध होईल व कामगारक्रान्तीचा क्षण लवकर येईल. ” सतरा नंबरच्या बुलेटिनमध्यें प्रसिद्ध झालेल्या कम्युनिस्ट पक्षाच्या ठरावांत म्हटलें होते कीं “ सरकारी यंत्रणेंतून सोशल फॅसिस्टांना [ समाजवाद्यांना ] अर्धचंद्र मिळाला असला व त्यांचीं वृत्तपत्रें व संघटना उध्वस्त केल्या गेल्या असल्या तरी भांडवलशाहीचे ते समाजांतील प्रमुख हस्तक आहेत ही वस्तुस्थिति त्यामुळें खोटी पडूं शकत नाहीं. ”

१९३४ च्या सुरवातीस बल्गेरियांत फॅसिस्ट प्रतिक्रान्ति यशस्वी झाली. शेतकरी पक्षाबरोबर संयुक्त आघाडी उभारून फॅसिस्टांचा प्रतिकार करण्याऐवजीं या काळांतहि बल्गेरियन कम्युनिस्ट शेतकरी पक्षांशींच झगडत राहिले. नंतर १९३५ च्या सातव्या कॉंग्रेसपुढें भाषण करतांना बल्गेरियन कम्युनिस्ट नेता क्रूमाव्ह म्हणाला कीं, “ १९३४ मध्यें बल्गेरियन कम्युनिस्टांनीं फॅसिझमच्या चढाईकडे बुद्‌ध्या दुर्लक्ष केलें व प्रतिक्रान्तिवादी बंडाची तयारी करीत असतां त्यांना विरोध न करतां ते शेतकरी संघटनेशीं झगडत राहिले.”* पण १९३४ मध्यें कोमिन्टर्नचें सहाव्या कॉंग्रेसचें अधिकृत धोरणच कम्युनिस्ट अमलांत आणीत होते. ऑस्ट्रियांत डलफसनें मुसोलिनीच्या फुशीनें कॅथॉलिक फॅसिस्ट हुकुमशाही स्थापन केली. बलशाली ऑस्ट्रियन समाजवादी चळवळीचें कायदेशीर अस्तित्व नष्ट केलें गेलें तेव्हां फेब्रुवारी १९३४ मध्यें व्हिएन्ना–कामगार शौर्यानें लढले. पण

* कम्युनिस्ट इंटरनॅशनल : बॉर्केन्यू : पान ३८२.

या वेळीं ऑस्ट्रियन कम्युनिस्टांना फॅसिझमचा प्रतिकार व त्यांत होणारी कामगार शक्तीची हानि म्हणजे भावी कम्युनिस्ट क्रान्तीचा द्रोह वाटत होता. युरोपमधील वाढत्या फॅसिस्ट विजयानें व हिटलरच्या विजयानें धुंद झालेल्या फ्रेंच प्रतिक्रान्तिवादी शक्तींनीं ६ फेब्रुवारी १९३४ रोजीं फ्रेंच पार्लमेंटला गराडा घातला. कम्युनिस्टांनीं याच दिवशीं याच ठिकाणीं आपलीं निदर्शनें केलीं. दोघांचाहि हेतु दलादिअरचें लोकशाही सरकार ढांसळून टाकणें हाच होता. पार्लमेंटच्या रक्षणार्थ झालेल्या गोळीबारानंतर सरकार कोसळलें. फॅसिझमचा धोका खऱ्या अर्थानें आंतरराष्ट्रीय बनत होता. १२ फेब्रुवारीस फ्रेंच ट्रेड युनियननें ( सी. जी. टी. ) एक दिवसाच्या सार्वत्रिक संपाची घोषणा केली तेव्हां फ्रान्समधील वाढत्या फॅसिस्ट शक्तींना शह देण्यास उत्सुक असलेले लाल ट्रेड युनियनमधील कामगारहि संपांत सामील झाले. फ्रेंच कामगारांनीं फॅसिझमविरुद्ध एकजूट करण्यास कम्युनिस्टांना या सहकार्यानें आव्हान दिलें होतें. पण सहाव्य कांग्रेसचें धोरण बदलण्यास अजून एक वर्षाचा काळ लोटणार होता.

जपाननें मांचुरियावर हल्ला केल्यावर व जर्मनींत हिटलरची हुकुमशाही आपले आक्रमक हेतू स्पष्ट बोलून दाखवूं लागल्यावर पूर्व-पश्चिमेकडून रशियाला धोका निर्माण झाला. इटलीशीं व जर्मनीशीं स्नेहसंबंध जुळविण्याचे रशियन सरकारचे प्रयत्नहि अयशस्वी ठरले होते. रशियाच्या संरक्षणास युरोपांतील क्रान्तिकारी शक्ति उपयोगी पडण्याची शक्यताहि नव्या परिस्थितींत नष्ट झाली होती. तेव्हां स्टॅलीननें आपल्या परराष्ट्रीय धोरणांत नवा पवित्रा घेतला. ज्या लीग ऑफ नेशन्सला गेलीं पंधरा वर्षे "लुटारु साम्राज्यवाद्यांची संस्था" म्हणून सोव्हिएट रशियानें संबोधिलें होतें त्या लीगमध्यें स्टॅलीननें १९३४ मध्यें प्रवेश केला. वसाहतींच्या विषय वांटणीवर आधारलेलें आंतरराष्ट्रीय राजकारण व तिचें सामुदायिक संरक्षणाचें धोरण जागतिक संघर्ष सोडविण्यास असमर्थ होतें. जर्मनी जपान व इटली हीं असंतुष्ट राष्ट्रें वसाहतींच्या फेरवांटणीची मागणी करून त्या घोषणेखालीं आक्रमक राष्ट्रवादी धोरणास स्वदेशांतील जनतेचा पाठिंबा मिळवीत होतीं. पण आतां स्टॅलीन त्यांना शह देण्यासाठीं साम्राज्यवादी दोस्त राष्ट्रांचा

व चालू विषम वांटपाचा समर्थक बनला. जर्मनीच्या सरहद्दीवरील फ्रान्स व झेकोस्लोव्हाकियाशीं त्यानें परस्पर सहकार्याचे करार केले. व्हर्साईलच्या जुलमी तहाची रशियानें आजपर्यंत यथेच्छ निंदा केली होती, पण त्या व्हर्साईल योजनेच्या संरक्षणासाठींच तो आतां सिद्ध झाला होता. "जगांतील सर्वांत लष्करशाहीनिष्ठ व सर्वांत आक्रमक राष्ट्र" म्हणून ज्या फ्रान्सची रशियानें संभावना केली होती त्या राष्ट्राचा प्रतिनिधी मॉ. लावाल मॉस्कोंत मे १९३५ मध्यें स्टॅलीनला भेटला तेव्हां असें अधिकृतरीत्या जाहीर करण्यांत आलें कीं "फ्रान्सच्या रक्षणासाठीं आवश्यक तेवढें खडें सैन्य ठेवण्याच्या फ्रान्सच्या राष्ट्र-संरक्षक धोरणाशीं कॉम्रेड स्टॅलीन सहमत आहे व त्याचें महत्त्व तो ओळखतो.* थोडक्यांत फ्रेंच कम्युनिस्ट पक्षानें सरकारच्या संरक्षण योजनांस यापुढें विरोध करूं नये असा इशाराच या पत्रकानें दिला गेला होता. रशियाच्या परराष्ट्रधोरणांतील हा बदल लवकरच कोमिन्टर्नच्या धोरणांत प्रतिबिंबित झाला.

ऑगस्ट १९३५ मध्यें कोमिन्टर्नची सातवी कॉंग्रेस भरली. जर्मन पार्लमेंट जळीत खटल्यांतील आरोपी जॉर्जी डिमिट्रॉव्ह सातव्या कॉंग्रेसचा प्रमुख प्रवक्ता होता. नव्या परिस्थितीचें निवेदन करतांना समाजवादी लोकशाही शक्तींच्या स्वरूपांत बदल झाला असल्याचा दावा करून तो म्हणाला कीं, "यापुढें या शक्तींना भांडवलशाहीचे पाठीराखे म्हणणें चूक ठरेल."† कामगार संघटनांच्या दृष्टिकोणासंबंधीं चर्चा करतांना त्यानें असें स्पष्टीकरण केलें कीं, "प्रत्येक देशांत व आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत कामगार संघटनांची एकजूट घडवून आणणें हेंच आमचें उद्दिष्ट आहे. एका धंद्यांतील कामगारांची एकच युनियन असावी हेंच आमचें धोरण आहे."† वसाहतींतील कम्युनिस्ट पक्षांनींहि आपलें एकांगी धोरण सोडून राष्ट्रीय संघटनांशीं सहकार्य करावें, हिंदी कम्युनिस्ट पक्षानें राष्ट्रसभेंत प्रवेश करावा असें मार्गदर्शन करण्यांत आलें. वसाहतींतील कम्युनिस्ट विरोध

---

* स्टॅलीन : बोरिस सुव्हारीन : पान ६२१. † फॅक्ट्स ॲण्ड फिक्शन : मधु लिमये : पान २६

सौम्य करतांना युरोपीय साम्राज्यवादी राष्ट्रांशीं स्नेहसंबंध राखण्याची उत्सुकताच प्रभावी ठरली होती. बल्गेरियन नेता क्रूमाव्हप्रमाणेंच जर्मन कम्युनिस्ट नेता विल्यम पेक यानें व इतर राष्ट्रांच्या कम्युनिस्ट प्रतिनिधींनीं आपल्या पक्षांनीं फॅसिस्ट विरोधकांशीं न लढण्यांत केवढी घोडचूक केली होती याचे कबुली जबाब सातव्या कॉंग्रेसमध्यें दिले. फ्रेंच कामगारांनीं १२ फेब्रुवारीच्या संपांत दाखविलेल्या फॅसिझमविरोधी एकजुटींतून समाजवादी व कामगार एकजुटीचें वातावरण निर्माण झालें होतें. पण सातव्या कॉंग्रेसनें घटक—पक्षांना संयुक्त आघाडीसंबंधीं दिलेल्या आदेशाचें स्वरूप अधिक व्यापक होतें. फॅसिझमविरोधी राष्ट्रीय आघाड्या सर्वत्र निर्माण करण्याची कल्पना त्यामागें होती. अशा आघाड्यांतूनच फॅसिझमविरोधी आंतरराष्ट्रीय आघाडी जन्म घेणार होती. ठराव म्हणतो, “ सर्व राष्ट्रांतील कम्युनिस्टांनीं समाजवादी लोकशाही संघटना, राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठीं झटणाऱ्या चळवळी तसेंच धार्मिक, लोकशाही व शान्ततावादी गट यांच्याशीं सहकार्य करून संयुक्त आघाडी उभारली पाहिजे. ” युरोपमधील स्वातंत्र्यवादी जनता फॅसिझमचा मनापासून द्वेष करीत होती. सातव्या कॉंग्रेसनें आपलें पूर्वीचें आत्मघातकी धोरण सोडून फॅसिझमविरोधी व्यापक आघाडींत सामील होण्याची इच्छा दर्शवितांच जनतेनें या परिवर्तनाचें सहर्ष स्वागत केलें. सातव्या कॉंग्रेसच्या धोरणास त्यामुळेंच स्वातंत्र्यवादी जनतेकडून व कामगार-वर्गाकडून पाठिंबा मिळाला. पण हें मतपरिवर्तन नव्हतें. रशियाच्या संरक्षणासाठीं तसेंच व्यापक कामगार चळवळींतून उठलेल्या कम्युनिस्ट नेतृत्वास पुनः जन-संघटनेंत पाय रोवतां येऊन वाढत्या बलानें भावी कालांत बाहेर पडतां यावें या हेतूनें हें धोरण पुरस्कारिलें गेलें होतें. पश्चिम युरोपमधील उदार स्वातंत्र्यावादी भावना स्वसामर्थ्य वाढविण्यासाठीं वापरून घेण्याचा पद्धतशीर प्रयत्न लोकशाही आघाडीच्या ( Popular Front ) काळांत कम्युनिस्ट व त्यांच्या छुप्या सोवळ्या संघटना करणार होत्या.

ऑगस्टमध्यें सातवी कॉंग्रेस झाल्यावर नव्या धोरणानुसार १५ ऑक्टोबर १९३५ ला फ्रेंच कम्युनिस्ट पुढारी कॅचीन व थोरेज समाजवादी आंतरराष्ट्रसभेचे

नेते व्हँडरव्हेल्डे व ॲडलेर यांना भेटले व दोन आंतरराष्ट्रसभांत एकजूट घडवून आणण्याची इच्छा त्यांनीं बोलून दाखविली. नव्या धोरणांनुसार धार्मिक व कर्मठ राष्ट्रवादी गटांशींहि कम्युनिस्ट सलगी करूं मागत आहेत ही घटना समाजवाद्यांच्या मनांत किन्तु निर्माण करण्यास पुरेशी होती. हें धोरण संधिसाधु आहे व त्यामागील एकजुटीची भावना शुद्ध नाहीं याची समाजवादी नेत्यांना खात्री पटली होती. म्हणूनच संघटनात्मक एकजुटीस त्यांनीं सपशेल नकार दिला. पण फॅसिझमविरोधी वातावरण वाढत असतां संयुक्त प्रयत्नांस स्वतः होऊन विरोध करून अप्रियता ओढवून घेण्याची त्यांची इच्छा नव्हती. त्यांनीं घटक पक्षांना परिस्थितीनुरूप संयुक्त आघाडी उघडण्यास मुभा दिली. ७ मार्च १९३६ला हिटलरनें ऱ्हाइनलंडवर स्वारी करून व्हर्साइल तहाच्या चिंधड्या उडविल्या व सामुदायिक संरक्षणाच्या तत्त्वास प्रथम उघड सुरुंग लावला. नाझी राजवट केवळ जर्मनीचा अंतर्गत प्रश्न सोडविण्यासाठीं निर्माण झाली नसून वसाहतींसाठीं भुकेलेल्या राष्ट्रांना न्याय मिळवून देण्यासाठीं ती जन्मास आली आहे असें हिटलर लीग ऑफ नेशन्सला या आक्रमणानें बजावीत होता. फॅसिझमचें स्वरूप आंतरराष्ट्रीय आहे हें सिद्ध झालें होतें. पश्चिम युरोपपासून मध्ययुरोप अलग करण्यासाठीं ऱ्हाईनलंडचा ताबा हिटलरनें घेतला होता. पण लोकशाही राष्ट्रांनीं हें आव्हान स्वीकारलें नाहीं. हिटलरच्या आक्रमणास नैतिक अधिष्ठान आहे असेंच त्यांना वाटत असावें. आश्चर्य हें कीं इंग्लंड व फ्रान्समधील समाजवादी चळवळींनाहि या मितीस स्वतःचें स्वतंत्र परराष्ट्रीय धोरण नव्हतें. फ्रेंच सरकार हिटलरला प्रत्युत्तर म्हणून मर्यादित लष्कर भरतीचा विचार करीत आहे असें कळतांच फ्रेंच समाजवाद्यांनीं त्यास जोराचा विरोध केला. ब्रिटिश मजूर पक्षानेंहि ऱ्हाईनलंडमधील आक्रमणाविरुद्ध कोणतीहि कडक उपाययोजना करण्यास विरोध केला. फ्रान्समधील वाढत्या अंतर्गत फॅसिस्ट शक्तींना धडा शिकविण्यासाठीं फ्रेंच कामगारांनीं १९३४ मध्यें सार्वत्रिक संप केला होता. पण खुद्द हिटलरनें ऱ्हाईनलंडवर स्वारी केली तेव्हां सामुदायिक संरक्षणाच्या तत्त्वाच्या अम्मल-बजावणीची मागणी फ्रेंच समाजवादी व कामगार शक्तींनीं केली नाहीं. समाजवादी आंतरराष्ट्रसभा संख्येनें वाढली होती खरी पण परराष्ट्रीय प्रश्नांवरील एकमुखी

धोरणाच्या अभावीं ती वस्तुतः दुर्बल कशी बनली होती हें या प्रसंगीं स्पष्ट झालें. ब्रिटिश व फ्रेंच सरकारनें या काळांत शास्त्रवाढीच्या केलेल्या मामुली मागण्यांनाहि लोकसभेंत समाजवाद्यांनीं विरोध केला.

लोकशाही आघाडीच्या धोरणाचें पहिलें दृश्य फल जून १९३६ मधील फ्रेंच निवडणुकांत दृष्टोत्पत्तीस आलें. समाजवादी, कम्युनिस्ट व जहाल पक्षानें संयुक्त आघाडीच्या तिकिटावर या निवडणुका लढविल्या व त्यांत त्यांना अपेक्षे-बाहेर यश लाभलें. समाजवादी पुढारी ब्लूम यानें संमिश्र मंत्रीमंडळ बनविलें. मजुरी, कामाचे तास, कामगार हितसंवर्धक योजना यांत युरोपांतील सर्व पुढारलेल्या राष्ट्रांहून फ्रेंच कामगारवर्ग मागें पडला होता. सार्वत्रिक संप करून आपल्या नव्या सरकारकडून त्यांनीं या मागण्या पुऱ्या करून घेतल्या. मंत्रि-मंडळाला सामाजिक सुधारणांच्या कार्यक्रमावर बहुमत मिळालें नाहीं तर राष्ट्ररक्षणाची खंबीर योजना जहाल लोकसत्ताक हातीं घेईल अशी राष्ट्राची अपेक्षा होती. भांडवलदार वर्गानेंहि याच अपेक्षेनें सरकारला पाठिंबा दिला होता. स्टॅलीनची इच्छाहि फ्रेंचांच्या स्वसंरक्षणाच्या तयारींतून हिटलरला दहशत बसावी हीच होती. कामगार संपापुढें सरकार नमल्यावर भांडवलदारांनीं आपलें सहकार्य काढून घेतलें. लोकआघाडीचा विजय हा फॅसिझमविरोधी आंतरराष्ट्रीय आघाडीचा विजयहि ठरला नाहीं. ब्रिटिश परराष्ट्र नीतीस बळी पडून ब्लूम सरकारनें स्पॅनीश यादवींत हस्तक्षेप न करण्याचें धोरण स्वीकारलें तेव्हां जहाल समाजवाद्यांनीं या आघाडीस दुसऱ्या बाजूनें धक्का दिला.

स्पेनमध्यें १९३६ सालीं निवडणुका झाल्या तेव्हां समाजवादी, लोकसत्ताक पक्ष व कम्युनिस्ट यांच्या लोकशाही आघाडीला बहुमत मिळालें. या नव्या सरकार-विरुद्ध १७ जुलै १९३६ ला मुसोलिनीच्या प्रोत्साहनानें जनरल फ्रँकोनें बंड पुकारलें. लोकशाही राष्ट्रांच्या व समाजवादी शक्तींच्या परीक्षेचा हा क्षण होता. फ्रँकोनें बंड पुकारतांच कामगारांनीं स्वयंस्फूर्तीनें माद्रिद, बार्सिलोना, बिलबावो हीं मोठीं शहरें ताब्यांत घेतलीं. बराकी ओस पडल्या. निरनिराळ्या पक्षांच्या खाजगी सेना शस्त्रधारी बनल्या. स्पेनच्या सरहद्दीवरील लोकशाही आघाडीचें

नवें फ्रेंच सरकार या यादवींत कोणती भूमिका घेतें यास महत्त्व होतें. पण २५ जुलैला फ्रेंच सरकारनें स्पॅनिश सरकारला मदत देण्याची सूचना नामंजूर केली. सप्टेंबरमध्यें ब्रिटिश मजूर पक्षानें व ट्रेड युनियन्सनीं आपल्या सरकारचें हस्तक्षेप न करण्याचें धोरण उचलून धरलें. फॅसिझम आंतरराष्ट्रीय चढाई करीत असतां त्याला विरोध करण्याचें सामुदायिक संरक्षणाचें तत्त्व जसें निरुपद्रवी ठरलें होतें तसेंच लोकशाही आघाडीचें स्वरूपहि आंतरराष्ट्रीय नाहीं हें या प्रकरणांत सिद्ध झालें. फ्रँकोनें लष्करी उठाव करून स्पेनमध्यें वर्गयुद्धाची लाट निर्माण केली होती. कामगारांनीं प्रमुख शहरें ताब्यांत घेऊन त्यास प्रत्युत्तर दिलें होतें. लोकसत्ताक पक्षाचा अझाना स्पेनचा अध्यक्ष होता हें खरें पण खरी सत्ता सामुदायिक उठाव करणाऱ्या कामगार संघटनांच्या हातीं होती. त्यांनीं आपल्या सेना उभारल्या होत्या. जमिनींचें सामाजीकरण सुरू केलें होतें. कामगार-क्रान्तीचें नेतृत्व पी. ओ. यू. एम् कडे ( कामगार एकजुटीचा मार्क्सवादी पक्ष ) होतें. पण स्टॅलीनला नव्या परिस्थितींत कामगारक्रान्तीची गरज नव्हती. सातव्या कॉंग्रेसचें धोरण व्यापक लोकआघाडीचें होतें.

१९३१ मध्यें राजेशाहीविरुद्ध लोकसत्ताक क्रान्ति झाली तेव्हां सहाव्या कॉंग्रेसच्या धोरणानुसार स्पॅनीश कम्युनिस्टांनीं त्या क्रान्तींत भाग घेतला नव्हता एवढेंच नव्हे तर ज्या समाजवादी व कामगार संघटनांनीं त्यांत भाग घेतला त्यांना द्रोही ठरविलें होतें. भांडवलशाहीचे हस्तक म्हणून त्यांची संभावना करून कामगारांना स्वतंत्र सोव्हिएट स्थापण्यास कम्युनिस्टांनीं आवाहन केलें होतें. नीन, मॉरीन हे मार्क्सवादी कम्युनिस्ट त्यावेळीं पक्षांतून फुटले व त्यांनीं लोकसत्ताकाच्या लढ्यास पाठिंबा दिला. पी. ओ. यू. एम्. हा नवा पक्ष स्थापन केला गेला. १९३६ च्या क्रान्तींत स्टॅलीनप्रणीत स्पॅनीश कम्युनिस्ट पक्ष व पी. ओ. यू. एम् यांनीं बरोबर विरोधी भूमिका घेतल्या. कामगारक्रान्तींतूनच फ्रँकोच्या लष्करास विरोध करण्याची ऊर्मि व शक्ति जनतेंत निर्माण होईल असें पी. ओ. यू. एम्. म्हणत होता तर १९३१ मध्यें विरोध केलेल्या भांडवल-शाहीनिष्ठ लोकसत्ताक सरकारचें संरक्षण करणें हेंच आपलें एकमेव कार्य आहे

असें कम्युनिस्ट पक्ष म्हणत होता. नोव्हेंबरमध्यें तटस्थतेचा त्याग करून स्टॅलीननें स्पेन सरकारला मदत करण्यास सुरवात केली तेव्हां तटस्थ फ्रान्स व ब्रिटनपेक्षां रशियाचें वजन स्पॅनीश सरकारच्या दरबारीं वाढलें. दुबळ स्पॅनीश कम्युनिस्ट पक्ष एकदम अंतर्गत राजकारणांत वरचढ बनला. मदतीची किंमत म्हणून रशियानें समाजवाद्यांना सरकारमधून हुसकावून लावण्याची मागणी केली. कित्येकांची धरपकड झाली. कामगारांनीं स्थापन केलेल्या कामगार–सैनिक–समित्या बरखास्त करण्यांत आल्या. १९३६ च्या मे मध्यें कम्युनिस्ट व बार्सिलोनामधील कामगार समित्यांत सशस्त्र चकमकी झाल्या. कम्युनिस्टांच्या नेतृत्वाखालीं सरकारी फौजांनीं या समित्यांचा पाडाव केल्यावर शस्त्रसंधि झाला. फ्रँकोशीं संगनमत केल्याच्या आरोपाखालीं पी. ओ. यू. एम्. चे नेते व कामगार समित्यांचे प्रमुख यांना अटक करण्यांत आली व त्यांची माद्रिदला रवानगी झाली. उघड खटले कधींच भरले गेले नाहींत; पण थोड्याच दिवसांत माद्रिदच्या रस्त्यावर ॲन्द्रे नीनचें प्रेत पडलेलें आढळलें. कम्युनिस्ट नेतृत्वाखालीं लोकसत्ताकाच्या रक्षणाच्या नांवाखालीं कामगार–क्रान्ति दडपून टाकण्यांत आली होती. रशियाच्या मदतीनें माद्रिदचा पाडाव लांबला होता; लोकशाही सरकारांनीं स्पेनला मदत केली नाहीं तरी स्वातंत्र्यवादी जनता आंतरराष्ट्रीय तुकडींत सामील होऊन माद्रिदचें रक्षण करीत होती.

जुलै १९३७ मध्यें प्रथमच ब्रिटिश मजूर पक्षानें सरकारच्या तटस्थतेच्या धोरणाचा धिःक्कार केला. सामुदायिक संरक्षणाचें तत्त्व कार्यान्वित करून ब्रिटिश सरकारनें स्पेनच्या मदतीस ताबडतोब धांवावें या मागणीभोंवतीं पक्ष जनमत संघटित करूं लागला. फ्रेंच समाजवादी पक्षांतील एक गट प्रथमपासूनच स्पॅनीश सरकारला फ्रेंच सरकारनें मदत करावी अशा मताचा होता. आतां त्याचे हात बळकट झाले. ॲबिसीनियावर चढाई करणाऱ्या इटलीविरुद्ध नाकेबंदी करण्याच्या लीग ऑफ नेशन्सच्या धोरणास युरोपमधील बहुसंख्य समाजवाद्यांनीं पाठिंबा देऊन, 'कोणत्याहि परिस्थितींत शान्तता' या आंतरराष्ट्रसभेच्या परंपरागत धोरणास मुरड घातली होती. आतां स्पॅनीश यादवींत हस्तक्षेप करण्याची

मागणी करून त्यांनीं एक पाऊल पुढें टाकलें. १९३५–३६ मध्यें शस्त्रास्त्रवाढ व स्वसंरक्षणाचा कार्यक्रम हिटलरला डिंवचण्यास कारणीभूत होईल अशी भूमिका ते घेत होते तर फॅसिझमचा धोका वाढूं लागला तशी या प्रश्नासंबंधींची भूमिकाहि त्यांनीं बदलली. फॅसिस्ट हिंसेला व आक्रमणाला शस्त्रानेंच प्रत्युत्तर दिलें पाहिजे व आधुनिक मक्तेदारी भांडवलशाहीला शह देण्यासाठीं जननिष्ठ योजनाबद्ध अर्थव्यवस्था स्वीकारली पाहिजे अशी स्पष्ट भूमिका युरोपीय समाजवाद्यांनीं आतां स्वीकारली. वर्गहितापलीकडे जाऊन व्यापक राष्ट्रहिताकडे लक्ष पुरविण्याची शिकवण कामगारवर्गास मिळूं लागली. समाजवादी पक्ष आपलें स्वतंत्र परराष्ट्रीय धोरण आंखून आपल्या सरकारला विरोध करूं लागले होते. पण हा इष्ट बदल फलद्रूप होण्याइतकी उसन्त समाजवादी शक्तींना आतां लाभली नाहीं. हिटलरनें युरोपमध्यें एकामागून एक सुरू केलेल्या आक्रमणामुळें युरोप हादरून गेलें. प्रत्येक राष्ट्रास आपलें स्वसंरक्षण कसें होईल याकडे सर्व लक्ष पुरवावें लागलें. स्पॅनीश यादवीवर केन्द्रित झालेलें जनतेचें लक्ष उडालें. स्वसंरक्षणाची विवंचना लागलेल्या जनतेला आतां स्पेनला मदत पाठवून फॅसिझमविरोधी आंतरराष्ट्रीय आघाडी मजबूत करण्याच्या कार्यक्रमाबद्दल फारशी उत्सुकता राहिली नव्हती. १९३९ च्या जानेवारींत फ्रँको विजयी होऊन स्पॅनीश क्रान्तीचें पर्व इतिहासजमा झालें.

फॅसिझमच्या वाढीच्या काळांत ज्या कारणास्तव समाजवादी आंतरराष्ट्रसभेचें धोरण निष्प्रभ ठरलें होतें त्याच कारणास्तव विजयी फॅसिस्टांच्या आक्रमणाच्या काळांत सातव्या कॉंग्रेसचें कम्युनिस्ट धोरणहि अखेर अयशस्वी ठरलें. सामुदायिक संरक्षणाचें धोरण विषम व अन्याय्य स्थिति टिकवूं मागत होतें. व्हर्साईल तहाच्या पायावर आधारलेली शान्तता भीषण अशान्ततेस बोलावणें करीत होती. रशिया लीग ऑफ नेशन्समध्यें येऊन अगर सामुदायिक संरक्षणांत भागीदार बनून युरोपचें भवितव्य बदलणार नव्हतें. अशा परिस्थितींत हिटलरला कांहीं देश ताब्यांत घेऊं देऊन त्याच्यापुढें नमतें घेण्याचें धोरण आपल्या सरकारवर लादण्याचा प्रयत्न भांडवलदार वर्गांनीं केला. पण या

दुर्बलतेची जाणीव हिटलरला होतांच तो अधिक आक्रमक बनला. १९३७ नंतर समाजवादी व कामगारशक्ती या नमतें घेण्याच्या धोरणास सक्त विरोध करूं लागल्या होत्या. पण कोणतीहि किंमत देऊन शान्तता टिकविण्याचें त्यांनीं धिक्कारलेलें धोरण आतां सरकार व इतर गटांनीं स्वसंरक्षणाच्या भीतीनें स्वीकारलें होतें. अखेर म्यूनिच येथें २७ सप्टेंबर १९३८ रोजीं ब्रिटन, फ्रान्स, इटली व जर्मनी या चार राष्ट्रांमध्यें कुप्रसिद्ध म्यूनिच करार झाला. इटली, जर्मनी व जपान यांनीं उघडलेल्या कोमिन्टर्नविरोधी आघाडीला प्रत्युत्तर म्हणून रशियानें फ्रान्स, झेकोस्लोव्हाकिया या राष्ट्रांबरोबर परस्पर सहकार्याचे करार केले होते. ही परराष्ट्रीय नीति यशस्वी करण्यासाठींच सातव्या कॉंग्रेसनें लोकशाही आघाडीचें धोरण पुरस्कृत केलें होतें. पण म्यूनिच करारानें ही आघाडी तुटली. स्टॅलीनचा प्रधान हेतू सफल झाला नाहीं. तरी सुद्धां कांहीं प्रमाणांत सातव्या कॉंग्रेसच्या धोरणाचा फायदा रशियाला मिळालाच. रशियाबद्दल पश्चिम युरोपमधील जनतेच्या मनांत नवा आदर निर्माण झाला. तुलनात्मक दृष्ट्या समाजवाद्यांचें बल कमी होऊन कम्युनिस्टांबद्दलची आपुलकी वाढली. ज्या संकटांच्या वेळीं फ्रान्सनें दगा दिला तेव्हां रशिया सहकार्यास तयार होता ही गोष्ट झेकोस्लोव्हाकियांतील जनता विसरली नाहीं. ब्रिटिश व फ्रेंच सरकारनें म्यूनिच करार केला असला, तात्पुरती शान्तता लाभली म्हणून जनतेनें निश्वास सोडला असला, तरी जागृत जनता आणि कामगार व समाजवादी शक्ती फॅसिझमला कडवा विरोध करून सरकारच्या धोरणावर दडपण आणीत होत्या. या जागृत शक्ती व रशिया यांचे प्रयत्न परस्परपूरक ठरतात कीं नाहीं, त्यांची फॅसिझमविरोधी खरीखुरी संयुक्त आघाडी निर्माण होते कीं नाहीं यावरच दुसऱ्या महायुद्धाचें भवितव्य अवलंबून होतें.

• • •

: १७ :

# दुसरें महायुद्ध : साम्राज्यशाही कीं लोकशाही ?

**मार्च** १९३९ मध्यें सुडाटेन भागांतून जर्मन फौजांनीं उरलेल्या झेकोस्लोव्हाकियावर आक्रमण केलें व म्यूनिच कराराच्या चिंधड्या उडविल्या. हिटलरला संतुष्ट करण्याचें ब्रिटिश व फ्रेंच राज्यकर्त्या वर्गाचें धोरण या नव्या आक्रमणानें हादरलें. युद्ध अटळ असेल तर शरणागतीचें धोरण कशासाठीं असा प्रश्न जनता विचारूं लागली. समाजवादी शक्तीहि आपल्या सर्व बलानिशीं फॅसिझमविरोधी कणखर धोरण स्वीकारण्यास राज्यकर्त्या वर्गावर दडपण आणीत होत्या. मार्चअखेर ब्रिटिश पंतप्रधान चेंबरलेननें आपल्या नमत्या धोरणाचा त्याग करून फॅसिझमविरोधी शक्तींच्या जोरदार मागणीस अधिकृत पाठिंबा दिला. हिटलरनें पोलंडवर हल्ला केल्यास युद्ध अनिवार्य आहे असा स्पष्ट इशारा त्यानें हिटलरला आपल्या भाषणांत दिला. जेव्हां लोकशाही राष्ट्रांतील राज्यकर्ता वर्ग हिटलरपुढें नमतें घेत होता तेव्हां रशियन परराष्ट्रीय खातें व कोमिन्टर्न समाजवादी चळवळींना व फॅसिझमविरोधी स्वातंत्र्यवादी जनतेस आपल्या सरकारवर दडपण आणण्यास सतत उद्युक्त करीत होते. या धोरणास अखेर यश येऊन म्यूनिच

अवस्था संपुष्टांत आली तेव्हां फॅसिस्टविरोधी जनता, लोकशाही राष्ट्रें व रशिया यांची अभेद्य एकजूट आतां सहजसुलभ बनेल व फॅसिझमविरोधी युद्धांत पश्चिम व पूर्व आघाडीवरून जर्मन लष्करी सत्तेवर निर्णायक हल्ले चढवितां येतील या आनंदांत होती. १९३५ पासून १९३९ पर्यंत सर्व कम्युनिस्ट वाङ्मय व चळवळी साम्राज्यवादी ब्रिटन व रुझवेल्टची अमेरिका यांचा लोकशाही राष्ट्रें म्हणूनच गौरव करीत होत्या. युद्धाचें स्वरूप लोकशाहीविरुद्ध फॅसिझमचें आहे असा प्रचार करीत होत्या. रशिया व लोकशाही राष्ट्रांच्या संयुक्त आघाडीची मागणी करीत होत्या. आंतरराष्ट्रीय समाजवादी व कम्युनिस्ट चळवळी फॅसिझम-विरोधी चळवळी बनल्या होत्या. पण कम्युनिस्ट चळवळीनें फॅसिझमविरोधी लढा तात्त्विक निष्ठेनें उभारला नव्हता, रशियन हितरक्षणाचा एक डावपेंच म्हणून त्यांनीं ती मोहीम हातीं घेतली होती, हें सत्य युरोपीय जनतेस व समाज-वाद्यांस कटु वाटत होतें, काल्पनिक वाटत होतें. पण कांहीं महिन्यांतच हें सत्य भीषण स्वरूपांत जगापुढें आलें.

लोकशाही राष्ट्रांतील राज्यकर्ता वर्ग हिटलरशीं निश्चितपणें पोलंडच्या प्रश्नावर लढणार आहे याची खात्री रशियन परराष्ट्रखात्याला व स्टॅलीनला पटतांच त्यांनीं आक्रमक हिटलरला अनाक्रमणाच्या करारानें पूर्व आघाडी सुरक्षित करून देऊन लोकशाही राष्ट्रांवर चाल करून जाण्यास रस्ता मोकळा करून दिला. अशा युद्धांत फ्रान्स, इंग्लंड एका बाजूनें व जर्मनी, इटली दुसऱ्या बाजूनें अशीं चार राष्ट्रें व अमेरिका फ्रान्सच्या मदतीस आल्यास हीं सर्व पांच राष्ट्रें एकमेकांविरुद्ध लढून दुर्बल बनतील व रशियाचें संरक्षण होईल एवढेंच नव्हे तर जगांत तें सर्वांत प्रबल राष्ट्र बनेल अशी रशियन परराष्ट्र-खात्याची व स्टॅलीनची नवी मनोभूमिका होती. स्टॅलीननें स्वराष्ट्रहितरक्षणाच्या दृष्टीनें हा मुत्सद्देगिरीचा डाव खेळणें चूक ठरलें नसतें. पण त्यास प्रथम फॅसिझमविरोधी व नंतर साम्राज्यशाहीविरोधी तात्त्विक अधिष्ठान देण्यांत, कोमिन्टर्ननें त्याच तत्त्वविवेचनाची भाटगिरी करण्यांत व युरोपीय स्वातंत्र्यवादी जनतेनें तिचा स्वीकार करण्यांत, तत्त्वनिष्ठेच्या ठिकऱ्या उडाल्या होत्या.

समाजवादी तत्त्वनिष्ठेचा व भावनांचा होम स्वार्थरक्षणार्थ झाला होता. २३ ऑगस्ट १९३९ रोजीं नाझी–सोव्हिएट अनाक्रमणाचा करार झाला व १ सप्टेंबरला जर्मनीनें पोलंडवर स्वारी केली. तीन सप्टेंबरला महायुद्ध सुरू झालें. रशियन परराष्ट्रखात्याची मनीषा तात्पुरती पुरी झाली होती. कोमिन्टर्न रशियाच्या परराष्ट्रखात्याचा एक जागतिक विभाग आहे ही गोष्ट तिच्या धोरणांतील, 'घूम जाव' मुळें पुनश्च शंभर टक्के सिद्ध होणार होती. रशियाचें हित नाझी सोव्हिएट करारानें साधलें खरें पण १९३४ नंतर ज्या शौर्यानें जर्मन कम्युनिस्ट चळवळ समाजवाद्यांच्या खांद्यास खांदा लावून हिटलरविरुद्ध लढली होती त्या कम्युनिस्ट चळवळीचें हिटलरला उखडून टाकण्याचें कार्य थोडेंच पुरें झालें होतें !

"साम्राज्यशाही युद्धांत जनतेचा शत्रु स्वतःच्या देशांतील स्वतःचा राज्यकर्ता वर्ग असतो" हें साम्राज्यशाही युगासंबंधींचें लेनीनचें तत्त्वज्ञान त्याचेच जर्मन पूजक आतां पायाखालीं तुडविणार होते. जर्मन कम्युनिस्ट नेते 'आपला खरा शत्रू आपल्या राष्ट्राच्या बाहेर' असा प्रचार करणार होते. स्वित्झर्लंडसारख्या तटस्थ देशांत निघणाऱ्या अधिकृत मुखपत्रांत, Die Welt च्या २ फेब्रुवारी १९४० च्या अंकांत, जर्मन कम्युनिस्ट पुढारी वॉल्टर अब्रिश्टनें लिहिलें, "दोस्त राष्ट्रांना पाठिंबा देण्याचें धोरण गुन्हेगारी आहे, कारण ग्रेटब्रिटन ही जगांतील सर्वांत प्रतिगामी शक्ति आहे." * १२ मे १९४० ला न्यूयॉर्क 'संडे वर्कर' या कम्युनिस्ट नियतकालिकांत प्रसिद्ध झालेल्या लेखांत कोमिन्टर्नचा अध्यक्ष जॉर्जी डिमिट्राव्ह यानें लिहिलें कीं, "फ्रेंच, ब्रिटिश दारुगोळ्यांनीं लहान राष्ट्रांचा कणा मोडला जात आहे. स्कँडिनेव्हियन राष्ट्रांची तटस्थता ते भंगून टाकीत आहेत. त्यांस प्रत्युत्तर म्हणून हिटलरनें डेन्मार्क व नॉर्वेचा भाग पादाक्रान्त केला आहे." ‡ एकदां कोमिन्टर्न हिटलरच्या आक्रमणाचें समर्थन करूं लागल्यावर, जर्मन कम्युनिस्ट पक्ष हिटलरहून ब्रिटनला जगाचा मोठा शत्रू मानूं लागल्यावर, हिटलरला निराळ्या युद्धप्रचाराची गरजच उरली नव्हती.

* सोशलिझम ॲण्ड नॅशनल रेव्होल्यूशन : आचार्य नरेन्द्र देव : १३९

‡ सोशलिझम ॲण्ड नॅशनल रेव्होल्यूशन : पान १४०

दोस्त राष्ट्रांतील कम्युनिस्ट पक्षांनींहि फॅसिझमविरोधी आघाडींस भगदाड पाडून युद्धविरोधी धोरणाचा पुरस्कार केला. हें युद्ध साम्राज्यशाही आहे व साम्राज्यशाही युद्धांत जनतेनें स्वराष्ट्रांतील भांडवशाहीविरुद्ध लढलें पाहिजे अशी कर्मठ मार्क्स-लेनीनवादी भूमिका त्यांनीं घेतली. फॅसिझम हा जागतिक स्वातंत्र्याचा शत्रु आहे हा कित्येक वर्षे जनतेंत केलेला प्रचार ते आतां नव्या प्रचारानें धुवून काढणार होते. आपल्या अधःपतनाचें परिमार्जन करणार होते. जपानशीं युद्ध सुरू असतांहि चिनी कम्युनिस्ट नेता माओ यानें या काळांत 'एशिया' मासिकांत लिहिलेल्या एका लेखांत हिटलर शान्ततावादी आहे व ब्रिटन आदि साम्राज्यशाही राष्ट्रेंच आक्रमक आहेत अशी भूमिका मांडली. अर्ल ब्राऊडर या अमेरिकन कम्युनिस्ट नेत्यास जून १९३९ मध्यें भर सभेंत एका प्राध्यापकांनीं "तुम्हांस नाझी सोव्हिएट कराराची शक्यता वाटते का?" असा प्रश्न विचारला होता. तेव्हां ब्राउडरनें उत्तर दिलें होतें कीं, "मी अमेरिकन चेंबर ऑफ कॉमर्सचा अध्यक्ष होण्याची जेवढी शक्यता आहे तेवढीच या कराराची शक्यता आहे!" * थोडक्यांत, ही गोष्ट कालत्रयीं शक्य नाहीं असेंच उत्तर त्यानें दिलें होतें. पण दोन महिन्यांत तसा करार झाला, एवढेंच नव्हे तर अमेरिकन पक्ष त्याची तरफदारी करूं लागला होता. सारांश, ऑगस्ट १९३९ ते २२ जून १९४१ पर्यंत कोमिन्टर्न फॅसिस्ट राष्ट्रांत दोस्तांचें शत्रुत्व करून हिटलरचें समर्थन करीत होती तर साम्राज्यशाही राष्ट्रांत व तिच्या वसाहतींत जोरदार युद्धविरोधी चळवळ उभारीत होती. स्टॅलीनच्या व रशियन परराष्ट्रखात्याच्या उद्दिष्टपूर्तीसाठीं फॅसिस्ट राष्ट्रांतील फॅसिझमविरोधी कम्युनिस्ट चळवळ बळी देण्यांत आली होती; नव्हे तेवढ्यानेंहि भागलें नाहीं.

जपाननें १९०५ सालीं पोर्ट ऑर्थर बंदर ताब्यांत घेऊन झारच्या रशियाचा पाडाव केला तेव्हां लेनीननें 'पोर्ट ऑर्थरचा पाडाव' हा लेख लिहून जपानच्या यशाबद्दल आनंद व्यक्त केला होता. त्यानें लिहिलें होतें कीं, "या जपानच्या विजयाबद्दल रशियन कामगारवर्गास आनंद होत आहे.

* मेन ॲण्ड पॉलिटिक्स : लुई फिशर : पान ६०९.

पुरोगामी जपाननें प्रतिक्रान्तिवादी युरोपवर केलेला हा हल्ला आहे." * पण त्याच लेनीनचा 'वारसदार' स्टॅलीन २ सप्टेंबर १९४५ रोजीं जपान शरण आल्यावर साजऱ्या केलेल्या विजयोत्सव प्रसंगीं केलेल्या भाषणांत म्हणाला कीं, "१९०४–५ च्या युद्धांत जपाननें रशियन सैन्याच्या केलेल्या पराभवाच्या भीषण स्मृति आमच्या लोकांच्या मनांत शिल्लक राहिल्या होत्या. आपल्या देशावर तो कलंक होता. आपली जनता विश्वासानें त्या दिवसाची वाट पाहात होती कीं ज्या दिवशीं जपानी सैन्याचा धुव्वा उडवून तो कलंक नाहींसा होईल. आम्ही जुन्या पिढींतील माणसें गेलीं ४० वर्षें या क्षणाची वाट पाहात होतों. आज तो दिवस उगवला आहे." * लेनीन व स्टॅलीन यांच्या मनोवृत्तींतील फरकाचें हें भेदक उदाहरण स्टॅलीननें १९३९ ते ४१ सालीं ज्या लष्करी चढाया केल्या त्यांमागील त्याची वृत्ति स्पष्ट करण्यासाठीं येथें दिलें आहे. जून १९३० मध्यें स्टॅलीननें घोषणा केली होती कीं "सोव्हिएटच्या आजच्या चतुः-सीमेबाहेरील एक इंच जमीनहि रशियाला नको आहे, पण आमची एक इंच जमीनहि आम्ही कोणास घेऊं देणार नाहीं." † १९३९ पर्यंत या स्टॅलीनच्या या घोषणेचा पुनरुच्चार कम्युनिस्ट चळवळीनें अनंत वेळा केला होता. सरहद्दीवरील राष्ट्रांना स्पष्ट आश्वासन देण्यांत आलें होतें. या नऊ वर्षांत रशियाच्या सरहद्दीवरील फिनलंड, पोलंड हीं राष्ट्रें फॅसिस्टवजा हुकुमशाही सत्तेखालीं नांदत असूनहि लेनीनग्राडच्या सरहद्दीवरील या सत्तांपासून रशियाच्या संरक्षणास धोका आहे अशी ओरड रशियानें एकदांहि केली नव्हती. पण हिटलरनें पोलंडवर स्वारी केल्यापासून दोन आठवड्यांच्या आंत स्टॅलीनच्या लाल फौजा स्वतंत्र पोलंडच्या हद्दींत घुसल्या. स्वराष्ट्राचें रक्षण करणाऱ्या पोलीश स्वातंत्र्यवादी जनतेला लाल सैन्यानें कंठस्नान घातलें. ३० नोव्हेंबरला फिनलंड-मध्यें लाल सेना घुसल्या. स्वातंत्र्यवादी फिनीश जनतेचा प्रतिकार लाल सेनेनें आपल्या प्रबल लष्करी सामर्थ्यावर झोडपून काढला. डी. एन्. प्रिटसारख्या

* थ्री हू मेड ए रेव्होल्यूशन : बे. वूल्फ : पान २७९ † मेन् अॅण्ड पॉलिटिक्स : पान ६२१

इंग्लिश स्टॅलीनभक्तांना आतां लेनीनच्या स्वातंत्र्य, स्वयंनिर्णयाची आठवण राहिली नव्हती. हिटलरपासून पोलीश व फिनीश जनतेची मुक्तता करण्याचें महान् पुण्यकर्म व हिटलरला रशियाच्या चतुःसीमेपासून दूर ठेवण्याचें चतुर धाडसी कार्य स्टॅलीननें केलें आहे असें आतां या आक्रमणाचें समर्थन करण्यांत आलें. पण या ' पुण्यकर्माचे ' उपकार पोलीश फिनीश जनतेनें मानावयाचे होते, इंग्लिश बॅरिस्टर डी. एन्. प्रिटनें नव्हे !!

नाझी सोव्हिएट कराराचा वर्षदिन साजरा करतांना २३ ऑगस्ट १९४० च्या अंकांत सोव्हिएट मुखपत्र प्रवदानें लिहिलें कीं ' या करारानें जर्मनीला पूर्व आघाडीवर शांतता मिळवून दिली. ' केवळ शान्तताच नव्हे तर या काळांत रशियानें जर्मनीला, जर्मनीच्या मित्र राष्ट्रांना स्वतःच्या सरहद्दींतून मदत पोहोंचवूं दिली. स्वतःच्या राष्ट्रांतील तेल, दाणा, कापड, लोखंड व इतर माल खुद्द रशियानें जर्मनीला दिला. रशियांतील फॅसिझमविरोधी जहर प्रचार एका फतव्यानें बंद झाला. साम्राज्यशाही राष्ट्रांविरुद्ध तितक्याच जोरानें प्रचार करण्यांत ती शक्ति यापुढें खर्ची पडूं लागली. रशियांतील बंदिस्त जर्मन हेर व जर्मनीच्या हातीं असलेले कम्युनिस्ट पुढारी यांची देवाण घेवाण झाली. ६ नोव्हेंबर १९४० ला मात्स्या रॅकोसी हा हंगेरीयन नेता या अदलाबदलीनुसार रशियांत येऊन दाखल झाला. जर्मनीची वारी करून आल्यावर मोलोटाव्हनें ' युद्धाचें स्वरूप साम्राज्यशाही आहे व लंडन, फ्रान्स हीं राष्ट्रें आक्रमक आहेत ' असा सिद्धांत कोमिन्टर्नच्या मार्गदर्शनासाठीं प्रसृत केला. १९४१ च्या एप्रिलमध्यें पॅरीस पडल्यावर स्वातंत्र्यवादी फ्रेंच जनतेनें व समाजवादी चळवळींनीं प्राणपणास लावून भूमिगत चळवळ सुरू केली होती. फ्रान्स पादाक्रांत केलेल्या जर्मन लष्कराविरुद्ध विध्वंसक मोहीम सुरू झाली पण फ्रेंच कम्युनिस्ट त्यांत सामील झाले नाहींत. पॅरीसचा पाडाव हा एका साम्राज्यसत्तेचा पराजय आहे असें ते मानीत होते.

२२ जून १९४१ ला हिटलरनें रशियावर स्वारी केली तेव्हां १९३९

नंतरचें रशियन परराष्ट्रीय धोरण संपुष्टांत आलें. रशिया स्वसंरक्षणार्थ शौर्यानें लढूं लागला एवढेंच नव्हे तर जागतिक युद्धाचें स्वरूपच या एका घटनेनें लोकशाही बनलें आहे असा प्रचार पुनश्च रशियनप्रणीत जागतिक कम्युनिस्ट चळवळ करूं लागली. रशियन जनतेच्या दृष्टीनें हें युद्ध हिटलरच्या आक्रमणा-बरोबर लोकयुद्ध बनलें असेलहि, पण फ्रान्स, ब्रिटन, अमेरिका हीं साम्राज्यवादी राष्ट्रेंहि या घटनेमुळें एकदम लोकशाही कशीं काय बनलीं? 'या देशांतील जनतेनें स्वराष्ट्रांतील शत्रूंविरुद्ध लढावें' ही सैद्धान्तिक बैठक कशी ढांसळली? व विशेषतः साम्राज्य टाचेखालील वसाहतींतील स्वातंत्र्यवादी जनतेच्या दृष्टीनें हें युद्ध 'लोकयुद्ध' कसें बनलें? पहिल्यापासून स्वराष्ट्र रक्षणार्थ आपल्या सरकारच्या पाठीशीं उभ्या राहिलेल्या समाजवादी शक्ती निदान आपल्या देशांतील भांडवलदार व साम्राज्यवादी वर्गाची स्तुति तरी करीत नव्हत्या. स्वराष्ट्र रक्षणाचें कर्तव्य पार पाडीत असतां वसाहतींतील स्वातंत्र्यवादी लढ्यांची त्यांनीं निर्भर्त्सना केली नाहीं. हिंदी स्वातंत्र्यवाद्यांस १९४२ चा लढा करूं नका म्हणून दडपण आणलें नाहीं. पण रशियावर जर्मन लष्करी सत्तेचे प्रहार सुरू होतांच साम्राज्य-वादी राष्ट्रांतील कम्युनिस्ट स्टॅलीनप्रमाणेंच चर्चिल–रूझवेल्टचा, पॅरीसमधील जनतेच्या स्वातंत्र्यप्रेमाचा, साम्राज्यवादी सत्तांच्या लोकशाही निष्ठेचा उदो उदो करूं लागले. साम्राज्य सरकारशीं हातमिळवणी करून वसाहतींतील स्वातंत्र्य–लढ्यास विरोध करूं लागले. युद्धोत्पादन करून देशी भांडवलदार–वर्ग नफ्याच्या तुंबड्या भरीत असतां व धान्य कपड्याचे भाव कडाडले असतां कामगारवर्गास संप करणें हा देशद्रोह आहे, पोटाला चिमटा घेऊन उत्पादन वाढवा, असा उपदेश करूं लागले. स्टॅलीनला चर्चिल रूझवेल्टची मदत हवी होती म्हणून दोस्त राष्ट्रांतील कम्युनिस्ट आतां चर्चिलचे खुषमस्करे व वसाहतींतील भांडवलदार-वर्गाचे बिनपगारी कामगार–संपर्क–नोकरदार बनले होते. जेव्हां आर्थिक संप यशस्वी होण्याची शक्यता होती तेव्हां कामगारवर्गास संप करूं नका असा आदेश ते देत होते व जेव्हां स्वातंत्र्यलढ्यास अनुकूल संधि होती, नव्हे लेनीनच्या शब्दांत जनतेचें तें ऐतिहासिक कार्य होतें, तेव्हां ते स्वातंत्र्यलढ्याची चळवळ ही देशद्रोही चळवळ आहे असा पुकार करूं लागले.

रशियापेक्षांहि कोमिन्टर्न नियंत्रित स्वदेशांतील कम्युनिस्टांबद्दल स्वातंत्र्यवादी जनतेच्या मनांत या काळांत अढी निर्माण झाली. १९४० मध्यें अमेरिकन कम्युनिस्ट पक्षानें 'साम्राज्यशाही युद्धास अगर लष्करवाढीस एक बंदूक, एक माणूस अगर एक पैहि देऊं नका' असें आपल्या जाहीरनाम्यांत म्हटलें होतें. हुकुमशाही राष्ट्रांतील जनतेला कालची घोषणा आज विसरण्याची सवय हुकुमशहा लावतात. हिटलरनें व स्टॅलीननें नाझी सोव्हिएट कराराच्या काळांत त्याचें प्रात्यक्षिक दाखविलें होतें. पण दोस्त राष्ट्रांतील जनता इतक्या सहजासहजीं कम्युनिस्टांनीं केलेला विश्वातघात विसरूं शकली नसती. पण स्टॅलीनला तर नव्या परिस्थितींत दोस्त राष्ट्रांतील जनतेचें सहकार्य हवें होतें. तेव्हां स्टॅलीननें दोस्त सरकारें व जनता यांचा विश्वास संपादन करण्यासाठीं एक पाऊल पुढें टाकलें. २२ मे १९४३ ला कोमिन्टर्नच्या कार्यकारी समितीनें कोमिन्टर्न बरखास्त करण्याची शिफारस केली. समितीचा ठराव म्हणतो, "युद्ध सुरू होण्याच्या फार पूर्वीपासून हें अधिकाधिक स्पष्ट होऊं लागलें होतें कीं आंतरराष्ट्रीय संबंधांतील गुंतागुंत लक्षांत घेतां प्रत्येक देशांतील कम्युनिस्ट चळवळीला आपले प्रश्न सोडविण्यास एक मध्यवर्ती आंतरराष्ट्रीय संघटना-केन्द्र अडथळा होऊन बसतें...प्रत्येक देशाच्या ऐतिहासिक परिस्थितीचे भिन्न मार्ग, समाजव्यवस्थेंतील अंतर्गत विरोधांचें भिन्न स्वरूप, आर्थिक व सामाजिक प्रगतीची भिन्न पातळी व वेग व विशेषतः कामगारवर्गाची जागृति व संघटना यांतील कमी अधिक फरक, या सर्व कारणांमुळें भिन्न भिन्न देश तील कामगारवर्गापुढील प्रश्न आज एकस्वरूप राहिलेले नाहींत. त्या प्रश्नांनीं विशेष स्वतंत्र स्वरूप धारण केलें आहे." * थोडक्यांत, आंतरराष्ट्रीय क्रान्तीच्या अभावीं तिची ऐतिहासिक गरज संपली होती. अर्थात् ती बरखास्त करूनहि स्टॅलीन व रशियाचे अंधश्रद्ध त्यांच्या परराष्ट्र धोरणाचें समर्थन भावी कालांतहि करीत राहातील याची त्यांना खात्री असल्यामुळें ती अधिकृतरीत्या बरखास्त करून एक नवा विश्वास संपादन करण्यांत स्टॅलीनचें नुकसान तर कांहींच नव्हतें, उलट फायदाच होता.

* सोशल ॲण्ड इकॉनमिक मूव्हमेंट्स : पान ४६५

आंतरराष्ट्रसभेला युरोपीय कामगारवर्गाचें पुढारीपण घेण्यांत, पुढारलेल्या देशांत क्रान्ति घडून आणण्यांत अगर वसाहतींतील स्वातंत्र्यवादी शक्तींचें शाश्वत सहकार्य मिळविण्यांत संपूर्ण अपयश आलें होतें. आंतरराष्ट्रीय संघटना पुढारलेल्या, सधन व गरीब, उद्योगप्रधान व कृषिप्रधान समाजांना एकाच संघटना सूत्रांत गोवूं शकत नाहींत याची कबुली विसर्जनाच्या ठरावांतच देण्यांत आली होती. कार्यकारी समितीची शिफारस म्हणजे आज्ञाच होती. तेव्हां २२ मे १९४३ रोजींच आंतरराष्ट्रसभा अधिकृतरीत्या बरखास्त झाली; नव्हे जगाच्या दृष्टीनें व जाहीरपणें कोमिन्टर्ननें यापुढें आपला कारभार चालविला नाहीं.

१९४३ नंतर युद्धकाळांतहि कांहीं प्रादेशिक केंद्रांमार्फत कम्युनिस्ट चळवळींचें मार्गदर्शन अर्थातच होत राहिलें. अतिपूर्व चळवळींचें प्रथम येनानहून व नंतर मांचुरियांतून, मुस्लिम राष्ट्रांतील चळवळींचें लेबेनानमधील बीरुटमधून, उत्तर आफ्रिकेचें फ्रान्समधून, दक्षिण अमेरिकेंतील चळवळीचें ब्यूनस आयर्समधून मार्गदर्शन होत होतें. ऑगस्ट १९४६ मध्यें चिनी कम्युनिस्ट पक्षाच्या मध्यवर्ती समितीच्या प्रबंधाचें भाषांतर झालें तेव्हां प्रबंधांत कोमिन्टर्नच्या अतिपूर्व ब्यूरोची सम्मति असल्याचा स्पष्ट उल्लेख आढळून आला. १९४५ च्या हिवाळ्यांत जर्मन कम्युनिस्ट नेत्यांनीं पक्ष सभासदांसाठीं एक अभ्यास–पुस्तिका तयार केली. तिचें नांव 'सातव्या कॉंग्रेसनंतरचें धोरण व डावपेंच' असें ठेवण्यांत आलें होतें. त्यावरून १९३५ ते ४५ हा कालखंड कम्युनिस्ट चळवळीच्या दृष्टीनें जर्मन नेते अविभाज्यच मानीत होते. पुस्तिकेंत सहाव्या कॉंग्रेसच्या आत्मघातकी धोरणाची पक्ष सभासदांस जाणीव करून देण्यांत आली होती. १९४३ नंतर दोस्त राष्ट्रांत कम्युनिस्ट चळवळीचीं सूत्रें रशियन वकिलातीमार्फत हलत होतीं याचा भरभक्कम पुरावा, कॅनेडियन सरकारनें रशियास अणु गुप्तिें फोडल्याबद्दल कॅनेडियन पक्षप्रमुखांवर खटला भरला तेव्हां, रॉयल कमिशननें केलेल्या रिपोर्टमधून जगापुढें आला. परदेशांतील कम्युनिस्ट चळवळ रशियन सरकारचें हेरखातें व रशियाप्रणीत जागतिक लष्करी हालचालीचें अविभाज्य अंग बनल्याचा सबळ पुरावा या रिपोर्टानें जगापुढें ठेवला आहे. पहिल्या महा-

युद्धानंतर ऑक्टोबर क्रान्तींतून युरोपीय कामगार क्रान्ति निर्माण व्हावी यासाठीं लेनीन कामगार व क्रान्तिकारी समाजवादी चळवळीवर विसंबून होता. तर दुसऱ्या महायुद्धाच्या समाप्तीच्या काळांत स्टॅलीनची भिस्त क्रान्तिकारी आंदोलनांवर नव्हती. हिटलरला मागें सारीत पूर्व व मध्य युरोप पादाक्रांत करणारी विजयी लाल सेना, रशियांत उभारलेल्या व पढविलेल्या युद्धकैद्यांच्या तुकड्या व मॉस्कोंत गोळा झालेले कम्युनिस्ट नेते आणि लोकयुद्धाच्या काळांत भूमिगत चळवळींत काम करणाऱ्या कम्युनिस्टांनीं जनतेच्या मनांत प्रज्वलित केलेल्या राष्ट्रभावना, हींच त्यांचीं क्रान्तीचीं, नव्हे जागतिक सत्तासंघर्षांतील हत्यारें होतीं. या वेळीं जर्मन क्रान्तीची अपेक्षा तो करीत नव्हता. उलट युद्धकाळांतच त्यानें बृहन् स्लाव्ह चळवळ सुरू केली होती. १९४३ पासून १९४८ पर्यंत स्लाव्ह राष्ट्रिकांच्या अनेक परिषदा युरोपांत भरल्या. झेकोस्लोव्हाकियांत १९४८ मध्यें कम्युनिस्टांनीं शासनसंस्थेचा ताबा घेतला तेव्हां झेक युवक परिषदेला धाडलेल्या संदेशांत कम्युनिस्ट पंतप्रधान गोटवाल्ड म्हणाला, "सोव्हिएट युनियन व दुसऱ्या स्लाव्ह देशांसह आपण २५ कोट जनता आहों...हसाईट कालखंडानंतर (कित्येक शतकांपूर्वी झेकोस्लोव्हाकियांत हसाईट साम्राज्य होतें) आजच आपला देश प्रथम त्या वैभवास पोहोंचला आहे."* कामगारवर्गाच्या युगनेतृत्वाची भाषा जागतिक कम्युनिस्ट चळवळीनें किती लीलेनें सोडून दिली होती. आंतरराष्ट्रीय कामगार क्रान्ति व तिचें नेतृत्व करणारी कम्युनिस्ट आंतरराष्ट्रसभा दुसऱ्या महायुद्धाच्या उदरांत लुप्त झाली होती.

• • •

---

* रशियन रेव्होल्यूशन : मानवेंद्रनाथ रॉय : पान ५९२, टिपणें.

## : १८ :

# रशियन कम्युनिझमचें नवें स्वरूप

**स्टॅलीननें** लेनीनच्या मृत्यूनंतर आंतरराष्ट्रीय क्रान्ति झाली नाहीं तरी एकट्या दुकट्या देशांत ( म्हणजेच रशियांत ) समाजवाद प्रस्थापित होणें शक्य आहे असा सिद्धान्त मांडला. स्टॅलीनच्या नेतृत्वाखालील ' समाजवादी रशियाची अप्रतिहत प्रगति होत होती. १९३८ सालीं तिसरी पंचवार्षिक योजना जाहीर करतांना तिचें उद्दिष्ट असें स्पष्ट करण्यांत आलें कीं, ' तिसरी पंचवार्षिक योजना वर्गविहिन समाजवादी समाजाच्या उभारणीचें कार्य पुरें करून त्याचें कम्युनिस्ट समाजांत हळु हळु रुपान्तर घडवून आणील. * कम्युनिस्ट समाज-व्यवस्थेचे द्रष्टे मार्क्स व एंगल्स यांनीं कम्युनिस्ट समाजाचें प्रमुख लक्षण सांगतांना असें म्हटलें होतें कीं अशा समाजांत ' प्रत्येक व्यक्तीचा स्वतंत्र विकास ही सर्वांच्या स्वतंत्र विकासाची शर्त बनेल. ' हे द्रष्ट्यांचें चित्र व प्रचलित रशियन हुकुमशाही राजवट यांच्यांत मेळ नव्हता. पण विरोधविकासवादी कम्युनिस्टांनीं असें समाधान मानून घेतलें कीं विकासाच्या एका अवस्थेंत एकदां इतका अभूतपूर्व बदल घडून येईल कीं अनियंत्रित हुकुमशाहीची जागा एकदम

---

* सोशल ॲण्ड इकॉनमिक मूव्हमेंट्स : पान ४०६.

अनिर्बंध-स्वच्छंद स्वातंत्र्य घेईल. शासनसंस्था लुप्त पावेल व मानवी समाज दंडहीन बनेल. पण तो क्षण येइपर्यंत स्टॅलीनच्या विचारसरणीनुसार रशियन शासनसंस्थेची दंडशक्ति इतकी वाढविणें आवश्यक होतें कीं तिला जगांत कोणत्याहि सत्तेपासून धोका राहाणार नाहीं; ती सर्व जगांत प्रभुत्व संपादन करील. जोंपर्यंत ही अवस्था निर्माण होणार नाहीं तोंपर्यंत हुकुमशाहीची पकड ढिली करण्याचा, जनतेला लोकशाही हक्क व स्वातंत्र्य उपभोगूं देण्याचा प्रश्नच उद्भवूं शकत नाहीं. स्टॅलीनची विचारसरणी हीच आज जगांत कम्युनिझमची अधिकृत विचारसरणी आहे व म्हणून जगावर रशियन सत्तेचें प्रभुत्व निर्माण करण्यासाठीं स्टॅलीनचा रशिया व स्टॅलीनप्रणीत जागतिक कम्युनिस्ट चळवळ आज अहर्निश झटत आहे. दुसऱ्या महायुद्धांत रशियाचा विजय निश्चित बनल्यावर याच दिशेनें स्टॅलीननें व जागतिक कम्युनिस्ट चळवळीनें पुढें पाऊल टांकलें.

रशियाच्या या सत्ताविस्तार योजनेचे ढोबळपणें तीन कालखंड कल्पितां येतील. युद्धकाळांत डिसेंबर १९४३ मध्यें तेहरान येथें, फेब्रुवारी १९४५ मध्यें याल्टा येथें व जुलै १९४५ मध्यें पॉस्टडॅम येथें रूझवेल्ट–स्टॅलीन–चर्चिल या बड्या त्र्यींमध्यें युद्धोत्तर जगाचा विचार करण्यासाठीं तीन महत्त्वपूर्ण बैठका झाल्या. यशस्वी युद्धसमाप्तीसाठीं दोस्त श्रेष्ठींचें सहकार्य आवश्यक होतें. तेव्हां जगाच्या कोणत्या वादग्रस्त भूभागांवर कोणाचें राजकीय प्रभुत्व मानलें जावें ( Spheres of Influence ) याची व्यावहारिक चर्चा या बैठकांतून झाली. मुत्सद्यांच्या द्वंद्वांत जेवढें प्रभुत्वाचें क्षेत्र आपल्या वांट्यास घेतां येईल तेवढें स्टॅलीननें मिळविलें युद्धोत्तर शांततेची घडी बड्या त्र्यींच्या एकवाक्य-तेच्या पायावर उभारली जाणार होती. या कालखंडांत दोस्त राष्ट्रांतील सत्ता-धाऱ्यांत अविश्वास निर्माण होईल असें पाऊल स्टॅलीन उचलणार नव्हता. जागतिक कम्युनिस्ट चळवळीनें या काळांत अवलंबिलेलें धोरण ‘ कमींत कमी संघर्षाचें तेहरान धोरण ’ या नांवानें उल्लेखितां येईल. प्रत्येक देशांतील कम्युनिस्ट चळवळ राष्ट्रीय एकजुटीचा पक्ष म्हणून या काळांत स्वतःची प्रतिष्ठा

स्वतःच्या देशांतील राजकारणांत निर्माण करणार होता. दुसऱ्या कालखंडांत स्वतःच्या राजकीय प्रभुत्वाखालील देशांत तिनें आपली सत्ता संघटित केली; सप्टेंबर १९४७ मध्यें मार्शल योजना सुरू होइपर्यंतचा हा कालखंड आहे. कोमिन्फर्मची स्थापना करून तिसऱ्या कालखंडांत रशियानें कम्युनिस्टेतर जगाविरुद्ध चढाईचें धोरण जारी केलें. आपल्या प्रभुत्वाखालील इतर व्याप्त प्रदेशांत एकतंत्री कम्युनिस्ट राजवट प्रस्थापित केली. आपल्या कक्षेबाहेरील जगांत संप, विध्वंसन, सशस्त्र उठावाचें तंत्र स्वीकारण्याचा आदेश या भूभागांतील चळवळीस दिला. या तीन कालखंडांच्या अभ्यासांतून रशियन कम्युनिझमच्या नव्या स्वरूपाचें दर्शन घडूं शकेल.

हिटलरनें आक्रमण काळांत पादाक्रान्त केलेल्या अनेक राष्ट्रांतील सरकारें युद्धकालांत लंडनमध्यें गोळा झालीं होतीं. लंडनमधून हिटलरविरोधी भूमिगत चळवळीचें मार्गदर्शन तीं करीत होती. हिटलरचा पराभव झाल्यावर तींच सरकारें आपल्या राजधान्यांत सत्तेचे वारसदार म्हणून परततील अशी भीति रशियाला होती. तेव्हां रशियानें या सरकारांना व त्यांच्या चळवळींना शह म्हणून व सत्तेच्या राजकारणाचे घोडे पुढें दामटणें सुकर बनावें या उद्देशानें, स्वतंत्रपणें मुक्ति चळवळी उभारल्या व त्यांच्या स्वतंत्र समित्या स्थापन केल्या. मॉस्कोंतील पोलीश देशभक्तांची युनियन, लिस्बन समिती, स्लोव्हाक राष्ट्रविमोचन चळवळ, येनानमध्यें स्थापण्यांत आलेली जपान मुक्तिलीग व कोरियन मुक्तिलीग व मेक्सिकोंत जर्मन कम्युनिस्टांनीं सुरू केलेली जर्मन मुक्तिसंघटना या त्यांपैकीं कांहीं प्रमुख चळवळी व संघटना होत. या चळवळींप्रमाणेंच मॉस्को येथें या काळांत कित्येक विख्यात कम्युनिस्ट नेते जमा झाले होते. कांहीं हिटलरबरोबर केलेल्या देवाणघेवाणींत मुक्त होऊन मॉस्कोला येऊन पोहोंचले होते. डिमिट्राव्ह ( बल्गेरिया ), टोलीॲत्ती ( इटली ), क्लिमेन्ट गोटवाल्ड ( झेकोस्लोव्हाकिया ), थोरेज ( फ्रान्स ), विल्यम पेक ( जर्मनी ), सॅंझो नोझाका ( जपान ), ओटो कुसेनीन ( फिनलंड ), मात्स्या रॅकोसी ( हंगेरी ), ली ली सान ( चीन ), ॲना पॉकर ( रुमानिया ), इबारुरी ( स्पेन ), यांचा उल्लेख या

नेत्यांत प्रामुख्यानें करावयास हवा. रशियावर मुसंडी मारून आलेल्या जर्मन लष्करास परतवून जेव्हां लाल सेना जर्मन लष्कराचा पाठलाग करीत बर्लीनच्या मार्गाला लागली तेव्हां त्या विजयी सेनेबरोबर हे कम्युनिस्ट नेतेहि आपआपल्या देशांत परतले. कांहीं पूर्वतयारीसाठीं लाल विमानांतून पुढें आले तर कांहीं विजयी लाल सेनेच्या पाठोपाठ मॉस्को येथें ठरलेल्या पूर्वयोजनेनुसार ते युरोप व आशियांतील युद्धोतर कम्युनिस्ट चळवळीचे व कम्युनिस्ट राजवटीचें यापुढें मार्गदर्शन करणार होते.

पोलंड, रुमानिया, हंगेरी, झेकोस्लोव्हाकिया व बल्गेरिया हे देश बर्लीन चढाईत रशियन लाल सेनेनें व्यापले होते. बर्लीन चढाईमागील हेतु केवळ हिटलरच्या सैन्याचा नाश करणें एवढाच नहता याचा पडताळा बल्गेरियाच्या उदाहरणावरून प्रथम आला. हिटलरचा पराभव अटळ आहे हें स्पष्ट होतांच बल्गेरियन पंतप्रधान म्यूरारीव्हनें हिटलरविरुद्ध युद्ध जाहीर केलें होतें. पण हिटलरशीं युद्ध पुकारणाऱ्या या नव्या दोस्त राष्ट्रास रशीयानें दोस्त आघाडींत सामील करून घेतलें नाहीं. उलट बल्गेरियाविरुद्ध युद्ध पुकारून आपल्या लाल सेना त्यांनीं बल्गेरियांत घुसविल्या. कांहीं दिवस बल्गेरिया, जर्मनी व रशियाच्या दोन्ही सेनांविरुद्ध लढला. लाल सेनेपुढें टिकाव धरणें त्यास शक्य नव्हतें. पण लाल-सेनेचें कार्य हिटलरच्या मगरमिठींतून बल्गेरियन, जनतेची मुक्तता करणें एवढेंच नसून आपल्यास अनुकूल अशी राजवट बल्गेरियांत प्रस्थापित करण्याचें व्यापक ध्येय तिच्यापुढें आहे ही गोष्ट या प्रसंगानें सिद्ध झाली. पहिल्या खंडांतील धोरणानुसार लाल सेनेच्या करड्या नजरेखालीं या व्याप्त देशांतील कम्युनिस्टांनीं व्यापक लोक-आघाड्या उभारल्या. राष्ट्रीय उदार, राष्ट्रीय शेतकरी, लोकशाही व समाजवादी यांपैकीं एक वा अनेक राजकीय पक्षांच्या साहाय्यानें या देशांत संमिश्र मंत्रिमंडळें स्थापन केलीं गेलीं. मात्र या पुनर्संघटित सरकारांत गृहखातें व संरक्षण खातें कम्युनिस्टांकडे घेण्याचें धोरण कटाक्षानें पाळण्यांत आलें होतें. त्याचा अर्थ स्पष्ट असला तरी व्याप्त प्रदेशांतील इतर पक्षांना दुसरा पर्याय शिल्लक नव्हता. प्रथम कांहीं काळ बरेंच राजकीय स्वातंत्र्य होतें. फक्त सोव्हिएट

रशियाच्या विरोधी सूर काढण्यास त्यांना सक्त मनाई होती. गृह व संरक्षण खात्याचे मंत्री ती काळजी घेणार होते. या धोरणानुसार हंगेरींत रॅजॅक गृहमंत्री बनला. रुमानियांत जॉर्जेस्क्यू गृहमंत्री व पॅट्रिसक्यॅन्यू न्यायमंत्री बनला.बल्गेरियांत युगाव्ह गृहमंत्री बनला. पोलीश सरकारमध्यें बहुतेक कम्युनिस्टच होते. झेकोस्लोव्हाकियाचे नेते बेनेश व मॅसॅरॅक लंडनहून मॉस्कोमार्गें मायदेशीं परतले तेव्हां कॉसीस येथें कम्युनिस्ट पुढारी गोटवाल्ड यानें त्यांच्याकडून प्रथम दोन अटी मंजूर करून घेतल्या. उद्योगधंद्यांचें राष्ट्रीयीकरण व सर्व जर्मन वंशाच्या झेक प्रजेचें सामुदायिक उच्चाटन याच त्या दोन अटी होत. अल्बानियांत जुन्या कम्युनिस्टांच्या जागीं मॉस्कोची वारी करून आलेला सेनानी होक्स्हा सर्वाधिकारी बनला. ग्रीसमध्यें ई. ए. एम्. या संयुक्त जहाल आघाडींतील कम्युनिस्ट नेता झॅचरडिस हा प्रथम कम्युनिस्ट नेतृत्व करीत होता. ग्रीसमध्यें गोरिला युद्ध सुरू झाल्यावर त्याची जागा जनरल मारकॅासनें घेतली.

दुसऱ्या कालखंडांत या व्याप्त देशांतील सत्ता कम्युनिस्टांनीं संघटित केल्या. लाल सेनेनें हंगेरीला स्वातंत्र्य परत मिळवून दिलें असूनहि जेव्हां नोव्हेंबर १९४५ मध्यें हंगेरींत प्रथम निवडणुकी झाल्या तेव्हां कम्युनिस्ट पक्षास फक्त १८ टक्के मतें मिळालीं. छोट्या जमीनमालक शेतकऱ्यांचा पक्ष प्रचंड बहुमतानें निवडून आला होता. लोकशाही मार्गानें कम्युनिस्टांची सत्ता या व्याप्त देशांत प्रस्थापित करणें अशक्य आहे, स्थानिक कम्युनिस्ट लोकप्रिय नाहींत व केवळ लाल सेनेचें अस्तित्वहि मतदारांस बदलूं शकणार नाहीं याची पक्की खूणगांठ रशियानें या प्रकरणांतून मनाशीं बांधली. अन्य वाम मार्गानें सत्ता संघटित करण्याखेरीज कम्युनिस्ट सत्ताधारी बनले नसते. तेव्हां वरकरणीं संमिश्र सरकारचें धोरण कायम ठेवूनहि गृहखातीं व लाल सेनानी तीं सरकारें आंतून पोखरूं लागले. गृहमंत्री रॅजॅकनें शेतकरी पक्षाविरुद्ध अस्त्र उगारलें. १९४७ फेब्रुवारींत शेतकरी पक्षाचा सरचिटणीस बेला कोव्हॅकसला अटक झाली. सरकार उलथण्याचा आरोप त्याच्यावर ठेवला गेला. पण ज्या शेतकरी पक्षाचें बहुमत होतें त्या पक्षास सरकार उलथण्याची गरज कां भासावी याचें उत्तर

एकटे कम्युनिस्टच देऊं शकतील. हंगेरी मागोमाग रुमानियांतील राष्ट्रीय शेतकरी पक्षाविरुद्ध तसेंच अस्त्र उगारण्यांत आलें. मॅन्यू व रॅडेस्क्यू या पक्ष-प्रमुखांना फांशीं देण्यांत आलें. बल्गेरियांत तेंच तंत्र वापरलें गेलें. विरोधी पक्षाच्या पेटकाव्हला फांसावर चढविलें गेलें. संमिश्र सरकारांत इतर राजकीय पक्षांच्या कोणत्या प्रतिनिधींनीं राहावें हे आतां कम्युनिस्ट ठरविणार होते; त्या पक्षांचे सभासद ती निवड करणार नव्हते. विरोधी पक्षाच्या सभा उधळणें, सरकार-प्रमाणेंच कम्युनिस्ट प्रिंटर्स युनियन्सनीं सेन्सॉरशिप करणें हे प्रकार सर्रास होऊं लागले. संमिश्र सरकारचें हें शुद्धिकरण अखेर व्याप्त देशांत एकतंत्री हुकूमत प्रस्थापित झाल्यावरच थांबलें. कम्युनिस्टप्रणीत राष्ट्रीय आघाडीचें नेतृत्व आतां सरकारें करणार होतीं. समाजवादी पक्षांतील कम्युनिस्टधार्जिण्या गटाबरोबर व कामगार संघटनांबरोबर एकजूट करून संयुक्त कामगार पक्ष स्थापन झाले होते. सर्व प्रकट विरोध नष्ट करण्यांत आला होता. विरोधी नेते फांसावर चढले होते, पळून गेले होते अगर जन्मठेपेची सजा भोगूं लागले होते. सप्टेंबर १९४७ पर्यंत झेकोस्लोव्हाकिया सोडून या सर्व देशांतील राज्यसत्तांत रशियानें आपलें प्रभुत्व प्रस्थापित केलें व कम्युनिस्ट पक्षांच्या हातीं राज्यकारभाराचीं सूत्रें आलीं.

युरोपचे जे देश लाल सेनेनें व्यापले नव्हते त्या देशांतहि कम्युनिस्ट चळवळीचा उद्देश 'येन केन प्रकारेण' सत्तेच्या जागा व्यापण्याचाच होता. 'येन केन प्रकारेण' म्हणण्याचें कारण समाजवादी तत्त्वज्ञानाची चाड या उद्दिष्टपूर्तीत त्यांनीं राखली नाहीं. १९४३ च्या मॉस्को परिषदेंत दोस्त राष्ट्रांनीं नाझीविरोधी भूमिगत चळवळींचें एकीकरण करण्याचें तत्त्व मंजूर केलें होतें. भूमिगत चळवळींत बदनाम कम्युनिस्टांचा शिरकाव करून घेण्यांत स्टॅलीननें अशाप्रकारें यश मिळविलें होतें. एकदां तो हेतु साध्य झाल्यावर तेहरान धोरणानुसार कम्युनिस्टांनीं या चळवळींतून व्यापक राष्ट्रीय एकजुटीची घोषणा केली. राष्ट्रीय स्वार्थरक्षणांत आपण कोणत्याहि पक्षाच्या मागें नाहीं हें सिद्ध करण्यासाठीं त्यांनीं आपल्या तात्त्विक श्रद्धा खुंटीला लटकावल्या होत्या. मुसोलिनी विरोधी आघाडींत कॅथालिक, राष्ट्रवादी, समाजवादी सर्वच सामील होते.

इटलींत दोस्तांच्या फौजा उतरल्यावर १ एप्रिल १९४४ ला इटॅलियन कम्युनिस्ट नेता टोलिअॅत्ती रशियन विमानांतून इटलींत येऊन हजर झाला. भूमिगत चळवळींतील नेत्यांची राजेशाहीला पुनः सत्ताधारी होऊं देतां नये अशी मागणी होती. पण 'खास' नवें धोरण सुरू करण्यासाठीं मॉस्कोहून परतलेल्या टोलिअॅत्तीनें स्पष्ट शब्दांत त्या मागणीस विरोध केला. कम्युनिस्टांच्या वरदहस्तानें इटलींतील राजेशाही आतां परत सत्ताधारी बनणार होती. २० एप्रिल १९४५ ला बोलोना येथें इटालियन पक्षप्रमुखांची बैठक झाली. पक्ष–सभासदांना मार्गदर्शन करण्यासाठीं केलेल्या ठरावांत त्यांनीं म्हटलें होतें कीं, "भाईनो ! फॅसिझमशीं लढत असतां जेवढ्या पूर्वाश्रमींच्या फॅसिस्टांना तुम्हांस भेटतां येईल तेवढ्यांना भेटा व आपले पक्ष–सभासद होण्याची त्यांना विनंती करा. जे पक्षांत सामील होतील त्यांना दोषमुक्त करण्याचें आश्वासन द्या. मात्र दुसऱ्या कुटल्याहि पक्षांत सामील होणाऱ्या ( पूर्वाश्रमींच्या ) फॅसिस्टांवर तुम्ही हल्ला करा. कॅथॉलिक चर्चला व पाद्र्यांना तुम्ही तोंडदेखली निष्ठा दाखवा. आपला पक्ष कॅथालिक धर्माविरोधी नाहीं हें जनतेला पटवून देणें अत्यावश्यक आहे. असंतोषी पाद्र्यांना पक्ष-शाखा निर्माण करण्यास मदत करा. इटॅलियन जनतेला पुनश्च दास्यांत टाकण्याची अँग्लो–अमेरिकन भांडवलदारांची व साम्राज्यवाद्यांची इच्छा आहे हें जनतेस स्पष्ट करून सांगा. इतर राजकीय पक्षांतून मोठ्या संख्येंत शिरा व त्या पक्षांत दुफळ्या माजवा. त्यायोगें देशांत आपलाच एक समर्थ व एकजीव पक्ष आहे हें सिद्ध होईल."* पुढें घटना समितींतील भाषणांत टोलिॲत्ती म्हणाला कीं, "इटॅलियन राष्ट्राची धार्मिक शान्तता कम्युनिस्ट बिघडवूं इच्छित नाहींत. फक्त करारावरील फॅसिस्ट सह्यांऐवजीं [ पोपचें कॅथॉलिक चर्च व मुसोलिनी यांच्यामध्यें १९२९ सालीं करार झाला होता त्यास उद्देशून ] प्रजासत्ताक इटलीच्या प्रतिनिधींच्या सह्या त्यावर व्हाव्या.'‡ मुसोलिनीची कित्येक वर्षांची हुकुमशाही राजवट एकदम कोसळल्यामुळें जी राजकीय पोकळी निर्माण झाली होती ती

* वर्ल्ड कम्युनिझम टुडे : मार्टीन एब्रॉन : पान २३४ ‡ वर्ल्ड कम्युनिझम टुडे : पान २३६

नेमस्त राष्ट्रीय धोरण पत्करून व ऐक्यावर भर देऊन, कम्युनिस्टांच्या राजकीय पक्षामार्फत भरून काढण्याचा धाडसी प्रयत्न टोलिॲत्ती करीत होता. कोणत्याहि मार्गानें सत्ताधारी बनण्याचें एकमेव उद्दिष्ट त्याच्या डोळ्यापुढें होतें. या त्याच्या धोरणास तात्काळ अनुकूल पाठिंबाहि दिसून आला. १९४७ मध्यें पक्षाचे २३ लाख सभासद नोंदले गेले.

वसाहतींतील जनतेच्या स्वातंत्र्याच्या प्रश्नावरून तरी वास्तविक राष्ट्रवाद्यांत व कम्युनिस्टांत तीव्र मतभेद व्हावयाचे. पण इटॅलियन व फ्रेंच कम्युनिस्टांनीं या प्रश्नावरहि संधिसाधु व तत्त्वभ्रष्ट भूमिका घेतली. कोमिन्टर्नबरोबर वसाहतीं-तील स्वातंत्र्य-लढ्याबद्दलची सहानुभूतिहि कम्युनिस्टांनीं बुडविली होती. इटलीनेंच इटॅलियन वसाहतींचें विश्वस्तमंडळ बनावें व तेथील अंतर्गत कारभारांत सुधारणा घडवून आणाव्या असा प्रचार इटॅलियन कम्युनिस्ट पक्ष करूं लागला. इटलीबरोबर इटलीच्या वसाहती ताब्यांत आल्या तर कम्युनिस्टांना त्याचें थोडेंच वावडें होतें ! फ्रेन्च कम्युनिस्ट पक्षहि नव्या धोरणानुसार याच मार्गानें सत्ता ताब्यांत घेऊं पाहात होता. १९४५ च्या सप्टेंबरमध्यें दी गॉलच्या नेतृत्वाखालीं स्थापन झालेल्या सरकारांत फ्रेन्च कम्युनिस्ट पक्ष सामील झाला. क्रान्ति नव्हे तर मिळेल तें अधिकारपद ताब्यांत घेणें व वापरणें हेंच कम्यु-निझमचें या कालखंडांत ब्रीदवाक्य होतें. संमिश्र सरकारनें लोकसभेकडे १९३ बिलीयन फ्रँकची मागणी केली होती. पैकीं १०० बिलियनची तरतूद हो शीं मीं ची इंडोचायनांतील स्वातंत्र्य चळवळ दडपून टाकण्यासाठीं केलेली होती. कम्यु-निस्टांनीं या मागणीस पाठिंबा दिला. १९४६ मध्यें समाजवादी या मागणीस विरोध करीत होते तरी कम्युनिस्ट पाठिंबा देत राहिले. डिसेंबर १९४६ मध्यें हायफाँगवर भीषण बॉम्बहल्ला करून जनरल लेकलेर्कनें स्वातंत्र्यवाद्यांची चढाई थोपविली तेव्हां लोकसभेंतील १८२ कम्युनिस्ट सभासदांनीं त्याचें अभिनंदन करणाऱ्या ठरावास पाठिंबा दिला. याल्टा करारानुसार इंडोचायना फ्रेंच राष्ट्रकुलांत राहावें या योजनेस स्टॅलीननें पाठिंबा दिला होता; तर हो शीं मीं ला संपूर्ण स्वातंत्र्य हवें होतें. तेव्हां फ्रेन्च कम्युनिस्टांनीं स्टॅलीनशीं प्रामाणिक राहून

हो शीं मीं ला तोंडघशीं पाडलें. तिसऱ्या कालखंडांत हेच कम्युनिस्ट, घटनात्मक मार्गानें सत्ताधिष्ठ होण्याची शक्यता नाहींशी झाल्यावर, फ्रेन्च सरकारच्या या नीतीचा ‘ साम्राज्यशाही नीति ’ म्हणून धिक्कार करणार होते.

वसाहतीच्या प्रश्नाप्रमाणेंच कामगार–हित–रक्षणाच्या प्रश्नांवरहि कम्युनिस्टांचें धोरण किती संधिसाधु असतें हें या काळांत सिद्ध झालें. सप्टेंबर १९४५ ते ३ मे १९४७ पर्यंत संमिश्र मंत्रिमंडळांत अधिकारावर असतांना कम्युनिस्ट कामगार-संप-विरोधी होते. राष्ट्राच्या आर्थिक पुनर्संघटनेच्या काळांत कामगारांनीहि देशभक्ती दाखवली पाहिजे व संपानें आपल्या आर्थिक मागण्या पुऱ्या करून घेण्याचा राष्ट्रघातकी मार्ग कामगारांनीं स्वीकारतां कामा नये असा या काळांत त्यांनीं प्रचार केला. आपल्या चुस्त राष्ट्रप्रेमाचें त्यांना जनतेपुढें प्रदर्शन करावयाचें होतें. पण रमादिअर सरकारवर असेंब्लीनें विश्वासाचा ठराव पास करतांच कम्युनिस्टांचा घटनात्मक मार्गानें सत्ताधारी बनण्याचा विश्वास नष्ट झाला. कामगार धोरणांत तत्काल बदल केला गेला व त्यांच्याच परिभाषेंत ‘ राष्ट्रघातकी ’ संबोधिल्या गेलेल्या संपांस त्यांनीं फूस दिली. ऑस्ट्रियांत हाच प्रकार घडला. हिंदुस्थानांतील रेल्वे कामगारांच्या संपाबाबत हेंच दुटप्पी धोरण त्यांनीं अवलंबिलें. संप व कामगारहित अशा तऱ्हेनें सत्ता संपादनाचें हत्यार बनलें होतें. फ्रेंच व इटॅलियन कम्युनिस्टांनीं या काळांत समाजवादी एकजुटीचा प्रयत्नहि करून पाहिला. इटलींत त्यांना थोडें फार यश आलेंहि. पण फ्रान्समध्यें समाजवाद्यांनीं निःसंदिग्ध शब्दांत असें जाहीर केलें कीं, “ जोंपर्यंत फ्रेंच कम्युनिस्ट मॉस्कोच्या मार्गदर्शनानुसार आपलें धोरण आंखत राहातील तोंपर्यंत समाजवादी एकजूट अशक्य आहे. पक्षानें स्वतंत्र पक्ष म्हणूनच काम केलें पाहिजे. ” राष्ट्रांच्या सरहद्दीवरून भांडणें उकरून काढून साम्राज्यसत्ता जनतेचें लक्ष आपल्या आर्थिक लढ्यांवरून विचलित करतात, त्यांची फसवणूक करतात, अशी टीका पहिल्या महायुद्धानंतर भांडवलशाही राष्ट्रावर कम्युनिस्ट नित्य करीत. पण या कालखंडांत कम्युनिस्ट पक्ष हाच खरा राष्ट्रीय पक्ष आहे हें जनतेला पटवून देण्यासाठीं त्यांनीहि सरहद्दीसंबंधींच्या भांडणांत पुढाकार घेतला.

ट्रीस्टवरून इटॅलियन व युगोस्लाव्ह कम्युनिस्ट पक्ष, मॅकेडोनियावरून युगोस्लाव्ह व बल्गेरियन पक्ष, कॅरीन्थीयाच्या भूप्रदेशावरून युगोस्लाव्ह व ऑस्ट्रियन पक्ष, टेश्चेन ( Teschen ) बद्दल पोलीश व झेकोस्लाव्ह पक्ष परस्परविरोधी भूमिका घेऊन भांडले. सत्तेच्या राजकारणांतलें हेंहि एक नाटक होतें. जनतेची शुद्ध फसवणूक करण्यांत येत होती.

स्टॅलीननें युरोपच्या सत्ता-संघर्षात १९४७ च्या मध्यास उच्चांक गांठला होता. पूर्व व मध्य युरोपमध्यें ग्रीस सोडून सर्व राष्ट्रांत कम्युनिस्ट सत्ताधारी बनले होते. ऑस्ट्रिया व जर्मनींतील रशियनव्याप्त प्रदेशांत त्यानें आपलें प्रभुत्व प्रस्थापित केलें होतें. फ्रान्स व इटलींत कम्युनिस्ट पक्ष लोकसभेंतील सर्वांत मोठे पक्ष बनले होते. स्टॅलीनच्या सत्तेचा हा विस्तार अनपेक्षित व अभूतपूर्व असाच होता. आशियांतहि चँगबरोबर रूसो–चीन दोस्तीचा करार करून त्यानें आपले हातपाय चीनच्या राजकारणांत पसरण्यास सुरवात केली होती. पण कम्युनिस्ट पक्ष हे राष्ट्रीय एकजुटीचे खरे पक्ष आहेत या पायावरच ही सत्तेची इमारत इतकी उंच चढली होती. कम्युनिस्टांचा राष्ट्रवाद बेगडी आहे हें जसें स्पष्ट होऊं लागलें तशी त्यांची लोकप्रियता कमी होऊं लागली. युरोपमधील प्रत्येक राष्ट्रापुढील सर्वांत महत्त्वाचा प्रश्न या काळांत आर्थिक पुनर्रचनेचा होता. तो सोडविण्यांत कम्युनिझमला यश येतें कीं अमेरिकेला यावर युरोपचें भवितव्य अवलंबून होतें. अमेरिकेनें या प्रश्नाचें गांभीर्य ओळखून मार्शल योजनेच्या रूपानें युरोपीय राष्ट्रांचा कोसळणारा आर्थिक गाडा सांवरण्याचा प्रयत्न केला. ७ जुलै १९४७ ला ब्रिटननें पुढाकार घेऊन युरोपच्या आर्थिक पुनर्रचनेचा विचार करण्यासाठीं पॅरीसला परिषद बोलावली. रशियालाहि आमंत्रण देण्यांत आलें. मोलोटाव्ह पॅरीस परिषदेला हजर होता. परिषदेंत फ्रेंच परराष्ट्रमंत्री बिडुट्यानें अशी सूचना मांडली कीं ब्रिटन, फ्रान्स व रशिया या देशांच्या परराष्ट्रमंत्र्यांनीं युरोपच्या आर्थिक गरजांचा आढावा घ्यावा व अमेरिकेनें देऊं केलेल्या आर्थिक मदतीच्या साहाय्यानें युरोपच्या आर्थिक पुनर्रचनेची एक युरोपव्यापी योजना आंखावी. बिडुट्ची सूचना स्वयंशासित स्वतंत्र राष्ट्राच्या अंतर्गत कारभारांत हस्तक्षेप

करणारी ठरेल असें कारण देऊन मोलोटाव्हनें ही सूचना फेंटाळून लावली. संयुक्त आर्थिक नियोजनांतून कदाचित युरोपच्या ऐक्याला चालना मिळाली असती. ब्रिटनमध्यें मजूर पक्ष सत्तारूढ झाला होता. फ्रान्स व इटलींत कम्युनिस्ट पक्ष सर्वांत मोठा होता व जर्मनींतहि समाजवादी व कम्युनिस्ट यांचें बल कमी नव्हतें. तेव्हां मदतींतील राजकीय धोका पत्करूनहि युरोप समाजवादाची वाटचाल करूं शकला असता. पण त्यासाठीं प्रामाणिक ऐक्याची व परस्पर श्रद्धेची जरूरी होती. शिवाय युरोपचें ऐक्य झालें तर तें सोव्हिएट रशियाच्या प्रभुत्वाखालींच होईल हा हट्ट सोडणेंहि क्रमप्राप्त होतें. अखेर मोलोटाव्हनें ही संधि झुगारून दिली. प्रत्येक राष्ट्रानें आपल्या आर्थिक गरजा सांगाव्या व अमेरिकेकडून स्वतंत्ररीत्या मदत घेण्याचा अधिकार प्रत्येक राष्ट्रास असावा अशी उलट सूचना मोलोटाव्हनें केली. युद्धकाळांत झालेल्या नासधुशीच्या प्रमाणांत ही आर्थिक मदत प्रत्येक राष्ट्रास मिळावी असें सुचवून अमेरिका रशियास एवढी मदत करणार नाहीं व मग मार्शल योजनेचें अंतरंग चवाठ्यावर आणतां येईल हा मुत्सद्देगिरीचा डाव मोलोटाव्ह खेळत होता. अखेर रशियानें मार्शल योजनेशीं असहकार केला एवढेंच नव्हे तर आपल्या प्रभावळींतील राष्ट्रांसहि असहकार करण्यास भाग पाडलें. मार्शल योजनेच्या बहिष्कारांतून युरोप द्विखंडित झालें होतें. या द्विखंड युरोपांत आपला मोठा भाग आहे व पश्चिम युरोपमध्यें मार्शल योजनेला सुरुंग लावण्याचें सामर्थ्य इटॅलियन व फ्रेंच पक्षांत आहे अशी अटकळ बांधून रशियानें हा डाव उधळला होता; पण उलटपक्षीं त्यांतून पश्चिम युरोपच्या ऐक्यास चालना मिळाली.

प्रथम पोलंड व हंगेरीनें मार्शल योजनेस अनुकूलता दर्शविली होती. झेकोस्लोव्हाकियानें तर सम्मतिहि दिली होती. पण रशियानें गोटवाल्ड व परराष्ट्र मंत्री मॅसॅरॅक यांना मॉस्कोस बोलावून त्यांची कानउघाडणी केली. मॉस्कोहून परतल्यावर त्यांनीं काढलेल्या पत्रकांत असें म्हटलें होतें कीं इतर सर्व स्लाव्ह राष्ट्रांनीं मार्शल योजना झिडकारली असल्यामुळें झेक सरकारनें ही मदत घेतली तर रशिया हें वर्तन मित्रविरोधी मानील; तेव्हां आम्ही या योजनेंत

सहभागी होऊं शकत नाहीं. झेंकेल आदि समाजवाद्यांनीं या भूमिकेस विरोध दर्शविला. रशियाशीं सहकार्याचा करार झाला म्हणून इतर राष्ट्रांशीं व्यापारी कररहि करतां कामा नयेत ही विचारसरणी राष्ट्रहित–विघातक आहे अशी त्यांची भूमिका होती. कॅथॉलिक झेकोस्लोव्हाक पुढारीहि अखिल स्लाव्ह एकतेचे उत्साही समर्थक नव्हते. स्टॅलीननें या प्रकरणांतून योग्य तो बोध घेतला व झेकोस्लोव्हाकियांतील राजकीय विरोध कायमचा नष्ट करण्यासाठीं फेब्रुवारी १९४८ मध्यें झेक कम्युनिस्ट पक्षानें अंतर्गत बंड करून शासन–यंत्रणेचा व उद्योगधंद्यांचा अवचित ताबा घेतला. राष्ट्राचा राज्यकारभार आपल्या प्रत्यक्ष नियंत्रणाखालीं आणला. मार्शल योजनेच्या धिक्कारांतून कम्युनिस्ट चळवळीनें तिसऱ्या कालखंडांत प्रवेश केला होता. कम्युनिस्ट चळवळीला एका आंतर-राष्ट्रीय संघटनेंत बांधून रशिया यापुढें कम्युनिस्टेतर जगांत चढाईचें धोरण अंगीकारणार होता. जागतिक सत्तासंघर्षांत विरोधकांना दुर्बल बनविण्यासाठीं त्या राष्ट्रांत अशांतता, संप, बखेडे निर्माण करणार होता. चीनमध्यें युद्धकाळांत तहकूब केलेलें व रुसो–चीन तहाच्या काळांत रोखून धरलेलें गृहयुद्ध पुनश्च छेडलें जाणार होतें. आशियांतील अमेरिकेच्या वाढत्या प्रभुत्वास त्यामुळें काटशह बसणार होता.

सप्टेंबर १९४७ मध्यें वॉर्साजवळील एका खेड्यांत रशियन कम्युनिस्ट नेत्यांच्या प्रेरणेनें युरोपमधील नऊ कम्युनिस्ट पक्षांची बैठक बोलावली गेली. झॅडनॉव्ह व मॅलिनकाव्ह हे रशियन पक्षश्रेष्ठी बैठकीचें मार्गदर्शन करण्यास जातीनें हजर होते. या बैठकींत कोमिन्फर्मची ( कम्युनिस्ट इन्फर्मेशन ब्यूरो : परस्परांस माहिती पुरविणारा कम्युनिस्ट संघ ) स्थापना करण्यांत आली. परिषदेच्या उद्‌घाटनाच्या भाषणांत झॅडनॉव्ह म्हणाला कीं " युरोपला पुनश्च दास्यांत खेंचणाऱ्या अमेरिकन योजनेच्या प्रतिकाराचें नेतृत्व करण्याची ऐतिहासिक जबाबदारी आज तुम्हांस पार पाडावयाची आहे. " कोमिन्फर्मनें प्रसिद्ध केलेल्या जाहीरनाम्यांत युरोपीय जनतेला असा इशारा देण्यांत आला होता कीं " म्यूनिच येथें हिटलरला सवलती देण्यांत हिटलरचें आक्रमण जसें

युरोपनें ओढवून घेतलें तसेंच अमेरिकेबद्दल नरमाईचें धोरण युरोपनें स्वीकारल्यास त्याहून भीषण व निंद्य असें आक्रमण अमेरिकेकडून झाल्याशिवाय राहाणार नाहीं. " युगोस्लाव्हिया, बल्गेरिया, रुमानिया, हंगेरी, पोलंड व झेकोस्लोव्हाकिया या सहा बाल्कन राष्ट्रांतील पक्ष व रशिया, इटली व फ्रान्समधील कम्युनिस्ट पक्ष कोमिन्फर्ममध्यें सामील झाले होते. ' चिरशान्तता व शाश्वत लोकशाही ' या नांवाचें मुखपत्र कोमिन्फर्मनें सुरू केलें. जागतिक कम्युनिस्ट चळवळीचें मार्गदर्शन या मुखपत्रामार्फत आतां होणार होतें. रशिया व सहा बाल्कन राष्ट्रें मार्शल योजनेंत सामील झालींच नव्हतीं. तेव्हां या योजनेस सुरुंग लावण्याची प्रत्यक्ष जबाबदारी फ्रेन्च व इटॅलियन कम्युनिस्ट पक्षावर येऊन पडली. फ्रान्समध्यें सार्वत्रिक संपाचा प्रयत्न झाला. इटलींत संपाबरोबरच रोम व इतर कांहीं शहरांत शस्त्रधारी कामगार पलटणीहि रस्त्यावर आल्या. पण फ्रेंच व इटॅलियन जनतेला व कामगारवर्गाला कम्युनिस्ट नेतृत्वाहून अन्न व इतर जीवनोपयोगी वस्तूंची अधिक निकड होती. राष्ट्राच्या पुनर्संघटनेंत कम्युनिस्ट सहभागी होते तोंपर्यंत त्यांना सर्वांहून अधिक पाठिंबा मिळाला होता हें खरें; पण तो पाठिंबा पुनर्संघटनेच्या कार्यक्रमास होता, पक्षास नव्हे. मार्शल योजनेला इटॅलियन व फ्रेंच कम्युनिस्टांनीं केलेला विरोध जनता समजूं शकली नाहीं. म्हणूनच कम्युनिस्टांच्या मार्शल योजनेच्या प्रतिकारास त्यांनीं साथ दिली नाहीं. १९४७ च्या सुरवातीस या दोन पक्षांस असलेलें पाठबळ १९४७ च्या अखेरीस रशियन धोरणाचा पुरस्कार करून ते गमावून बसले होते.

मार्शल योजनेच्या प्रतिकाराच्या धोरणांतून पश्चिम युरोपमधील कम्युनिस्ट चळवळीची लोकप्रियता कमी झाली; तर टिटो–स्टॅलिन प्रश्नांतून पूर्व युरोपांतील एकसंध कम्युनिस्ट आघाडीच दुभंगली. टिटोला मॉस्कोच्या प्रभुत्वाखालीं राखण्याचे युद्धाव्यतिरिक्त सर्व दडपणाचे प्रयत्न फोल ठरल्यावर २८ जून १९४८ ला कोमिन्फर्म पक्षांनीं टिटोविरुद्ध ठराव पास करून टिटोविरोधी प्रचार मोहीम हातीं घेतली. युद्धोत्तर कम्युनिस्ट चळवळींचें अंतरंग जगाच्या दृष्टीस पडलें. युद्धपूर्व काळांत टिटो व त्याचे कांही साथीदार मॉस्कोवादी कम्युनिस्ट

असले तरी युगोस्लाव्ह कम्युनिस्ट पक्षाची खरी वाढ हिटलरविरोधी प्रतिकार चळवळीच्या काळांत व कम्युनिस्ट पक्ष सत्ताधारी बनल्यावरच झाली होती. पांच लाख कम्युनिस्ट सभासदांच्या या पक्षांतील २५ टक्के सभासद चळवळीच्या काळांत पक्षांत आले होते, तर ७० टक्के सभासद, पक्ष सत्ताधारी बनल्यावर वाढले होते. इतर बाल्कन राष्ट्रांत हिटलरचा पराभव रशियन लाल सेनेच्या सामर्थ्यावर झाला होता तर युगोस्लाव्हियांतील जनतेची दास्यमुक्तता भूमिगत चळवळीनें केली होती. कम्युनिस्ट पक्षानें राष्ट्रवादाचा पुरस्कार धोरण म्हणून केला नव्हता. तर राष्ट्रवादी शक्तींतूनच तो पक्ष समर्थ व सत्ताधारी बनला होता. मे १९४५ मध्येंच टिटोनें जाहीर केलें होतें कीं "आंतरराष्ट्रीय सौदा पटविण्यांत आमच्या स्वातंत्र्याशीं कोणीहि खेळ खेळला तर आम्हांस तें सहन होणार नाहीं. प्रभावळीचें क्षेत्र वाढविण्याच्या राजकारणांत आम्हांस सहभागी व्हावयाचें नाहीं."* या वक्तव्यानें इंग्लंड-अमेरिकेच्या पातळीवर रशियाला आणून बसविण्याचा प्रमाद टिटोनें केला आहे म्हणून मॉस्कोनें टिटोची कानउघाडणी केली होती. पक्षाच्या मध्यवर्ती समितीच्या बैठकींत एकदां टिटोचा सहकारी जिलास म्हणाला "नैतिक दृष्ट्या रशियन लष्करी अधिकाऱ्यांची पातळी ब्रिटिश अधिकाऱ्यांहून खालची आहे."* लाल सेनेचा पाणउतारा करण्याचा प्रमाद जिलासनें केला होता.

१९४७ च्या जुलैनंतर मध्य व पूर्व युरोपांतील कम्युनिस्ट राष्ट्रांवरील आपली पकड मजबूत करण्याच्या धोरणानुसार रशियानें युगोस्लाव्ह राज्यकारभारांत हस्तक्षेप सुरू केला तेव्हां युगोस्लाव्ह पक्षास तें सहन झालें नाहीं. १५ एप्रिल १९४८ रोजीं रशियन पक्षाच्या मध्यवर्ती समितीला पाठविलेल्या पत्रांत युगोस्लाव्ह पक्षाची मध्यवर्ती समिति म्हणते : "आमच्या पक्ष नेत्यांबद्दल पक्षसभासदांत गैरसमज पसरविण्याचें, त्यांची प्रतिष्ठा कमी करण्याचें व त्यांच्याबद्दल अविश्वास निर्माण करण्याचें कार्य रशियन गुप्त हेरखातें करीत

* सोव्हिएट युगोस्लाव्ह डिस्प्यूट : प्रकाशक रॉयल इं. ऑ. इं. अफेअर्स

आहे व आमच्या पक्षसभासदांना रशियन गुप्त हेरखात्यांत भरती करून घेतलें जात आहे याचे सबळ पुरावे आमचेजवळ आहेत. कर्नल स्टेपॅनोव्हनें आमच्या एका जवळच्या सहकाऱ्यास १९४५ मधेंच रशियन हेरखात्यांत सामील करून घेतलें होतें "* २० मार्च १९४८ ला मोलोटाव्हला लिहिलेल्या पत्रांत टिटोनें असें कळविलें होतें कीं, कोणतीहि स्वतंत्र शासनसंस्था दुसऱ्या शासनसंस्थेचें हेरखातें तिच्यावर पाळत ठेवीत आहे ही गोष्ट समजल्यावर तो हस्तक्षेप सहन करणार नाहीं व म्हणून कोणत्याहि नोकरानें अशी माहिती रशियन एजंट्सना स्वतः देऊं नये असा हुकूम मी काढला आहे. रशियानें युगोस्लाव्ह पक्षावर केलेल्या प्रति आरोपांत एक आरोप हा होता कीं 'युगोस्लाव्ह पक्षांत लोकशाही नाहीं. तिच्या मध्यवर्ती समितीवरील कित्येक सभासद स्वीकृत करून घेण्यांत आलेले आहेत...'* त्यास उत्तर देतांना टिटो म्हणतोः "ही परिस्थिति युद्धामुळें निर्माण झाली. इतर कम्युनिस्ट पक्षांत व रशियन पक्षांत तेच प्रकार घडले आहेत." रशियाच्या एकतंत्री नेतृत्वास प्रथमच प्रकट विरोधक भेटला होता व हें प्रकरण चिघळलें तर बाल्कन कम्युनिस्ट पक्षांवरील आपल्या अविरोध नेतृत्वासहि बाधा निर्माण होईल या जाणिवेनें रशियानें कोमिन्फर्मला टिटोविरुद्ध प्रचार आघाडी उघडण्यास प्रवृत्त केलें. आजपर्यंत रशियांतील प्रत्येक विरोधकास ट्रॉट्स्कीवादी संबोधून झोडपण्यांत आलें होतें. आतां कम्युनिस्ट चळवळींत टिटोवादी हा शब्द तशा अर्थानेंच रूढ होणार होता.

रशियन पक्षानें टिटोवर असा आक्षेप घेतला होता कीं टिटोनें 'कामगार आंतरराष्ट्रीयवादाचें' तत्त्वज्ञान झुगारून राष्ट्रवादाचा रस्ता पकडला आहे. १५ मे १९४९ च्या कोमिन्फर्मच्या अंकांत या प्रश्नावर प्रकाश टाकण्यांत आला. "सोव्हिएट युनियनच्या ऐतिहासिक कामगिरीचें कांहीं कम्युनिस्ट योग्य मूल्यमापन करीत नाहींत. कोणत्याहि पक्षाच्या अचूक राजकीय धोरणाचें गमक त्याचें रशिया व सोव्हिएट कम्युनिस्ट पक्षासंबंधींचें धोरण हेंच आहे."* टिटोनें

* सोव्हिएट युगोस्लाव्ह डिस्प्यूट : प्रकाशक रॉयल इं. ऑ. इं. अफेअर्स

रशियाच्या गुप्त हेरगिरीबद्दल निषेध केल्यामुळें रशियन पक्षविरोधी धोरण स्वीकारल्याचा प्रमाद, त्याचे हातून घडला होता. तो राष्ट्रवादी बनला होता. पुढें हंगेरियन कम्युनिस्ट नायब पंतप्रधान कोस्टाव्ह याजवर खटला भरण्यांत आला तेव्हां त्याच्यावर ठेवण्यांत आलेल्या आरोपांतील एक आरोप हा होता कीं त्यानें शासनसंस्थेचा गुप्ततेसंबंधींचा कायदा ब्रिटन, अमेरिकेप्रमाणें रशियाच्या बाबतींतहि पाळला जावा असा हुकूम हंगेरियन सरकारी नोकरांस सोडला आहे. रशियन गुप्त हेरखातें प्रत्येक बाल्कन कम्युनिस्ट राष्ट्रांत काम करीत होतें व कांहीं स्वाभिमानी कम्युनिस्ट राज्यकर्त्यांना हें दास्यत्व सहन झालें नाहीं असा सरळ निष्कर्ष या खटल्यांतून निघतो. २८ जून १९४८ ला युगोस्लाव्ह पक्षानें कोमिन्फर्मला उद्देशून काढलेल्या पत्रकांत असें स्पष्ट म्हटलें आहे कीं " प्रत्येक घटक पक्षानें स्वखुशीनें कोमिन्टर्नचे निर्णय स्वीकारावे या मूलभूत तत्त्वास कोमिन्फर्मनें हरताळ फांसला आहे. युगोस्लाव्ह पक्षानें न केलेले अपराध मंजूर करण्याबद्दल ती बळजबरी करीत आहे, एवढेंच नव्हे तर पक्षसभासदांस पक्षान्तर्गत बंड करून पक्ष छिन्नविछिन्न करण्यास ती आवाहन करीत आहे."* कोमिन्फर्मचें स्वरूप घटक पक्षांना माहिती पुरविण्याइतकें सोवळें नव्हतें हें टिटो प्रकरणांत स्पष्ट झालें. रशियन पक्षाचें जागतिक कम्युनिस्ट चळवळींतील नेतृत्व अबाधित राखण्यासाठींच कोमिन्टर्ननें अवतार घेतला होता.

युगोस्लाव्हियावर लाल सेना धाडून टिटोचें पारिपत्य करण्याच्या डावपेंचांत जागतिक युद्ध भडकण्याची भीति होती. पक्षान्तर्गत बंडाच्या कारवायांनाहि फारसें यश आलें नाहीं. कारण टिटोचें शिक्षण मॉस्कोंतच झालें होतें. अखेर कोमिन्फर्म राष्ट्रांनीं युगोस्लाव्हियाची आर्थिक नाकेबंदी सुरू केली. पण पश्चिम युरोपनें व अमेरिकेनें कम्युनिस्ट टिटोलाहि आर्थिक सहकार्य देऊं केल्यामुळें युगोस्लाव्हियाची अर्थव्यवस्था नाकेबंदीनें अडचणींत आली तरी कोलमडून पडली नाहीं. युद्धपूर्व काळांत एकट्या रशियांतच कम्युनिस्ट सत्ताधारी होते. युद्धोत्तर कालांत बाल्कन राष्ट्रांत व पोलंडमध्यें कम्युनिस्ट पक्ष सत्ताधारी बनले

* सोव्हिएट युगोस्लाव्ह डिस्प्यूट : प्रकाशक रॉयल इं ऑ. इं. अफेअर्स

खरे, पण ते रशियाचे अविरोध एकतंत्री नेतृत्व मानीत होते. तेव्हां स्वतंत्र कम्युनिस्ट राष्ट्रांमधील परस्परसंबंध सम पातळीवर कोणत्या तत्त्वांनीं चालावे याचा उहापोह कधीं झाला नव्हता. मार्क्स, एंगल्स व लेनीन यांनीं ही शक्यता विचारांत घेऊन याची चर्चा कधीं केली नव्हती व त्यांचे वारसदार स्टॅलीन व टिटो यांच्यांत या तत्त्वाबद्दल गंभीर मतभेद झाले होते. टिटोला शरण आणण्यांत स्टॅलीनला यश येतें तर हा प्रश्न पुनः डावलला गेला असता. पण त्यांत स्टॅलीनला अपयश आल्यामुळें टिटोचे विचार इतर कम्युनिस्ट राष्ट्रांत मूळ धरण्याची शक्यता आतां निर्माण झाली होती. तेव्हां स्टॅलीननें इतर कम्युनिस्ट राष्ट्रांतील स्वाभिमानी व स्वयंप्रज्ञ कम्युनिस्ट नेत्यांना स्थानभ्रष्ट करण्याची मोहीम तांतडीनें हातीं घेतली. त्यांचें पक्ष–शुद्धिकरण हातीं घेऊन-आपल्यास सदैव प्रामाणिक राहाण्याची शपथ घेणारा राज्यकर्ता वर्ग प्रत्येक कम्युनिस्ट राष्ट्रांत निर्माण केला, बल्गेरियन कम्युनिस्ट नेता कोस्टाव्ह, हंगेरियन गृहमंत्री रॅजॅक, पोलिश पक्ष–प्रमुख गोम्युलका व त्यांचे खरे, संशयित शेकडों अनुयायी या शुद्धिकरणांस बळी पडले. आपल्या पक्षनेत्यांना मानण्याऐवजीं रशियन पक्षाचा व स्टॅलीनचा अनुनय करणें अधिक व्यवहारी व सोयीस्कर आहे हा धडा या शुद्धिकरणांतून या राष्ट्रांतील कम्युनिस्ट पक्ष–सभासद शिकले. रशियन पक्षासाठीं ते स्वखुषीनें हेरगिरी करूं लागले. आपलीं हुकमी माणसें या राजवटींतून पेरण्याच्या इराद्यानें १९४९ च्या नोव्हेंबरांत रशियन नागरिक बनलेला लाल सेनापति रोकॉसोव्हस्की यास झिमरस्कीच्या जागीं पोलिश लष्कराचा प्रमुख नेमण्याची मागणी स्टॅलीननें केली व तो पोलीश लष्कराचा प्रमुख बनला. बाल्कन राष्ट्रांच्या राज्यकारभारांतील स्टॅलीनच्या हस्तक्षेपाचें हें अभूतपूर्व वर्तन रशियन कम्युनिझमच्या नव्या स्वरूपाचें विदारक दर्शन घडवितें.

जागतिक सत्तासंघर्षासाठीं, मध्य व पूर्व युरोपांतील कम्युनिस्ट राष्ट्रांचें शासनबल व जागतिक कम्युनिस्ट चळवळीची विध्वसंन-शक्ति स्टॅलीननें आज आपल्या पाठीशीं उभी केली आहे. चिनी क्रान्तींत यश संपादन केलेला

चीनचा सत्ताधारी कम्युनिस्ट पक्षहि आज रशियाच्या प्रभावळींत सामील झाला आहे. या देशांच्या राजकारणांत जसें रशियानें प्रभुत्व संपादलें आहे त्याचप्रमाणें त्यांचें अर्थकारणहि आज रशिया, स्वहितासाठीं व जागतिक सत्ता-संघर्षाच्या दृष्टीनें चालवूं मागत आहे. रशियाचें एम्. व्ही. टी. हें व्यापार खातें व त्यानें कम्युनिस्ट राष्ट्रांत स्थापन केलेल्या "औद्योगिक कॉर्पोरेशन्स," एका कम्युनिस्ट राष्ट्रानें दुसऱ्या कम्युनिस्ट राष्ट्राशीं कोणती देवाणघेवाण करावी व कोणत्या तऱ्हेनें करावी, याचा निर्णय घेतात. युरोपमध्यें नाझी जमनीचें प्रभुत्व प्रस्थापित झालें तर अनेक राष्ट्रांचा अर्थव्यवहार कसा चालावा या संबंधीची योजना तयार करण्यासाठीं हिटलरनें जर्मन अर्थपंडित डॉक्टर क्लॉडिन्स याची नेमणूक केली होती. आज त्याच्या साहाय्यानेंच रशियन व्यापारप्रमुख मिकोयान रशियन विस्तार योजनेंतील अर्थविभागाची जबाबदारी पार पाडीत आहे. प्रत्येक कम्युनिस्ट राष्ट्रांतील प्रमुख उद्योगधंदे व व्यापार यांचें आज रशिया व तें राष्ट्र यांच्या संयुक्त कॉर्पोरेशन्समार्फत नियंत्रण होतें. उदाहरणार्थ रुमानियांत आज सात प्रमुख सोव्हरोम्स (सोव्हिएट-रुमानियन कॉर्पोरेशन्स) आहेत. बँकिंग, तेल, लाकूडसामान हे उद्योगधंदे व मोटार, रेल्वे, विमानांची वाहतुक व्यवस्था या सोव्हरोम्समार्फत होते. हंगेरींत बाक्साइट, तेल, लोखंड, पोलाद, केमिकल्स, वीज या प्रमुख वस्तूंचें उत्पादन व देवाणघेवाण या संयुक्त कॉर्पोरेशन्स करतात. पूर्व जर्मनींतील दोनशें औद्योगिक कंपन्या या द्विदल व्यवस्थेखालीं आज आहेत. चीनमधील अतिपूर्व रेल्वेंत रशियाची भागीदारी आहे. याखेरीज या राष्ट्रांतील हजारों नागरिक आज रशियांतील वेठीश्रमांत सक्तीनें राबत आहेत. कम्युनिस्ट राष्ट्रांतील परस्पर-व्यापार कित्येक वेळां रशियन दलाली देऊनच होत असतो. पडद्यामागील कम्युनिस्ट राष्ट्रांतील या अर्थशोषणाचें भीषण स्वरूप अजून जगापुढें तेवढें आलेलें नाहीं. पण अर्थव्यवस्थेचा हा द्विदल पाया व तिची अनियंत्रित हुकुम-शाही अंमलबजावणी तिच्या शोषक स्वरूपावर प्रकाश पाडण्यास पुरेशी ठरेल.

कम्युनिस्टेतर जगांतहि चढाईच्या तिसऱ्या कालखंडांत कम्युनिझमनें

आपल्या विध्वंसक सामर्थ्याची चुणुक जगास दाखविली. मार्शल मदतींत अडथळा निर्माण करण्यासाठीं १९४९ मध्यें इंग्लंड, अमेरिका, ऑस्ट्रियांतील बंदरांसह जगांतील दोन तृतीयांश बंदरांत कम्युनिस्टांनीं डॉक-संप घडवून आणले. पनामा कालव्याच्या दक्षिण-उत्तर किनाऱ्यावरील कोस्टारिका व बोगोटामध्यें सत्ताक्रान्तीचे प्रयत्न केले. अणुबॉम्ब संशोधनखात्यांत व कारखान्यांत आपले हेर पेरले. क्रान्तीच्या केन्द्रांपेक्षां सत्तेच्या केन्द्रावर जागतिक कम्युनिस्ट शक्ती आज आपलें सामर्थ्य एकवटत आहेत. रणदिवे यांच्या नेतृत्वाखालीं हिंदी कम्युनिस्ट पक्षानें १९४९ नंतर स्वीकारलेलें हिंसात्मक विध्वंसक धोरण या जागतिक चढाईचाच एक आविष्कार होता. कम्युनिस्ट जगांत हुकुमशाहीनिष्ठ शान्तता व कम्युनिस्टेतर जगांत सर्व साधनांचा व असंतोषाचा वापर करून अधिकाधिक अशान्तता याच धोरणाची अम्मलबजावणी रशियानें व जागतिक कम्युनिस्ट चळवळीनें या कालखंडांत केली आहे. या अशान्ततेंतून कम्युनिस्ट प्रभावळीबाहेरील राष्ट्रें जितकीं दुर्बल बनतील, त्या राष्ट्रांतील सत्ता जितक्या अप्रिय बनतील, तितकी जागतिक सत्तासंघर्षाची पूर्वतयारी पुरी होईल. जगाचें प्रभुत्व करण्याचें रशियन कम्युनिझमचें नवें अवतारकार्य यथासांग पार पडेल.



: १९ :

# चीनमधील कम्युनिस्ट क्रान्ति

**स्टॅलीन** प्रेरित कॅन्टन बंडानंतर चिनी कम्युनिस्ट पक्षाचें मोठमोठ्या शहरांतील व कामगारवर्गांतील कार्य धुळीस मिळालें होतें. चीनमधील क्रांति कामगारवर्गाच्या शक्तीवर होणार आहे कीं शेतकरीवर्गाच्या मदतीनें या प्रश्नांवर पक्षप्रमुख ली ली सान व कम्युनिस्ट नेता माओ–त्से–तुंग यांच्यांत तीव्र मतभेद होते. कॅन्टन बंडांत कामगार संघटना नष्ट झाल्यावर कम्युनिस्ट चळवळ ओघानेंच ग्रामीण विभागाकडे वळली व ली ली सानची पक्षनेतृत्वाची जागा माओनें घेतली. सन यत् सेनच्या मृत्यूनंतर चँगनें उत्तरेची मोहीम हातीं घेऊन चीनमध्यें एक मध्यवर्ती राज्यसत्ता स्वतःच्या नेतृत्वाखालीं संघटित करण्याचा प्रयत्न केला होता. पण या राष्ट्रीय एकीकरणाचा पाया लष्करी विजयाचा होता; कित्येक सुभेदार सेनानी स्वतःच्या खड्या सैन्यानिशीं चँगला येऊन मिळाल्यामुळें ही मोहीम लवकर पुरी झाली होती. पण या एकीकरणानंतरहि चीनमध्यें एकजीव राष्ट्रीयसेना उभारली गेली नव्हती. मध्यवर्ती सत्तेचा एकमुखी अम्मल चीनच्या अवाढव्य प्रदेशावर प्रस्थापित झाला नव्हता. सन यत् सेनच्या राष्ट्रोद्धाराच्या कार्यक्रमांत शेतीसुधारणेला अग्रस्थान होतें. जमीनदारी प्रथा नष्ट करण्यावर त्यांत भर होता. पण सुभेदार जमीनदारांच्या

सहकार्यातून राष्ट्राचें एकीकरण केलेल्या चँगला जमीनदारशाही विरोधी कार्यक्रम कार्यान्वित करणें जमलें नाहीं. आपल्या राज्यसत्तेस बहुसंख्य शेतकरीवर्गाचें अधिष्ठान निर्माण करण्याचें महत्व त्यास पूर्णपणें उमगलें नाहीं.

माओच्या नेतृत्वाखालीं चिनी कम्युनिस्ट चळवळ पुनर्संघटित झाली तेव्हां चँगला शह देण्यासाठीं त्यांनीं नेमक्या याच दोन कमकुवत आघाड्यांवर हल्ले चढविले. जमीनदारशाही नष्ट करण्याची कायदेशीर सत्ता आपल्या हातीं कधीं तरी येईल या भरंवशावर तो राहिला नाहीं. मध्यवर्ती सत्तेपासून दूरच्या ग्रामीण विभागांत जमिनीसाठीं भुकेलेल्या शेतकऱ्यांच्या छोट्या मुक्तिसेना त्यानें उभारल्या. जमीनदारांच्या जमिनी छिनून घेऊन त्या शेतकऱ्यांना वांटल्या व ही नवोदित मालकी कायम ठेवण्यासाठीं त्या जमीनींचें जमीनदारांपासून संरक्षण करण्याचें कार्य या मुक्तिसेनेवरच त्यानें सोंपविलें. कायद्याची अम्मलबजावणी करण्यासाठीं मोठ्या संख्येनें कधीं चँगची सेना आलीच तर तिला उघड सामना देण्याचें सामर्थ्य या मुक्तिसेनांत नव्हतेंच. तेव्हां त्यांनीं गनिमी–तंत्राचा अवलंब करून या सेनांना हैराण केलें. भिन्न भिन्न प्रदेशांत असे जमिनीचे उठाव करून व राष्ट्रीय सेनेची शक्ति दुभंगवून त्यांनीं आपल्या मर्यादित शक्ती अधिक परिणामकारक बनविल्या. जर शेतकरी वर्गाची जमिनीची भूक सर्वत्र प्रज्वलित नसती, जर चँगच्या राज्यव्यवस्थेस व्यापक स्थानिक पाठिंबा असता व जर शासनसंस्थेची दंडशक्ति संघटित व बलशाली असती तर हें तंत्र कधींच यशस्वी झालें नसतें. पण त्याच्या अभावीं राष्ट्रांत एकाच वेळीं मध्यवर्ती सत्ता व उदयोन्मुख प्रतिसत्ता अस्तित्वांत आल्या व टिकल्या.

आशियांतील इतर देशांप्रमाणेंच चीनचा ग्रामीण विभागहि मागसलेला होता. उत्पादनाचीं मामुली साधनें, शिक्षण, स्थानिक संस्था यांचीहि ग्रामीण विभागांत उणीव होती. आधुनिक औद्योगिक संस्कृतीचें लोण पूर्व किनाऱ्यावरील कांहीं बंदरांत व त्या भोंवतीं उठलेल्या कांहीं प्रमुख शहरांपर्यंतच येऊन पोहोंचलें होतें. माओच्या कम्युनिस्ट पक्षानें आपल्या क्रान्तिकारी कार्यक्रमाबरोबरच ग्रामीण विभागांत विधायक कार्यक्रम हातीं घेऊन ही उणीव भरून काढली. त्यांनीं

छोट्या उत्पादक सहकारी संस्था स्थापन केल्या, शिक्षणाचें कार्य हातीं घेतलें, आरोग्याकडे लक्ष पुरविलें व मनोरंजनाचे कार्यक्रमहि सुरू केले. या नवजीवनास अजूनपर्यंत पारख्या असलेल्या ग्रामीण जनतेंत एक नवी श्रद्धा, नवा उत्साह या प्रयोगांतून निर्माण झाला. त्यांचें दैनंदिन जीवन सह्य व सुखी करण्यासाठीं धडपडून नवजीवन चळवळीनें प्रतिसत्तेस लोकप्रियतेचा आधार निर्माण केला होता. सत्तासंघर्षाचें प्रमुख हत्यार मात्र मुक्तिसेना व तिचें सशस्त्र गनिमी युद्ध हेंच होतें.

जपाननें १९३१ मध्यें मांचुरियावर स्वारी केल्यानंतर चिनी जनतेमध्यें साम्राज्यविरोधी भावना प्रज्वलित होऊं लागली. जपानी आक्रमक फौजांच्या आघाड्यांना ज्या प्रान्तांच्या सरहद्दी भिडल्या होत्या व ज्या सेनानींची हुकूमत त्या प्रान्तांत होती ते सेनानी जपानविरोधी आघाडी मजबूत करूं मागत होते. चँग आपल्या सर्व शक्तींनिशी जपानी लष्कराशीं लढण्यास उत्सुक नाहीं असा त्यांचा ग्रह झाला होता. या मनोभूमिकेंत ते असतांना चिनी कम्युनिस्टांनीं त्यांना संपूर्ण सहकार्य देऊं केलें. जे जमीनदार जपानविरोधी लढ्यांत सामील होणार नाहींत त्यांच्याच जमिनी आम्हीं ताब्यांत घेऊं अशी घोषणा करून जपानविरोधी लढ्याचें महत्व आपणांस किती आहे हें त्यांनीं सिद्ध केलें. मांचूरियांतून हांकलून लावलेला सेनानी चँग–सू–लियांग त्यापैकींच एक होता. चँगनें चँग सूला कम्युनिस्टांच्या शेन्सी प्रान्तावर चालून जाण्याचा उलट आदेश दिला तेव्हां त्यानें त्याची अम्मलबजावणी केली नाहीं. जपानविरोधी शेन्सी-कम्युनिस्ट त्यास अधिक जवळचे वाटत होते. त्याला धडा शिकविण्यासाठीं डिसेंबर १९३६ मध्यें चँग सिॲनफूला गेला तेव्हां चँग सूनेंच उलट त्यास गिरफदार केलें. कम्युनिस्टांविरुद्ध लढावयाचें धोरण टाकून देऊन जर जपान-विरुद्ध मनापासून तूं लढणार असशील तरच तुझी सुटका होईल व तें होणार नसेल तर माझ्याप्रमाणें इतर अनेक सेनानीहि कम्युनिस्टांस जाऊन मिळतील अशी धमकी त्यानें चँगला दिली. चँग शरण आला, कम्युनिस्ट विरोधी चढाई त्यानें बंद केली व जपानविरोधी युद्ध १९३७ मध्यें तीव्र बनलें. जपानला

नव्या चढाईबरोबर कम्युनिस्टांनींहि आपलें सोव्हिएट औपचारिकरीत्या बरखास्त केलें. साम्राज्यशाहीविरोधी आघाडींत ते हिरीरीनें सामील झाले. चँगची मध्यवर्ती सत्ता मान्य करून ते त्याचे आदेश मानूं लागले. मात्र ह्या एकजुटीनंतरहि कम्युनिस्ट सेना बरखास्त झाली नव्हती, मध्यवर्ती सेनेचा एक विभाग म्हणून ती काम करूं लागली होती. राज्यकारभार व्यवस्थेंतहि बदल झाला नव्हता. कोमिन्टर्नचें सातव्या काँग्रेसचें धोरणहि साम्राज्यशाहीविरोधी आघाडी सहजगत्या निर्माण होण्यास कारणीभूत झालें होतें. २२ सप्टेंबर १९३७ रोजीं चिनी कम्युनिस्ट पक्षानें प्रसिद्ध केलेल्या जाहीरनाम्यांत म्हटलें होतें कीं, "कोमिंगटँगची (चँगच्या राष्ट्रीय पक्षाची) राजकीय सत्ता उलथून टाकण्याचें सशस्त्र उठावाचें धोरण, जमिनी हिसकावून घेण्याचा कार्यक्रम व चँगविरोधी प्रचार यांचा आम्ही संपूर्ण त्याग करीत आहों." * या धोरणांतील बदलांतून जपानविरोधी लढ्यांत दोन्ही पक्ष व त्यांच्या सेना खांद्याला खांदा लावून लढल्या खऱ्या पण त्यांच्यांत परस्पर विश्वास व संघटनात्मक एकजीवता कधींच घडून आली नाहीं. परकीय आक्रमण चालू असेतों दोन्ही पक्षांनीं शस्त्रसंधि केला होता एवढेंच. युद्धकाळांत निर्माण झालेल्या अनेक आंतरराष्ट्रीय राजकीय प्रश्नांवर माओनें स्टॅलीनच्याच धोरणाची री ओढली. नाझी सोव्हिएट करारानें समर्थन केलें व कम्युनिझमशिवाय चीनला व सर्व जगालाच तरणोपाय नाहीं अशी भूमिका १९४४ सालीं प्रसिद्ध केलेल्या 'नवी लोकशाही' या पुस्तकांत त्यानें मांडली.

दुसऱ्या महायुद्धाच्या अखेरीस एकीकडे ॲटम बॉम्ब वापरून जपानचें युद्ध लवकर संपुष्टांत आणण्याचा विचार अमेरिकन युद्धश्रेष्ठी करीत होते तर रूझवेल्ट स्टॅलीनला जपानविरोधी युद्धांत सामील होण्यास आर्जवीत होता. जपानच्या पराभवासाठीं रूझवेल्टला स्टॅलीनचें सहकार्य नको होतें, तर आशियाच्या युद्धोत्तर पुनर्संघटनेंत स्टॅलीनला भागीदार करून आशियांतील सत्तासंघर्ष बड्या त्रयींच्या ऐक्यांतून बंद पाडण्याची त्याची इच्छा होती.

* वर्ल्ड कम्युनिझम टुडे : पान ३७१.

स्टॅलीनलाहि चिनी सरकारशीं मैत्रीचा करार हवा होता; त्यास गृहयुद्धाची तात्काळ आवश्यकता भासत नव्हती. तेव्हां स्टॅलीननें रूझवेल्टच्या विनंतीचा स्वीकार केला व जपानविरुद्ध युद्ध पुकारून मांचूरियांत लाल फौजा घुसविल्या व चीन-मधील सर्वांत औद्योगिक प्रगति झालेला भूभाग स्टॅलीननें प्रत्यक्षांत लाल सेनेच्या वर्चस्वाखालीं आणला. दुसऱ्या महायुद्धांत जपाननें शरणागति दिल्यावर पहिल्या कालखंडांतील धोरणानुसार अमेरिकेशीं प्रत्यक्ष संघर्ष न येऊं देतां रशिया चीनचें राजकारण खेळणार होता. तेव्हां त्यानें चिनी सरकारशीं मैत्रीचा करार केला. चिनी कम्युनिस्ट गृहयुद्धाचें अपुरें पर्व पुरें करण्याची सिद्धता करीत राहिले पण या करारामुळें चँगविरुद्ध उघड चढाई करणें त्यांना शक्य झालें नाहीं. चिनी पक्षानें गृहयुद्ध सुरू करावें कीं नाहीं अगर केव्हां करावें याचा निर्णय ते परिस्थितीनुरूप घेणार नव्हते तर स्टॅलीन आपल्या परराष्ट्रनीति-नुसार तो निर्णय घेणार होता. चँगला अमेरिकेची मदत व सहानुभूति असल्या-मुळें रशियाच्या सहानुभूतीच्या व सहकार्याच्या अभावीं गृहयुद्ध यशस्वी होणार नाहीं हें माओ व स्टॅलीन दोघेहि ओळखीत होते. १९४७ च्या उत्तरार्धांत मार्शल योजना हाणून पाडण्याचा निर्णय रशियानें घेतल्यावर व जागतिक कम्युनिस्ट चळवळीनें अमेरिकाविरोधी जागतिक आघाडी उभारण्याचें धोरण स्वीकारल्यावर आशियांतील अमेरिकेच्या वर्चस्वाला शह देण्यासाठीं चीन हीच एक प्रमुख आघाडी होती. तेव्हां स्टॅलीननें माओला गृहयुद्धाचा इशारा दिला. चीनला जोडलेल्या शेकडों मैलांच्या सरहद्दींतून चिनी कम्युनिस्ट क्रान्तीला रशियाची मदत पोहोंचूं लागली. चिनी जनतेंतील साम्राज्यविरोधी भावना जोरदार प्रचार आघाडी उघडून पुनश्च प्रज्वलित करण्यांत आल्या. कम्युनिस्ट प्रचारांत जपानऐवजीं आतां अमेरिका साम्राज्यशाही राष्ट्र बनलें होतें. चँग परकीय साम्राज्यसत्तेचा हस्तक व गुलाम आहे अशी शिकवण चिनी जनतेला देण्यांत येऊं लागली. संयुक्त आघाडीच्या काळांत, पूर्वी शान्सीच्या एका प्रान्तांत कोंडलेल्या कम्युनिस्ट शक्ती चीनभर सर्वत्र पसरल्या होत्या. शासन-संस्था, कोमिंगटँग, राष्ट्रीय सेना व शैक्षणिक संस्था यांत या काळांत कम्युनिस्टांना प्रवेश मिळाला होता. चँग व माओ यांच्यांत ऐक्य घडवून आणण्याच्या

प्रयत्नांत चँगबरोबर माओचें महत्त्वहि अमेरिकन मध्यस्थांनीं वाढविलें होतें. असंतोषी चिनी जनतेला प्रतिस्पर्धी नेतृत्वाची निवड करण्यास संधि मिळाली होती.

शेतकऱ्यांचा जमिनीचा प्रश्न पक्षाच्या कार्यक्रमाचें प्रमुख अंग बनवून माओनें आपली सत्ता उभी केली व वाढविली होती. जनतेंत लोकप्रियता मिळविली होती. जर युद्धोत्तर काळांत चिनी राष्ट्रीय सरकारनें व चँगनें या इतिहासांतून बोध घेऊन जमीनव्यवस्थेंत क्रान्तिकारी बदल घडवून आणले असते तर गृहयुद्धांत कम्युनिस्ट यशस्वी होण्याची शक्यता फार कमी होती. पण सुभेदार, सेनानी व भांडवलदार वर्ग तसेंच अमेरिकेची अपरंपार आर्थिक व लष्करी मदत यांच्या जोरावर या कम्युनिझमला ठेचून टाकूं पाहाणाऱ्या सत्तान्ध चँगनें कोट्यवधी जनतेच्या मूलभूत प्रेरणा दृष्टीआड केल्या. चिनी भांडवलदार व व्यापारी वर्गानें व नोकरशाहीनें ही पर्वणी साधून जनतेचें शोषण आरंभिलें. लांचलुचपतीनें सर्वत्र किळसवाणें स्वरूप धारण केले. वीस वर्षांच्या चँग व कम्युनिस्ट लढ्यांत चीनमध्यें स्वतंत्र लोकशाही शक्तींची व पुरोगामी पक्षाची वाढ होऊं शकली नव्हती. गृहयुद्धांत या वा त्या गटांत सामील होण्याखेरीज या शक्तींना स्वतंत्र पर्याय व व्यासपीठ राहिलें नव्हतें. १९३१ मध्यें सुरू झालेलें युद्ध १९४६ पर्यंत संपुष्टांत न आल्यामुळें व चिनी राष्ट्राला शान्तता न लाभल्यामुळें चिनी जनतेच्या आर्थिक व सामाजिक प्रगतीसाठीं कुठलेच भरीव प्रयत्न होऊं शकले नव्हते. चीनचें ग्रामीण जीवन मागसलेलें राहिलें होतें. क्रान्तिकारी प्रयत्नांस त्यामुळें परिस्थिति अधिक अनुकूल होती. चीनची राजकीय परंपराहि सशस्त्र लढ्याची होती; लोकशाही मार्गाचा पर्याय स्वीकारण्यास चिनी जनतेनें आजपर्यंत लोकशाही पद्धतींचा व प्रथांचा अनुभव कधींच घेतला नव्हता. या सर्व कारणांस्तव एकदां माओनें गृहयुद्ध छेडल्यावर त्यास जनतेचा सर्वत्र वाढता पाठिंबा मिळत गेला.

लाल सेनेबरोबर चीनचा जुना कम्युनिस्ट नेता व माओचा प्रतिस्पर्धी ली ली सान मांचूरियांत परतला होता. मॉस्कोंतील प्रदीर्घ वास्तव्यांत एकदां 'ट्रॉट्स्कीवादी' संबोधला गेलेला नेता स्टॅलीनचा पुनश्च विश्वस्त अनुयायी

बनला होता. गृहयुद्धाचें पर्व सुरू होतांच स्टॅलीन व माओ यांच्यामधील तो दुवा बनला. आपले पूर्वीचे विरोध पक्ष सभासदांच्या मनांतून काढून टाकण्यासाठीं त्यानें चीनमध्यें येतांच असें जाहीर केलें कीं "माओची भूमिका बरोबर होती व माझी भूमिका चूक होती हें इतिहासानेंच सिद्ध केलें आहे;" तर माओनें आपल्या बाजूनें, 'नवीन लोकशाही' ही समाजवादाकडे जाण्याची पहिली पायरी असली तरी चीनमधील कम्युनिस्ट चळवळीच्या विकासांत दुसरी पायरी 'कामगार क्रान्ति' च आहे व भांडवलशाही लोकशाहीला डोकें वर करण्यास वाव न देतां आपण त्या अवस्थेंत प्रवेश केला पाहिजे असें स्पष्टीकरण देऊन ली ली सानला पक्ष-नेतृत्वाचा मार्ग मोकळा करून दिला. अर्थात् ही कामगारक्रान्ति आतां कामगार-शक्ति व कामगार-संघटना करणार नव्हत्या. प्रचलित राजवट व समाजव्यवस्था उखडून टाकण्याचें कार्य ते या क्रान्तींत करणार नव्हते. कारण राजवट कम्युनिस्ट पक्षाचीच राहाणार होती व भांडवलशाही समाजव्यवस्था व भांडवलदार वर्गाचें राजकीय प्रभुत्व ते कधीं निर्माणच होऊं देणार नव्हते. तेव्हां कामगार-क्रान्ति, कामगार चळवळीचें ऐतिहासिक कार्य, हे शब्द आतां मूळ अर्थानें अर्थशून्य बनले होते. मार्क्सवादी विचारांची पोपटपंची अजून चालू राहाणार होती म्हणून ती परिभाषा वापरली जात होती एवढेंच. रशियन राज्यक्रान्तींत कामगारवर्गानें सोव्हिएट्सच्या मार्गे कम्युनिस्ट सत्ता प्रस्थापित करण्यांत बजावलेलें ऐतिहासिक कार्य सोडलें तर जगांतील इतर कुठल्याहि यशस्वी कम्युनिस्ट क्रान्तींत कामगारवर्गाचा भाग फार अल्प आहे. रशियन राज्यक्रान्तींतहि कामगारवर्गाइतकेंच युद्धास कंटाळलेल्या लक्षावधि सशस्त्र सैनिकांचें व जमिनीसाठीं भुकेलेल्या लक्षावधि शेतकऱ्यांचें सहकार्य मोलाचें ठरलें होतें. महायुद्धाच्या पार्श्वभूमीवर क्रान्तींत यश मिळविणें सुकर झालें होतें. ऑक्टोबर क्रान्तीनंतर प्रतिक्रान्तिकारी बंडांचा व परकीय लष्करांच्या आक्रमणांचा निःपात करण्यांत क्रान्तींत मिळालेल्या जमिनींचें रक्षण करणाऱ्या शेतकरीवर्गानेंच विशेष जबाबदारी उचलली होती. सोव्हिएट रशियाच्या आर्थिक प्रगतीचा पाया त्यानेंच भरला होता. पण रशियन क्रान्तींतील कामगार व शेतकरी सैनिक वर्गाचें तुलनात्मक महत्व वादग्रस्त ठरलें तरी त्यानंतर

झालेल्या प्रत्येक कम्युनिस्ट क्रान्तींत कामगारवर्गाच्या स्वयंस्फूर्त व व्यापक उठावास जवळ जवळ कांहींच स्थान नव्हतें हें निर्विवाद. “कोणतीहि समाजव्यवस्था, जोंपर्यंत तिच्या उदरांत उत्पादक शक्तींना वाढ होण्यास अवसर आहे तोंपर्यंत नष्ट होत नाहीं’ हा मार्क्सचा समाजक्रांतीचा व समाज परिवर्तनाचा मूलभूत सिद्धांत होता. त्या सिद्धांतानुसार जमीनदारशाहीनिष्ठ शेती उत्पादन शक्ति शिगेला पोहोंचल्यावर त्याची जागा भांडवलशाही व्यक्तिनिष्ठ शेती-उत्पादनानें व जमीनदारवर्गाची जागा सधन जमीन–मालक शेतकरीवर्गानें घेतली. जमिनीवर उदरनिर्वाह करणारे लक्षावधी अपुऱ्या जमिनीचे मालक मजुरीसाठीं शहरांत आले. औद्योगिक क्रांतीस ते उपयुक्त ठरले. तिचें नेतृत्व भांडवलदार वर्गानें केलें. स्पर्धानिष्ठ यांत्रिक उत्पादनांतून राष्ट्राची संपत्ति वाढली, उत्पादन वाढलें, कामगारांमध्यें वर्गजागृति वाढली. श्रमशोषक भांडवलशाही अर्थपद्धति वाढत्या उत्पादनशक्तींना जोखड ठरूं लागली. तेथेंच उत्पादक शक्तींची अनिर्बंध वाढ होऊं देणारी कामगार–क्रांति होणार होती. संघटित बलशाली कामगारवर्ग उत्पादन साधनांचा मालक बनून तें ऐतिहासिक कार्य करणार होता. पण हा समाजक्रांतिक्रम यशस्वी कम्युनिस्ट क्रांति झालेल्या कुठल्याहि देशास लागू पडणार नव्हता. युरोपमधल्या क्रांतिकारी कामगार शक्तीस भिऊन भांडवलदार वर्गानें आपलें ऐतिहासिक कार्य पार पाडणें सोडून दिलें होतें. तें कार्य सत्तेसाठीं झगडणारा कम्युनिस्ट पक्ष रशियन शासनसंस्थेच्या बलावर आतां पुरें करूं मागत आहे. सर्व यशस्वी कम्युनिस्ट सत्ता हें राष्ट्रीय क्रांतीचें कार्य आज पूर्व युरोपांत व आशियांत आपल्या विशिष्ट पद्धतीनें पुरें करूं मागत आहेत. स्टॅलीनच्या जागतिक सत्तासंघर्षाच्या गाड्याला स्वतःस जुंपून घेऊनच हें कार्य त्या करणार आहेत. साहजिकच ही आर्थिक क्रांति जागतिक सत्तेच्या राजकारणांत विकृत स्वरूप घेतल्याशिवाय राहाणार नाहीं. पूर्व युरोपमधील आशियांतील जनतेला या क्रांतींतून पूर्व परिस्थितीहून बरे दिवस दिसतील, शेतकऱ्यांस जमिनी मिळतील, कदाचित् त्यांच्या राष्ट्रांचा कारभार करड्या कम्युनिस्ट सत्ताधाऱ्यांच्या नजरेखालीं कमी लांचलुचपतीचा बनेल, जागतिक सत्ता संघर्षाच्या प्रेरणेंतून या राष्ट्रांचें औद्योगीकरणहि लष्करी

करणाचा एक भाग म्हणून अधिक झपाट्यानें होईल. पण या प्रगतीस रूढार्थानें समाजवादी अगर कम्युनिस्ट क्रांति म्हणणें म्हणजे त्या कल्पनांची विटंबना करणें होय.

माओनें गृहयुद्ध सुरू केल्यावर त्यांत त्याला कल्पनेबाहेर झपाट्यानें यश मिळालें. अफाट भूप्रदेश, जनतेचें दारिद्र्य व कनिष्ठ राहाणीमान, मध्यवर्ती राज्यसत्तेचा अभाव, युद्धोत्तर अस्थिर परिस्थिति, जपानविरोधी युद्धांत वाढलेली व नांवाजलेली स्वतंत्र कम्युनिस्ट सेना, जनतेंतील जागृत साम्राज्यविरोधी भावना, स्टॅलीनच्या आशीर्वादानें सुरू झालेल्या नव्या चढाईस रशियाकडून मिळालेली अपरिमित मदत, चँगचा व सरकारी अधिकाऱ्यांचा अत्यंत नादान व जनताविरोधी राज्यकारभार, किळसवाणी लांचलुचपत व भीषण महागाई, रशियन लाल सेनेच्या महायुद्धांतील विजयाचा जनमनावरील पगडा, चँगविरोधी बुद्धिजीवी व विद्यार्थी वर्गाचा कम्युनिस्ट पक्षास मिळालेला वाढता पाठिंबा, शेतकऱ्यांच्या मुक्तिसेनेला मिळालेलें युद्धकालीन शिक्षण व जागतिक सत्तासंघर्षातून निर्माण झालेलें अनुकूल आंतरराष्ट्रीय वातावरण या सर्व घटना त्या यशास कमीअधिक प्रमाणांत पूरक ठरल्या. आज माओ व त्याचा कम्युनिस्ट पक्ष जगांतील सर्वांत मोठ्या भूप्रदेशाचा व प्रजेचा शास्ता बनला आहे. चिनी कम्युनिस्ट क्रान्ति आशियाच्या पुनरुत्थापनावर अनुकूल वा प्रतिकूल दूरगामी परिणाम केल्याशिवाय राहाणार नाहीं.



: २० :

# सोशलिस्ट इंटरनॅशनल

**युद्धोत्तर** जागतिक शान्ततेच्या व पुनर्संघटनेच्या प्रश्नाचा विचार करण्यासाठीं तेहरान व याल्टा येथील रूझवेल्ट-चर्चिल-स्टॅलीन या बड्या त्रयींच्या बैठकीनंतर जुलै १९४५ मध्यें पॉट्स्डॅम येथें पुनः बड्या त्रयींची बैठक भरली होती. दिवंगत रूझवेल्टची जागा ट्रुमननें घेतली होती. ब्रिटनमध्यें महायुद्धोत्तर प्रथमच निवडणुका होत होत्या. त्यांचा निकाल जाहीर होईपर्यंत पॉट्स्डॅम परिषद स्थगित झाली होती. या निवडणुकांत ६४० प्रतिनिधींच्या पार्लमेंटमध्यें ३९३ जागांवर मजूरपक्षाचे उमेदवार निवडून येऊन ब्रिटनच्या इतिहासांत प्रथमच मजूर चळवळीला पार्लमेंटमध्यें निर्णायक बहुमत मिळालें. पॉट्स्डॅम परिषदेंत ट्रुमन-स्टॅलीनच्या जोडीला चर्चिलची जागा ॲटलीनें भरून काढली. मजूर पक्षानें युद्धोत्तर ब्रिटिश आर्थिक पुनर्संघटनेच्या स्वतंत्र समाजवादी कार्यक्रमावर जरी बव्हंशानें हें बहुमत मिळविलें होतें तरी समाजवादी ब्रिटन व सोव्हिएट रशिया यांच्या सहकार्यांतून समाजवादी युरोपची उभारणी होऊन युरोपला चिरकालीन शान्तता लाभेल ही ब्रिटिश जनतेची उत्कट इच्छा त्या सुयशास थोडीबहुत कारणीभूत होती. ही इच्छा लक्षांत घेऊन मजूर पक्षानें

आंतरराष्ट्रीय प्रश्नांवर सोव्हिएट रशियाचें सहकार्य संपादन करण्याचा प्रामाणिक प्रयत्न पुढील दोन वर्षांत करून पाहिला.

दुसऱ्या आंतरराष्ट्रसभेचें नेतृत्व जर्मन सोशल डेमोक्रॅटिक पार्टीनें केलें होतें. तिसऱ्या आंतरराष्ट्रसभेनें प्रथम ही बलशाली समाजवादी चळवळ दुभंगली व जर्मन कम्युनिस्ट पक्ष अखेर रशियन नेतृत्वाचा दास बनला. कोमिन्टर्नमध्यें सामील न झालेली सोशल डेमोक्रॅटिक चळवळ पुर्नसंघटित 'कामगार समाजवादी इंटरनॅशनल' मध्यें [ L. S. I. ] सामील झाली होती. या इंटरनॅशनलचें नेतृत्वहि बहुतांशीं युरोपीय समाजवादी पक्षांकडेच होतें. पण दुसऱ्या महायुद्धानंतर ब्रिटिश मजूर पक्षानें मिळविलेल्या घसघशीत यशानन्तर आंतरराष्ट्रीय समाजवादी चळवळीवरहि ब्रिटिश चळवळीची छाप पडली. नव्या आंतरराष्ट्रीय पुनर्संघटनेंत हाच नवा बलशाली पक्ष पुढाकार घेणार होता. या पक्षाच्या दृष्टिकोणाचा प्रभाव आंतरराष्ट्रीय समाजवादी चळवळीवर पडणार होता. १९४५ मध्यें समाजवादी व कम्युनिस्ट चळवळीच्या ऐक्याची शक्यता हिटलरविरोधी भूमिगत चळवळींतील संयुक्त आघाडींतून निर्माण झाली होती. १९४४ मध्यें खुद्द फ्रेन्च समाजवादी पक्षानें सोशलिस्ट–कम्युनिस्ट एकजुटीचा ठराव मांडला होता; तर इटलींत फॅसिस्ट मुसोलिनीच्या पराभवांतून या दोन चळवळींत वाढतें ऐक्य प्रस्थापित झालें होतें. १९४५ मध्यें युरोपमधील कांहीं समाजवादी पक्ष सत्तारूढ झाले तेव्हां समाजवादी चळवळहि अधिक बलवान बनली. ब्रिटनप्रमाणेंच ऑगस्ट १९४५ मध्यें स्वीडनमध्यें व डिसेंबर १९४५ मध्यें नॉर्वेत समाजवादी पक्षास हुकमी बहुमत मिळून ते पक्ष सत्ताधारी बनले. हिटलरचा पाडाव करणाऱ्या शूर लाल सेनेबद्दल व रशियाबद्दल युरोपीय जनतेंत आंतरिक सहानुभूति निर्माण झाली होती. या सर्व घटनांमुळे युद्धसमाप्तीबरोबर युरोपचें राजकीय नेतृत्व समाजवादी व कम्युनिस्ट चळवळींकडे जाण्याची अधिकाधिक शक्यता निर्माण झाली होती. जर ही शक्यता वस्तुस्थितींत येती तर युरोपीय राजकारणाचें व पर्यायानें जागतिक राजकारणाचें नेतृत्व अमेरिकेकडे गेलें नसतें. ब्रिटिश मजूरपक्ष आपल्या बाजूनें नव्या आंतरराष्ट्रीय समाजवादी चळवळींत,

कोमिन्फर्मची स्थापना होईपर्यंत, असें ऐक्य घडवून आणलेल्या समाजवादी शक्तीस व पर्यायानें स्टॅलीनला दुखविण्यास तयार नव्हता. या धोरणाच्या अम्मलबजावणीसाठींच आंतरराष्ट्रीय समाजवादी चळवळींतील आपली नवी प्रतिष्ठा तिनें उपयोगांत आणली. पण जागतिक कामगार चळवळींत व शक्य तर जागतिक सत्तासंघर्षांत आपलें एकतंत्री हुकुमशाही नेतृत्व प्रस्थापित करण्याचा डाव खेळणाऱ्या स्टॅलीननें या प्रयत्नास सुरुंग लावला.

१९४१ मध्यें पूर्व पोलंडचा ताबा घेतल्यावर स्टॅलीननें प्रथम पोलीश समाजवादी पक्षाचे जहाल नेते एरलिच व एलटेर यांना फांशीं दिलें. १९४३ नंतर फ्रेन्च व इटॅलियन कम्युनिस्ट पक्षानें फ्रान्समध्यें व इटलींत सत्तारूढ होण्यासाठीं आत्यंतिक राष्ट्रवादी धोरणाचा अवलंब करून पर्यायानें समाजवाद्यांस राष्ट्रविरोधी ठरविण्याचा प्रयत्न केला. फ्रेन्च व इटॅलियन जनतेस राष्ट्रवाद कीं समाजवाद यांत निवड करण्यास उद्युक्त न करतां कम्युनिस्टांनीं द गॉलचा राष्ट्रवाद कीं थोरेजचा, गॅसपेरीचा कीं टोलिॲत्तीचा असा प्रश्न जनतेपुढें टाकला. हिटलरचा सेनानी फॉन पॉलस् याचें नांव जर्मन गुन्हेगारांच्या यादींतून, तो रशियाप्रेमी बनतांच, स्टॅलीननें काढलें; पण जर्मन समाजवादी नेता शूमाकरचें नांव गुन्हेगारांच्या यादींतून वगळण्यास त्यानें विरोध केला. युरोपला समाजवादी बनावयाचें असेल तर त्यानें स्टॅलीनचें नेतृत्व पत्करलें पाहिजे हीच स्टॅलीनची व कम्युनिस्ट चळवळीची मागणी होती. समाजवादी हुकुमशाही कीं भांडवलशाही लोकशाही अशीच समस्या त्यामुळें जनतेपुढें उभी राहिली. लोकशाही स्वातंत्र्य व समतावादी समाजवाद या युरोपच्या गेल्या दीडशें वर्षांतील दोन प्रमुख क्रान्ति-प्रेरणा एकजीव करूं मागणाऱ्या समाजवादी लोकशाही शक्ती या संघर्षांत निष्प्रभ बनल्या. पण युद्धकालांत भरडून निघालेली जनता केवळ ध्येयनिष्ठ तत्त्वज्ञानाची बुभुक्षु राहिली नव्हती. आर्थिक स्वास्थ्य व राजकीय स्थैर्य मिळविण्यासाठीं अमेरिका अगर रशिया या युद्धोत्तर दोन महान् सत्तांपैकीं एका सत्तेचा आशीर्वाद असलेलें तत्त्वज्ञान स्वीकारण्याखेरीज तिला गत्यंतर उरलें नव्हतें. ब्रिटनमध्यें मजूर पक्ष सत्ताधारी बनला तरी खुद्द ब्रिटिश राष्ट्रच प्रथम श्रेणींतून

खालीं घसरलें होतें. राजकीय स्थैर्यासाठीं भुकेलेल्या जनतेस ब्रिटन व रशिया तुल्यबल वाटत नव्हते. रशियन सहकार्याच्या अभावीं ब्रिटनला व युरोपीय जनतेला अमेरिकेवर अधिकाअधिक अवलंबून राहावें लागलें. समाजवादी ब्रिटनला अमरिकेहून स्वतंत्र परराष्ट्रीय धोरण आंखणें कठिण बनूं लागलें. पश्चिम युरोपचें नेतृत्व अमेरिकेकडे गेल्यावर या देशांतील समाजवादी शक्तींऐवजीं राष्ट्रवादी व कॅथॉलिक शक्तीच अधिक प्रबल बनल्या. स्टॅलीनच्या एकतंत्री नेतृत्वाच्या धोरणामुळें व अमेरिकेच्या वाढत्या प्रभुत्वापुढें युद्धोत्तर समाजवादी चळवळींवर पडलेल्या मर्यादा ध्यानीं घेऊनच या चळवळींच्या आंतरराष्ट्रीय पुर्नसंघटनेचे प्रयत्न व त्यांचें यशापयश अभ्यासावयास हवें.

ब्रिटिश मजूर पक्षाच्या प्रेरणेनें १७ ते २० मे १९४६ मध्यें क्लॅक्टन येथें समाजवादी पक्ष प्रतिनिधींची पहिली प्रातिनिधिक आंतरराष्ट्रीय परिषद भरली. या परिषदेपुढें ब्रिटन, अर्जेंटिना, ऑस्ट्रिया, बेल्जियम, कॅनडा, डेन्मार्क, फ्रान्स, हॉलंड, न्यूझिलंड, नॉर्वे, स्वीडन, स्वित्झर्लंड, पॅलेस्टाईन, झेकोस्लोव्हाकिया, पोलंड, हंगेरी, रुमानिया व पोलंड या अठरा राष्ट्रांतील समाजवादी पक्षांनीं आपले अहवाल सादर केले. लाल सेना व्याप्त देशांतील समाजवादी पक्षांना नव्या संघटनेंत स्थान देण्यास ब्रिटिश मजूर पक्ष राजी होता. बल्गेरियांत कम्युनिस्ट धार्जिणा व स्वतंत्र असे दोन समाजवादी पक्ष होते म्हणून तात्पुरतें कोणत्याच पक्षास प्रतिनिधित्व देऊं नये असा निर्णय परिषदेनें घेतला. परिषदेचें कामकाज पाहाण्यासाठीं एक स्थायी सल्लागार समिती निर्माण झाली व लंडन येथें तिची कचेरी स्थापन करण्यांत आली. जर्मन समाजवादी पक्षाला अधिवेशनासाठीं निमंत्रण पाठवूं नये; फक्त जर्मनीच्या राजकीय परिस्थितीचा अभ्यास समितीनें करावा असाहि निर्णय घेण्यांत आला. बोर्न माऊथ येथें नोव्हेंबर १९४६ मध्यें परिषदेचें दुसरें खुलें अधिवेशन झालें. १९४७ च्या जूनमध्यें झूरीच येथें तिसरें अधिवेशन भरलें, तोंपर्यंत बाल्कन राष्ट्रांतील कम्युनिस्ट सत्ता संघटित झाल्या होत्या. कम्युनिस्टांशीं एकजूट करूं मागणाऱ्या समाजवाद्यांच्या साहाय्यानें त्यांनीं या राष्ट्रांत 'संयुक्त कामगार पक्ष' स्थापन केले होते व स्वतंत्र समाजवादी

पक्षांना दडपून टाकण्यांत आलें होतें. लाल सेना न पोहोंचलेल्या देशांतील समाजवादी चळवळ दुभंगली होती. एक गट कम्युनिस्ट पक्षांशीं सहकार्य करण्याची मागणी करीत होता तर दुसरा गट कम्युनिस्टविरोधी होता. रशियन प्रभावळींतील राष्ट्रांमधील समाजवादी चळवळ नांवापुरती समाजवादी राहिली आहे हें माहीत असूनहि ब्रिटन रशियाशीं सहकार्याचें धोरण ठेवूं इच्छित असल्यामुळें मजूर पक्ष प्रतिनिधींनीं झूरीच अधिवेशनांत स्टॅलीनचा आशीर्वाद असलेल्या समाजवादी गटालाच अधिकृत पक्ष म्हणून मान्यता देण्याच्या धोरणास पाठिंबा मिळविला, तर स्टॅलीन या कमकुवत धोरणाचा फायदा घेऊन परिषदेला सुरुंग लावण्याचा व आपलें सत्ताबाज राजकारण पुढें रेटण्याचा डाव डोळसपणें खेळत होता.

झूरीच अधिवेशनापूर्वी एप्रिलमध्यें स्टॅलीनच्या प्रेरणेनें हंगेरीयन पक्षानें डॅन्यूब राष्ट्रांतील समाजवादी पक्षांची एक स्वतंत्र बैठक घेतली. या परिषदेस पोलंड, झेकोस्लोव्हाकिया, हंगेरी, रुमानिया, बल्गेरिया व ऑस्ट्रिया या देशांमधील समाजवादी पक्ष हजर होते. हे पक्ष कम्युनिस्टांबरोबर आपल्या राष्ट्रांतील सरकारांत सामील झालेले होते. सहकार्याच्या सोवळ्या उद्देशानें बैठक बोलावली होती खरी पण झूरीच अधिवेशनांस एकमुखी विरोध करण्याचा उद्देश त्यामागें होता. अधिवेशनांत पूर्व गटाचा एक भाग म्हणून काम करण्यास ऑस्ट्रियन पक्षानें विरोध करतांच हा उद्देश विफल ठरला. परस्पर सहकार्याचा नाममात्र निर्णय घेऊन बैठक आटोपली. डॅन्यूब बैठक जे निर्णय घेण्यासाठीं बोलावली होती त्याची माहिती जगापुढें त्यामुळें निराळ्याच मार्गानें आली. पोलीश समाजवादी पक्षानें आपल्या मुखपत्रांतून असा प्रचार सुरू केला कीं जर्मन पक्षास कोमिस्कोमध्यें घेण्यास आपला तीव्र विरोध आहे. रशियानें पूर्व पोलंडमधला बराच भूप्रदेश गिळंकृत करून त्या मोबदल्यांत जर्मनीचा मोठा भाग तहाच्या द्वारां पोलंडला मिळवून देण्याचें आश्वासन दिलें होतें. या नव्या कल्पित चतुःसीमा जर्मन पक्षानें मंजूर कराव्या यासाठीं त्यांच्यावर विरोधांतून दडपण आणण्यांत येत होतें. झेक कम्युनिस्टधार्जिण्या समाजवादी पक्षानें अशी

ओरड सुरू केली कीं जर कोमिन्टर्न पुनर्संघटित झालेली नाहीं तर परिषदेमार्गें समाजवादी इंटरनॅशनलचें पुनरुज्जीवनहि होतां कामा नये. या प्रचाराच्या आघाडीला पाठबळ देण्यासाठीं खुद्द प्रवदानें ( रशियन मुखपत्र ) याच काळांत ॲटली, ब्लूम आदि समाजवादी नेत्यांवर ते समाजवादी चळवळींत फूट पाडूं पाहात आहेत अशी टीका सुरू केली. झूरीच अधिवेशनांतील संभाव्य कामकाजास अशा तऱ्हेनें अधिवेशन भरण्यापूर्वीच शह देण्यांत आला होता. रशियासंबंधींचें निर्णायक धोरण ब्रिटननें घेतलें नसल्यामुळें झूरीच परिषदेस मजूर पक्षनेते निःसंदिग्ध मार्गदर्शन करूं शकले नाहींत.

जर्मन पक्षास परिषदेंत सामील करून घ्यावें कीं नाहीं व परिषदेचें रूपांतर इंटरनॅशनलमध्यें करावें कीं नाहीं हेच प्रमुख प्रश्न झूरीच अधिवेशनापुढें होते. जर्मन प्रश्न अधिवेशनापुढें येतांच या प्रश्नाचा निर्णय कोणत्या पद्धतीनें घ्यावा यावरच तीव्र मतभेद झाले. हा निर्णय एकमताचा असला पाहिजे असा आग्रह डॅन्यूब गटानें धरला. एका पक्षानें विरोध केला तरी त्यामुळें जर्मन पक्ष कोमिस्कोबाहेर राहाणार होता. अखेर दोन तृतीयांश मतें पडलीं तरच जर्मन पक्षास सामील करून घ्यावें असा ठराव पास झाला. जर्मन पक्षाची बाजू मांडण्यासाठीं जर्मन समाजवादी नेता शूमाकर स्वतः अधिवेशनास हजर होता. पक्षातर्फे आपलें निवेदन त्यानें करावें व इतर प्रतिनिधींच्या प्रश्नांस उत्तर द्यावें अशी विनंती त्यास करण्यांत आली. जर्मन पक्ष पोलंडच्या नव्या चतुःसीमा मानण्यास तयार आहे का? हिटलरला अधिकारावर आणण्यास व ज्यूंच्या अमानुष कत्तलीस जर्मन पक्ष कारणीभूत बनला ही गोष्ट तुम्हांस मंजूर आहे का? अशा प्रकारचे सतरा प्रश्न एकट्या पोलीश प्रतिनिधीनें विचारले. या सर्व प्रश्नांस शूमाकरनें धीरोदात्त अशीं उत्तरें दिलीं. तो आपल्या उत्तरांत म्हणाला कीं जर्मन समाजवादी पक्ष शक्तिसर्वस्वानें नाझींशीं लढला, त्यांच्याशीं कोणताहि करार पक्षानें केला नाहीं अगर त्यांना पक्षानें सहकार्यहि दिलें नाहीं. पण जर्मन समाजवादी लोकशाही जर्मन जनतेचाच एक भाग आहे व म्हणून सर्व जर्मन जनता हिटलरला अधिकारावर आणण्यास व त्याच्या युद्धधोरणास जितक्या

प्रमाणांत जबाबदार आहे तितक्या प्रमाणांत पक्षहि आहे व त्याचे परिणाम भोगण्यांवाचून पक्षास सुटका नाहीं. ठरावास दोन तृतीयांश मतें मिळालीं नाहींत हें खरें पण परिषदेच्या सल्लागार समितीनें पुढल्या अधिवेशनापूर्वी जर्मनींत जाऊन या प्रश्नाचा सर्वांगीण अभ्यास करावा व आपला अहवाल सादर करावा असा निर्णय घेण्यांत आला. २० जूनला न्यूरेन्बर्ग येथें समितीची बैठक झाली. बेल्जियम समाजवादी पुढारी डी ब्रोकेअरनें झालेल्या चर्चेंतून १५ सप्टेंबरपर्यंत आपला अहवाल तयार करून सर्व सभासदांस पाठवावा व अधिवेशनाच्या आदल्या दिवशीं समितीनें त्यावर निर्णय घ्यावा असें या बैठकींत ठरलें. इंटर-नॅशनलच्या पुनर्संघटनेचा निर्णय झूरीच अधिवेशनानें घेतला नव्हता. झेक पक्षाच्या प्रचाराचें सार्थक झालें होतें.

२८ नोव्हेंबर १९४७ रोजीं परिषदेचें चौथें अधिवेशन ॲन्टवर्पला भरलें. जर्मन पक्षाचा प्रश्न, इंटरनॅशनलची स्थापना व समाजवादी दृष्टिकोणांतून युरोपच्या आर्थिक पुनर्संघटनेचा व आंतरराष्ट्रीय प्रश्नांचा विचार हेंच अधिवेशनापुढील प्रमुख कार्य होतें. दोन बल्गेरियन समाजवादी पक्षांपैकीं फक्त कम्युनिस्ट धार्जिण्या पक्षांस अधिवेशनास समीक्षक (observer) म्हणून हजर राहूं द्यावें असें ब्रिटिश पक्षाचें मत असूनहि दोन्ही पक्षांस समीक्षक म्हणून हजर राहूं देण्याची सूचना अधिवेशनांत पास झाली. दोन तृतीयांश मतानें जर्मन पक्षाला परिषदेंत सामील करून घेण्यांत आलें. या निर्णयानें एका बलशाली पुनरुज्जीवित समाजवादी चळवळीस परिषदेनें आपल्या संघटनेंत गोंविलें होतें. १९३१ सालीं जर्मन पक्षाचे सहा लाख सभासद होते, पण युद्धसमाप्तीपर्यंत ती संख्या त्रेसष्ट हजारां-वर आली होती. नोव्हेंबर १९४७ पर्यंत दोन वर्षांच्या कालावधींत जर्मन चळवळ पुनर्संघटित झाली होती. तिनें आठ हजार स्थानिक पक्षसमित्या पुनरुज्जीवित केल्या होत्या व पक्षाचे आठ लाख सभासद नोंदविले होते. हिटलरच्या भीषण दडपशाहीनेंहि समाजवादी लोकशाहीचें जनतेच्या मनांतील प्रेम नष्ट झालें नव्हतें, ती अनुकूल परिस्थितीची वाट पाहात होती हें यांतून सिद्ध झालें. ॲन्टवर्प येथें फ्रेंच व बेल्जियम पक्ष इंटरनॅशनलची अधिकृत

स्थापना व्हावी या मताचे होते. झेक पक्षाऐवजीं यावेळीं पोलीश पक्षानें त्यास विरोध केला. पण त्याच पोलंडमध्यें सप्टेंबरमध्यें कोमिन्टर्न कोमिन्फर्मच्या नांवानें पुनरुज्जीवित झाली होती व झेक पक्षाचा पूर्व आक्षेप खोटा पडला होता हें विसरतां नये. ब्रिटिश मजूर पक्षाच्या विरोधामुळें हा प्रश्न या अधिवेशनांतहि पुढें ढकलण्यांत आला. ब्रिटन, सोव्हिएट रशियाच्या मैत्रीसाठीं ही किंमत, ॲटली आदि नेत्यांवर प्रवदांतून हल्ले होत असूनहि अजून मोजीत होता. ॲंटवर्पपर्यंत परिषदेचें कार्य सल्लागार समिति पाहात होती. पण या अधिवेशनांत सल्लागार समितीचें रूपान्तर तिला अधिक घटनात्मक अधिकार देऊन मध्यवर्ती कार्यकारी समितींत करण्यांत आलें. ‘ कोमिस्को ’ ( समाजवादी पक्षांची आंतर-राष्ट्रीय समिति ) या नांवानें ती संबोधली जाऊं लागली. गट–परिषदा भरविण्यास परिषदेनें मोकळीक देऊन डॅन्यूबवाद्यांचा रस्ता मोकळा केला होता. आर्थिक पुनर्संघटन व आंतरराष्ट्रीय परिस्थितीवरील महत्त्वपूर्ण ठराव अगदींच मोघम व सर्व गटांस पसंत पडेल अशा प्रकारचा होता. ठरावाचा मसुदा चर्चेस आला तेव्हां डच प्रतिनिधी उठून म्हणाला, “ ठरावांत अमेरिकन भांडवलशाहीच्या धोक्याकडे बोट दाखविण्यांत आलें आहे, पण मॉस्कोचें धोरणहि स्वातंत्र्य व लोकशाहीस आव्हान देत आहे; तेव्हां ठरावाचें स्वरूप एकांगी वाटतें ”* मार्शल योजना राष्ट्रीय स्वातंत्र्यावर घाला घालणारी आहे या टीकेचें ब्रिटिश प्रतिनिधि हेलेनें खंडन केलें. पण मोलोटाव्ह–योजनेनुसार पूर्व युरोपांतील राष्ट्रें करीत असलेल्या आर्थिक सहकार्याचाहि ठरावांत गौरव करण्यांत आला. सर्व युरोप-मधील राष्ट्रें अखेर परस्पर आर्थिक सहकार्य करतील अशी आशाहि ठरावांत व्यक्त करण्यांत आली. पश्चिमेकडील व पूर्वेकडील समाजवाद्यांनीं खरें मतैक्य अशक्य आहे हेंच हा ठराव सम्मत करून जाहीर केलें होतें. मजूर पक्षाच्या नेतृत्वामुळेंच ॲन्टवर्प येथें वरकरणी ऐक्य सांधलें गेलें होतें.

ॲन्टवर्प परिषदेपूर्वीं झेक समाजवादी पक्षाची व कम्युनिस्ट पक्षाची

---

* नाशिक येथील सहाव्या समाजवादी पक्षपरिषदेचा वृत्तान्त : पान १२८.

सप्टेंबरमध्यें संयुक्त बैठक झाली होती. बैठकीनंतर पक्ष सभासदांसाठीं काढलेल्या पत्रकांत समाजवादी प्रतिनिधींनीं लिहिलें होतें कीं, "पूर्णतया लोकशाही मार्गानें लोकसत्ताक झेकोस्लोव्हाकियाची उभारणी करण्याची कम्युनिस्ट घोषणा लक्षांत घेऊनच आम्ही एकजुटीचा निर्णय घेतला आहे." * १९४७ च्या शेवटच्या निवडणुकींत ३०६ पैकीं ११८ जागाच झेक कम्युनिस्ट पक्षानें जिंकल्या होत्या. पण फेब्रुवारी १९४८ मध्यें या अल्पमतवादी पक्षानें अवचित झेक शासनसंस्थेचा ताबा घेतला. कम्युनिस्टांची 'पूर्णतया लोकशाही मार्गाची' घोषणा अशा प्रकारची होती. झेक समाजवाद्यांनीं या घोषणेवर 'विश्वास' ठेवून समाजवादी चळवळीचा विश्वासघात केला होता. झेक कम्युनिस्टांचा विशेष भर उद्योगधंद्यांच्या राष्ट्रीयीकरणावर होता. तर फिनलंडमधील कम्युनिस्ट पक्ष, समाजवादी पक्षाचा सरचिटणीस यू. वारजोनेन फिनीश उद्योगधंद्यांच्या राष्ट्रीयीकरणासाठीं मागणी करीत असतां, त्यांस विरोध करीत होता. फिनलंडवर रशियानें बसविलेला जबर युद्धदंड राष्ट्रीयीकरण झाल्यास निःशंकपणें उकळतां येणार नाहीं म्हणून फिनीश कम्युनिस्ट परप्रेरणेनें राष्ट्रीयीकरणास विरोध करीत होते. पूर्व यूरोपचें आर्थिक पुनर्संघटन रशिया कोणत्याहि तात्त्विक भूमिकेनें करीत नव्हता तर आपला स्वार्थ साधण्याची बुद्धिच त्यामागें होती हें अशा अनेक उदाहरणांवरून सिद्ध करतां येईल. झेकची सत्ताक्रान्तिहि उद्योगधंद्यांच्या परिणामकारक राष्ट्रीयीकरणाच्या धोरणाहून या स्वार्थी व सत्ता विस्ताराच्या उद्दिष्ट पूर्तीसाठींच घडून आली होती. पूर्व युरोपमधील समाजवादी चळवळ १९४७ नंतरच्या चढाईच्या धोरणांत पुरती नष्ट झाली तेव्हां पश्चिम युरोपमधील समाजवाद्यांचे व ब्रिटिश मजूर पक्षाचे डोळे उघडले. आपलें मिळतें घेण्याचें धोरण त्यांनीं सोडून दिलें. कोमिस्कोच्या चळवळींत नवा उत्साह दिसूं लागला. १९४८ च्या बर्लीन कोंडींतून ही ऐक्यभावना वाढली. जून १९४८ मध्यें व्हिएन्नांत, मे १९४९ मध्यें बर्न येथें व जून १९५० मध्यें कोपनहेगन येथें कोमिस्कोचें पांचवें, सहावें व सातवें खुलें अधिवेशन झालें. या अधिवेशनांतून इंटरनॅशनलच्या अधिकृत

* कोमिस्को बुलेटिनमधून.

स्थापनेस वाढता पाठिंबा निर्माण झाला, लोकशाही समाजवादाच्या मूलभूत तात्त्विक निष्ठेबद्दल निरनिराळ्या घटक पक्षांत व अधिवेशनांत गंभीर चर्चा झाली व संघटनात्मक चळवळीकडे कोमिस्कोनें अधिक लक्ष पुरविलें. मार्च १९५१ मध्यें लंडन येथील आठव्या अधिवेशनांत एका प्रमुख प्रश्नाचा निर्णय लागला. कोमिस्कोचें ' सोशलिस्ट इंटरनॅशनल ' मध्यें सर्वसम्मतीनें रूपांतर झालें. लोकशाही समाजवादाच्या मूलभूत तत्त्वानिष्ठेचें निवेदन करणारा मसुदा अधिवेशनापुढें आला तेव्हां तो अधिक विचारासाठीं कार्यकारी समितीची जागा घेतलेल्या मध्यवर्ती कौन्सिलकडे पुनश्च धाडण्यांत आला. सहा वर्षांच्या पूर्वकार्यानंतर आज ' सोशलिस्ट इंटरनॅशनल ' जगांतील समाजवादी चळवळी एका संघटनेंत गोवूं व संघटित करूं मागत आहे.

१९३१ मध्यें कामगार समाजवादी इंटरनॅशनलचें अखेरचें अधिकृत अधिवेशन झालें तेव्हां तिला ३६ पक्ष जोडलेले होते, त्यांची एकुण सभासद संख्या ६२,०४००० होती व घटक पक्षांचें शेवटचें एकूण मतदान २,६४,००००० होतें. आज नव्या इंटरनॅशनलला ३१ पक्ष जोडले गेले आहेत, एकुण सभासदसंख्या ९६,०१००० आहे व अखेरचें एकूण मतदान ४,३६,८२००० झालें आहे. ब्रिटिश, स्वीडिश व नॉर्वेजियन घटक पक्ष सत्ताधारी आहेत तर ऑस्ट्रियन, डच, फ्रेन्च, इस्राइल व स्विस पक्ष आपल्या सरकारांत सहभागी आहेत. या सर्व देशांतील कम्युनिस्ट चळवळीची आज तरी पीछेहाट चालू आहे. स्वीडनमध्यें कम्युनिस्ट मतदान दोन लाखांनीं कमी झालें आहे तर ६०० ऐवजीं १२५ स्थानिक ट्रेड युनियन्समध्येंच आज ते कार्यकारिणींत आहेत. फ्रान्समधील पक्ष सभासद संख्या त्यांच्या रिपोर्टाप्रमाणेंच एक लाखानें कमी झाली आहे. ब्रिटन, डेन्मार्क, नॉर्वे, बेल्जियम, ऑस्ट्रिया व पश्चिम जर्मनी यांतील आंकडेहि हीच पीछेहाट दर्शवितात. पण समाजवादी शक्तींची वाढ अगर कम्युनिस्ट पीछेहाट केवळ संख्यात्मक बलाबलांतून अभ्यासून या शक्तींचें वास्तव मूल्यमापन आज होणार नाहीं. वस्तुतः अमेरिका व रशिया यांतील वाढत्या सत्तासंघर्षांत आज समाजवादी चळवळ १९३३ प्रमाणेंच

पुनश्च संरक्षण व माघारीच्या अवस्थेस जाऊन पोहोंचली आहे. जगाच्या राजकारणास स्वतंत्र व परिणामकारक वळण देण्यास ती असमर्थ ठरली आहे.

अमेरिकेंतील लक्षावधींची कामगार चळवळ कितीहि बलशाली व संघटित असली तरी वर्गहित–रक्षणापलीकडे राष्ट्राच्या राजकारणास समाजवादी वळण देण्याचा प्रयत्न, छोटे समाजवादी पक्ष वा गट सोडल्यास, तिनें कधीं केलेला नाहीं अगर आपला व्यापक राजकीय पक्ष उभारला नाहीं. कम्युनिस्ट जगांतील कामगारवर्ग व जनताहि आज या सत्तासंघर्षापासून रशियन सत्ताधाऱ्यांना परावृत्त करण्यास स्वतंत्र व संघटित नाहीं. त्या देशांत अनियंत्रित हुकुमशाहीचा अम्मल सुरू आहे. रशियन कम्युनिझमचें उद्दिष्ट जागतिक सत्ता–प्रभुत्वाचें असल्यामुळें व 'लोकशाही', 'शांतता', 'साम्राज्यशाहीविरोधी एकजूट', 'जहाल वा समाजवादी एकजूट' हे कम्युनिस्ट चळवळीचे अनेकविध आविष्कार त्या उद्दिष्टपूर्तीचेच अनेक डावपेंच असल्यामुळें हा अमेरिका व रशियामधील जागतिक सत्तासंघर्ष नजीकच्या भविष्यकालांत मिटण्याची कोणतीच संभाव्यता नाहीं. अशा परिस्थितींत सोशलिस्ट इंटरनॅशनलची संख्यात्मक वाढ परिस्थितींत कांहीं गुणात्मक फरक घडवून आणील, अशी आशा धरून चालणार नाहीं. त्यांतून नव्या इंटरनॅशनलचें स्वरूपहि आजमितीस युरोपीयच आहे. हिंदी समाजवादी चळवळ अजून तिची अविभाज्य घटक बनलेली नाहीं व ती अगर आशियांतील इतर राष्ट्रांतील समाजवादी चळवळहि आज बाल्यावस्थेंत असल्यामुळें आपल्या राष्ट्रांतील व आफ्रिकेंतील कोट्यवधी जनतेंत समाजवादी जागृति निर्माण करून या सत्तासंघर्षापलीकडे जगांतील जनतेला नेण्याची कुवत या मितीस तिच्यामध्यें नाहीं. म्हणूनच जागतिक समाजवादी चळवळीचें मूल्यमापन या नजीकच्या भविष्यकालावर दृष्टि ठेऊन होणें जरूर आहे.

● ● ●

: २१ :

# आशियांतील समाजवाद

**पाश्चिमात्य** राष्ट्रांच्या औद्योगिक भरभराटीस पूर्वेकडील वसाहतींच्या आर्थिक शोषणानें बराच हात दिला होता. युरोपीय जनतेनें स्वराष्ट्रांतील जमीनदारशाही व अनियंत्रित राजेशाही यांचा अन्त करून तेथें लोकशाही राज्यव्यवस्था निर्माण केल्या होत्या खऱ्या पण तेथील राज्यकर्त्या वर्गांत बदल होऊनहि वसाहतीपर्यंत हें सुधारणांचें लोण फार काल येऊन पोहोंचलें नाहीं. वसाहतींतील जनतेची राजकीय गुलामी व अर्थशोषण विसाव्या शतकापर्यंत अप्रतिहत चालू होतें. साम्राज्यशाही राष्ट्रांतील अंतर्गत विरोधांतून व तद्जन्य दोन महायुद्धांतूनच आशियांतील बहुतेक स्वातंत्र्यवादी चळवळींना आपली राजकीय गुलामी झुगारून देण्यास व औद्योगिक भरभराटीसाठीं अनुकूलता लाभली. युरोपमधील साम्राज्यशाहीविरोधी शक्तींनीं व चळवळींनींहि वसाहतींतील स्वातंत्र्यवादी चळवळींस वाढता पाठिंबा दिला. आशियांतील समाजवादी चळवळींची वाढ एक तर या साम्राज्यशाहीविरोधी स्वातंत्र्य लढ्यांतून झाली अगर कोमिन्टर्न स्थापन झाल्यावर तिनें आशियांतील अनेक राष्ट्रांत आपले एजन्ट्स पाठवून जी कम्युनिस्ट चळवळ सुरू केली त्यामधून कामगार व समाजवादी चळवळ वाढीस लागली. तिचें नेतृत्व प्रायः पाश्चिमात्य राजकीय विचार-

प्रणालींशीं संबंध आलेल्या बुद्धिजीवी वर्गानें केलें तर साम्राज्यशाही अर्थशोषणांत भरडून गेलेल्या व निकृष्ट राहाणीमान असलेल्या श्रमजीवी जनतेनें या चळवळीस जनशक्ति पुरविली. राजकीय स्वातंत्र्य, औद्योगिक भरभराट व लोकशाही कामगार चळवळ आणि समाजवाद या युरोपीय विकासक्रमांतून या देशांतील समाजवादी चळवळ गेली नाहीं. युरोपीय साम्राज्यसत्तांनीं तिला विचार व संघटना स्वातंत्र्य लाभूं न दिल्यामुळें क्रान्तिकारी मार्गाकडेच तिचा ओढा राहिला. तिचें नेतृत्व अनेक ठिकाणीं कम्युनिस्टांच्या हातीं गेलें. आपल्या स्वशक्तीपेक्षां आंतरराष्ट्रीय संघर्षांचा फायदा घेऊनच ती वाढल्यामुळें आज तिच्या विकासास जबरदस्त मर्यादा पडल्या आहेत.

यशस्वी रशियन राज्यक्रान्तीनें आशियांतील क्रान्तिकारी शक्तींमध्यें नवा विश्वास निर्माण झाला. लेनीननें सत्ता ताब्यांत घेतांच झारच्या साम्राज्यावर पाणी सोडलें व भिन्नभिन्न राष्ट्रिकांना स्वयंनिर्णयाचा हक्क बहाल केला तेव्हां, आशियांतील साम्राज्यशाहीविरोधी जनतेच्या मनांत कम्युनिस्ट रशियाबद्दल नितान्त आदर निर्माण झाला होता. साम्राज्यशाहीविरोधी स्वातंत्र्य लढ्यास कोमिन्टर्ननें निःसंदिग्ध पाठिंबा जाहीर करून आपल्या आंतरराष्ट्रीय क्रान्तीच्या आघाडींत या वसाहतींतील चळवळींचा समावेश करून घेतला तेव्हां तिला या चळवळींची सहानुभूति मिळाली. ही सहानुभूति कार्यान्वित करण्याचे दोन मार्ग कोमिन्टर्नेला उपलब्ध होते. या चळवळीचे अविभाज्य घटक बनून ती अधिक क्रान्तिप्रवण बनविणें अगर स्वतंत्र कम्युनिस्ट पक्ष स्थापून ही सहानुभूति पक्षाच्या झेंड्याखालीं संघटित करणें. क्रान्तीचें एकतंत्री नेतृत्व करण्याच्या धोरणानुसार एकवीस शर्तींचा ठराव समाजवादी व कामगार चळवळींवर लादून तिनें युरोपीय समाजवादी चळवळींत फूट पाडली होती. तर स्वातंत्र्यवादी चळवळींत सामील होण्याचा आदेश कम्युनिस्टप्रेमी तरुणांना देण्याऐवजीं स्वतंत्र कम्युनिस्ट पक्ष स्थापन करून, तिनें आशियांतील साम्राज्यशाहीविरोधी चळवळींत सवता सुभा निर्माण केला. १९१९ सालीं इंडोनेशियांत, १९२० मध्यें ऑस्ट्रेलियांत, १९२१ मध्यें चीनमध्यें, १९२२ मध्यें जपानमध्यें, १९२५ मध्यें

कोरियांत व मलायांत तिनें कम्युनिस्ट पक्ष स्थापन केले. कॉम्रेड रॉय यांच्या-मार्फत हिंदुस्थानांतहि याच काळांत कम्युनिस्ट पक्ष स्थापन करण्याचा प्रयत्न कोमिन्टर्ननें केला. या राष्ट्रांपैकीं फक्त ऑस्ट्रेलिया व जपानमध्येंच यापूर्वी समाज-वादी चळवळ सुरू झाली होती. इतर सर्व देशांत कम्युनिस्टांनींच समाजवादी चळवळीस आरंभ केला.

ऑस्ट्रेलियांत १८९१ पासूनच मजूर प्रतिनिधी पार्लमेंटमध्यें निवडून येऊं लागले होते व निवडणुकांच्या मार्गानें राज्यकारभार हातीं घेण्याच्या मार्गाला ती चळवळ लागली होती. जपानमध्यें १८९७ सालीं सेन कात्यायामा यानें समाजवादी अभ्यासमंडळें व ट्रेड युनियन्सद्वारां चळवळीची मुहूर्तमेढ रोवली. पण राज्यकर्त्या वर्गानें दडपशाही करून तिला कित्येक वर्षें डोकें वर काढूं दिलें नाहीं. १९१४ च्या महायुद्धांत जपानची झपाट्यानें औद्योगिक भरभराट झाली. प्रमुख शहरांत मोठ्या संख्येनें कामगारवर्ग संघटित झाला. युद्धोत्तर महागाईतून भाकरीचीं बंडें उद्भवलीं. या असंतोषांतून कामगारांना संघटनेचा व संपाचा अधिकार मिळाला. १९२२ मध्यें कात्यायामाच्या नेतृत्वा-खालींच कम्युनिस्ट पक्ष स्थापन झाला. १९२७ मध्ये जपानी जनतेस सार्वत्रिक प्रौढ मतदानाचा अधिकार मिळवून देण्यांत समाजवादी व कामगार चळवळींचा बराच हात होता. १९२८ च्या पहिल्या निवडणुकींत सर्व समाजवादी गटांना मिळून ५ लाख मतें मिळालीं. इसो आबेच्या [ Isoh Abe ] नेतृत्वाखालीं समाजवादी लोकशाही पक्षानें यानंतरच्या प्रत्येक निवडणुकींत वाढते प्रतिनिधी डायटमध्यें पाठविले पण १९४० सालीं जपानी लष्करशाहीनें राज्यकारभारांत आपलें प्रभुत्व प्रस्थापित करून सर्व राजकीय पक्ष बंद पाडले. जपानी कम्युनिस्टांनीं यूनानमध्यें १९४३ मध्यें मुक्तिलीग स्थापन करून जपानी लष्करशाहीविरुद्ध आपला लढा सुरू ठेवला होता. १९४५ मध्यें जपानचा पराभव झाल्यानंतर समाज-वादी लोकशाही पक्ष पुनर्संघटित झाला. ‘ राजाचीहि युद्धगुन्हेगार म्हणून चौकशी व्हावी ’ ही कम्युनिस्ट पक्षाची मागणी जनतेला मानवणारी नव्हती. १९४६ मध्यें त्यांनीं सर्वत्र संपाची वावटळ निर्माण केली व १९४७ च्या प्रारंभीं सार्वत्रिक

संपासाठीं जेव्हां कामगारांना आवाहन केलें गेलें तेव्हां जनरल मॅकार्थरनें सार्वत्रिक संपावर बंदी घातली. एप्रिल १९४७ मध्यें नव्या निवडणुकी झाल्या तेव्हां समाजवाद्यांनीं कम्युनिस्टांची एकजुटीची मागणी धिक्कारली. "आर्थिक पुनर्संघटनेसाठीं सार्वत्रिक संपाचा अवलंब करण्याचा तुमचा अजब मार्ग आम्हांस पसन्त नाहीं व आमचा पक्ष राजकीय संपाच्या विरोधी आहे" * असें उत्तर त्यांनीं कम्युनिस्टांना दिलें. निवडणुकींत १४४ जागा मिळवून समाजवादी लोकशाही पक्ष लोकसभेंतील सर्वांत मोठा पक्ष बनला होता; तर कम्युनिस्टांना फक्त २ च जागा मिळाल्या. पण तेवढ्यावरून कम्युनिस्टांना जनतेंत असलेला पाठिंबा ठरविणें चूक ठरेल. जपानमधील कम्युनिस्ट चळवळ आज पुनर्संघटित झाली असून पक्षाचे ५०००० सभासद आज जपानमध्यें आहेत. रशिया व अमेरिका यांच्यामधील सत्तासंघर्षाचा कांहीं निर्णायक शेवट होईपर्यंत जपानमधील समाजवादी चळवळीचें भवितव्य निश्चित होणार नाहीं.

जपाननें १९४१ मध्यें पॅसिफिक युद्ध सुरू केल्यावर आग्नेय आशियांतील मलाया, इंडोचायना, इंडोनेशिया, ब्रह्मदेश व फिलिपाइन्स या राष्ट्रांवर आक्रमण केलें. सयाम (थायलंड) या एकमेव स्वतंत्र राष्ट्रांतील राजसत्तेनें जपानशीं दोस्ती केली. जपानच्या आक्रमणांतून या राष्ट्रांतील राष्ट्रीय स्वातंत्र्यवादी चळवळींना चैतन्य मिळालें व स्वातंत्र्य मिळविण्यासाठीं निकराचा प्रयत्न करण्यास अनुकूल संधिहि प्राप्त झाली. युद्धाच्या पार्श्वभूमीवर हे प्रयत्न सशस्त्रच राहाणार होते. जपानच्या चढाईच्या काळांत दोस्त राष्ट्रें जपानविरोधी प्रत्येक प्रतिकाराच्या चळवळीकडे आपुलकीनें पाहात होतीं. तेव्हां आजपर्यंत जंगला-पर्वतांत आश्रय घेऊन राहिलेल्या कम्युनिस्ट गुप्त चळवळींना जपानविरोधी प्रतिकार चळवळींत उजळ माथ्यानें सामील होण्यास संधि लाभली. मलाया, फिलिपाइन्स व इंडोनेशियांत तर कम्युनिस्ट गुप्त हेरच दोस्त राष्ट्रें व स्थानिक प्रतिकार चळवळी यांच्यांत दुवा म्हणून काम करीत होते. दोस्तांनीं त्यांच्या

* वर्ल्ड कम्युनिझम टुडे : पान ३५१.

मार्फतच प्रतिकार चळवळींस शस्त्रास्त्रें व इतर साहित्य पुरविलें होतें. १९४७ नंतर हींच शस्त्रें कम्युनिस्टांनीं मलाया व फिलिपाइन्समध्यें गृहयुद्धासाठीं वापरलीं. १९४१ मध्यें इंडोचायना जपानी लष्करानें व्यापूनहि हिटलरबरोबर दोस्ती केलेल्या व्हिशी सरकारच्या वसाहत खात्याच्या अमलांत त्यांनीं हस्तक्षेप केला नव्हता. पण फ्रेंच प्रतिकार चळवळ वाढली तेव्हां १९४५ च्या मार्चमध्यें जपाननें राज्यकारभार स्वतःच्या हातीं घेतला. याच काळांत इंडोचायनामधील स्वातंत्र्यवादी चळवळ दक्षिण चीनमधून आपलीं सूत्रें हलवीत होती. डाँग मी होई हा राष्ट्रवादी नेता व हो शीं मीं हा कम्युनिस्ट नेता यांचें प्रतिस्पर्धि नेतृत्व प्रस्थापित झालें होतें. महायुद्धांत जपानचा पराभव झाल्यावर ब्रिटिश व त्यांच्या पाठोपाठ फ्रेंच लष्कर इंडोचायनांत उतरलें. यावेळीं फ्रेंच कम्युनिस्ट वसाहतींचा लढा तीव्र करण्याच्या धोरणाचा अवलंब करीत नसल्यामुळें अखेर हो शीं मीं वर दडपण पडून फ्रेंच व इंडोचिनी स्वातंत्र्यवादी चळवळ यांच्यांत तात्पुरता समझोता झाला. पण १९४६ अखेर फ्रेंच व हो शीं मीं यांच्यांत पुनश्च सशस्त्र लढाई सुरू झाली. १९४७ नंतर कम्युनिस्टांनीं जागतिक चढाईच्या धोरणाचा पुरस्कार केल्यावर ज्या हो शीं मींला त्यांनीं अडचणींत टाकलें होतें त्यालाच ते संपूर्ण पाठिंबा देऊं लागले. इंडोचायनाच्या स्वातंत्र्याचा प्रश्नहि जागतिक सत्तासंघर्षाच्या कोंडींत आज सांपडला आहे.

इंडोनेशियांतील स्वातंत्र्यवादी चळवळ जपानच्या माघारीच्या काळांत त्यांनींच टाकलेल्या हत्यारांनीं सशस्त्र होत होती. राष्ट्रीय नेता सोकार्नोनें जपानला नाममात्र पाठिंबा दिला होता; तर समाजवादी पुढारी शहरीर जपानच्या प्रतिकार चळवळींतून पुढें आला होता. जपान शरण आल्यापासून केवळ तीन दिवसांच्या आंत हे दोन नेते एकत्र आले व त्यांनीं स्वतंत्र इंडो-नेशियन प्रजासत्ताकाची घोषणा केली. जपाननें सोडलेला राज्यकारभार व शस्त्रास्त्रें प्रजासत्ताकाच्या हातीं आलीं होतीं. साम्राज्यवादी डच फौजांनीं आपली वसाहत व्यापण्याचा नंतर पुनः प्रयत्न केला पण त्यांत त्यांना यश आलें नाहीं. १९४८ मध्यें आपल्या आत्यंतिक धोरणानुसार कम्युनिस्टांनीं

प्रजासत्ताकाविरुद्ध बंड केलें. पण इंडोनेशियन प्रजासत्ताकाच्या सैन्यानें तें झोडपून टाकलें. नवोदित प्रजासत्ताकाला संकटांत टाकणाऱ्या कम्युनिस्ट पक्षास आंतरराष्ट्रीय संघर्षाखेरीज पुनश्च इंडोनेशियांत व्यापक पाठिंबा मिळण्याची आशा आज राहिलेली नाहीं. युद्धकाळांत मलायामध्यें ब्रिटिशांच्या मदतीनें जपानशीं लढणाऱ्या कम्युनिस्टांनीं १९४८ मध्यें ब्रिटिश साम्राज्यफौजांविरुद्ध उठाव केला. पण मलायांतील चिनी, मलायी व हिंदी प्रजेपैकीं चिनी लोकांखेरीज फारच थोडा पाठिंबा त्यांना या उठावांत लाभला आहे. आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट आघाडीचें राजकारण म्हणून हा उठाव सुरू झाला असल्यामुळें जागतिक सत्तासंघर्षाचा प्रश्न सुटेपर्यंत मलायी जनताहि स्वतंत्र होण्याची आशा आज राहिलेली नाहीं. ब्रह्मदेशांत प्रथम जपाननें व नंतर ब्रिटननें लष्करी आक्रमण केलें. युद्धकाळांत सुरू झालेल्या चळवळींत ऑंग सानची फॅसिझमविरोधी स्वातंत्र्यवादी जनता लीग (AFPFL) हीच प्रमुख होती. त्यांनीं स्थापलेलें जनता सैनिक दल (P. V. O.) हेंच त्यांचें लष्कर होतें. प्रथम ब्रिटिश सरकार ऑंगशीं सहकार्य करण्यास तयार नव्हतें. पण वसाहतीचें प्रदीर्घ युद्ध कीं ऑंगशीं सहकार्य यांत निवड करण्याचा प्रश्न नवोदित मजूर सरकारवर आला तेव्हां त्यांनीं सहकार्याचा मार्ग स्वीकारला व ४ जानेवारी १९४८ रोजीं ब्रह्मदेश स्वतंत्र झाला. पण नव्या स्वातंत्र्याविरुद्ध आत्यंतिक राष्ट्रवादी व जहाल कम्युनिस्ट या दोघांनींहि शस्त्र उगारलें. ऑंगसान व त्याच्या सहकाऱ्यांना ठार करण्यांत राष्ट्रवाद्यांना यश आलें खरें पण तो मार्ग अखेर आत्मघातकी ठरला. लाल झेंडा कम्युनिस्ट, पांढरा झेंडा कम्युनिस्ट, पी. व्ही. ओ. मधील व्हाईट बँड यांनीं व स्वतंत्र राष्ट्र निर्माण करूं पाहाणाऱ्या फुटीर केरेन्सनीं, १९४८ व १९४९ मध्यें, स्वतंत्रपणें व कधीं कांहींनीं संयुक्तपणें नव्या सरकारविरुद्ध सशस्त्र उठाव केले. थाकीन् नू व त्याचे समाजवादी मित्र यांनीं १९४८ च्या जूनमध्यें १५ कलमी राष्ट्रीय कार्यक्रम जाहीर करून ही जहाल चळवळीची लाट मध्येंच फोडण्याचा प्रयत्न केला. जमिनींचें राष्ट्रीयीकरण व कांहीं ब्रिटिश धंद्यांची सरकारी मालकी यांचा त्यांत प्रामुख्यानें समावेश होतो. पण अजूनहि ब्रह्मदेश गृहयुद्धाच्या बाहेर पडलेला नाहीं. थायलंडमध्यें प्रिडी व

पिबूल या नागरी व लष्करी नेत्यांत सत्तासंघर्ष सुरू असला तरी जपानच्या पराभवानंतरहि थायलंडचें स्वातंत्र्य अबाधित राहिलें आहे. समाजवादी चळवळीला तेथें आज तरी कांहीं स्थान नाहीं.

या बहुतेक देशांत कमी अधिक चिनी प्रजा आहे; भिन्न धर्मीय जनता आहे. चीन कम्युनिस्ट झाल्यानंतर या देशांतील चिनी प्रजेमार्फत वा तिच्या नांवानें चीनचा हस्तक्षेप या राष्ट्रांत होण्याची अगर जागतिक संघर्षाचा डाव म्हणून भिन्न धर्मीयांत वितुष्ट निर्माण करून या देशांत राजकीय अस्थिरता निर्माण केली जाण्याची बरीच शक्यता आहे. या सर्व देशांत दुसऱ्या महायुद्धापूर्वी समाजवादी चळवळ नव्हतीच. तेव्हां ती नव्यानें संघटित होण्यास बराच कालावधि लागेल. कम्युनिस्ट चळवळ जनतेच्या आकांक्षा व आर्थिक प्रगतीहून तसेंच नवोदित स्वातंत्र्य संघटित करण्याहून, आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट सत्ता संघर्षाचें घोडें पुढें दामटण्याचा खेळ खेळत असल्यामुळें तिलाहि स्वतंत्र भवितव्य नाहीं. आज तरी जनतेंत स्वतंत्र अधिष्ठान असलेली व बऱ्याच वर्षांची तपश्चर्या पाठीशीं असलेली एकच समाजवादी चळवळ आशियाई राष्ट्रांत आहे. त्या हिंदी समाजवादी चळवळीचा ओझरता आढावा येथें घेतला पाहिजे.

हिंदुस्थानांतील समाजवादी चळवळींची राष्ट्रव्यापी संघटनात्मक वाढ १९३४ सालीं कॉंग्रेस समाजवादी पक्ष स्थापन झाल्यावरच सुरू झाली. कोमिन्टर्नच्या प्रयत्नानें १९३० पूर्वीहि हिंदुस्थानांत तरुण मार्क्सवाद्यांचा गट स्थापन होऊन मुंबई, कलकत्ता यासारख्या मोठ्या शहरांतील कामगारवर्गांत तो काम करूं लागला होता. मानवेंद्रनाथ रॉय कोमिन्टर्नच्या मर्जीतून उतरल्यावर या गटास मार्गदर्शन करण्याचें काम ब्रिटिश कम्युनिस्ट पक्षाकडे सोंपविण्यांत आलें होतें. सुरवातीच्याच काळांत सहाव्या कॉंग्रेसच्या धोरणानुसार या गटानें बाल्यावस्थेंतील कामगार चळवळींत फूट पाडून स्वतंत्र लालबावटा युनियन काढल्यामुळें व १९३०-३२ च्या देशव्यापी स्वातंत्र्य चळवळीस भांडवलदारांची चळवळ संबोधून, तिला प्रकट विरोध केल्यामुळें कम्युनिस्ट चळवळ, स्वातंत्र्यवादी जनतेची

सहानुभूति गमावून बसली. पण स्वातंत्र्य संग्रामांत सामील झालेल्या शेकडों तरुण कार्यकर्त्यांनाहि कॉंग्रेसची संघटना व तिचें लढ्याचें तंत्र निष्प्रभ वाटत होतें. कामगार व शेतकरी वर्गाच्या संघटित शक्ती राष्ट्रीय लढ्यांत आणल्या-खेरीज व स्वातंत्र्य लढ्याचें स्वरूप अधिक क्रान्तिकारी बनविल्याखेरीज, संपूर्ण स्वातंत्र्याचा लढा यशस्वी होणार नाहीं असा निष्कर्ष त्यांनीं काढला होता. आपल्या मार्क्सवादाच्या अध्ययनांतून ते हेंहि शिकले होते कीं वसाहतींतील जनतेला संपूर्ण राजकीय स्वातंत्र्य मिळेपर्यंत साम्राज्यसत्तेविरुद्ध एक राष्ट्रीय क्रान्तिकारी आघाडी निर्माण करणें हेंच समाजवाद्यांचें आद्य कर्तव्य आहे. आपल्या आर्थिक लढ्यांसाठीं संघटित होणाऱ्या ट्रेड–युनियन्सनींहि हाच राजकीय दृष्टिकोण अंगीकारला पाहिजे. तेव्हां तुरुंगांतून बाहेर आल्यावर या युवकांनीं स्थापन केलेला समाजवादी पक्ष कॉंग्रेसान्तर्गत राहाणार होता व कामगार, शेतकऱ्यांच्या वर्गीय संघटना उभारून त्यांनाहि तो साम्राज्यशाही-विरोधी कॉंग्रेसच्या झेंड्याखालीं आणणार होता. या वर्गीय संघटनांना कॉंग्रेस-मध्यें सामुदायिक सभासदत्व मिळावें अशी खटपटहि पक्षानें केली पण त्यांत त्यांना यश आलें नाहीं. प्रभावी ट्रेड युनियन चळवळ हिंदुस्थानांत उभारण्या-साठीं कामगारवर्गात व कामगार संघटनांत ऐक्य घडवून आणणें व समाजवादी चळवळींत एकजूट घडवून आणून कॉंग्रेसचें धोरण अधिकाधिक क्रान्तिप्रवण बनविणें हीं दोन प्रमुख उद्दिष्टें यावेळीं समाजवादी पक्षापुढें होतीं.

पक्षांतील ट्रेड युनियन कार्यकर्त्यांनीं मवाळांचें नॅशनल फेडरेशन ऑफ ट्रेड युनियन कॉंग्रेस व कम्युनिस्टांची लाल बावटा ट्रेड युनियन यांच्या ऐक्याचे प्रयत्न हातीं घेतले. प्रथम कम्युनिस्टांनीं विरोध केला पण १९३५ च्या सातव्या कॉंग्रेसमध्यें डिमिट्राव्हनें ट्रेड युनियन एकजुटीची घोषणा केल्यावर हिंदी कम्युनिस्टांचा विरोधहि मावळला. हिंदुस्थानांतील समाजवाद्यांच्या एकच पक्ष निर्माण करण्याच्या उद्दिष्टानुसार, भांडवलदारांचे हस्तक, सोशल फॅसिस्ट म्हणून पक्षाची संभावना होत असतांहि, समाजवाद्यांनीं कम्युनिस्टांना पक्ष-संघटनेंत येण्यास वारंवार आवाहन केलें. प्रथम हा सहकार्याचा हातहि त्यांनीं

झिडकारला. पण पामदत्त व ब्रॅडले यांनीं नव्या धोरणानुसार समाजवादीच नव्हे तर साम्राज्यशाहीविरोधी राष्ट्रीय एकजुटीचा आदेश हिंदी कम्युनिस्टांना दिल्यावर समाजवादी पक्षाकडे व कॉंग्रेसकडे ते नव्या दृष्टिकोणांतून पाहूं लागले. समाजवाद्यांत वाढतें ऐक्य झाल्याचें समाधान पक्षास मिळालें खरें पण तें ऐक्य पुनः आत्यंतिक धोरण स्वीकारतांना वाढत्या शक्तींसह बाहेर पडण्याच्या व दोस्त संघटना आंतून पोखरण्याच्या आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट शिरस्त्यानुसार घडून आलें होतें; ऐक्याच्या प्रामाणिक भुकेंतून नव्हे हें हिंदी समाजवाद्यांस नव्यानें शिकावयाचें होतें. रशियन शासनसंस्थेकडेहि एक पुरोगामी शक्ति म्हणून पक्षांतील कार्यकर्ते पाहात असल्यामुळें या धोक्याकडे त्यांनीं काणाडोळा केला. १९३८ च्या लाहोर पक्षपरिषदेपर्यंत पक्ष–संघटना आंतून पोखरण्याचे पद्धतशीर प्रयत्न कम्युनिस्ट करीत आहेत याचा पुरावा पक्ष नेत्यांच्या हातीं पडला होता पण कम्युनिस्टांची पक्षांतून संपूर्ण हकालपट्टी करण्यास अजून दोन वर्षांचा काल मध्यंतरीं जाणार होता.

दुसऱ्या महायुद्धाच्या सुरवातीपासूनच हिंदी समाजवादी पक्ष वसाहतींतील गुलामी जनतेच्या दृष्टीनें हें युद्ध साम्राज्यशाही आहे असा प्रचार करीत होता व कॉंग्रेसनें स्वातंत्र्याचा देशव्यापी लढा हातीं घ्यावा म्हणून दडपण आणीत होता. १९४१ पर्यंत कम्युनिस्टहि हीच भूमिका घेत होते. पण जर्मनीनें रशियावर स्वारी केल्यावर व स्टॅलीन–चर्चिल दोस्तीचा करार झाल्यावर हिंदी कम्युनिस्ट हें युद्ध 'लोकयुद्ध' आहे असा प्रचार करूं लागले व प्रखर स्वातंत्र्य लढ्याची मागणी करणाऱ्या समाजवादी, बोसवादी, ट्रॉट्स्कीवादी गटास पंचमस्तंभी देशद्रोही म्हणून विरोध करूं लागले. १९४२ च्या स्वातंत्र्य संग्रामांत समाजवाद्यांनीं भूमिगत चळवळींत पुढाकार घेऊन जनतेच्या स्वातंत्र्य प्रयत्नांस साथ दिली, त्यांचें मार्गदर्शन केलें. कम्युनिस्टांचें या काळांतील राजकीय व आर्थिक कामगार संपविरोधी धोरण व स्वयंनिर्णयाच्या बुरख्याआड स्वातंत्र्यविरोधी मुस्लीम लीगला त्यांनीं दिलेला पाठिंबा या गोष्टी त्यांच्या ध्येयच्युतीची परमोच्च साक्ष देतात. १९४७ सालीं हिंदुस्थान स्वतंत्र झाल्यावर हिंदी समाजवादी

चळवळीच्या नव्या पर्वास प्रारंभ झाला. स्वातंत्र्यवादी चळवळीचें मूर्तस्वरूप बनलेली काँग्रेस सत्ताधारी पक्ष बनली होती. धनिक वर्गाचें वाढतें प्रभुत्व तिच्या धोरणांतून व्यक्त होऊं लागलें होतें. अशा परिस्थितींत समाजक्रांतीच्या ध्येयास व संघटनेस वाहिलेल्या समाजवादी चळवळीस काँग्रेसमध्यें राहणें अशक्य बनलें. मार्च ११४८ च्या नाशिक पक्ष परिषदेंत समाजवादी काँग्रेसपासून अलग झाले व राष्ट्राच्या राजकारणांत विरोधी भूमिका त्यांनीं घेतली. तसेंच कामगार व शेतकऱ्यांच्या हितरक्षणासाठीं त्यांच्या वर्गीय संघटना मजबूत करण्याकडे पक्ष अधिकाधिक लक्ष पुरवूं लागला. या संघटनांनीं समाजवादी चळवळीस शक्ति-पुरवावी व समाजवादी पक्षाचें धोरण निश्चित करण्यांत सहभागी व्हावें या उद्देशानें पाटणा अधिवेशनांत पक्षाची घटना बदलण्यांत आली व वर्गसंघटनांना सामुदायिक सभासदत्वाचा हक्क देण्यांत आला.

युद्धोत्तर काळांतहि हिंदी कम्युनिस्ट चळवळ आंतरराष्ट्रीय चळवळीचा अविभाज्य घटक म्हणूनच काम करीत आहे हें तिच्या धोरणांवरून सिद्ध झालें. प्रथम नेहरूसरकारला कम्युनिस्टांनीं पाठिंबा दिला. पण कोमिन्फर्म स्थापन होऊन झॅडनाव्ह धोरणानुसार कम्युनिस्ट शक्तींनीं आंतरराष्ट्रीय चढाईचें धोरण स्वीकारल्यावर फेब्रुवारी १९४८ मधील दुसऱ्या हिंदी कम्युनिस्ट काँग्रेसनें त्या धोरणाची अम्मलबजावणी करण्याचा निर्णय घेतला. पी. सी. जोशींचें नेतृत्व झुगारून रणदिवे गट अधिकार पदावर चढला. कामगारांचे सार्वत्रिक संप, तेलंगण पद्धतीचे शेतकरी उठाव, सर्वत्र तुरुंगांतील कम्युनिस्ट कैद्यांचे झगडे या धोरणाचेंच प्रतीक होतें. या हिंसक अत्याचारी धोरणाच्या अम्मलबजावणींत हिंदी कम्युनिस्ट चळवळीच्या ठिकऱ्या उडाल्या. १९५० च्या शेवटीं पक्षाच्या पॉलिट ब्यूरोनें पक्ष—सभासदांस उद्देशून काढलेल्या गुप्त पत्रकांत हिंदी कम्युनिस्ट चळवळ तात्त्विक, संघटनात्मक व आर्थिक या तीन्ही आघाड्यांवर आज छिन्नविछिन्न झाली आहे अशी स्पष्ट कबुली देण्यांत आली आहे. १९४२ च्या क्रांति—आंदोलनांत जनतेपासून व रणदिवे धोरणाच्या काळांत व्यापक कामगार व शेतकरी चळवळींतून दूर फेंकले गेलेले कम्युनिस्ट पुनश्च संयुक्त आघाडीच्या

घोषणेखालीं पुनर्संघटित होऊं पाहात आहेत. पण हिंदी समाजवादी पक्ष या एकजुटीच्या घोषणेस फसण्याची शक्यता आतां राहिलेली नाहीं. चिनी कम्युनिस्टांचा विजय, बलवत्तर रशियन सत्तेचा आशीर्वाद व हिंदी सरकारचें अधूनमधून साहाय्यक परराष्ट्रीय धोरण यामुळेंच हिंदी कम्युनिस्ट चळवळ आज तग धरून आहे; अन्यथा हिंदी समाजवादी चळवळीच्या इतिहासांतून तिचें कायमचें उच्चाटन झालें असतें.

जागतिक समाजवादी चळवळीच्या डोळस अभ्यासांतून हिंदी समाजवादी चळवळीनें आज आपलें ध्येय, धोरण व कार्यक्रम निश्चित केला आहे. लोकशाहीचें अधिष्ठान नसलेलें समाजवादी तत्त्वज्ञान समाजवादी असूंच शकत नाहीं अशी तिची श्रद्धा आहे. पण त्याचबरोबर लोकशाहीपद्धत व प्रथा याहून जनतेच्या स्वयंस्फूर्त स्वातंत्र्य व समतेच्या प्रेरणा जिवंत ठेवणें अधिक मोलाचें आहे ही गोष्ट ती कदापिहि विसरूं शकत नाहीं. म्हणूनच आपल्या कार्यक्रमांत विधायक कार्य व शांततामय प्रतिकारास तिनें अग्रस्थान दिलें आहे. राजकीय वा आर्थिक केन्द्रीकरण लोकशाहीस बाधक ठरतें हा इतिहासांतील अनुभव जमेस धरून सत्तेच्या विकेन्द्रीकरणाचें व सहकारी उत्पादन प्रयत्नांचें तत्त्व आज ती प्रचारीत आहे. अमेरिका व रशिया यांच्या जागतिक सत्ता संघर्षापासून दूर राहून आशियाई राष्ट्रें व जनता यांची स्वतंत्र व कार्यक्षम तिसरी आघाडी निर्माण करण्याच्या धोरणाचा ती पुरस्कार करीत आहे. या दोन्ही राष्ट्रांच्या सहकार्याच्या अभावीं वा विरोधांतूनहि राष्ट्राचें सामाजिक व आर्थिक पुनर्संघटन ती करूं शकेल कीं नाहीं व त्या मार्गें आशियांतील इतर राष्ट्रांपुढें नवा आदर्श ठेवूं शकेल कीं नाहीं यावरूनच तिचें यशापयश निश्चित होणार आहे.



: २२ :

# आंतरराष्ट्रीय समाजवादाचें भवितव्य

आजचें जग भौगोलिक व नैसर्गिक संपत्तीच्या दृष्टीनेंच नव्हे तर राजकीय, आर्थिक व सामाजिक दृष्टीनेंहि विषमतासंपन्न आहे. तेव्हां एकजीव मानव समाज, त्याचें विश्वराज्य व विश्वसंस्कृति निर्मू मागणाऱ्या प्रत्येक व्यक्ति, पक्ष, राष्ट्र, तत्त्वज्ञान वा चळवळीची मनोधारणा समताभावी व सहकारनिष्ठ असणें क्रमप्राप्त आहे. आजमितीसहि आफ्रिका खंडांतील व जगाच्या इतर कांहीं कानाकोपऱ्यांतील कोट्यवधि जनता राजकीय गुलामगिरी अनुभवीत आहे. दुसऱ्या महायुद्धानंतर आशियांतील अनेक राष्ट्रांना राजकीय स्वातंत्र्य लाभलें. पण हीं नवीं राष्ट्रें अमेरिका व रशिया यांच्या युद्धोत्तर जागतिक सत्ता संघर्षाच्या कालखंडांत उदयाला आलीं असल्यामुळें आपले पुनर्संघटनेचे व परराष्ट्रसंबंधाचे प्रश्न स्वातंत्र्याच्या भूमिकेंतून हाताळणें त्यांना कठिण जात आहे. दुसऱ्या महायुद्धानंतर जगांत शान्तता व स्थैर्य निर्माण करण्याचा, एक जागतिक घडी बसविण्याचा, प्रयत्न युनोची स्थापना करून करण्यांत आला. पण त्याचा पाया बड्या राज्यसत्तांमधील मतैक्याचा होता. लहानांतल्या लहान स्वतंत्र राष्ट्राच्या समान प्रतिष्ठेवर युनोची उभारणी झाली नाहीं. ज्यांनीं ही घडी बसविण्यांत पुढाकार घेतला त्या मोठ्या राष्ट्रांनींहि आपलें सार्वभौमत्व या संस्थेच्या

हवालीं करून तिला सार्वभौम बनविलें नाहीं. अखेर बड्या राष्ट्रांतील मतैक्य भंगल्यावर त्या पायावर उभारलेली युनोची घडीहि विसकटली. छोट्या राष्ट्रांना बड्यांनीं बसविलेल्या या घडीबद्दल स्वयंस्फूर्त आपुलकी असण्याचें कारणच नव्हतें. गुलाम राष्ट्रांना व जनतेला स्वातंत्र्य मिळवून देण्यास युनो बांधलेली नसल्यामुळें त्यांनाहि तिच्या भवितव्याबदल पर्वा असण्याचें कारण नव्हतें. तेव्हां हा प्रयोग सलोख्यानें विश्वराज्य निर्माण करण्यास असमर्थ ठरला आहे.

या राजकीय वा राष्ट्राराष्ट्रांतील विषमतेहून जगांतील निरनिराळ्या राष्ट्रांतील मानवी समूहांतील आर्थिक विषमता अधिक भयावह बनली आहे. पुढारलेल्या राष्ट्रांतील मानवी समाजांत अंतर्गत सांपत्तिक विषमता आहेच पण या औद्योगिक राष्ट्रांतील जनता व मागसलेली उत्पादन व्यवस्था असलेल्या आशिया–आफ्रिकेंतील जनता यांच्या उत्पादनक्षमतेमध्यें आज भीषण तफावत दिसून येते. त्यांना मिळणाऱ्या श्रमाच्या मोबदल्याचें प्रमाण ढोबळ मनानें २०:१ आहे. जोंपर्यंत या जनतेचें राहाणीचें मान किमान आवश्यक पातळी गांठणार नाहीं व आपली उत्पादनक्षमता वाढविण्यासाठीं अनुरूप उत्पादन साधनें तिच्या हातीं येणार नाहींत तोंपर्यंत श्रमाचा वाढता मोबदला तिला मिळणार नाहीं. तिची भौतिक, शैक्षणिक, सांस्कृतिक पातळी उंचावणार नाहीं. या पुढारलेल्या राष्ट्रांतील जनतेबरोबर एकाच बैठकीवर ती येऊन बसूं शकणार नाहीं. पश्चिम युरोपांतील साम्राज्यशाही राष्ट्रांच्या औद्योगिक भरभराटीस वसाहतींचें अर्थशोषण उपयुक्त ठरलें. विपुल भौगोलिक संपत्ति व दोन महायुद्धांतून हातीं आलेलें राजकीय नेतृत्व अमेरिकन भांडवलशाहीच्या मदतीस आलें. तर रशियन राज्यक्रान्तीनंतर भांडवलशाही युरोप व अमेरिकेइतकी यांत्रिक व औद्योगिक भरभराट करण्याच्या व आपल्या राजसत्तेचें सामर्थ्य वाढविण्याच्या जिद्दींतून, सक्तीचें सामुदायिक शेती उत्पादन आरंभून व राजकीय विरोधक, देशोधडीस लागलेले लक्षावधि शेतकरी, रशियांतील अनेक असंतुष्ट राष्ट्रिक जमाती व युद्धकैदी यांना सक्तीच्या श्रमाला जुंपून, रशियन कम्युनिस्ट सत्ताधाऱ्यांनीं औद्योगीकरणाचें कार्य पुढें नेलें. दुसऱ्या महायुद्धानंतर तिच्या

प्रभावळींत सांपडलेलीं पूर्व युरोपांतील राष्ट्रें आज त्याच तंत्राचा अवलंब करीत आहेत व चीनमध्यें सत्तारूढ झालेली कम्युनिस्ट सत्ता कमीअधिक वेगानें त्याच तंत्राची अम्मलबजावणी करणार आहे. रशियाच्या जागतिक सत्तासंघर्षांच्या डावांत सामील होऊन आपलीं मोहोरीं हलविणाऱ्या चीनला दुसरें तंत्र अवलंबिणें आतां अशक्य आहे. राष्ट्राचें लष्करीकरण ती किंमत मोजून घेतल्याशिवाय राहाणार नाहींत.

शंभर कोटींहून अधिक प्रजा असलेल्या चीन सोडून इतर आशियाई राष्ट्रांना व उद्यां स्वतंत्र होणाऱ्या आफ्रिकेलाहि आपली आर्थिक भरभराट करावयाची आहे. जनतेचें राहाणीचें मान वाढवावयाचें आहे. सामाजिक व आर्थिक समता निर्मावयाची आहे. एक तर श्रमिकांचें अर्थशोषण करणाऱ्या भांडवलशाही मार्गानें अगर सक्तीच्या श्रमाच्या कम्युनिस्ट मार्गानें हा प्रश्न हीं राष्ट्रें सोडवूं शकतील; पण तो मार्ग स्वातंत्र्य व समतानिष्ठ नाहीं व समाजवादी तर नाहींच नाहीं. अमेरिका व रशिया यांच्या सत्तासंघर्षांत, या वा त्या गटांत सामील होऊन त्यांच्या कलानुसार व गरजांनुसारें हें कार्य हीं राष्ट्रें पुरें करूं शकतील; पण त्यामध्यें त्यांच्या नवोदित वा गर्भित स्वातंत्र्यालाच नख लागेल. भांडवलशाही अमेरिका व कम्युनिस्ट रशियाखेरीज कांहीं युरोपीय राष्ट्रांत आज समाजवादी सरकारें वा समाजवादी चळवळीहि आहेत. पण हा युरोपीय समाजवादहि या शंभर कोटींहून अधिक जनतेचे हे प्रश्न सोडविण्यास आज अपुरा पडणार आहे. एक तर स्वसंरक्षणासाठीं व स्वराष्ट्रांतील युद्धोत्तर आर्थिक पुनर्संघटनेसाठीं आज अमेरिकन गटांशीं त्यानें सहकार्य केलें पाहिजे अगर बुद्ध्या आपल्या जनतेचें राहाणीचें मान कमी केलें पाहिजे; साम्राज्यशाही परराष्ट्रीय धोरण व अर्थशोषण संपूर्ण झुगारून दिलें पाहिजे; आज अनेक गुंतागुंतीच्या कारणास्तव हा मार्ग युरोपीय समाजवादी घेऊं शकत नाहींत. सारांश, स्वातंत्र्य व समाजवादी निष्ठेशीं प्रामाणिक राहावयाचें तर आशिया व आफ्रिकेतील या राष्ट्रांना व जनतेला स्वतंत्र मार्गानें व स्वशक्तीवरच आपल्या सामाजिक व आर्थिक समस्या सोडवाव्या लागतील

व जोंपर्यंत त्या सुटणार नाहींत तोंपर्यंत विश्वसंस्कृति व विश्वराज्य या फक्त भव्य कल्पनाच राहतील. त्या साकार बनणार नाहींत.

तेव्हां आजमितीस तरी जग या तीन स्थूल गटांत विभागलें गेलें आहे. आशियाई गटास आपल्या समस्या सोडवावयाच्या तर जी शान्तता व स्वातंत्र्य हवें आहे तें दुसऱ्या दोन गटांपैकीं या वा त्या गटांत सामील होऊन लाभणार नाहीं. जनतेच्या उपक्रमशीलतेंतून, स्वयंस्फूर्त त्यागांतून व सहकार्यांतून, विधायक सामुदायिक श्रमप्रयत्नांतून व राजकीय व सामाजिक जागृतींतून हीं राष्ट्रें जेव्हां आपल्या स्वतःच्या राष्ट्रांत स्वयंपूर्ण व सहकारी समाजवादी अर्थव्यवस्था निर्माण करण्यांत यश मिळवितील व आपल्या गटांतील इतर राष्ट्रांस हें यश मिळविण्यांत सहकार्य देतील तेव्हांच जगाच्या राजकारणांत कांहीं स्वतंत्र भूमिका पार पाडणें या गटांतील राष्ट्रांस शक्य होईल. तोंपर्यंत दुसऱ्या दोन गटांच्या सत्तासंघर्षांत त्यांनीं केलेला हस्तक्षेप संधिसाधु, वांझ अगर आळीपाळीनें एका व दुसऱ्या गटास खुष करण्याचें धोरण अवलंबिल्यामुळें त्या संघर्षांत तेल ओतणाराच ठरेल. म्हणूनच आजमितीस तरी आपल्या अंतर्गत प्रश्नांवर सर्व लक्ष व सामर्थ्य केन्द्रित करणें हेंच या गटांतील समाजवादी चळवळींचें प्रमुख कार्य आहे. जागतिक सत्तासंघर्षाची परिणति तिसऱ्या मानवसंहारक महायुद्धांत होण्यापूर्वी जर या कार्यांत कांहीं भरीव यश या समाजवादी चळवळींना आलें तर त्या भरीव यशाच्या बळावरच हें संकट टाळलें जाण्याची थोडीफार संभाव्यता आहे. अमेरिका व रशिया या दोन गटांतील जागतिक सत्ताप्रभुत्वाच्या शीत युद्धाचा एक भाग म्हणून कोरियांत छोटेखानी सशस्त्र युद्धहि सुरू झालें आहे. हें युद्ध भीषण स्वरूप धारण करून तिसऱ्या महायुद्धांत जग केव्हां सांपडेल कोण जाणे. पण त्या युद्धांत भांडवलशाही अमेरिका यशस्वी झाला तर युद्धोत्तर शान्ततेंतून समाजवादी जग निर्माण होईल अशी आशा करणें वेडेपणाचें ठरेल. त्याचप्रमाणें कम्युनिस्ट रशियाचा जय झाला तरी त्यांतूनहि आंतरराष्ट्रीय समाजवादी क्रान्तीचें ऐतिहासिक कार्य पुरें होण्याची मुळींच शक्यता नाहीं. मग जगांत समाजवादी समाजरचना निर्माण होणें दूरच

राहो. १९२४ पासून सोव्हिएट रशियाचें संरक्षण म्हणजेच समाजवादाचें व कामगारवर्गाचें संरक्षण अशी श्रद्धा कम्युनिस्ट चळवळीनें घेतली आहे. उद्यांच्या महायुद्धांत सोव्हिएट रशियाचा जय म्हणजेच आंतरराष्ट्रीय समाजवादाचा विजय अशी घोषणाहि जगभर कम्युनिस्ट चळवळ करील. पण तो विजय ना सोव्हिएट्सचा होणार आहे ना समाजवादाचा. ज्या रशियन क्रान्तीचें कार्य कामगार, सैनिक, शेतकऱ्यांच्या सोव्हिएट्सनीं पुरें केलें व क्रान्तीनंतर जीं ही सोव्हिएट्स सत्तेचीं केन्द्रें बनलीं त्यांचें पोषण व संवर्धन करण्याऐवजीं, त्या सोव्हिएट्सभोंवतीं समाजव्यवस्था गुंफण्याऐवजीं, त्या सर्व सोव्हिएट्सवर, सहकारी संस्थांवर व ट्रेड युनियन संघटनांवर, सत्ताधारी रशियन कम्युनिस्ट पक्षानें सर्वंकष हुकुमशाहीचें प्रभुत्व स्थापन केलें. शासनसंस्था लुप्त होण्याऐवजीं त्यांची उपक्रमशीलता व स्वतंत्र जीवन मात्र शासनसंस्थेनें नष्ट केलें.

'आधीं सत्ता मग समाजपुनर्संघटनेचा विचार' या दृष्टिकोणांतून काम करणाऱ्या मार्क्सवादी समाजवादी पक्षांनीं व चळवळींनीं क्रान्तिपूर्वकालांत नव्या समाजपेशींचें संवर्धन करण्याचे, उत्पादन, विनिमय व उपभोग आदि जीवनाच्या सर्व अंगांना व्यापणारे नव्या प्रकारचे सहकारी संघ त्याभोंवतीं गुंफलेलें सामूहिक जीवन निर्माण करण्याचे, फारसे प्रयत्न कधींच केले नाहींत. क्रान्तीसाठीं व क्रान्तींत ज्या समाजसंघटना निर्माण झाल्या त्या राष्ट्राच्या पुनर्संघटनेचें कार्य पुरें करण्यास असमर्थ ठरल्या व अखेर त्यांच्या नांवानें सत्ताधारी वर्गानें सर्वंकष केन्द्रीय हुकुमशाही राज्यव्यवस्था निर्माण केली. आज तेथील जनता सत्ताधारी वर्गाच्या अनुमति व प्रोत्साहनाशिवाय कोणताहि नवा उपक्रम हातीं घेण्यास उत्सुक नाहीं अगर सत्ताधारी वर्गाचें अमूक एक धोरण वा उत्पादन योजना चुकीची आहे असें म्हणण्याचें स्वातंत्र्य आज तिला राहिलेलें नाहीं. सर्व जगाची सत्ता रशियन कम्युनिस्टांच्या हातीं आली तरी गेलीं ३०–३५ वर्षें राज्यकर्त्या वर्गाच्या चेहऱ्याकडे पाहून हंसण्यास, गंभीर होण्यास, कामांत उत्साह दाखविण्यास अगर विरोध करण्यास शिकलेली जनता एकदम स्वयंभू व स्वच्छन्द जीवन जगूं लागेल ही कल्पना स्वप्नवाद्यांनाहि लाजविणारी ठरेल.

जगाची सत्ता हातीं आली तर जागतिक हुकुमशाही निर्माण करण्याची यंत्रणा आज रशियाजवळ असेलहि; पण समाजवादी समाजजीवन समृद्ध व सुसंघटित करण्याची कला, ती उपक्रमशीलता व त्या उत्स्फूर्त प्रेरणा आज कम्युनिस्ट चळवळींत राहिलेल्या नाहींत. मागसलेल्या राष्ट्रांचें 'विशिष्ट पद्धतीनें' औद्योगीकरण व आधुनिकीकरण करणें हेंच तिचें ऐतिहासिक कार्य बनून गेलें आहे. ही 'विशिष्ट पद्धति,' उत्पादनाच्या वाढत्या केन्द्रीकरणावर, समाजाच्या एका विभागाच्या श्रमशक्तीचें जबरदस्त हुकुमशाही दंडशक्तीनें सक्तीचें शोषण करून होणाऱ्या धनसंचयावर, अवाढव्य नोकरशाहीवर व एकपक्षीय राजकीय हुकुमशाहीवर आधारलेली आहे. समाजाला जागतिक सत्तासंघर्षाचें एक प्रभावी शस्त्र बनविण्याची जिद्द त्यामागें आहे. तेव्हां आशिया व आफ्रिकेंतील जनतेनें या पद्धतीनें आपल्या समस्या आपणांस सोडविणें आहे कीं नाहीं याचा ठाम निर्णय एकदां मनाशीं घेतला पाहिजे. या राष्ट्रांतील समाजवादी चळवळींनीं जनतेला योग्य निर्णयाप्रत पोहोंचण्यास मदत केली पाहिजे.

धर्मस्वातंत्र्य, विचारस्वातंत्र्य व व्यवसायस्वातंत्र्याच्या चळवळींतून समाजवादी विचार व चळवळीची पार्श्वभूमि निर्माण झाली. खाजगी मालकी व्यवस्थेवर व आर्थिक विषमतेवर चढविलेल्या प्रखर हल्ल्यांतून व समतेच्या प्रेरणेंतून समाजवादी विचार व चळवळ समृद्ध झाली. औद्योगिक क्रांतींतून या विषमतेचें स्वरूप अधिक भीषण बनलें तेव्हां कांहीं कल्पनावादी समाजवादी पुनश्च नैसर्गिक सामुदायिक समाजजीवनाकडे चला म्हणून जनतेस आर्जवूं लागले; तर कांहीं कल्पनावाद्यांनीं जनतेचें राहाणीचें मान उंचावणाऱ्या या उत्पादन व्यवस्थेचा पुरस्कार केला. मात्र ती विषमता नष्ट करण्यासाठीं जसें उत्पादन सामुदायिक बनलें आहे त्याचप्रमाणें उत्पादन साधनांची मालकी व वांटपहि सामुदायिक बनविण्यासाठीं आग्रह धरला. मार्क्सवाद्यांनीं वर्गयुद्धाची शक्ति या विचाराच्या पाठीशीं उभी करून ही मालकी प्रस्थापित करण्यासाठीं क्रांतिद्वारां राज्यसत्ता ताब्यांत घेण्याचें उद्दिष्ट समाजवादी चळवळीपुढें ठेवलें. पण राज्यसत्ता ताब्यांत येऊन शासन संस्थेची मालकी जरी प्रस्थापित झाली तरी राज्य-

सत्तेची मालकी व उत्पादक समाजाची सामाजिक मालकी एक नव्हेत हें कटुसत्य अजून समाजवादी चळवळी पूर्णांशानें शिकलेल्या नाहींत. राजसत्तेच्या मालकींतून आर्थिक समताहि निर्माण होतेच असें नाहीं हें रशियाच्या प्रयोगां-वरून आज सिद्ध झालें आहे. जनतेचें राहाणीचें मान वाढविण्याच्या हव्यासांत तिचें स्वातंत्र्य व उपक्रमशीलता नष्ट होत असेल व सामाजिक मालकी स्थापन करण्यास ती हतबल बनत असेल तर समाजाचें पुनर्संघटन अधिकार-शाहीच्या वा शास्ता–शासित तत्त्वावर होणें अपरिहार्य आहे. तेव्हां तें स्वातंत्र्य व उपक्रमशीलता नष्ट न होऊं देण्यासाठीं समाजवादी राजसत्तेनें जाणिवेनें आपले अधिकार मर्यादित करून घेतले पाहिजेत; कमींत कमी निर्णय स्वतः घेतले पाहिजेत व जनतेच्या मनांतील विकल्पाला व विरोधाला विधायक वाट काढून दिली पाहिजे. पण कम्युनिस्ट राजसत्तांनीं हा जागरूक प्रयोग कधींच केला नाहीं. जनतानिष्ठ समाजवादी चळवळीस व राजसत्तेस तो करावा लागेल. हा प्रयोग यशस्वी होण्यासाठीं सत्तेचें व उत्पादनाचें वाढतें विकेन्द्रीकरण अपरि-हार्य आहे असा विचार आज समाजवादी चळवळींत जोरानें पुढें येत आहे. सबंध समाज व्यवहाराची प्रेरणा केंद्रीकरणाऐवजीं स्वायत्तता व विकेन्द्रीकरण बनूं पाहात आहे.

एके काळीं व्यक्ति व राज्य यांच्यामध्यें 'पंचायत' जीवनाचा दुवा होता. व्यक्तिधर्म व राजधर्माइतकीच शेजारधर्माची प्रतिष्ठा होती. छोट्या समूह जीवनांत व्यक्तीच्या व्यक्तित्व विकासास सहजसुलभ संधि मिळत होती. आज केन्द्रीय उत्पादनाचा व राज्यव्यवस्थेचा प्रत्येक व्यक्ति एक असहाय दुवा बनली आहे. ज्या 'राजकारणातीत' स्थानिक व प्रान्तीय संस्था आज अस्तित्वांत आहेत त्याहि केन्द्रीय राजसत्तेचें धोरण व आदेश खालपर्यंत नेऊन पोहोंचविण्याची माध्यमें बनल्या आहेत. साध्यासुध्या समाज व्यवहारांतहि व्यक्ति आज प्रतिनिधींमार्फत अगर पक्ष सभासदांमार्फत बोलते. कोणत्याच समाज व्यवहारांत प्रत्यक्ष निर्णय घेण्याचें कार्य ती सतत करीत नाहीं; फक्त निर्णयाच्या अम्मल-बजावणीचें कार्य करते. तेव्हां व्यक्तीचा सहजसुलभ विकास शक्य करणाऱ्या व

तिच्या सर्वांगीण जीवनाला स्पर्श करणाऱ्या अशा समूहांच्या स्वयंस्फूर्त व स्वाभाविक एकत्रीकरणांतूनच नवसमाजरचनेचा प्रयोग झाला पाहिजे; तरच अधिकारशाही-शिवाय समाजधारणा शक्य बनेल. हा प्रयोग सत्ता हातीं आल्यावर सुरू करूं ही सदोष कम्युनिस्ट विचारसरणी समाजवादी चळवळीनें झिडकारून दिली पाहिजे. आपल्या ट्रेड युनियन्स, सहकारी संस्था, शेतकरी पंचायती, व्यवसाय संघटना केवळ सत्तासंघर्षाचीं हत्यारें न बनतां, नवसमाजरचनेचीं उद्दिष्टें कार्यान्वित करणारीं सामूहिक जीवनाचीं प्रात्यक्षिकें बनतील व असंघटित समाजास त्यांच्या-बद्दल आकर्षण निर्माण होईल तरच एक दिवस त्या प्रतिसत्ता बनून राजसत्तेची अदलाबदल कमींतकमी संघर्षानें घडून येईल. त्या क्रान्तिप्रयोगांत सातत्य राहील. जनतेच्या सहकार्यांत खंड पडणार नाहीं. कम्युनिस्ट अगर समाजवाद्यांनीं सत्ता हातीं घेणें म्हणजे समाजक्रांति नव्हे हा समाजवादाचा प्राथमिक धडा समाजवादी चळवळीनें पुनश्च गिरविण्याची वेळ आज आली आहे.

या दृष्टिकोणांतून समाजवादी चळवळींचें अवलोकन केलें तर जगांत समाजवादी समाजरचना निर्माण होण्यास अजून फार कालावधि लोटावयाचा आहे. हिंदी समाजवादी चळवळ आपलें उद्दिष्ट व कार्य या नव्या दृष्टींतून आज अभ्यासत आहे; कार्यान्वित करूं मागत आहे. जनतेवरील नितान्त श्रद्धा, तिची उत्स्फूर्त क्रियाशील भावना, तिची विधायक उपक्रमशीलता व सामूहिक जीवनांत स्वातंत्र्य व समतेची तिला होत जाणारी अनुभूति हेंच आशियाई राष्ट्रांचें सामाजिक व आर्थिक पुनर्रचनेचें भांडवल आहे. आशियांतील समाजवादी चळवळ या प्रेरणा जितक्या प्रमाणांत समाजांत जागृत करील तितक्या प्रमाणांत, जागतिक सत्तासंघर्षांत भागीदार न होतां, कोणाच्याहि शोषणावर आपल्या भरभराटीचे इमले न चढवितां व कोणाच्याहि मदतीवर विसंबून न रहातां, हा शंभर कोटी मानवांचा समाज उन्नत होईल. शांतता, समता व विश्वबंधुत्वासाठीं भुकेलेल्या जगाच्या दुसऱ्या दोन विभागांतील जनतेला तो प्रेरक ठरेल.

विश्वराज्य व विश्वसंस्कृति अखेर जगांतील बहुसंख्य जनतेच्या मनांत

सहोदर भावना जागृत होईल तेव्हांच निर्माण होईल. एकाद्या सम्राटानें अगर हुकुमशहानें जगावर आधिपत्य करून ती भावना जनतेंत निर्माण होणार नाहीं. आज ही भावना कांहीं ध्येयवादी व स्वप्नवादी हृदयांतून ओसंडत असली तरी तिनें कोट्यवधि मानवांचीं मनें भारून टाकलेलीं नाहींत. समाजवादी विचार व चळवळी गेलीं दोनशें वर्षें या भावनेचा उच्चार करीत आहेत. समाजवादाची आंतरिक श्रद्धा आंतरराष्ट्रीयच आहे. पण जोंपर्यंत प्रत्यक्ष समाजजीवनांत गुलामी, विषमता व उच्चनीचता आहे तोंपर्यंत निरनिराळ्या राष्ट्रांतील मानवांत परस्पर आदर व सहकारभावना निर्माण होणार नाहीं. जोंपर्यंत राष्ट्रविशिष्ट सार्वभौमत्व नष्ट होणार नाहीं तोंपर्यंत विश्वराज्य संघटित होणार नाहीं. जोंपर्यंत आशिया व आफ्रिकेंतील शंभर कोटी मानव स्वयंपूर्ण व स्वयंप्रकाशित समाज-जीवनाची वाट चालूं लागणार नाहींत तोंपर्यंत त्यांच्या शब्दाची प्रतिष्ठा आधुनिक जगांत निर्माण होणार नाहीं. मानववंशाच्या विकासक्रान्तीच्या आजच्या ऐतिहासिक कालखंडांत जर नजिकच्या भविष्यकालांत आंतरराष्ट्रीय सहकार्य निर्माण झालें नाहीं व साधीसुधी माणुसकीची भावना विश्वव्यापी बनली नाहीं तर तो वंश पुनश्च प्राथमिक रानटी अवस्थेप्रत पोहोंचल्याशिवाय राहणार नाहीं हें निःसंशय. या भीषण भवितव्याची व तद्जन्य ऐतिहासिक जबाब-दारीची जाणीव ठेवून तें आंतरराष्ट्रीय सहकार्य घडवून आणण्यांत आजपर्यंत पुढाकार घेतलेल्या समाजवादी चळवळीनें श्रद्धेनें व खंबीरपणें एक एक पाऊल पुढें टाकलें पाहिजे.



# सूचि

